









बंगाल प्रांत आपल्या अमलाखालीं कायमचा यावा या हेतूनें शेरखानानें १५३७ च्या अक्टोबर महिन्यांत त्या प्रांताची राजधानी गौडवर स्वारी केली.

हुमायूनला ही गोष्ट फार उशिरा कळली. तो तर गुजराथ, माळवा वगैरे प्रदेश जिंकल्या नंतर परत येते वेळीं आग्रा येथें भोगविलासांत पडून राहाला. म्हणून त्याचें पूर्वीकडील साम्राज्य शत्रूच्या हातीं गेल्याची बातमी उशिरां कळली.

तो शेरखानाशीं युद्ध करण्यासाठीं डिसेंबर महिन्याच्या दुसऱ्या आठवड्यांत निघाला. तो सरळ गौड येथें गेला नाहीं. त्यानें वाटेंत चुनारच्या किल्ल्याला वेढा दिला. चुनारच्या सैन्यानें मोगलांना सहा महिने अडकवून ठेवलें. शेरखानानें १५३८ च्या एप्रिल महिन्यांत गौड नगर जिंकलें.

बिहार प्रांतांत मान खालीं झाल्यानंतर हुमायून १५३८ च्या जुलाई महिन्यांत गौडला पोंचला तेव्हां शेरखानानें त्याची खोड मोडण्याचा नाद सोडून देऊन बिहार व जोनपूरच्या मोगल प्रांतांवर स्वारी केली व पश्चिमेकडे कनोजपर्यंत चालत गेला.

शेरखानानें पश्चिमेकडील प्रदेशांत जो धुमाकूळ माजविला होता त्याच्या बातम्या हुमायुनच्या कानावर येऊं लागल्या. म्हणून तो सैन्य घेऊन पश्चिमेकडे वळला. वाटेंत दोघांच्या सैन्यांची चकमक उडाली. शेवटीं १५३९ च्या जून महिन्यांत मोगलांच्या सैन्याचा विमोड झाला. हुमायून पळूं लागला तेव्हां त्यानें चुकून गंगेंत उडी मारली तेव्हां एका भिश्त्यानें त्याचा जीव वांचविला.

दिल्लीच्या बादशहाचाच पराभव झाल्या वर शेरखानाच्या अमलाखालीं आसामच्या पश्चिमे कडील पर्वतांच्या रांगेपासून पूर्वेकडे चिटगांव पर्यंत व दक्षिणेकडे बंगालच्या आखातापर्यंतचा मुलुख आला. त्यानें आपल्या नांवाचीं नाणीं पण पाडलीं.

दुसऱ्या वर्षी हुमायूननें आपलें राज्य परत मिळविण्यासाठीं प्रयत्न केला. त्यानें आपल्या भावांकडे मदत मागितली. परंतु त्याला मिळाली नाहीं.

१७ मे १५४० या रोजीं कनोज नजीक मोगल व अफगाण सैन्यांचें युद्ध झालें व त्यांत अफगाण सैन्यालाच जय मिळाला. हुमायूननें कसाबसा आपला जीव वांचविला. अशा तऱ्हेनें बाबरनें मिळविलेलें हिंदुस्थानाचें राज्य पुन्हां अफगाणांच्या हातीं गेलें. त्यानंतर हुमायूनला पंधरा वर्षे स्वतःचें घर सोडून परक्यांचा आश्रय मागीत हिंडत फिरावें लागलें.



त्या परिस्थितींतहि बाबरच्या इतर मुलांनीं हुमायूनला मदत केली नाहीं. हुमायूननें लाहोरला जाऊन त्यांची मदत मागितली, पण त्या प्रयत्नांतहि यश मिळालें नाहीं.

ही संधी साधून शेरशाहनें आपला राज्यविस्तार केला. त्यानें पंजाबचा कांहीं भाग जिंकला. १५४२ मध्यें रजपुतांशीं युद्ध करून त्यानें माळवा प्रांत आपल्या राज्याला जोडला. मध्य भारतांत रायसीनचा किल्ला सर करण्यासाठीं त्यानें १५४३ मध्यें किल्ल्याला वेढा दिला. तेथील सैन्यानें किल्ल्याच्या रक्षणार्थ कित्येक दिवस शत्रूला तोंड दिलें. पण शेवटीं त्यांना शस्त्र खालीं ठेवावें लागलें. रजपुतांनीं माळव प्रांत सोडून जाण्याचें वचन देऊन किल्ला सोडला. पण अफगाणांनीं मात्र वचन दिल्याप्रमाणें रजपुतांना निर्विघ्न जाऊं दिलें नाहीं. बायकामुलांच्या रक्षणार्थ रजपुतांना प्राणाहुती द्यावी

लागली. शेरशाहच्या चरित्रावर हा एक कलंक कायमचा राहून गेला.

पंजाबमध्यें शेरशाहच्या सुभेदारानें सिंध व मुलतानचीं राज्यें अफगाणांच्या अमलाखालीं आणलीं. आतां शेरशाहचा शत्रु असा मारवाडचा राजा मालदेव फक्त एकच उरला होता. तो युद्धकलेंत शेरशाहच्या बरोबरीचा होता. त्याच्या राज्याचें क्षेत्रफळ दहा हजार वर्गमैल होतें. मालदेवानें ज्या राजपुतांचा पराभव केला होता त्यांना आपल्याकडे मिळवून शेरशाहनें मालदेवावर स्वारी केली. मालदेव युद्धाला तयार होताच.

मालदेवाच्या सैन्यांत खळबळ उडवून देण्यासाठीं शेरशाहने एक अफवा पसरवली. त्यानें चिठ्ठ्या लिहून मालदेवाच्या सैन्यांत वांटवल्या कीं कांहीं रजपूत राजघराणीं त्याच्या मदतीस ससैन्य येत आहेत. ही बातमी कळल्यावर मालदेव घाबरला. बाहेरच्या शत्रूशीं युद्ध करून जय मिळविणें त्याला अशक्य नव्हतें. पण फितुरी झाली तर आपल्याला यश मिळणार नाहीं याची त्याला खात्री होती. म्हणून तो स्वतःच्या रक्षणासाठीं सिवनच्या किल्ल्यांत जाऊन लपून बसला. तरी रजपूत सैन्यानें शौर्य दाखवून अफगाण सैन्याशीं युद्ध केलें. परिणामी शेरशाह विजयी झाला तरी सहस्रावधि अफगाण हताहत झाले. साम्राज्याची शक्ति क्षीण झाली. रजपुतांचें देखील या युद्धामुळें फार मोठें नुकसान झालें. उत्तर हिंदुस्तान भर अफगाण सत्ता स्थापन झाली. शेरशाह अजमीर ते आबूपर्यंत कूच करीत गेला व शेवटीं कालिंजरचा किल्ला त्यानें जिंकला. त्याच वेळीं म्हणजे २२ मे १५४५ मध्यें बंदुकीच्या दारूचा बिस्फोट झाल्यानें त्याच अपघातांत तो मरण पावला.



# नेहरू चरित्र



[७]

१९ फेब्रुवारी, १९१५ या रोजीं गोपाळ कृष्ण गोखले यांस देवाज्ञा झाली. त्यामुळें मवाळ पक्षाचें प्राबल्य कमी झालें. गांधीजी दक्षिण आफ्रिकेंतून कांहीं दिवसांपूर्वींच म्हणजे ९ जानेवारी १९१५ या रोजीं स्वदेशीं परत आले. त्यांनीं गोखल्यांना वचन दिल्याप्रमाणें एक वर्षपर्यंत राजकीय कार्यांत भाग घेतला नाहीं.

त्यावेळीं कोठेंच युद्धाच्या तयारीच्या विरुद्ध कोणी बोलत नव्हतें. सरकारनें आरंभिलेल्या नॅशनल डिफेन्स फोर्स मध्यें भर्ती होण्यासाठीं नेहरूंनीं अर्ज केला होता. गांधीजींनीं इंग्रज अधिकाऱ्यांना युद्धाच्या तयारीच्या कामांत सरकारला सर्व प्रकारें मदत करीन असें वचन दिलें होतें. मोतीलालजींच्या पत्नी स्वरूपराणी नेहरू यांच्या प्रमाणेंच कस्तूरबा गांधी यांनीं पण सैन्यांत भर्ती झालेल्यांसाठीं पोशाक तयार केले होते. ३ जून १९१५ या दिवशीं इंग्रजांच्या राजाच्या वाढदिवसा निमित्त वांटलेल्या पदव्यांबरोबर गांधीजींना युद्धप्रसंगीं ब्रिटीश साम्राज्याची सेवा केल्या बद्दल 'कैसरे हिंद' पदक देण्यांत आलें होतें.

हें सर्व जवाहरलालजींची मानसिक अशांति वाढण्यास कारण झालें. तोंपर्यंत समाजवादी विचारसरणीकडे पण त्यांचें लक्ष वेधलें नव्हतें. मनांत राष्ट्रीय विचार येऊं लागले होते. अजून संकोच गेला नव्हता. उभे राहून भाषण करणें देखील त्यांना अवघड जाई. १९१५ मध्यें एका लहानशा सभेंत ते दोन शब्द बोलले. तेव्हां व्यासपीठावर तेजबहादुर सप्रू होते. त्यांनीं

स्वभावाचे होते. नेहरू कटवाल्या क्रांतिकारकांत तर सामील होणार नाहींत अशी धास्ती मोतीलालजींना वाटत होती. क्रांतिकारकांना फांशी व तुरुंगवासाशिवाय दुसरी शिक्षा देत नसत. मोतीलालजी स्वत: मवाळ विचारांचे होते. जहाल विचार त्यांना आवडत नसत. पण मुलाच्या मनांत राष्ट्रीय चैतन्य मुसमुसत होतें. पित्याचें मन देखील तिकडे आकर्षिलें गेलें.

अशा परिस्थितींत काय करावें हें त्यांना सुचत नव्हतें. १९१७ जून महिन्यांत सरकारनें ॲनीबेझंटना तुरुंगांत टाकलें. त्यामुळें होमरूल चळवळ शांत होण्याऐवजीं जास्त खवळली. कित्येक मवाळ पक्षीय लोक त्या चळवळींत सामील झाले. त्यांत मोतीलाल पण होते. ॲनीबेझंट विषयीं त्यांच्या मनांत आदरभाव होता. म्हणून ते होमरूल लीगकडे वळले. पुढें ते अलाहाबाद शाखेचे अध्यक्ष पण निवडून आले.

जर्मनीबरोबर चालू असलेल्या युद्धांत कित्येक राष्ट्रांची स्थिति बिघडत गेली. म्हणून भारताविषयींच्या इंग्रज सरकारच्या विचारांत पण बराच बदल झाला.

सेप्टेंबर महिन्यांत ॲनीबेझंट यांना तुरुंगांतून सुटका मिळाली त्यावेळीं असें वचन देण्यांत आलें कीं भारताच्या राज्यघटनेंत बदल करण्यांत येईल.

अलाहाबाद येथें कांग्रेसच्या वर्किंग-कमेटी बरोबर मुस्लिम लीगचें अधिवेशन झालें व दोघांनीं असें ठरविलें कीं देशाला स्वायत्त सत्ता मिळाली पाहिजे. "आपत्कालीं स्वायत्त भारत ब्रिटिश सरकारला जास्त आनंदानें मदत करूं शकेल!" असें टिळक म्हणाले.






[ ८ ]

[ मंथारणाचा किल्ला पठाण सेनापति उस्मानखान यानें जिंकला. किल्लेदार वीरेंद्रसिंह जखमी होऊन कैदी झाला. त्याची मुलगी तिलोत्तमा व दासी विमला दोघी कैदेंत पडल्या. मानसिंहाचा मोठा मुलगा जगतसिंह तिलोत्तमेची भेट घेण्यासाठीं विमलेच्या सहाय्यानें मंथारणच्या किल्ल्यांत गेला होता. त्याचें पठाणांशीं युद्ध झालें. पण तो देखील जखमी होऊन पठाणांच्या हातीं कैद झाला. पुढें वाचा. ]

जगतसिंहाला शुद्धी आली तेव्हां तो एका सुंदर खोलींत मऊ बिछान्यावर झोंपलेला होता. त्यानें डोळे उघडून पाहिलें. ती एक मोठी खोली होती. पायगती एक स्त्री बसलेली होती. ती मधून मधून त्याच्या डोक्यावर गुलाब पाणी ठेवीत होती. दुसरी एक स्त्री थोडी दूर उभी होती. जगतसिंह एका हस्तीदंती पलंगावर झोंपलेला होता. त्या पलंगावर एक हृष्टपुष्ट पठाण सुंदर पेहराव करून पान खात फारसी भाषेचें एक पुस्तक वाचीत होता. पण बोलत कोणीच नव्हता.

युवराजानें एकदां खोलीभर नजर फिरविली आणि या कुशीवरून त्या कुशीवर वळण्याचा यत्न करून पाहिला. पण तें त्याला शक्य झालें नाहीं.

श्री बंकिमचंद्र चट्टोपाध्याय



त्याला हालचाल करूं लागलेला पाहून पायगती बसलेली बाई म्हणाली—" हलूं नका, आहांत तसेच पडून रहा !"

त्यानें खोल आवाजांत विचारलें—" मी कोठें आहें ?"

" तुम्ही बोलूं नका ! तुम्ही चांगल्या सुरक्षित स्थानींच आहांत. काळजी करूं नका. स्वस्थ पडून रहा !" हळुवारपणें ती स्त्री म्हणाली.

" किती वाजायचा सुमार असेल ?"

" तीन प्रहर ! उगीच विचार करूं लागलात तर जास्त त्रास होईल व बरे व्हायला अधिक काळ लागेल. स्वस्थ राहलांत तर येथून जातां येईल."

मोठ्या कष्टानें युवराजानें पुन्हां विचारलें—

" फक्त एकच गोष्ट विचारतो ! तुम्ही कोण !"

" आयशा !"

तो बराच वेळ आयशाकडे पहात होता. तिला पूर्वी कोठें पाहिलें असेलसें त्याला आठवेना. आयशाचें वय वीस बावीसच्या दरम्यान असेल. ती सुंदर पण तशीच होती. तिला पाहून जगतसिंहाला तिलोत्तमेची आठवण झाली. त्याच्या हृदयाला अकस्मात धक्का लागल्यासारखें वाटलें. रक्तस्राव जोरानें सुरू झाला. तो पुन्हां बेशुद्ध होऊन पडला.

आयशा घाबरून उठून उभी राहाली. पलंगावर बसून पुस्तक वाचीत बसलेला तरुण प्रेमळपणें मधून मधून आयशाकडे पहात होता. आयशा त्याच्या कानांत म्हणाली—" उस्मान ! हकिमाकडे लवकर निरोप पाठव !"

उस्मान उठून लगेच बाहेर गेला. ती पलंगाजवळ गेली व चांदीच्या तिवईवर ठेवलेल्या एका भांड्यांतून एक द्रव-



पदार्थ घेऊन युवराजाच्या तोंडावर शिंपडूं लागली.

उस्मान खान हकिमाला बोलावून घेऊन आला. त्यानें औषध लावून रक्तस्राव बंद केला. तो औषध देऊन व रोग्याला पथ्य वगैरे सांगून जाऊं लागला.

आयशानें जवळ जाऊन हळूच विचारलें—" कशी काय आहे तब्यत यांची ?"

" ताप जरा जास्तच आहे !" असें सांगून हकीम निघाला. उस्मानखान त्याला दारापर्यंत पोंचवायला गेला. " तसें जिवावरचें दुखणें नाहीं. तरी काळजी घ्यावी लागेल. पुन्हां कांहीं विशेष झालें तर निरोप पाठवा मला." असें सांगून तो निघून गेला.

त्या दिवशीं रात्रीं उस्मानखान व आयशा दोघे मध्यरात्र उलटून गेली तरी जागी होतीं. हकीम कित्येकदां येऊन युवराजाची तब्येत तपासून निघून गेला. आयशा सारखी रोग्याच्या उशाशीं बसून शुश्रूषा करीत होती. तीन प्रहर रात्र उलटल्यावर एक दासी तिला येऊन म्हणाली—" बेगम साहेबा आपली आठवण करीत होत्या."



" हो, आलेंच !" म्हणत आयशा उठून उभी राहाली. उस्मानखान देखील पलंगावरून उठून उभा राहिला.

" तूं सुद्धां निघालास वाटतें ?" आयशानें त्याला विचारलें.

" पुष्कळ उशीर झाला आहे. चल, मी तुला पोंचवून येतों." उस्मानखान म्हणाला.

आयशा दासीला युवराजांकडे सतत लक्ष ठेवायला बजावून सांगून आपल्या आईकडे निघून गेली. वाटेंत उस्मान खानानें तिला विचारलें—" आज तूं बेगम साहेबांकडेच राहणार का ?"



"नाहीं, मी परत येणार आहें, युवराजां-जवळ!" आयशा म्हणाली.

"आयशा तुझ्या चांगुलपणाचें काय म्हणून वर्णन करूं? तूं माझ्या या शत्रूची जी सेवा करीत आहेस तितकी सेवा त्याची स्वतःची बहीण तरी करील कीं नाहीं शंकाच." उस्मानखान म्हणाला.

आयशा स्मित करून म्हणाली—"उस्मान! तो स्त्री-स्वभाव आहे! दुखी कष्टी लोकांची सेवा करण्याचें भाग्य मिळल्यास आणखी काय पाहिजे? तुझी कृपा काय थोडी आहे यांच्यावर? तुझा तो शत्रु आहे म्हणतोस, मग त्याला वांचविण्याची इतकी उठाठेव कशाला?"

"तूं उदार मनाची आहेस म्हणून तुला वाटतें कीं इतर लोक देखील तुझ्यासारखेच उदार मनाचे असतील. माझ्या मनांत दुसराच विचार आहे. जगतसिंह आपल्या कैदेंत राहाला तर मानसिंह आपल्या मुठींत आला असें समज! वाटेल तशी संधी करवून घेईन मी त्याच्याकडून! बरें तें जमलें नाहीं तर जगतसिंहाला परत करण्यापूर्वी त्याच्याकडून पुष्कळ धन मिळेल. म्हणून जगतसिंहाला वांचविण्यांत सर्वतऱ्हेनें फायदाच आहे. या बाबतींत मी निष्काळजीपणा दाखविला तर मला लोक मूर्खांत काढतील." उस्मानखान म्हणाला.

"उस्मान! तूं इतक्या क्षुद्र बुद्धीचा असशील असें नव्हतें मला माहीत! सर्वच तुझ्यासारखे होतील त्या दिवशीं धर्म बुडा-लाच असें समजावें लागेल." आयशा थोडीशी रागांतच म्हणाली.

उस्मान त्यावर कांहीं एक बोलला नाहीं. तो आयशाला पोंचवून स्वतःच्या खोलींत झोंपायला निघून गेला.





दुसऱ्या दिवशीं संध्याकाळ पर्यंत जगत-सिंहाची स्थिति नाजूकच होती. हकीम, उस्मान व आयशा त्याच्या जवळच होतीं. औषधोपचार चालू होता. थोडा थोडा गुण पडूं लागल्यावर हकीम म्हणाला—"ताप उतरूं लागला आहे. आतां जिवावरचें संकट टळलें." तें ऐकून आयशा व उस्मान दोघांच्या चेहऱ्यावर आनंद झळकूं लागला. हकीम निघून गेला. उस्मानखान देखील झोंपायला निघून गेला. आयशा युवराजा-जवळच बसून होती.

मध्यरात्र उलटल्यावर जगतसिंहानें डोळे उघडून पाहिलें. त्याला समोर आयशा दिसली. परंतु त्याची दृष्टि हुडकीत होती तो चेहरा न दिसल्यामुळें त्याच्या डोळ्यांत निराशा व हताशा स्पष्ट झळकूं लागली.

बऱ्याच वेळानंतर त्यानें आयशाला विचारलें—"मी कोठें आहें?"

"कतलुखानाच्या किल्ल्यांत!" आयशा उत्तरली.

कांहीं वेळ विचार करून त्यानें पुन्हां विचारलें—"मी येथें कसा काय आलों?"

"तुम्ही जास्त बोलूं नका. तुमची तब्येत बरी नाहीं!"

"नाहीं, नाहीं, मी येथें कैदी आहें! तूं कोण?"

"आयशा! कतलुखानाची मुलगी!"

"किती दिवस झाले मला येथें?"

"चार दिवस!"

"हूं........"

"बीरेंद्रसिंह कोठें आहेत?"

"कैदेंत! आजच त्यांच्या विद्रोही पणाबद्दल विचारणा होणार आहे!"

तें ऐकून जगतसिंहाचें तोंड उतर-ल्यासारखें भासलें. "इतर सर्व कोठें आहेत?"



"तें सर्व मला नाहीं माहीत !" आयशा घाबऱ्या आवाजांत उत्तरली.

युवराज स्वतःशींच कांहीं तरी पुटपुटल्या सारखा भास झाला. पुटपुटण्याचा बंधूक आवाज आयशाच्या कानीं पडला. तिनें तिलोत्तमा नांव दोनतीनदां ऐकलें. ती उठून उभी राहाली व तिनें त्याला औषध पाजलें.

"मी जीवन-मरणाच्या सीमेवर पोंचलों असतां मला एक स्वप्न पडलें. कोणीतरी देवकन्या माझ्या डोक्याशीं बसून माझी सेवाशुश्रूषा करीत होती. ती तूंच कीं तिलोत्तमा ?" जगतसिंहानें विचारलें.

"तुम्हांला स्वप्नांत दिसली ती तिलोत्तमाच असण्याची शक्यता आहे." आयशा म्हणाली.

दुपारीं बारा वाजतां कतलुखानाचा दरबार भरला. त्याच दिवशीं वीरेंद्रसिंहाला शिक्षा मिळणार होती. कांहीं सैनिक वीरेंद्रसिंहाला साखळदंडांनीं बांधून कतलुखानासमोर घेऊन आले. वीरेन्द्रसिंहाचे डोळे आग पाखडीत होते. त्याच्या तोंडावर भयाचें नांव देखील नव्हतें.

कतलुखान शांत व संथपणें म्हणाला— "वीरेंद्रसिंह ! माझ्या दरबारांत तुझ्या अपराधाबद्दल विचार होणार आहे. प्रथम मला हें सांग, तूं आमच्या विरुद्ध कां शस्त्र उगारलेंस ?"

"मी काय केलें, हें तरी सांगशील कीं नाहीं ?" वीरेंद्रसिंहानें त्याला विचारलें.

"जरा तोंड संभाळून बोल !" एक दरबारी म्हणाला.

"माझ्या आज्ञेप्रमाणें तूं सैन्य व पैसे कां नाहीं पाठविलेस ?'' कतलुखानानें विचारलें.

"तूं राजद्रोही आहेस. डाकू व लुटेरा आहेस ! तुला मी कशासाठीं पैसे द्यावयाचे ? व सैन्य तरी कां पाठवावयाचें ?" वीरेंद्रसिंहानें निर्भीकपणें विचारलें.

हा स्वतःच आपलें मरण ओढवून घेत आहे त्याला आतां कोण काय करणार असें प्रत्येक दरबारी मनांतल्या मनांत म्हणत होता.

कतलुखानाचें अंग रागानें थरथर कांपूं लागलें. तरी त्यानें आपला राग आवरला व म्हणाला—"तूं आमच्या अमलाखालीं असलेल्या प्रदेशांत आहेस, आमची प्रजा आहेस. मग तूं आमच्या शत्रूला कां फितूर झालास ?"

"तुझें राज्य आणि तुझा अंमल ? कोठें आहे ? मला तो मान्य नाहीं." वीरेंद्रसिंह करड्या आवाजांत उत्तरला. कतलुखानाचा राग जास्तच भडकला.

विश्वासघातकी राजद्रोही आहेस तूं. तुला लवकरच तुझ्या पापाचीं फळें भोगावीं लागतील. स्वतःचा जीव वांचवायला अजून सवड आहे !" कतलुखान म्हणाला.

वीरेंद्रसिंह खदखदां औपरोधिकपणें हंसून म्हणाला—"कतलुखाना ! मला साखळदंडांनीं बांधून तुझ्यासमोर उभा केला असतां मी स्वतःचा जीव वांचविण्यासाठीं तुझ्या



दयेची भिक्षा मागीन असें वाटलें होय तुला ? तुझ्यासारख्या नराधमाच्या कृपेवर ज्यांचें जिणें अवलंबून आहे त्यांच्या जिण्यावर धिःकार ! मी तुला आशीर्वाद देऊन मरायला तयार होतों. पण तूं माझ्या वंशाची दोरीच तोडलीस. माझ्या प्राणाहून मला जास्त प्रिय....” बोलत असतां त्याचा कंठ दाटून आला. डोळ्यांतून अश्रुधारा सुरू झाल्या. तो मान खालीं करून रडूं लागला.

कतलखान क्रूर होता. दुसऱ्यांना दुःखी पाहून हृदय दगडासारखें घट्ट करून घेण्याची शक्ति त्याच्या अंगांत होती. स्वाभिमानी शत्रूला स्थितींत पाहून त्याच्या ओंठावर हास्य झळकलें. त्यानें बीरेंद्रसिंहाला विचारलें—“तुला माझ्याजवळ कांहीं मागावयाचें नाहींस म्हणाला होतास. खूप विचार करून बोलतो आहेस ना ?”

बीरेंद्रसिंह ताठ उभा राहून म्हणाला—“मला आणखी कांहीं नको ! लवकर माझा शिरच्छेद कर !”

“बरें, आणखी कांहीं विचारावयाचें आहे ?”

“नाहीं, या जन्मांत आणखी कांहीं विचारावयाचें नाहीं, मला !”

“मरणापूर्वी आपल्या एकुलत्या एका मुलीचें तोंड पाहण्याची इच्छा नाहीं वाटतें तुला ?” बीरेंद्रसिंहाचे डोळे पुन्हां भरून आले. दुसऱ्या क्षणीं ताठ उभा राहून तो म्हणाला—“माझी मुलगी अद्याप मेली नसेल तर तिला पाहण्याची माझी इच्छा नाहीं. ती मेली असेल तर मात्र तिचें प्रेत पाहण्याची इच्छा आहे. तिला आपल्या मांडीवर घेऊन मी आनंदानें प्राण सोडीन !”

( पुढील गोष्ट पुढील अंकीं )





# राज्याची हाव

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाहीं. तो पुन्हां झाडाजवळ गेला. झाडावरून प्रेत काढून खांद्यावर टाकून नेहमींप्रमाणें स्मशानाकडे निघाला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला—“राजा, तूं एवढी मेहनत करीत आहेस, कर, माझी ना नाहीं. परंतु परिणामीं तुझी स्थिति जयमल्लसारखी होऊं नये, एवढेंच मला वाटतें. मेहनतीचें फळ मिळण्याचा ऐन प्रसंग आला असतां तो तें गमावून बसला. तुला कंटाळा येऊं नये म्हणून मी ती गोष्ट सांगतों, ऐक.” असें सांगून तो ती गोष्ट सांगूं लागला.

एकदां पैठण प्रदेशांतल्या लहान मोठ्या संस्थानिकांनीं ठरविलें कीं यापुढें आपसांत भांडणें करावयाचीं नाहींत. त्यांना या निश्चयामुळें बराच फायदा झाला. त्या पिढीचे सर्व संस्थानिक निश्चय केल्याप्रमाणें

## वेताळाच्या गोष्टी



वागले. परंतु सर्वकाल दिलेलें वचन कोणी पाळतो का?

वीरमल नांवाच्या एका संस्थानिकाच्या संस्थानांत दुष्ट लोकांची संख्या वाढत गेली होती. वीरमल स्वभावानें सरळ होता व त्यांत वयोवृद्ध. म्हणून तो बंडखोरांचें पारिपत्य करूं शकला नाहीं. परंतु इंद्रदत्त नांवाच्या शेजारच्या दुसऱ्या पिढींतल्या तरुण संस्थानिकास आपल्या शेजारच्या राज्यांत चालू असलेली बंडाळी खपली नाहीं. म्हणून इंद्रदत्तानें वीरमलच्या विरुद्ध युद्ध करण्याचें ठरवून त्याच्या राज्यावर स्वारीपण केली.

वीरमल्लानें मदतीसाठीं इतर संस्थानिकांना बोलावणीं पाठविलीं. त्यांनीं दोन राज्यांतल्या आपसांतील भांडणांत पडणें आम्हांला बरोबर दिसत नाहीं असें सांगून अंग काढून घेतलें.

वीरमल्लाला युद्ध करण्याची इच्छाच नव्हती. शिवाय युद्ध करण्यास पुरेशी तयारीपण त्यानें केली नव्हती. म्हणून तो राणी व राजकन्या दोघांना घेऊन विंध्य पर्वतांत पळून गेला.

एक थेंबदेखील रक्त सांडल्याशिवाय वीरमल्लाचें राज्य इंद्रदत्तानें बळकावलें. त्यानें कडक कायदे काढून दुष्ट प्रजेला दडपून टाकलें. राज्यांत शांतता स्थापन झाली व अशा प्रकारें प्रजा सुखी झाली.

वीरमल्लानें मरण प्रसंगीं विंध्य पर्वतांत आपला मुलगा जयमल याला गुप्तपणें बोलावून घेतलें आणि राज्य कसें चालवून बसला याचें वर्णन करून म्हणाला—"बाळ! मी सर्व संस्थानिकांनीं मिळून केलेल्या संधी प्रमाणें वागलों. संधींत वचन दिल्याप्रमाणें इतर कोणी माझ्या मदतीला आलें नाहीं. परंतु मी मात्र वचन दिल्याप्रमाणें युद्ध केलें नाहीं. पण तुला राज्य हवें असेल तर तूं युद्ध करून स्वतःचें राज्य परत मिळव. मी



वचन दिलें होतें. आमची पिढी संपली. आपल्या पिढीच्या हितासाठीं वाटेल तें करायला तूं खुद मुख्तार आहेस."

बाप वारल्यावर जयमलनें आपल्या वडिलांचें राज्य परत मिळविण्याचें मनाशीं ठरविलें. त्याला राज्याचा लोभ पण होताच. रानोमाळ हिंडत असतांना रानटी लोकांच्या सहवासांत हिंस्र पशूंची शिकार करणें त्याला चांगलें येऊं लागलें होतें. तसा तो स्वभावानें साहसीपण होताच.

परंतु राज्य मिळविण्यासाठीं आपल्याला चांगली तयारी करावी लागेल ही गोष्ट देखील तो पूर्णपणें ओळखून होता. साहस, शक्ति, बुद्धिमत्ता सर्व त्याच्याजवळ होतें. पण शस्त्रविद्या त्याला पुरेशी अवगत नव्हती. शिकार करण्यांत किंवा मल्लयुद्धांत त्याची बरोबर करण्यास कोणी धजला नसता. परंतु युद्धांत जय मिळविण्यास शस्त्रविद्या अवगत करून घेणें आवश्यक आहे. सैन्य देखील जमा करणें आवश्यक आहे.

म्हणून जयमल आपल्या आईबरोबर पैठण देशांत आला. व एका संस्थानांत राहून शस्त्रविद्येचा अभ्यास करूं लागला. पुढें कांहीं दिवसांनीं त्यानें दुसऱ्या एका





राजाच्या पदरीं सैनिक म्हणून नोकरी धरली. लवकरच उत्तम सैनिक म्हणून त्याचा नांवलौकिक वाढला.

कांहीं दिवसांनीं त्याची आई वारली. आतां राज्य मिळविण्या व्यतिरिक्त दुसरी कांहीं काळजी उरली नाहीं. इंद्रदत्ताचा समोरासमोरच्या युद्धांत पराभव करणें अशक्य आहे हें त्याला चांगलें माहीत होतें.

आतां एकच एक उपाय त्याच्याजवळ उरला होता. शक्ति जेथें निरुपयोगी ठरते तेथें युक्तीचाच उपयोग करावा लागतो. म्हणून त्यानें आपलें नांव बदलून इंद्रदत्तच्या सैन्यांत भर्ती होण्याचा विचार केला. कांहीं दिवसांनीं आपण कोण हें सैन्याला कळल्यावर सैन्य आपल्या आज्ञेप्रमाणें वागेल व इंद्रदत्ताच्या विरुद्ध बंड करील असा त्यानें विचार केला. म्हणून सैन्य जमविणें, त्याला शस्त्रास्त्रें पुरविणें सर्व अनावश्यक आहे. युद्ध करण्याची गरजच नाहीं. अशातऱ्हेनें आपल्या वडिलांनीं आपल्या पिढीच्या लोकांना दिलेल्या वचनाचें पालन पण सहजीं होईल.

असा विचार करून जयमल आपल्या बापाच्या राज्यांत गेला. इंद्रदत्ताच्या सैन्यांत त्यानें आपलें नांव नोंदविलें. त्याला जी जी कला अवगत होती ती त्यानें दाखविली. ती पाहून इंद्रदत्त खूष झाला. त्यानें जयमलला आपला अंगरक्षक म्हणून नेमलें.

जयमलनें देशाच्या परिस्थितीचा लक्षपूर्वक अभ्यास केला. इंद्रदत्ताच्या राज्य कारभारांत कडकपणा होता, पण तो स्वतः स्वभावानें क्रूर नव्हता. त्याच्या पदरीं नोकरी करणारे सर्व लोक स्वामिभक्त नोकर होते. ते राजाच्या व त्याच्या राज्याच्या रक्षणार्थ सर्वस्वाचा होम करण्यास तयार होते. दुष्टलोक त्याचें नांव ऐकून थर थर कांपत, पण प्रजेचें राजावर प्रेम होतें. त्याचे वडील राज्य करीत असतां प्रजेच्या मनांत राजाचें भय नव्हतें व राजावर प्रेम पण नव्हतें, हें ऐकून जयमलला मनापासून दुःख वाटलें.

इंद्रदत्त शिकारीला जाई तेव्हां जयमलचें शिकारींतलें कौशल्य त्याच्या नजरेस आल्याशिवाय राहिलें नाहीं. क्रूर व हिंस्र जनावरांना फक्त काठीनें ठार करतांना त्याला पाहून इंद्रदत्त चकित होई. जयमलच्या मनांत रानटी श्वापदांचें भय म्हणून नव्हतें. म्हणून इंद्रदत्त त्याला बरोबर घेऊन शिकारीला जाई. एकटा कधीं गेला नाहीं.

एकदां इंद्रदत्त शिकारीला गेला असतां शिकारीचा पाठलाग करीत रानांत दूर एकटा निघून गेला. त्यानें मागें वळून पाहिलें तेव्हां त्याला फक्त जयमल पाठीमागून येत असलेला दिसला.

इंद्रदत्तानें घोड्यावरून उतरून घोडा झाडाला बांधून ठेवला आणि स्वतः आराम करण्याच्या विचारांत होता. परंतु त्याला उशास घ्यायला कांहीं दिसेना. तें ओळखून जयमलनें आपल्या मांडीवर डोकें ठेवून राजाला झोंपायला सांगितलें. डोकें टेकल्याबरोबर त्याला झोंप लागली.



आपल्या शत्रूचा वध करण्यास या पेक्षां जास्त सुंदर संधी जयमल्लला कोठून मिळणार ? भाला किंवा तलवार त्याच्या छातींत खुपसून त्याचा शेवट करणें जयमल्लला सहज शक्य झालें असतें, तसें त्याच्या मनांत आलें देखील. पण त्यानें मनाला आवरलें.

इतक्यांत इंद्रदत्त 'पकडा' 'पकडा' असें झोंपेंतच मोठ्यानें ओरडत दचकून जागा झाला. जयमल्ल घाबरल्यासारखा उठून उभा राहाला. "तूंच का ? मी एक फार वाईट स्वप्न पाहिलें. स्वप्नांत मी वीरमल्लच्या मुलाच्या मांडीवर डोकें टेंकून झोंपलों होतों. तो मला पाहून एक भाला उचलून माझ्या छातींत खुपसणार, एवढ्यांत मी मोठ्यानें ओरडलों आणि उठून उभा राहालों.

राजाचें ओरडणें त्याच्या बरोबर शिकारीस आलेल्या त्याच्या अनुयायांना ऐकूं आलें. ते आवाजाच्या अनुरोधानें तेथपर्यंत धांवत आले.

"महाराज, आपल्याला जें स्वप्न पडलें होतें अगदींच खोटें होतें असें म्हणतां येणार नाहीं. मीच वीरमल्लचा मुलगा इंद्रदत्त ! आपला वध करावा असें माझ्या मनांत आलें होतें. पण मी मनाला आवरलें !" जयमल्ल म्हणाला.

तें ऐकून इंद्रदत्त चकित झाला. "मग तूं माझा वध करायला कां कचरलास ?"

त्याचें उत्तर न देऊन इंद्रदत्त म्हणाला— "असा प्रसंग पुन्हां पुढें कधीं येण्याचा संभव आहे. म्हणून मला अंगरक्षकाच्या पदावर कायम ठेवणें आपणांस बरोबर होणार नाहीं. आपली नोकरी सोडून जाण्याची परवानगी मला द्या !"

इंद्रदत्तनें त्याचें कांहींच उत्तर दिलें नाहीं. आपले अनुयायी जवळ आल्या-बरोबर त्यांनें जयमल्लला कैद करण्यास सांगितलें.

त्याच्याजवळ फक्त एकच एक भाला होता. तरी जिवावर उदार होऊन तो त्यांच्याशीं लढला. कित्येक जखमी झाले. तरी तो शेवटीं कैद झाला.

इंद्रदत्त त्याला राजधानींत घेऊन गेला. औषधोपचार करून तो बरा झाल्यावर त्याला त्याच्या बापाचें राज्य देऊन इंद्रदत्त स्वतःच्या राज्यांत निघून गेला.

वेताळ येथवर गोष्ट सांगून म्हणाला— "राजा मला हें कळत नाहीं कीं जयमल्लनें





इंद्रदत्ताचा वध कां केला नाहीं ? तो भ्याला कीं राजभक्ति आड आली ? कीं त्याच्या वडिलांनीं आपल्या पिढींतल्या इतर संस्थानिकांशीं केलेली संधी त्याला आठवली ? नंतर इंद्रदत्तानें जयमल्लला राज्य कां दिलें ? स्वतः संकटांत सांपडण्याच्या भीतीनें कीं जयमल्लनें वध करण्याची संधी मिळाली असूनहि केला नाहीं म्हणून कृतज्ञतेच्या भावनेनें ? या शंकांचें समाधान माहीत असून हि करण्याचें तूं टाळलेंस तर तुला माहीतच आहे, त्याचा परिणाम ? तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळूं लागतील.

विक्रमार्क म्हणाला—"इंद्रदत्त एक प्रजारंजक राजा होता. प्रजेच्या हिताचीं कामें तो करीत राहाला नसता तर त्याला ठार करण्याचा विचार जयमल्लच्या मनांत दृढ झाला असता. त्याच्या वडिलांच्या राज्यांत प्रजा सुखी नव्हती. अशा परिस्थितींत त्यानें राजाचा वध केला असता तर प्रजा त्याच्या विरुद्ध उलटली असती. म्हणून त्यानें राजाचा वध करण्याचा विचार सोडून दिला. जयमल्लनें स्वतःच्या रक्षणासाठीं एकटा असूनहि जें शौर्य व साहस दाखविलें तें तो प्रजेला सुखी करण्यासाठीं झटेल हें पटविण्यास पुरें होतें. त्याच्या राज्यांत बंडाळी माजणार नाहीं अशी मनाची खात्री झाल्यावर इंद्रदत्तानें जयमल्लला त्याच्या बापाचें राज्य देऊन टाकलें."

अशा प्रकारें राजाचें मौन भंग झाल्यामुळें वेताळ प्रेताबरोबर अदृश्य झाला व झाडाच्या फांदीला जाऊन लोंबकळूं लागला.

(कल्पित)





# परोपकारी गोपाळ

गोपाळ ज्या देशांत रहात असे त्या देशांत एकदां दुष्काळ पडला. पाऊस नाहीं, म्हणून पिकें करपून गेलीं. दुष्काळ निवारण्यासाठीं राजानें विहिरी जास्त खोल खणल्या. खजिन्यांत धन होतें नव्हतें तें खर्च करून परदेशांतून अन्न पुरवठा करून प्रजेला वांटलें. खजिना रिकामा झाला.

त्याच सुमारास गोपाळला एक विचित्र स्वप्न पडलें. स्वप्नांत त्याला राजा दिसला. तो गोपाळला पूर्वेकडील डोंगराकडे बोट दाखवून विचारीत होता कीं या डोंगरांत एक धनाचा ठेवा आहे असें माझ्या कुळदेवतेनें मला सांगितलें आहे. मी सैनिकांना पाठविलें पण त्यापैकीं कोणी परत आला नाहीं. लोक उपाशी मरत आहेत. तेथें धनाचा ठेवा आहे कीं नाहीं हें पाहून येणारा कोणी मिळेल तर बरें होईल. तूं करूं शकशील का एवढें काम ?"

"कां नाहीं, महाराज ? हा निघालों पहा !" असें बोलत असतांना गोपाळची झोंप मोडली. स्वप्नांतली प्रत्येक गोष्ट खरी असावी असें त्याला वाटूं लागलें. त्यानें विचार केला कीं स्वप्न खरें आहे कीं खोटें हें कां पाहून येऊं नये ? म्हणून गोपाळ घरांत कोणाला कळविल्या शिवाय पूर्वेकडे निघाला. डोंगराच्या पायथ्याच्या रानांत तो पोंचला तेव्हां त्या रानांत राहणारे लोक त्याला सांगूं लागले कीं त्या डोंगरांत एक तर कोणी जात नाहीं व जे जातात ते परत येत नाहींत. एकदां कांहीं सैनिक गेले, पण एक देखील परतला नाहीं. तें ऐकून गोपाळला स्वप्न खरें असावें असें वाटूं लागलें.

दुष्काळ ]

[श्री. मा. गो. मोरे



तो रानांत पुढें जाऊं लागला तसतशी दाट झाडी वाढतच गेली. त्याला वाटेंत एक मनुष्य भेटला. त्यानें त्याला विचारलें—

"तुमचेंच नांव गोपाळ का?"

गोपाळनें त्याला ओळखलें. तो चोर होता. पूर्वी गोपाळनें त्याला एका भयंकर आजारांतून वांचविलें होतें. गोपाळनें त्याला जें स्वप्न पडलें होतें तें वर्णन करून सांगितलें आणि म्हणाला—"लोक उपाशी मरत आहेत. डोंगरांत धनाचा ठेवा कोठें आहे, याचा शोध लावण्याच्या कामीं तूं मदत करूं शकशील का?"

"तें शक्य नाहीं. या प्रदेशांत पाऊल टाकणेंच चूक तुम्ही कृपा करून परत जावें अशी माझी हात जोडून विनंती आहे." चोर म्हणाला.

"तिकडे लोक उपाशी मरत आहेत व मी येथें धनाचा मोठा ठेवा आहे हें माहीत असून देखील कसा परत जाऊं?" गोपाळनें त्याला विचारलें.

"अहो गोपाळराव, असलें दया दाक्षिण्य दाखवायला ही जागा नव्हे. आपण कृपा करून परत जावें अशी मी पुन्हां पुन्हां विनंती करतों." चोर म्हणाला.

इतक्यांत आणखी एक मनुष्य कोठून तरी आला. "कोण तूं? कशाला आला आहेस इकडे? काय रे, याचे हात पाय बांधून कां नाहीं नेलेंस याला? आणि येथें उभा राहून त्याच्याशीं कसल्या गुलगुल गप्पा चालू आहेत?" तो देखील चोरांच्या टोळींतलाच एक होता.

त्याला तो पहिला चोर कानांत म्हणाला—"हेच ते परोपकारी गोपाळराव!"

दोघे गोपाळला आपल्या सरदाराकडे घेऊन गेले. पहिल्या चोरानें सरदाराच्या कानांत कांहींतरी सांगितलें.





तें ऐकून सरदार गोपाळला म्हणाला—"हें आमचें राज्य आहे. आमच्या राज्यांत पाऊल टाकणाऱ्यास आम्ही परत जाऊं देत नाहीं. पण तुम्ही आमच्या या साथी मित्राला एकदां वांचविलें होतें. म्हणून आम्ही तुम्हांला शिक्षा किंवा दंड केल्याशिवाय परत जाऊं देतों. बरोबर आहे ना?"

"मी तुमचा आभारी आहें. पण माझ्यावर तुम्ही एक कृपा करा. या डोंगरांत धनाचा ठेवा कोठें आहे, हें मला दाखवा. मी परत जाऊन राजाला त्या संबंधी माहिती देईन. त्यानंतर जें करावयाचें असेल तें राजा स्वतःच करील किंवा मी राजाला सुचवीन." गोपाळ म्हणाला.

"वा रे वा! आतांपर्यंत तुम्ही जें पाहिलेंत व ऐकलेंततें कोणासमोर बोलणार नाहीं अशी आमचें कुलदैवत जी काली माता तिच्यासमोर उभे राहून शपथ घेतली पाहिजेत. तरच आम्ही तुम्हांला येथून जिवंत परत जातां येईल." सरदार म्हणाला.

"मला तो धनाचा ठेवा दाखवायचा नसेल तर माझा आग्रह नाहीं. तुम्हीच तो राजाकडे पोंचता केलात तरी माझ्या मनाचें समाधान होईल." गोपाळ म्हणाला.

चोरांचा सरदार तें उत्तर ऐकून तापला. म्हणाला—"आम्ही जें मिळवितों तें कोणाला देण्यासाठीं नव्हे. काली मातेसमोर तुम्ही शपथ घेतली नाहींत तर तुम्हांला आम्ही जिवंत परत जाऊं देणार नाहीं."

"मी अशी शपथ घ्यायला तयार नाहीं!" गोपाळ म्हणाला.

लगेच सरदाराचा आज्ञेप्रमाणें चोरांनी गोपाळचे हातपाय बांधून त्याला काली मातेसमोर हजर केलें. काली मातेची एक भव्य मूर्ति होती ती. "निदान आतां तरी काली मातेसमोर शपथ घे! तुला

जिवंत सोडूं आम्ही." चोरांचा सरदार म्हणाला.

"हें पहा, मी आलों आहें येथें धनाचा ठेवा आहे कीं नाहीं याच्या शोधार्थ! तुझ्या गुपिताचें रक्षण करण्यासाठीं किंवा तुझ्यावर हेरगिरी करण्यासाठीं आलों नाहीं." गोपाळ म्हणाला.

गोपाळचा शिरच्छेद करण्यासाठीं सरदारानें आपली तलवार उपसली.

त्याच वेळीं कोणी तरी ती मूर्ति जणुंकांहीं ढकलली. थोडी बाजूला आडवी होत सरळ सरदाराच्या डोक्यावर कोसळली. चोरांचा सरदार त्या मूर्तीखालीं चिरडून तत्काल मरण पावला.

"पाहिलेंत, मला स्वतः देवीनेंच या कामासाठीं इकडे पाठविलें आहे. तिनें तें तुम्हांला कळावें म्हणून तुमच्या सरदारालाच वाटेला लावलें. लोक दुष्काळामुळ पटापट मरत असतां हा धनाचा ठेवा जमा करून तरी काय उपयोग? मला देवीचा दृष्टांत झाला व तिच्या आज्ञेनें मी येथें आलों. चला माझ्याबरोबर. तुम्हांला राजा कांहीं शिक्षा करणार नाहीं, तुम्ही प्रजेच्या कष्ट सुखाचे वाटेकरी व्हायला तयार व्हाल तर देवी तुमचें रक्षण करील." गोपाळनें चोरांना धीर दिला.

ज्या लोकांनीं गोपाळचा तो निर्भीकपणा पाहिला होता, त्याच्या बोलण्यावर त्यांचा विश्वास बसला. ते गोपाळच्या बरोबर आपलें सर्व धन घेऊन राजासमोर हजर झाले. राजानें चोरांना माफ केलें. त्यांच्या उदर निर्वाहाची जरूर ती सर्व व्यवस्था करून दिली. दुष्काळांत सांपडलेल्या गोरगरिबांच्या रक्षणार्थ त्या धनाचा उपयोग झाला.





# डोळे उघाड

दंडकारण्यांत एका काळीं निरनिराळ्या जातीचे लोक रहात. त्यांची राहाणी रानटी लोकांसारखीच होती. सभ्यतेचा गंधस्पर्श देखील त्यांना झालेला नव्हता. तरी हळूहळू एकेका जातीनें आपल्या प्रांताचा एक राजा निवडला. तेव्हांपासून सर्व जातींच्या राहणींत हळूहळू सभ्यतेचा शिरकाव होऊं लागला.

दंडकारण्यांतच दंडामथ नांवाचा एक प्रांत होता. त्या प्रांतांत कोणी राजा नव्हता. मारामारी व दंगेखोरपणा हाच जणुं कांहीं त्यांच्या आयुष्यांतला नियम झाला होता. बलवान दुर्बलांवर अत्याचार करीत. कोण काम धंदा करणार व मिळवून काय करणार. सर्व लोक आळशी होऊन गेले. कोणी विचारपूस करणारा नव्हता.

पण त्या जातींत समित्र नांवाचा एक बुद्धिमान तरुण निघाला. आपल्या जातीची ती दुःस्थिति पाहून त्याला फार वाईट वाटलें. त्यानें दुष्ट लोकांना समजावून सांगण्याचा प्रयत्न करून पाहिला. परंतु त्याला यश आलें नाहीं. शेवटीं त्याला जीविताचा वीट आला व तो रानांत एका एकांत स्थानीं जाऊन राहूं लागला. तेथें त्याला एक योगी भेटला. तो रानांत एका जागीं आश्रम बांधून योगाभ्यास करीत असे.

सुमित्राची त्या योग्याशीं ओळख झाली व परिचय वाढला. एकदां त्यानें त्याला विचारलें कीं देशांत शांतता स्थापन करण्यास कांहीं उपाय सांगा. योगी म्हणाला—"हें पहा, मनुष्यांची जात ही स्वभावानें फार स्वार्थी व भांडखोर आहे. त्या जातीला

सौ. शामला सरदेसाई



सन्मार्गावर आणण्यासाठीं एका राजाची गरज असते. पण राजा बलवान असला पाहिजे, पराक्रमी असला पाहिजे. राजाला सल्ला देणारा एक ज्ञानी, विवेकवान आणि धर्मपरायण मंत्रीपण असावा लागतो.''

सुमित्र स्वदेशीं परत गेला व आपल्या जातींतल्या धीरसिंह नांवाच्या एका शूर पराक्रमी माणसाला म्हणाला–“ तूं आमच्या जातीचा राजा हो! सैन्य जमवून देशाचें रक्षण कर. प्रजेकडून कर घेऊन प्रजेचें पालन केलेंस तर आपला देश खात्रीनें सुखी होईल.''

धीरसिंहाला तें पटलें. त्यानें:स्वतला राजा म्हणून जाहीर केलें व स्वतःच्या राज्याभिषेकाची तयारी सुरू केली. त्या योग्यानें स्वतः हजर राहून धीरसिंहाचा राज्याभिषेक करून दिला. निरोप घेतांना त्यानें धीरसिंहाला एक सल्ला दिला. म्हणाला–“ एक हुशार मंत्री नेमून तूं त्याच्या सल्ल्यानें राज्य कारभार चालव!''

पण धीरसिंहानें त्याकडे दुर्लक्षच केलें. मी स्वतः राजा असतां आणखी कोणाचा सल्ला घेण्याची काय गरज? असा विचार करून त्यानें मंत्री नेमण्याचा विचार केला नाहीं.

राजाच्या पदरीं नोकरी करणारे तेच गुंड व पुंड लोक होते. मारहाण करणें हा एकच एक धंदा त्यांना अवगत होता. गोर गरिबांचा व दुर्बळांचा त्राता उरला नाहीं. त्यांच्या अत्याचारामुळें प्रजा कंटाळून गेली.

तें सर्व पाहून सुमित्र पुन्हां त्या योग्याच्या दर्शनास गेला. त्यानें देशाची स्थिति वर्णन करून त्याला सांगितली. तेव्हां योगी म्हणाला–“ मी तुझ्या राजाचें डोकें ठीक करतों. एका आठवड्यानें मी स्वतः येऊन राजाला भेटतों. मी देतों तें फूल माझ्या वतीनें राजाला नेऊन दे. राजाशिवाय इतर कोणी त्या फुलाचा वास घेतां कामा नये. कारण त्याचा परिणाम उलटा होईल.'' असें सांगून त्यानें एक फूल पानांत गुंडाळून सुमित्राला दिलें. त्या फुलाचा वास पाना-बाहेर देखील येत होता.

सुमित्रानें तें फूल योगिराजाची भेट म्हणून राजाला दिलें आणि म्हणाला– “ योगिराज स्वतः राजाच्या भेटीला एका आठवड्यानें येणार आहेत.'' राजा त्या फुलाचा वास घेत बराच वेळ योगिराजांचें कौतुक करीत विचार करीत बसला.



तो रात्रीं झोंपला तेव्हां तो आनंदांत होता. पण सकाळीं झोंप मोडली तेव्हां त्याचें डोकें दुखत होतें. औषध पाणी करण्यांत आलें पण कांहीं एक उपयोग झाला नाहीं. अंथरुणावर तळमळत होता.

एका आठवड्यानें योगिराज राजाला भेटायला आले. राजाला एका आठवड्या-पासून डोकें दुखी असल्याचें ऐकून तो म्हणाला–“ राजा! तुला डोके दुखी सुरू होणार? अरे! प्रजापालन म्हणजे काय थट्टा वाटली तुला? ही डोकेदुखी फार पूर्वीच सुरू व्हायला पाहिजे होती. पण तुझें शरीर स्वास्थ्य उत्तम होतें म्हणून इतके दिवस कांहीं झालें नाहीं. अजून तूं कोणाला तरी आपला मंत्री नेम आणि मोकळा हो! विचार करण्याचा श्रम वांचेल. तो विचार करून जी मंत्रणा देईल त्याप्रमाणें वाग.''

इतके कष्ट होत होते तरी धीरसिंह माघार घ्यायला तयार नव्हता. म्हणाला– “ योगिराज! मी सर्व ऐकायला तयार आहें. हें नाहीं मला कबूल! दुसऱ्याच्या बुद्धीवर विसंबून का मी राज्य करणार?''

योगिराज स्मित करून म्हणाले– “ दुसऱ्याच्या डोक्यावर मी तुला विसंबून

रहायला सांगत नाहीं. तूं एखाद्या हुशार माणसाला शोधून त्याला आपलें डोकें उधार दे! इतरांकडून तूं जशी कामें करवितोस तशीं त्याच्याकडून देखील कामें करवून घे! ही डोके दुखी कायमची बंद होईल बघ!"

"पण तें कसें हें नाहीं कळलें मला." राजा म्हणाला.

"तें मी सांगतों. तुझ्या मतें कोणावर तुझा विश्वास आहे हें प्रथम सांग! मी तुझ्या डोक्यांतली थोडी विचार शक्ति त्याच्याकडे पोंचती करतों." योगी म्हणाला.

राजानें सुमित्राचें नांव सुचविलें. राजाची विचार शक्ति उधार घेऊन काम करण्यास तो तयार झाला. योगिराजाच्या मंत्रबळानें राजाला योगनिद्रा आली. योगी सुमित्राला म्हणाला—"मी जें फूल राजाला दिलें होतें त्यामुळेंच ही डोकें दुखी सुरू झाली होती. या झोंपेंतून जागा झाल्यावर ती बंद होईल." राजा झोंपेंतून जागा झाल्यासारखा उठला. त्याची डोकेदुखी बंद झालेली होती. "आतां नाहीं माझें डोकें दुखत!" तो म्हणाला.

"ज्यास्त विचार केल्यानें तुझा मेंदू सुजला होता. आतां तुला नाहीं त्रास होणार. सुमित्र तुला तुझ्याच विचार-शक्तीच्या सहाय्यानें सल्ला देत राहील." योगी म्हणाला.

त्यानंतर धीरसिंह आपल्या मंत्र्याच्या सल्ल्याप्रमाणें राज्य करूं लागला. राजा ज्याचा सल्ला घेतो, तो मोठा हें सर्व दरबारी लोकांस कळलें व ते सुमित्राचा पण मान करूं लागले. राजा आणि मंत्री परस्परांवर विश्वास करून प्रजेचें पालन करूं लागल्या-मुळें प्रजा सुखी झाली.





# शूरपाल

वितस्ता नदीच्या काठीं केकेय देशांत प्रजापति नांवाचा राजा राज्य करीत असे. त्याच्या मांडलिक राजांपैकीं एकाचें नांव धर्मपाल असें होतें. तो एक शूर शासक होता. धर्मपालच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा शूरपाल जहागिरीचा वारस झाला. त्याच्या जहागिरींतून राजाला कित्येक वर्षें कर मिळाला नव्हता. राजाला ही गोष्ट कळली तेव्हां त्यानें शूरपालकडे निरोप पाठविला कीं एका महिन्याच्या आंत येऊन राजाला भेटला नाहींस तर जहागीर जप्त होईल. शूरपाल आपला मित्र क्षेमवर्मा याच्या बरोबर वीस सैनिक घेऊन निघाला.

शूरपालची जहागीर फार चांगली होती. जहागिरींत सोन्याची खाण पण होती. तें कळल्यावर राजाच्या धाकट्या मुलाला दुष्टपणा सुचला. मध्यें विघ्न आणलें तर राजाची भेट होणार नाहीं. त्यानें राजाज्ञा मोडली आहे म्हणून राजा त्याची जहागीर पण जप्त करील. तेव्हां राजाचें मन वळवून ती जहागीर स्वतःसाठीं मागून घेऊं, असा होता त्याचा डाव. ती गोष्ट मंत्र्याच्या मुलाला सांगून तो कांहीं सैनिकांना घेऊन राजधानी बाहेर शूरपालच्या वाटेवर रानांत लपून बसला. सैनिकांना झुडपाआड लपायला सांगून राजाचा मुलगा व मंत्र्याचा मुलगा घोड्यावर बसून रस्त्यावर आडवे उभे राहाले.

घोडे व कांहीं घोडेस्वार दूर उभे असलेले पाहून क्षेमवर्माला संशय आला, कांहींतरी भानगड आहे. त्यानें शूरपालाला व त्याच्या बरोबरच्या सैनिकांना मागें रहा-यला सांगितलें व स्वतः घोड्यावर बसून पुढें

श्री. भा. रा. भोसले



















गेला. तोच शूरपाल असेल असा विचार करून राजकुमार व मंत्र्याचा मुलगा दरडावून म्हणाले—"थांबव, घोडा!"

"मला पुढें जायचें आहे. बाजूला व्हा!" असें म्हणत क्षेमवर्मानें राजकुमाराला धक्का देऊन पुढें गेला.

"इतका गर्व आहे का तुला?" असें म्हणत त्यानें क्षेमवर्माला धक्का दिला. लगेच शूरपाल आपला घोडा भर धांव सोडून पुढें आला व दरडावून म्हणाला—"भितऱ्या निशस्त्र माणसावर शस्त्र उगारतांना तुला लाज नाहीं आली?"

"प्रथम तूं स्वतःचा बचाव कर! आला आहे उपदेश करायला!" राजकुमारानें तलवार उपसली. पण इतक्यांत शूरपालची तलवार राजकुमाराला लागली व त्याचें डोकें जमिनीवर धुळींत लोळूं लागलें.

मंत्र्याचा मुलगा तें पाहून घाबरूनच गेला. त्याची पांचावर धारण बसली. शूरपालनें आपला मित्र क्षेमवर्मा याला हात धरून उभें केलें आणि तो सरळ राजधानींत गेला. राजाला नमस्कार करून म्हणाला—"आपल्या राजधानीबाहेर वेशीजवळ डाकू दिवसा ढवळ्या वाटसरूंना लुटीत आहेत. एका मूर्ख डाकूनें माझ्या या मित्राला धक्का मारून घोड्यावरून खालीं पाडलें. मी त्याचें पारिपत्य करण्यास गेलों त्यांत तो डाकू ठार झाला."

"ठीक! अशा लोकांना अशीच शिक्षा झाली पाहिजे!" राजा म्हणाला.

इतक्यांत मंत्र्याचा मुलगा राजकुमाराचें प्रेत घेऊन आला. त्यानें तें राजासमोर ठेऊन निवेदन केलें कीं "महाराज, या दुष्टानें राजकुमाराचा कसा अमानुष वध केला आहे पहा. यानें विनाकारण त्यांच्यावर शस्त्र उगारलें. राजकुमार आपली तलवार नीट उपसून त्याच्यावर वार करणार इतक्यांत यानें त्यांचा शिरच्छेद केला."

राजाला राग आला व पुत्र शोकानें विह्वल होऊन तो शूरपालाला मारायला धांवला. पण कांहीं दरबारी मध्यें पडले. रागाच्या भरांत कांहीं करून नंतर पश्चाताप करणें बरोबर होणार नाहीं असा त्यांनीं सल्ला दिला. शूरपालाचें काय म्हणणें आहे हें देखील ऐकून घेतलें पाहिजे. त्यांनीं राजाला आवरलें.

"मी स्वतः होऊन राजकुमारावर धांवलों नाहीं. प्रथम आपल्या मुलानेंच अपशब्द बोलून माझ्यावर वार केला. तो कोण आहे हेंदेखील मला माहीत नव्हतें. आपल्या मंत्र्याचा मुलगा म्हणाला तें सपशेल खोटें आहे. मी स्वतः आपल्या भेटीस येत असतां वाटेंत भांडण काढून राजकुमाराचा मी वध करीन यांत कांहीं अर्थ आहे का?" शूरपाल म्हणाला.

परंतु राजाला पुत्र वधाचा इतका राग आला होता कीं त्याला दुसरें कांहीं दिसत नव्हतें.

"तूं खरें बोलत आहेस कीं मंत्र्याचा मुलगा, हें आम्हांला कळायला मार्ग?





देवालाच काय तें माहीत. तुम्ही दोघे द्वंद्व युद्ध करा. जो जिंकेल तोच खरा!" राजा म्हणाला.

शूरपाल अजून वयानें लहानच होता. मंत्र्याचा मुलगा चांगला तीस वर्षांचा बलवान होता. राजाला वाटलें होतें कीं त्याच्या हातीं शूरपाल नक्की ठार होईल व मुलाच्या खुनाचा सूड सहजीं उगवला जाईल. शूरपालच्या अंगांतली चपळता मंत्र्याच्या मलाच्या अंगांत नव्हती. परिणाम जो व्हायचा तो झालाच. मंत्र्याचा मुलगा आपल्या मित्राला भेटायला निघून गेला, म्हणजे ठार केला.

"महाराज, निदान आतां तरी हा हट्ट सोडाल अशी अपेक्षा करतों. आपण सांगितल्याप्रमाणें ह्यानें स्वत: निर्दोष असल्याचें सिद्ध केलें आहे." मंत्री म्हणाले. परंतु राजाचा राग कमी व्हायच्या ऐवजीं जास्त वाढला. त्याला ठार करण्यासाठीं राजानें आणखी एक उपाय केला.

"मी याला माफ करायला तयार आहे. पण यानें मी सांगितलेलें एक काम करून आलें पाहिजे. त्याला कुशान चक्रवर्तीच्या राज्यांत जावें लागेल. तेथें मुख्य अतिथीचा वध करून चक्रवर्तीचा किरीट आणून माझ्या समोर हजर केला पाहिजे. त्यानें हें काम करून दाखविलें तर मी त्याला माफ करायला तयार आहें." राजानें जें कांहीं सांगितलें तें ऐकून राजाचा खरा हेतू काय हें सर्वांना सहजीं कळलें. सर्व चकित होऊन शूरपाल काय उत्तर देतो हें पाहूं लागले. पण शूरपाल शांतपणें म्हणाला—"महाराज! आपली हीच इच्छा असेल तर मी ती आज्ञा समजून वागायला तयार आहें." असें सांगून तो दरबारांतून निघून गेला.

क्षेमवर्मा व आपल्या बरोबरच्या सैनिकांना राजधानींतच मागें रहायला सांगून तो एकटाच निघाला. पुष्कळ दिवसांचा प्रवास होता व वाट तशी निर्विघ्न नव्हती. कुशान देशाच्या पश्चिमेकडच्या डोंगरांत राक्षसांची वस्ती होती. शूरपालला त्याच वाटेनें जावें लागलें. राक्षसांचा राजा ताम्राक्ष याच्याशीं त्याला युद्ध करावें लागलें. परंतु शूरपाल त्यांत यशस्वी झाला. त्यानें त्या राक्षसाला ठार करून त्याच्या हातांतील सोन्याचें कंकण काढून तो कुशान राजाच्या राजधानींत पोंचला.

शूरपाल राजधानींत पोंचला. त्या दिवशीं राजधानींत मंगलवाद्यें वाजत होतीं व चहूंकडे लोकांची गर्दी होती. त्याच दिवशीं राजकन्येचा विवाह होता. राजवाड्यांत चक्रवर्ती आपल्या पाहुणे मंडळीसह बसला होता. एका बाजूला राजकन्या बसली होती व दुसऱ्या बाजूला नवरदेव. शूरपाल सरळ राजासमोर जाऊन उभा राहिला. त्यानें राजाला लवून मुजरा केला. "ही माझ्या राजाची आज्ञा आहे." असें सांगून त्यानें नवर देवाचा वध केला.

हाहाकार उडून गेला. चक्रवर्ती स्वत: चकित होऊन त्याच्याकडे पाहूं लागले. तो आला काय, बोलला काय आणि क्षणार्धांत





त्यानें नवर देवाला ठार केलें काय? पण राजकन्या खूष झालेली दिसली. कारण राजानें तिच्यासाठी निवडलेला मुलगा तिला पसंत नव्हता. त्याच्यांत मनुष्याला साजतील असा एक गुणदेखील नव्हता.

"पकडा त्या दुष्टाला!" राजा ओरडला.

"महाराज! क्षमा करावी! माझें आपल्या होणाऱ्या जांवयांशीं किंवा आपणांशीं कांहीं एक वैर नाहीं. मी फक्त आपल्या राजाच्या आज्ञेचें पालन केलें आहे. आपण आपला मुकुट काढून द्यावा, म्हणजे आज्ञेचें पुरें पालन होईल व मी आपल्या वाटेनें निघून जाईन. पुन्हां मी आपल्या देशांत कधीं पाऊल देखील टाकणार नाहीं." शूरपाल तें सर्व विनम्रपणें म्हणाला.

तें ऐकून राजा काय गप्प बसणार? तो क्रोधांध होऊन म्हणाला—"पकडा याला आणि टाका याला अंधार कोठडींत. उपाशी मारा याला. एक थेंब पाणीदेखील देऊं नका प्यायला!"

"राजा! तूं मला सामान्य मनुष्य समजत असशील, पण लक्षांत ठेव मी ताम्राक्ष राक्षसाचा वध केला आहे येतांना. हें पहा त्याचें कंकण त्याला ठार करून त्याच्या हातांतून काढून घेऊन आलों आहें." शूरपाल म्हणाला. पण कुशान राजानें तिकडे दुर्लक्ष केलें.

राजाच्या आज्ञेप्रमाणें शूरपालला कैदेंत टाकण्यांत आलें. तो दिवस व त्याच्या पुढला दिवसपण उलटला. शूरपाल काळ कोठडींत जमिनीवर पडून विचार करीत होता. आतां या कोठडींतच मरण येणार. मुलाचा वध केला म्हणून प्रजापति राजानें चांगला सूड काढला माझ्यावर.

पण त्या काळोखांतहि जणुंकांहीं आशेचे किरण एक तरुण स्त्री हातांत दिवा घेऊन



आली. शूरपालनें तिला ओळखलें, ती कुशान राजाची कन्या होती. म्हणाली—"तुझ्यासाठीं जेवण व पाणी घेऊन आलें आहें! पाहारेकऱ्यांना बक्षिस देऊन मी आंत आलें आहें. पाहारेकरी मी सांगेन तसें वागतील."

तेव्हांपासून राजकन्या रोज रात्रीं त्याच्या-साठीं जेवण आणूं लागली. दोघं बराच वेळ परस्परांशीं बोलत बसत. त्या क्रूर माणसाचा वध करून त्यानें तिला संकटांतून वांचविल्याबद्दल तिनें शूरपालचे आभार मानले. शूरपालानें देखील तिचे आभार मानले. त्याला जगण्याची आशा उरली नव्हती. तिनें त्याला वांचविलें याबद्दल त्यानें तिचे आभार मानले. परंतु त्या काळकोठडींतून सुटका कशी होणार हें त्याला कळेना.

एका महिन्यानंतर राजाला त्या काळ-कोठडीच्या अधिकाऱ्यानें येऊन कळविलें कीं तो दुष्ट मेला. राजाच्या मनाचें समाधान झालें.

पुढें कांहीं दिवसांनीं राज्यावर एक मोठें संकट आलें. शूरपालनें ताम्राक्ष राक्षसाचा वध केला होता. त्याचा भाऊ धूम्राक्ष कुशान राज्यावर चालून आला. कुशान राजा घाबरला. राक्षसांशीं वैर करून राज्याचें रक्षण कसें होणार? बापाला काळजींत पडलेला पाहून राजकन्या म्हणाली—"ताम्राक्षाचा वध करणारा तरुण असता तर त्यानें या धूम्राक्षाचा पण वध करून आपल्याला वांचविलें असतें."

"पण आतां काय उपयोग? तो तर मरून गेला!" राजा म्हणाला.

राजकन्येनें राजाचे पाय धरले व म्हणाली—"क्षमा करावी, महाराज! तो तरुण अजून जिवंत आहे. मी रोज रात्रीं त्याला जेवण पोंचवीत होतें. तो अजून तेथेंच आहे. त्याला मुक्त केल्यास या राक्षसाचा वध करील."

राजाच्या जिवांत जीव आला. राक्षसांची जात तरी काय विचित्र आहे! त्यांच्यापैकीं एकाला जरी बाहेरून कोणी येऊन ठार केला तर तें ते सर्व विसरून जातात. एका राक्षसाला ठार करण्यासाठीं जर त्यांच्या प्रदेशांत बाहेरून सैन्य आलें तर सर्व राक्षस मिळून कुशान राजाच्या राजधानीला वेढा देत. तेव्हां त्यांची एकदां खोड मोडलीच पाहिजे असा विचार करून राजानें काळ-कोठडींतून शूरपालाला बोलावून घेऊन यायला सांगितलें.



शूरपाल आल्यावर राजा त्याला म्हणाला—"तूं ज्या राक्षसाचा वध केला होतास त्याचा धाकटा भाऊ राक्षसांचें मोठें सैन्य घेऊन आला आहे व त्यानें राजधानीला गराडा घातला आहे. तूं त्याचा पराभव केलास तर माझा मुकुट तर मी तुला देईनच राज-कन्येचा विवाह देखील तुझ्याशीं करून देईन."

शूरपाल त्याला तयार झाला.

तो धूम्राक्षाशीं द्वंद्व युद्धास निघाला. धूम्राक्ष गदा घेऊन शूरपालाला मारायला धांवला. पण शूरपालानें त्याचपूर्वीं चपळाईनें आपली तलवार त्याच्या पोटांत भोसकून त्याला ठार केलें.

शूरपाल आपली कामगिरी पूरी करून आला. त्यानें ती गोष्ट राजाला कळविली व दिलेल्या वचनाप्रमाणें मुकुट देण्यास विनंति केली.

"मी तुझा मृत्युदंड रद्द करतों. परत स्वदेशीं जायला तुला परवानगी आहे." राजा म्हणाला.

"महाराज! आपण मला आपला मुकुट देऊन राजकन्येशीं माझा विवाह करून










देण्याचें वचन दिलें होतें." शूरपालानें आठवण करून दिली.

"तूं मी सांगितल्याप्रमाणें निघून गेला नाहींस तर तुला पुन्हां ती शिक्षा देण्यांत येईल. तोंड संभाळून बोल!"

शूरपालाला राग आला. त्यानें तलवार उपसून वचनभंग केल्याबद्दल राजाला शिक्षा करण्याचें ठरवून त्याचा शिरच्छेद केला. राजाचे स्वामिभक्त दरबारी त्याला धरायला धांवले. परंतु राजाच्या मरणानंतर लगेच राजकन्येकडे वारसा हक्क आला. ती म्हणाली—"यांचा अपराध कांहीं नाहीं. बाबांचीच चूक होती. त्यांनीं दिलेलें वचन न पाळतां यांना पुन्हां तुरुंगांत खितपत मरणाची शिक्षा दिली होती. यापुढें हेच माझे पति आहेत. तेव्हां यांच्या आज्ञेचें पालन करणें हें माझ्या प्रजेचें कर्तव्य आहे.

शूरपाल व राजकन्येचा विधिवत विवाह-समारंभ पार पडला. तिनें आपल्या पतीला कुशान चक्रवर्तीच्या गादीवर बसवून त्याचा राज्याभिषेक करविला. केकेय देशाचा राजा प्रज्ञापति यानें नव्या चक्रवर्ती राजाचें अभिनंदन केलें.

"महाराज! मी आपण आज्ञा केल्याप्रमाणें दोन्ही कामें पुरी केलीं आहेत. कुशान राजाचा मुकुट माझ्या डोक्यावर दिसतच असेल. आपण आज्ञा करावी!" शूरपाल प्रज्ञापतीला म्हणाला.

प्रज्ञापतीनें त्याचे पाय धरून माफी मागितली.

"या खेपेस मी माफ केलें. या पुढें कोणाला अशा संकटांत ढकलूं नका!" शूरपालानें प्रज्ञापतीला बजावून सांगितलें.





# सात घोडे

फार पूर्वी एका रानाजवळ एक गरीब कुटुंब रहात असे. पति-पत्नी व दोन मुलें जिवापाड मेहनत करून उदर निर्वाह करीत. तरी त्यांना पोटभर अन्न किंवा अंगभर वस्त्र कधीं मिळालें नाहीं.

असल्या जिण्यापेक्षां भीक मागून जगणें जास्त बरें, असा विचार करून मोठा मुलगा सकाळीं उठून घरून निघाला. दिवसभर हिंडत हिंडत तो एका राजवाड्यासमोर आला तेव्हां रात्र पडली होती.

राजवाड्यासमोर स्वतः राजा पायरीवर उभा होता. त्या मुलाला पाहून राजानें विचारलें—"कोण तूं? कोठून आलास?"

"एक जागा असेल तर सांगतां येईल. जेथें पोटभर खायला मिळेल तेंच गांव माझें!" मुलगा म्हणाला.

"म्हणजे तुला काय पाहिजे आहे. माझ्याकडे सात घोडे आहेत. त्यांना चरायला घेऊन जा. तुला निराळा पगार देणार नाहीं. दिवसभर घोड्यांबरोबर हिंडत रहा. संध्याकाळीं आल्यावर घोड्यांनीं दिवसभर काय खाल्लें व काय प्यालें तें येऊन सांग. तूं खरें बोललास तर मी आपल्या मुलीचें लग्न तुझ्याशीं करून देईन. खोटें बोललास तर तुझी चामडी लोळवीन." राजा म्हणाला.

त्या गरिबाच्या मुलाला हें काम तसें कठीण वाटलें नाहीं. राजाचे जांवई आपण झालोंच असें त्याला वाटूं लागलें. म्हणाला—"मी आपलें काम करायला तयार आहें."

तो दुसऱ्या दिवशीं तबेल्यांत गेला. त्यानें घोडे सोडले व तबेला बंद करण्या-

सौ. सरोजनि परब



साठीं बाहेर आला. पण तेवढ्यात घोडे वायुवेगानें एका डोंगराकडे धांवले. पळूं लागल्यावर त्यांचा वेग जास्तच वाढत गेला. वाटेंत सर्वत्र हिरवीं गार कुरणें होतीं. पण घोडे चरायला कोठेंहि थांबले नाहींत.

तो डोंगरापर्यंत धांवत आला. पण चढणीवर धांवत जाणें अशक्य होतें. घामानें त्याचे सर्व कपडे ओलेचिंब झाले होते. त्याला दम लागला होता डोंगरा जवळच पायथ्याशीं एका झोंपडींत एक म्हातारी चरख्यावर सूत काढीत बसली होती. तिनें त्याला पाहून बोलाविलें. म्हणाली—“ये बाळ, आंत ये. किती घाम सुटला आहे.” त्यानें चकित होऊन म्हातारीकडे पाहिलें. तेवढ्यांत घोडे अदृश्य झाले.

घोड्यांना धरणें अशक्य आहे असा विचार करून तो त्या म्हातारीच्या झोंपडींत शिरला. म्हातारीनें त्याचा घाम पुसला. पिंजारलेले केस विंचरून सारखे केले. नंतर त्यानें कांहीं वेळ विश्रांति घेतली व उठून म्हातारीला म्हणाला—“आजी! आतां मी सरळ आपल्या गांवीं जातों. राजवाड्यांत जाणें आतां व्यर्थच. राजवाड्यांत गेलों तर राजा विचारील कीं घोड्यांनीं काय खाल्लें व काय प्याले? मी समाधानकारक उत्तर देऊं शकलों नाहीं. तर तो मारहाण करून माझा जीव घेईल. मग उघड्या डोळ्यांनीं विहिरींत कशी काय उडी मारूं?”

“अरे एवढ्याशा गोष्टीसाठीं इतकी भीति? घोडे गवत खाऊन पाणी पितात. राजाला तें सांग!” म्हातारीनें त्याला सल्ला दिला.

संध्याकाळीं घोडे परत येईपर्यंत तो मुलगा वाट पहात म्हातारीच्या झोंपडींतच बसून राहिला. त्यांच्या पाठोपाठ तो राजवाड्यांत गेला.





तो परत आल्याबरोबर राजानें त्याला विचारलें—“घोडे चरले का छान? काय खाल्लें व प्याले?”

“गवत खाऊन पाणी प्याले!” मुलगा म्हणाला.

“याला छान बडवा व धक्के मारून बाहेर काढा याला.” राजानें नोकरांना आज्ञा केली.

म्हातारीचा सल्ला होता तसा तो वागला म्हणून त्याला मार खावा लागला. रक्तबंबाळ होऊन तो घरीं परत आला.

मोठा मुलगा घरीं परत आल्यावर धाकटा मुलगा स्वतःचा उदरनिर्वाह मी बाहेर कोठेंतरी जाऊन करीन असें सांगून घरून निघून गेला. तो देखील दिवसभर चालत संध्याकाळीं त्याच राजाच्या राजवाड्यासमोर आला. राजानें त्याला देखील घोडे चरायला घेऊन जायला सांगितलें व ते काय खातात पितात हें पाहून परत येऊन सांगायला सांगितलें. त्यानें त्याला बजावलें कीं जर खोटें बोललास तर तुझी चामडी लोळवीन. धाकट्या मुलानें तें कबूल केलें.

दुसऱ्या दिवशीं तो घोडे सोडूं लागला तेव्हां घोडे पळूं लागले. धाकटा मुलगा त्यांच्या समोर ओरडत होता—“या या, माझ्याबरोबर धांवण्याची पैज मारायला!”

घोडे डोंगरापर्यंत पोंचले तरी तो धांवतच होता. त्याचे कपडे घामानें ओले चिंब झाले होते. तरी तो पळत राहिला. तो देखील म्हातारीच्या झोंपडीपर्यंत पोंचला.

“ये बाळ! तुझा घाम पुसतें मी!” म्हातारी त्याला म्हणाली.

“मी जवळ येईन तर ना?” म्हणत तो पळत पुढें निघून गेला.

पण आतां तो बराच दमला होता. तो सुरवातीला घोड्यांच्या पुढें धांवत होता.



नंतर बरोबर व शेवटीं घोडे पुढें धांवत होते व तो त्यांच्या पाठोपाठ.

सर्वांत पाठीमागें जो घोडा होता. त्याची आयाळ पकडून तो त्या घोड्यावर बसला.

घोडे एका दाट अरण्यांत पळत गेले. एका जागीं एक देऊळ होतें. त्या देवळा-जवळ ते थांबले. घोडे येथेंच नित्य येतात वाटतें असा विचार करून तो घोड्यावरून खालीं उतरला व देवळाच्या आवारांत जाऊं लागला.

घोडे एकेक करून त्या आवारांत शिरले व आंत पाऊल पडल्याबरोबर त्यांना मनुष्य रूप मिळालें. त्यांच्यांत तो बदल झालेला पाहून धाकट्या मुलाला अर्थातच फार आश्चर्य वाटलें.

त्या तरुण मुलांपैकीं सर्वांत जो मोठा होता त्यानें धाकट्या मुलाला जवळ बोला-वून आपली हृदयविदारक गोष्ट सांगितली. म्हणाला—"आम्ही सातजण राजपुत्र आहोंत. आमच्या वडिलांनीं आमच्या बहिणीचें लग्न तुझ्याशीं करून द्यायला सांगितलें आहे. वाटेंत ज्या म्हातारीनें तुला आपल्या झोपडींत बोलाविलें होतें ती एक जादूगारीण आहे. तिनेंच मंत्रबळानें आम्हांला हें रूप दिलें आहे. तिचा मंत्र या मंदिराबाहेर उपयोगी पडतो. म्हणून आम्ही दिवसां शक्य असेल तितका वेळ येथें येऊन राहतों. मनुष्यांचें जेवणच आम्हांला आवडतें. मनुष्य जें खातात तेंच आम्ही खातो व पितों. आम्ही जें खाऊं व पिऊं तें तूं आमच्या बाबांना जाऊन सांग म्हणजे ते तुझें लग्न आमच्या बहिणीशीं करून देतील. त्यानंतर एक उपकार आमच्यावर कर. या देवळांत एक तलवार आहे. ती मंत्रवलेली आहे. तूं ती तलवार घेऊन आमच्याबरोबर संध्याकाळीं तबेल्यांत ये. आम्हांला बांधून ठेवल्यावर आमचीं डोकीं कापून टाक. तसें केलेंस तर आमचें अश्व रूप जाऊन आम्हांला मनुष्य रूप मिळेल."



असें सांगून मोठ्या राजकुमारानें त्या मुलाला देवाळांतली तलवार दाखविली. तो मुलगा दोन्ही हातांनीं देखील ती सहजीं उचलूं शकला नाहीं.

देवळांत एक खड्डा होता. त्यांत जादूचें पाणी होतें. राजकुमारानें तें पाणी तीनदां प्यायला सांगितलें. तीन घोट पाणी प्याल्या-वर एका हातानें त्याला ती सहज उचलतां आली.

नंतर राजकुमारांनीं देवळाच्या आवारांत सैंपाक केला. जेवणासाठीं सर्व आवश्यक पदार्थ देवळांत एका कोठडींत ठेवलेले होते.

राजकुमारांबरोबर धाकट्या मुलानें देखील जेवून घेतलें. संध्याकाळपर्यंत सर्व त्या देवळांतच राहिले. नंतर ते घरीं निघाले. देवळांतून बाहेर आल्याबरोबर सातहि राज-कुमार घोडे झाले. गरीब मुलगा तलवार घेऊन एका घोड्यावर बसला. मुलाला घोड्यां-बरोबर परत आलेला पाहून म्हातारी रागानें त्याच्याकडे पाहूं लागली. तिनें त्याला धमकी दिली कीं तुला गाढवाचें रूप देईन.














संध्याकाळीं मुलगा घरीं आल्यावर राजानें त्याला विचारलें—"काय रे ? घोड्यांना नीट चरायला घेऊन गेला होतास ना ?"

मला त्याच कामावर नेमलें आहेत तर मी तें नाहीं तर दुसरें काम करीन का ?" मुलानें विचारलें.

"काय खाल्लें त्यांनीं व काय प्याले ते ?" राजानें पुन्हां विचारलें.

"मनुष्य जें खातात तेंच त्यांनीं खाल्लें व मंत्रवलेलें पाणी प्याले." धाकटा मुलगा म्हणाला.

"अरे हे उत्तर देऊं शकणारा आजपर्यंत दुसरा कोणी भेटला नव्हता. मी वचन दिल्याप्रमाणें माझ्या मुलीशीं तुझें लग्न करून देतों. यापुढें तूं माझा जांवई !"

त्या दिवशीं रात्रीं सर्व झोंपीं गेल्यावर धाकटा मुलगा तलवार घेऊन तबेल्यांत गेला. पण घोड्यांचें डोकें कांपण्यास त्याचा हात धजेना. तरी मन घट्ट करून त्यानें सपासप सर्वांच्या माना कांपल्या. लगेच एका मागून एक राजकुमार त्यांच्या जागीं त्याला दिसले. सातहि राजकुमाराना मंत्रबळानें मनुष्य रूप मिळालें.

राजाला परमानंद झाला. त्याचे सातहि पुत्र देवानें त्याला परत दिले होते. त्या गरिबाच्या मुलाचीच खरोखरी ती कृपा होती. इतक्या वर्षांनीं आपल्या भावंडांना भेटूं शकल्याबद्दल राजकुमारीला आनंद झाला. तिच्या डोळ्यांतून आनंदाश्रु टपटप गळूं लागले.

त्या गरीब मुलाचें राजकन्येशीं लग्न झाले. त्यानें आपल्या आईवडिलांना व वडील भावाला बोलावून घेतलें व आपल्याबरोबर राजवाड्यांतच त्यांना ठेवून घेतलें.





# युध्द कांड

बिभीषणानें कुंभकर्णाचें वर्णन करीत असतां त्याची जन्मकथा पण सांगितली. म्हणाला—"कुंभकर्ण जन्माला आल्याबरोबरच त्याला इतकी भूक लागलेली दिसली कीं त्यानें सहस्रावधि लोकांना जिवंत गिळून टाकलें. लोक घाबरून इंद्राकडे धांवले. इंद्राला कुंभकर्णाचा राग आला व त्यानें त्यावर वज्र टाकलें. पण कुंभकर्ण भ्याला नाहीं. तो इंद्राच्या ऐरावतावर चढला. त्याचे दांत उपटले व ते घेऊन इंद्राच्या छातींत भोसकले.

इंद्र घाबरून पळाला व ब्रह्मदेवाकडे गेला. त्यानें ब्रह्मदेवाजवळ विनंति केली कीं कुंभकर्णाच्या भयानें पृथ्वीवर हाहाकार उडाला आहे. त्यानें माझा व देवांचा अपमान केला आहे. आश्रमांचा ध्वंस करून परस्त्रियांचें अपहरण करीत आहे.

ब्रह्मदेवानें सर्व राक्षसांचें पाचारण केलें. त्यांत कुंभकर्णपण होता. तो त्याला म्हणाला—"विश्रवसूनें तुला जनसंहार करण्यासाठीं का जन्म दिला ? जा, तुला आजपासून कायमची गाढ निद्रा लागेल."

ब्रह्मदेवासमोरच कुंभकर्णाला झोंप येऊं लागली. तें पाहून रावण म्हणाला—"अजोबा ! आपल्या नातवाला असा शाप दिलात तर कसें चालेल ? त्याच्या निद्रेची












व जागरणाची वेळ ठरवून घ्या म्हणजे झालें.

"तथास्तु! याला सहा महिने झोंप व सहा महिने जागरण राहील!" ब्रह्मदेव म्हणाला.

येथवर कुंभकर्णाचें चरित्र वर्णन करून बिभीषण म्हणाला—"रामा, तुझ्या भयानें रावणानें धावरून जाऊन याला जागा केला आहे. त्याला पाहून वानर सेना पळूं लागली आहे. म्हणून आपण वानरांना असें समजावून सांगितलें पाहिजे कीं कुंभकर्ण राक्षस नसून एक चालतें बोलतें यंत्रच आहे."

रामानें नील वानरास वानर सैन्य सज्ज करायला सांगितलें. शरभ, हनुमान, अंगदादि वानर एकेक करून मोठमोठे डोंगर उचलून घेऊन लंकेच्या महाद्वारासमोर उभे राहिले.

तिकडे कुंभकर्ण रावणाच्या महालांत गेला. तेथें त्याचा मोठा भाऊ शोक करीत बसलेला त्याला दिसला. कुंभकर्णाला आलेला पाहून रावण प्रेमानें त्याला भेटला.

कुंभकर्णानें वडील भावाला आदरपूर्वक नमस्कार केला व म्हणाला—"दादा! मला कां रे जागा करायला सांगितलें? असें झालें तरी काय? मृत्यूचें बोलावणें कोणाला रे आलें आहे?"

"तूं झोंपला होतास म्हणून तुला रामानें माझ्याविरुद्ध काय काय केलें हें कळलें नाहीं. राम सुग्रीवाला बरोबर घेऊन समुद्र पार करून लंकेला आला आहे. लंकेंतलीं उद्यानें पहा, सर्वत्र वानरच वानर आहेत. सर्व मुख्य मुख्य राक्षसांचा वध रामलक्ष्मणांनीं केला आहे. पण मुख्य मुख्य वानरांपैकीं एकाच्या अंगाला देखील आम्हीं आतांपर्यंत हात लावूं शकलों नाहीं. तूं महाबली आहेस. मला तूं मदत करशील या आशेनें मी तुला जागें करायला सांगितलें." रावण कुंभकर्णाला म्हणाला.





कुंभकर्ण हंसला व म्हणाला—"दादा! मागें एकदां याविषयीं आपलें बोलणें झालें होतें. तेव्हां स्वतःला तुझे हितैषी म्हणविणारे म्हणाले होते कीं तुझ्यावर कोणत्याहि प्रकारचें संकट येणार नाहीं. तें संकट आज प्रत्यक्ष उभें आहे, वध. मागचा पुढचा विचार केल्याशिवाय तूं सीतेला उचलून घेऊन आलास. माझ्या मतें अशा प्रसंगीं तूं बिभीषण सांगेल तसें करावें."

रावण तें ऐकून चिडून गेला. म्हणाला—"मला शिकवायला नकोस तूं! मला कळतें मी काय करावें तें. माझा मान तूं राखला पाहिजेस. आज उपदेश करण्याची वेळ नाहीं. जें झालें तें झालें. आतां त्याची चर्चा करण्याची गरज उरली नाहीं. पुढें काय करावयाचें तें सांग! मी चूक केली आहे ती तूं आपल्या शौर्यानें बरोबर कर! तरच तुझें शौर्य, नाहींतर तें काय कामाचें?"

रावणाला राग आलेला पाहून कुंभकर्ण थोड्या नमत्या आवाजांत म्हणाला—"तुला वाईट वाटून घेण्याचें कारण नाहीं. किंवा रागरोष करण्याचेंहि कारण नाहीं. मी तुझा भाऊ आहें, हितैषी आहें. म्हणून मला जें रास्त वाटलें तें मी सांगितलें. मी रामा-लक्ष्मणांचा वध करून तुझी इच्छा पूर्ण करतों. रामाचें डोकें तुझ्यासमोर हजर करून दाखवितों. तुला रामाचें भय करण्याचें काय कारण? मी युद्धाला जातों. मला शस्त्रास्त्रांची गरज नाहीं. रिकाम्या हातांनींच मी सहस्रावधि शत्रूंचा संहार करीन."

कुंभकर्णाचें बोलणें झाल्यावर महोदर म्हणाला—"तूं आहेस मूर्ख, बेअक्कल आणि घमेंडखोर! जें काम करणें रास्त नाहीं तें काम रावण करीलच का? म्हणे, चुकीची दुरुस्ती अशक्य आहे. त्या चुकीचा हा परिणाम आहे या बोलण्याचा काय अर्थ?



चांगल्या कामाचा परिणाम दुःख व वाईट कामाचा परिणाम सुख होत नाहीं असें देखील पहावयास मिळतें. सीतेचें अपहरण करण्याची इच्छा रावणाला झाली. आम्ही त्याचा विरोध केला नाहीं. तूं एकटाच युद्धाला जाईन, म्हणतोस. जनस्थानांत इतक्या राक्षसांचा संहार ज्यानें केला त्याला तूं एकट्यानें ठार करणार?"

महोदरनें कुंभकर्णाला सुचविलें कीं आपण दोघे बरोबर द्विजिह्व, सह्याद्रि व वितर्दन यांना घेऊन जाऊं व रामाचा वध करूं या. राम मारला गेला तर ठीक, आपण जखमी होऊन परत आलों तर परत येऊन रावणाला कळवूं कीं आपण रामाला खाऊन टाकलें. रावण सीतेला तें जाऊन सांगेल व तिचें मन वळविण्याचा प्रयत्न करील. रावणाला युद्ध करण्याची गरजच राहणार नाहीं. रणांगणावर गेल्याशिवायच सीता रावणाला वशीभूत होईल. सर्व मनासारखें होऊन जाईल.

कुंभकर्ण शूर होता. त्याला हा दुष्टपणा व फसवेगिरी आवडली नाहीं. म्हणाला—"असला मूर्खपणा मनांतून काढून टाक. तोंडघशी पडशील!"

त्याच्या सारख्यांच्या सल्ल्यामुळेंच रावणाची ही दशा झाली होती. युद्धाचें नुसतें नांव ऐकून घाबरून जाणाऱ्या महोदरासारख्या लोकांनींच रावणाचा तोंडपुजेपणा करून त्याला पथभ्रष्ट केलें होतें.

कुंभकर्णानें महोदरला केलेला उपदेश ऐकून रावण हंसला व म्हणाला—"महोदर रामाला भ्याला आहे म्हणून युद्धाला न जावें लागावें म्हणून हे छक्के पंजे करण्याचा विचार करीत आहे. तूं जा व राम, लक्ष्मण आणि वानरांचा संहार करून ये.

कुंभकर्णानें एक विचित्र भाला घेतला. तो पोलादी होता. पण सोन्यानें मढवलेला होता. त्याला तांबड्या फुलांची माळा घातलेली होती. इंद्राच्या वज्राहून तो कमी प्रतीचा नव्हता. तो भाला घेऊन कुंभकर्ण म्हणाला—"मी एकटाच युद्धाला जातों. मला कोणाच्या मदतीची गरज नाहीं. तरी रावणानें त्याला बरोबर सैन्य घेऊन जायला सांगितलें. त्यानें आपल्या भावाच्या गळ्यांत एक रत्नहार घालून सुंगधी फुलाची माळ घातली व सोन्याचें कवच घालायला देऊन त्याला आशीर्वाद दिला.



कुंभकर्ण भावाला कडकडून भेटला. त्याला नमस्कार केला व रणांगणावर निघाला. त्याच्या पाठोंपाठ मोठमोठे वीर राक्षस सैन्य घेऊन निघाले. कुंभकर्णानें रणांगणावर निघातांना आपलें अंग वाढविलें होतें. म्हणून तो लंकेच्या महाद्वाराबाहेर आला, तेव्हां त्याला पाहून वादळाच्या वाऱ्यानें ढगांची जशी गाळण उडून जाते तशी वानरांची उडाली व पळापळ सुरू झाली.

कुंभकर्णाला पाहून पळणाऱ्या वानरांत नल, नील, गवाक्ष कुमुद इत्यादि वानरवीर होते. त्यांना पळत असलेले पाहून अंगद म्हणाला—"तुम्ही आपला आत्मगौरव, पराक्रम वगैरे विसरून भित्र्यासारखे कोठें पळत आहांत? तो येत आहे तो राक्षस नसून तुम्हांला भय दाखविणारें बाहुलें आहे या आपण त्याचा सर्वनाश करूं या."

तें ऐकून पळणारे वानर मागें फिरले. त्यांनीं कुंभकर्णावर मिळून हल्ला केला. त्यांनीं डोंगर व झाडें उपटून कुंभकर्णावर टाकलीं. त्याचा यत्किंचित देखील परिणाम झाला नाहीं. तो मुळींच भ्याला नाहीं. त्याला राग मात्र आला व तो जास्त जोरानें वानरांचा संहार करूं लागला.

वानरांची गाळण उडाली व ते पळूं लागले. कांहीं आकाशांत उड्या मारूं



लागले. कांहीं समुद्रांत जाऊन पडले व कांहीं पुलावरून पळूं लागले. कांहीं अस्वलांच्या जातीचे वानर झाडावर चढून बसले. कांहीं डोंगराच्या गुहेंत शिरून लपून बसले. कांहीं मेल्यासारखे जमिनीवर चित्त पडून राहाले.

अंगदानें वानरांना धीर देण्याच्या हेतूनें बोलावून म्हटलें—"अरे, असे भिऊन पळतां काय? रणांगणावर मरणाराला वीर गति म्हणजे स्वर्ग मिळतो. शत्रूचा पराभव केलात तर कीर्ति अमर होते. पण पळपुटे भित्रे इहलोक व परलोक दोन्ही घालवून बसतात. रामाच्या हातीं कुंभकर्णाचा वध निश्चित आहे."

"अरे होय, पण तो मरणापूर्वी आमचा जीव घेईल त्याचें काय? त्यानें चालविलेला संहार आम्हांला नाहीं पहावत. आम्ही निघालों. आमचा जीव वांचला कीं पुरे आम्हांला." असें म्हणत ते कुंभकर्णाला येत असलेला पाहून पळूं लागले.

परंतु पळत असलेल्या वानरांची समजूत घालून व धीर देऊन अंगद व हनुमान त्यांना परत घेऊन आले.

नंतर मारुती बारा वीर वानरांना बरोबर घेऊन युद्धाला निघाला. त्याच्या बरोबर वृषभ, शरभ, मैंद, धूम्र, नील, कुमुद, सुषेण, गवाक्ष, रंभ, तार, द्विविद व पनस होते. त्याच्या हातीं अनेक राक्षस व हत्ती, घोडे उंट ठार झाले. मारुतीनें आकाशांत उड्डाण केलें व कुंभकर्णावर तेथून दगड व झाडें यांचा वर्षाव केला. पण कुंभकर्णानें भाल्यानें स्वतःचें रक्षण केलें. तो वानरांना पळवीत येत असलेला पाहून मारुती एक डोंगर घेऊन वाटेंत आडवा उभा राहीला. त्यानें तो डोंगर कुंभकर्णावर फेंकला तेव्हां त्याच्या डोक्याला एक जबर जखम झाली व त्याचें





सर्व अंग रक्तबंबाळ झालें. कुंभकर्णानें त्याचें उत्तर म्हणून मारुतीच्या छातींत भाला मारला. तो लागल्यावर मारुती भडभड रक्त ओकला व बेशुद्ध होऊन पडला.

मारुतीला बेशुद्ध पडलेला पाहून वानरांची पळापळ पुन्हां सुरू झाली. नील वानरानें त्यांना थांबायला सांगितलें व कुंभकर्णावर एक मोठी शिला फेंकली. कुंभकर्णानें ती चेंडूसारखी झेलली व हाताच्या मुठींत तिचा चुराडा करून चुरा फेंकून दिला. नंतर पांच वानरांनीं मिळून कुंभकर्णावर एकदम हल्ला केला. त्यांनीं त्याला दगड धोंडे, झाडें जें हातीं आलें त्यांनीं मारून बेजार करून सोडलें. पण कुंभकर्णाचा धीर मुळींच खचला नाहीं. उलट त्यानेंच त्या सर्वांना ठार केलें.

आतां मात्र वानर चिडले. सहस्रावधि वानरांनीं मिळून एकदम चारी बाजूंनीं कुंभकर्णावर दगडा धोंड्यांचा वर्षाव सुरू केला. कुंभकर्ण एकेकाला धरून कच्चाच खाऊं लागला. वानर भयभीत होऊन रामाकडे धांवले.

अंगदानें एक मोठा दगड कुंभकर्णावर फेंकला. कुंभकर्णानें चिडून जाऊन त्याच्यावर आपला भाला फेंकला. पण अंगद चपळाईनें स्वतःचा बचाव करून कुंभकर्ण उभा होता तेथें जवळ येऊन पोंचला. त्याच्या छातींत त्यानें मुष्टिप्रहार केला. कुंभकर्ण बेशुद्ध होऊन पडला. पण शुद्धीवर येतांच त्यानें अंगदाला उचलून मुठींत दाबलें व जमिनीवर फेंकून दिलें. अंगद बेशुद्ध होऊन पडला. नंतर कुंभकर्ण भाला घेऊन सुग्रीवाला मारण्यासाठीं धांवला. त्यानें सुग्रीवावर भाला फेंकला. मारुतीनें तो मध्येंच पकडला व मोडून दूर फेंकून दिला. तो लोखंडी भाला मारुतीनें गवताच्या काडीसारखा तोडून टाकलेला पाहून स्वतः कुंभकर्ण चकित झाला.










भाला हातचा गेला तेव्हां कुंभकर्णाला दगड घेऊन शत्रूला मारण्याशिवाय दुसरा उपाय सुचला नाहीं. त्यानें एक मोठा दगड सुग्रीवावर फेंकला. सुग्रीव बेशुद्ध होऊन पडल्यावर त्याला उचलून घेऊन कुंभकर्ण पळाला. सुग्रीवाला पळवून नेल्यावर सर्व वानर सेना पळून जाईल व रामालक्ष्मणांचा पराभव करणें सोपें जाईल, असें त्याला वाटत होतें. तो सुग्रीवाला घेऊन लंकेंत गेला.

मारुतीनें विचार करून पाहिला. कुंभकर्णाशीं युद्ध करून सुग्रीवाला सोडवून आणावें असा त्यानें विचार केला. परंतु गंभीरपणें विचार केल्यावर त्यानें तो विचार सोडला. कारण शुद्धीवर आल्यानंतर सुग्रीव स्वतःला सोडवून येऊं शकेल या गोष्टीची त्याला खात्री होती. त्याच्यापेक्षां आणखी महत्त्वाच्या एका गोष्टीकडे त्याचें लक्ष गेलें. सुग्रीवाला कुंभकर्ण घेऊन गेलेला पाहून वानर पळूं लागतील. त्यांना धीर देण्यासाठीं कोणीतरी मागें राहाणें आवश्यक आहे. त्याप्रमाणें तो वानरांची समजूत घालूं लागला.

लंकेच्या नागरिकांनीं कुंभकर्णाच्या शौर्याची स्तुती करून त्याच्या अंगावर पुष्पवृष्टि केली आणि सुगंधी द्रव्यांचा शिडकाव केला. त्यामुळें सुग्रीव शुद्धीवर आला. पुढें काय करावयाचें याचा त्यानें क्षणभर विचार केला. नंतर त्यानें आपल्या नखांनीं कुंभकर्णाचे नाक, कान ओरबाडून काढले. कुंभकर्णानें चिडून जाऊन त्याला जमिनीवर जोरानें फेंकले व त्याला पायांखालीं तुडविलें. पण सुग्रीवानें त्या सर्वांची फिकीर केली नाहीं. तो वायुवेगानें आकाशांत उडत रामाकडे येऊन पोंचला.





# मयूरध्वज

एकदां धर्मराज युधिष्ठिरानें अश्वमेध यज्ञ करण्याचें ठरवून घोडा सोडला. घोड्याच्या रक्षणार्थ अर्जुन ससैन्य निघाला. अर्जुनाचें सारथ्य करायला स्वतः श्रीकृष्ण बरोबर गेला.

घोडा भ्रमण करीत कौंडिण्यपुरीला आला. युवराज ताम्रध्वज यानें घोड्याला अडवून घोड्याच्या कपाळावर बांधलेलें ताम्रपत्र वाचलें.

"हा धर्मराज युधिष्ठिराचा घोडा आहे. या घोड्याचें रक्षण करण्यासाठीं गांडीवधारी अर्जुन येत आहे. जर कोणी या घोड्याला अडविलें तर त्याला अर्जुनाच्या हातीं व्यर्थ मरावें लागेल!"

"इतका गर्व आहे तर गर्वभंग झालाच पाहिजे." ताम्रध्वज म्हणाला. त्यानें घोडा बांधून ठेवला. कांहीं वेळानें अर्जुन ससैन्य तेथें येऊन पोंचला. बरोबर कृष्ण होताच.

अर्जुनानें घोडा बांधलेला पाहून दरडावून विचारलें—"घोडा बांधून ठेवण्याचें साहस कोणी केलें?"

ताम्रध्वज स्मितकरून म्हणाला—"मी!"

"तूं लहान मुलगा आहेस म्हणून माफ करतों. तूं ओळखलें नाहींस वाटतें मला? हा घोडा कोणाचा आहे हें माहीत आहे का तुला?" अर्जुनानें ऐटींत विचारलें.

घोड्याच्या कपाळावरचा ताम्रपट दाखवून ताम्रध्वज म्हणाला—"हा पाहून कळलें मला सर्व असेल हिंमत तर घोडा सोडून ने!" ताम्रध्वज म्हणाला.

तें ऐकून अर्जुनाला राग आला. गांडीव उचलून म्हणाला—"तुला स्वतःचा जीव



वांचवायची इच्छा असेल तर मुकाट्यानें बाजूला हो!"

ताम्रध्वज देखील धनुष्य बाण घेऊन युद्धास सज्ज झाला. दोघांचें युद्ध झालें. कांहीं वेळ युद्ध झाल्यावर अर्जुनाला कळलें कीं वाटत होतें तितकें तें युद्ध सोपें नाहीं. अर्जुनाचें शौर्य ताम्रध्वजाच्या पराक्रमासमोर अपुरें ठरलें. अर्जुन चकित होऊन कृष्णाला विचारूं लागला—"कृष्णा! हें कसें कायरे घडलें? हा टीचभर मुलगा माझा अपमान करीत आहे. याचें काय कारण असूं शकेल?"

कृष्ण स्मित करून म्हणाला—"युद्ध झालें कीं त्यांत एकाचा जय व दुसऱ्याचा पराजय हा होणारच!"

"तें कबूल! पण तूं माझ्याबरोबर असतां माझा पराभव कां व्हावा हें नाहीं कळलें मला!" अर्जुन म्हणाला.

"हें पहा, ताम्रध्वजाचा बाप मयूरध्वज याच्या धर्मबळासमोर ताम्रध्वजाचा पराभव करणें तुला शक्य नाहीं. तुझ्या अंगीं किती शक्ति असली तरी ती टिकणें शक्य नाहीं." कृष्ण म्हणाला.

अर्जुन कांहीं वेळ मान खालीं करून विचार करीत उभा राहिला व म्हणाला—"कृष्णा! माझें हें गांडीव व माझें शौर्य अपुरें पडत आहे त्याबद्दल मला आश्चर्य वाटत नाहीं. पण स्वतः धर्मराज युधिष्ठिरापेक्षां जास्त धर्मपरायण महात्मा कोणी असूं शकेल असें नाहीं वाटत मला."

"खरें बोलावयाचें तर मयूरध्वज खरोखरीच युधिष्ठिरापेक्षां सुद्धां मोठा धर्मपरायण महात्मा आहे. खात्री पटवून घ्यायची असेल तर चल माझ्याबरोबर!" कृष्णानें तें सुचविल्याबरोबर अर्जुन त्याच्याबरोबर जायला तयार झाला.



दोघे वेष पालटून निघाले. कृष्णानें ब्राह्मण गुरूचा वेष घेतला व अर्जुनानें त्याच्या शिष्याचा. दोघे मयूरध्वजाच्या दरबारांत पोंचले. राजानें आदरपूर्वक दोघांना बसायला सांगून येण्याचें कारण विचारलें.

कृष्ण म्हणाला—"मयूरध्वज महाराज! मी एका संकटांत सांपडलों आहें. आपली मदत मिळेल या अपेक्षेनें आलों आहें. अभयवचन द्यावें."

मयूरध्वज म्हणाला—"किती मोठें संकट असलें तरी त्यांतून तुला वांचविण्याचें वचन मी देतों."

"महाराज! आज माझ्या मुलाचें लग्न आहे. मी मुलाला घेऊन वधूच्या पित्याकडे निघालों असतां वाटेंत एक वाघ आम्हांला दिसला व तो माझ्या मुलाला खायला धांवला. मी विनवणी केली कीं सोड माझ्या मुलाला. पाहिजे तर मला खा! पण तो सिंह म्हणाला—"तुझ्या सारख्या म्हाताऱ्याचें मांस नाहीं आवडत मला, पण मयूरध्वज राजा मला खायला मिळेल तर मी तुझ्या मुलाला सोडून द्यायला तयार आहें. पुत्रमोहानें मी आपणांकडे



आलों आहें." गुरु वेषांत आलेला कृष्ण म्हणाला.

मयूरध्वज म्हणाला—"ब्राह्मणोत्तमा! माझें मांस वाघाला खायला घालून आपल्या मुलाचें रक्षण कर!"

"महाराज! आपलें हें औदार्य व धार्मिक वृत्ती पाहून वाईट वाटतें. अशा थोर पुरुषाला वाघाच्या तोंडी देणें महापाप आहे. मी आपला फार आभारी आहें. तो वाघ असेंदेखील म्हणाला, 'मयूरध्वजाला पुरा खाण्याची इच्छा मला नाहीं. जर मयूरध्वजानें फक्त आपलें उजवें अंग चिरून



# भारताचा इतिहास



शेरशाह जितका शूर होता त्याहून जास्त उत्तम शासक होता असें म्हणावयास हरकत नाहीं. त्यानें फक्त पांचच वर्षें राज्य केलें. परंतु त्या अवधींत त्यानें एक उत्तम राज्यव्यवस्थेचा बळकट पाया घातला. "या पठाण शासनकर्त्यानें जें शासन कौशल्य दाखविलें तें इतर एकाहि मुसल्मान अंमलदारानें दाखविलें नाहीं, इंग्रजांनीं देखील नाहीं." असें एका इंग्रज इतिहासकारानें लिहून ठेविलें आहे. जमिनीवरील कर वसूल करण्याची पद्धत, शेतकऱ्यांचा हक्क, पट्टा इत्यादि गोष्टींत एक प्रमाणिक सुव्यवस्था स्थापन करण्याचें श्रेय या शासकालाच मिळतें. देश रक्षणासाठीं मोठमोठ्या सडका प्रथम यानेंच बांधल्या. पूर्व बंगाल मधील सोनार गांवापासून तर थेट सिंधु नदीपर्यंत २००० मैल लांबीची सडक आज पावेतों आहे. जागोजागीं हिंदू व मुसलमानांस राहाण्यासाठीं धर्मशाळा यानेंच बांधल्या. "निर्जन स्थानीं सोनें गाठोड्यांत बांधून घेरत पडून राहाण्यास आवश्यक अशी निराळी सैन्य व्यवस्था यानेंच केली." त्याच्या राज्यांत सर्वांस एक तऱ्हेचा न्याय मिळत असे. राजघराण्यांतल्या लोकांना-देखील या कायद्यांतून सुटका नव्हती.

शेरशाह स्वतः फार मोठ्या घराण्यांत जन्मला नव्हता. परंतु स्वतःच्या कर्तबगारीच्या बळावर तो हिन्दुस्तानाचा बादशाह झाला. शेरशाह सारखा कर्तृत्ववान बादशाह त्यापूर्वीं एकदेखील झाला नव्हता. अकबराला उत्तम शासक म्हणून जें यश मिळालें त्याच्या मुळाशीं शेरशाहनें स्थापन केलेली राज्यव्यवस्थाच होती. अपघातामुळें शेरशाह मरण पावला नसता तर भारतांत मुगल साम्राज्य स्थापन झालेंच नसतें व भारताच्या इतिहासाला एक निराळेंच वळण मिळालें असतें.

शेरशाहबरोबर त्यानें पुन्हां स्थापन केलेलें अफगाणांचें साम्राज्य पण लयास गेलें. आपसांतील भांडणें व बंडाळी वाढत गेली. शेरशाह वारल्यावर त्याचा मुलगा सलीम शाह सुलतान झाला. तो देखील बापासारखाच कर्तबगार होता. पण तो अल्पवयांतच म्हणजे १५५४ च्या नोव्हेंबर महिन्यांत वारला. त्याच्या अल्पवयी मुलाला त्याचा मामा आदिलशाह यानें ठार करून स्वतः दिल्लीची गादी हस्तगत केली. हा आदिलशाह कर्तबगार नव्हता, म्हणून थोड्याच दिवसांत अफगाणांची सत्ता लयास गेली.

हुमायून वाट पहातच होता. १५ वर्षें रानोमाळ फिरत राहाल्यानंतर त्याला संधी मिळाली. सिंध प्रांतांत त्यानें सैन्याची जमवाजमव करून आपलें राज्य परत मिळविण्यासाठीं अयशस्वी प्रयत्न पण केले ते. सिंध प्रांताचा सुबेदार शाहहुसेन यानें त्याला मदत करण्या ऐवजीं विघ्नेंच आणलीं.



सन् १५४२ च्या अखेरीला हुमायून सिंधप्रांताच्या वाळवंटांत हिंडत असतां त्यानें हमीदा बेगमशीं निकाह म्हणजे लग्न केलें. ती शेख अली अंबर याची मुलगी. त्यांना रजपूत राजकर्त्यांनीं सहाय्य केलें नाहीं. तो अमर कोट येथें गेला. तेथील राजानें हुमायूनला वचन दिलें कीं सहाय्य करीन. पण त्यानें कोणत्याहि प्रकारें मदत केली नाहीं.

२३ नोव्हेंबर १५४५ या रोजीं अमरकोट येथें अकबराचा जन्म झाला.

हिंदुस्थानांत आपल्याला कोणी मदत करणार नाहीं असें वाटून हुमायून इराण

देशांत गेला. तेथें त्यानें शाह तहमास्प याची मदत मागितली. त्यानें दोन अटींवर मदत करण्याचें कबूल केलें. पहिली अट हुमायूननें शियापंथ स्वीकारावा. दुसऱ्या अटीप्रमाणें कंदाहार हा प्रांत हुमायूननें त्याला द्यावा. हुमायूननें दोन्ही अटी कबूल केल्यावर त्यानें त्याला १४००० चें एक सैन्य मदतीसाठीं दिलें. ही मदत मिळाल्यावर हुमायूनला आपल्या बापाप्रमाणेंच भारताचें राज्य मिळविण्यासाठीं पुन्हां युद्ध करावें लागलें.

१५४५ मध्यें कंदाहार व काबूल हुमायूननें जिंकले. पण त्यानें वचन दिल्याप्रमाणें कंदाहार इराणच्या बादशहाला दिला नाहीं. कंदाहारच्या प्रश्नावर इराणच्या बादशाह व मोगल यांच्यांत बरेच दिवस वैमनस्य राहालें. कामरानला कैद करण्यांत आलें. त्याचे डोळे काढून त्याला मक्केला पाठविण्यांत आलें. हिंदाल युद्ध करीत असतां मरण पावला.

१५५५ च्या नोव्हेंबर महिन्यांत हुमायूननें हिंदुस्तानावर स्वारी केली. १५५५ च्या फेब्रुवारी महिन्यांत लाहोर, जुलैंत दिल्ली व आगरा हीं शहरें हुमायूननें स्वाधीन करून घेतलीं.

कष्ट सहन करीत असतां त्याच्या मनोवृत्तींत पुष्कळ बदल झाला परंतु त्याची जाणीव व्हायला त्याला वेळच कोठें होता ! २४ जानेवारी १५५६ मध्यें तो आपल्या पुस्तकालयाच्या जिन्यावरून उतरत असतां घसरून पडला व त्या अपघातांतच त्याला मरण आलें.

१४ फेब्रुवारी १५५६ रोजीं वयाच्या १३ व्या वर्षी अकबर दिल्लीच्या गादीवर बसला.



# नेहरू चरित्र

## [ ८ ]

इंग्रज सरकारानें राजकीय सुधारणा जाहीर केल्या. परंतु कांग्रेस व मुस्लिम लीग दोन्ही संगठनांना त्या असमाधानकारक वाटल्या. या सुधारणांविषयीं विचार करण्यासाठीं मुंबई येथें १९१८ च्या ऑगस्ट महिन्यांत एक विशेष सम्मेलन बोलावण्यांत आलें. त्याला मवाळ पक्षाचा एक देखील सभासद हजर नव्हता. त्यांनीं आपली एक निराळी संस्था स्थापन केली.

आणखी एक गोष्ट घडली. राजकीय कैद्यांच्या विरुद्ध लावलेल्या आरोपाची चवकशी व विचार कसा व्हावा या विषयीं सल्ला देण्यासाठीं जस्टिस रौलेट यांच्या अध्यक्षतेखालीं सरकारनें एक समिति नेमली होती. या रौलेट कमेटीचा रिपोर्ट त्याच वर्षी प्रसिद्ध झाला होता. त्याच्या आधारें सरकारनें दोन कायदे काढले. ते कायदे १९१९ मध्यें महायुद्ध संपल्यावर तीन महिन्यांनीं प्रसिद्ध झाले.



रौलेट अक्टनें आगींत तेल ओतल्या सारखें झालें. देशभर खळबळ उडून गेली. याचवेळीं भारताच्या राजकीय क्षेत्रांत गांधीजींचें पदार्पण झालें. मोतीलालजींनीं यांच्याचमुळें आपलें मवाळ धोरण बरेचसें सोडलें. सरकारनें राजकीय सुधारणांची घोषणा केली तेव्हां त्यांनीं त्या सुधारणा कांहीं अंशीं मान्य असल्याचें मत दिलें होतें. जवाहरलालजींनीं त्या सुधारणांचा विरोध केला. परंतु रौलॅट ॲक्ट विषयीं पिता पुत्र एक मताचे होते.

पुढें काय हा प्रश्न कांग्रेसच्या समोर होता. पण गांधीजींची भूमिका स्पष्ट होती.











केली. जून महिन्यापर्यंत मार्शल लॉ सरकारनें मार्गे घेतला नाहीं. तोंपर्यंत पंजाब प्रांताच्या प्रजेवर सरकारनें निरनिराळे अत्याचार केले. सन् १८५७ नंतर प्रजेनें इतका असंतोष सरकार विरुद्ध कधींच दर्शविला नव्हता.

एक विचित्र गोष्ट अशी कीं ज्या रौलेट कायद्या विरुद्ध इतकी मोठी चळवळ झाली त्या कायद्याचा उपयोग झालाच नाहीं.

पंजाबच्या हत्याकांडाविषयीं सरकारला चवकशी करावी लागली. लॉर्ड हंटर यांच्या अध्यक्षतेखालीं चार भारतीय व चार इंग्रज मिळून एक कमेटी चवकशीसाठीं नेमण्यांत आली. या कमेटीनें चवकशी करून आपला रिपोर्ट सरकारला सादर केला. जनरल डायर यानें केलेल्या अत्याचारांची निंदा भारतीय व इंग्रज दोघांनीं केली. म्हणून जनरल डायर याला सैन्यांतल्या नोकरीवरून बडतर्फ करून इंग्लंडला परत पाठविण्यांत आलें. परंतु तेथें अनेक लोकांनीं त्याच्या कार्याची प्रशंसा करून त्याला एक सोन्याची तलवार भेट केली.

या गोष्टींचा परिणाम मोतीलालजींच्या मनावर फार पडला व ते गांधीजी व जवाहरलाल यांच्या चळवळींत सामील झाले. तेव्हां पासून त्यांनीं कधींहि पाऊल मागें घेतलें नाहीं. भारताच्या अग्रगण्य पुढाऱ्यांत त्यांना तेव्हांपासूनच स्थान मिळालें. प्रजेच्या चळवळीवर मोतीलालजींचा तितकासा विश्वास नव्हता. परंतु हें तितकेंच खरें कीं प्रजेचे प्रतिनिधि असे त्यांचे चिरंजीव जवाहर-लाल नेहरू यांच्या मागोमाग ते स्वातंत्र्यवीर झाले. याबरोबर सर्वांस मोहिनी घालणारें गांधीजींचें व्यक्तिमत्व देखील मोतीलालजींना चळवळींत ओढण्यास कारणीभूत झालें.






[ १ ]

[ मंदारणचा किल्ला सर केल्यावर जगतसिंह विमला व तिलोत्तमा यांचें रक्षण करण्यासाठीं युद्ध करीत असतां जखमी होऊन पडला. पठाणांचा सेनापति उस्मानखान यानें त्याला कतलूखानाच्या वाड्यांत पोंचविलें. तेथें तो त्याच्या औषधपाण्याची काळजी वाहूं लागला. नबाब कतलूखानाची मुलगी आयशा जगतसिंहाची सेवाकरीत होती व तिच्या सेवेमुळेंच तो वांचला. ज्यादिवशीं तो शुद्धीवर आला त्याच दिवशीं वीरेंद्रसिंहाला कतलूखानानें मृत्युदंडाची शिक्षा सुनावली.]

नबाबानें खूण करतांच सैनिक वीरेंद्रसिंहाला वधस्थानाकडे घेऊन गेले. जातांना एका मुसलमानानें कांहीं तरी त्याच्या कानांत येऊन सांगितलें. पण तें त्याला कळलें नाहीं. त्या मुसलमानानें एक चिट्ठी दिली. त्याचें लक्ष आणखी कोठें तरी होतें. तरी त्यानें ती चिट्ठी उघडून पाहिली. तें विमलाचें पत्र होतें. त्यानें तें पत्र रागाच्या भरांत फाडून फेंकून दिलें. पण ज्यानें ती चिट्ठी आणून दिली होती त्यानें सर्व तुकडे एकत्र केले आणि जातांना शिपायांना म्हणाला—"मी येईपर्यंत तुम्ही येथेंच थांबा."

तो चिट्ठी आणणारा स्वत: उस्मानखानच होता. म्हणून सैनिक त्याच्या आज्ञेप्रमाणें तेथेंच थांबले.

श्री बंकिमचंद्र चट्टोपाध्याय



उस्मानखान ती चिठ्ठी घेऊन अंतःपुराच्या अंगणांत जाऊन उभा राहिला. एका झाडा-खालीं विमला पातळची ओढणी तोंडावर टाकून बसली होती. तो जवळ जाऊन उभा राहिला व घडलेली गोष्ट त्यानें थोडक्यांत सांगितली.

मी तुम्हांला त्रास दिला खरा, पण हें सर्व तुम्हांला करावें लागणार आहे?" विमला म्हणाली.

"तुम्ही करायला सांगत आहां त्यांत किती धोका आहे, याची तुम्हांला कल्पना-देखील नसेल. ही गोष्ट कतलखानाला कळली तर माझी मान उडवल्याशिवाय तो राहणार नाहीं." उस्मानखानानें हळूच तिच्या कानाजवळ तोंड नेऊन सांगितलें.

"कतलखान! उगीच खोटें बोलूं नकोस! तुझ्या अंगाला हात लावण्याची तरी कतल-खानाची छाती होईल का?" विमलानें विचारलें.

"कतलखानाच्या क्रूरपणाची तुम्हांला कल्पनादेखील नाहीं. तरी हरकत नाहीं. चला!" उस्मानखान म्हणाला.

दोघें वधस्थानीं पोंचले. उस्मानखाना पाठोपाठ विमला वीरेंद्रसिंह उभा होता तेथें आली. तेव्हां वीरेन्द्रसिंह अभिरामस्वामी जवळ उभा होता. तो एका भिक्षूचा वेष पालटून आला होता. "गुरुदेव! आतां मला निरोप द्यावा. आतां मी जगून तरी काय करूं? कोणासाठीं जगायचें?"

अभिरामस्वामीनें पदर तोंडावर टाकून उभी असलेल्या विमलाकडे बोट दाखविलें. वीरेंद्रसिंहानें तिच्याकडे पाहिलें. विमलानें तोंडावरचा पदर बाजूला केला आणि वीरेंद्र-सिंहाचे पाय धरून रडूं लागली.

वीरेंद्रसिंह "विमला!" एवढेंच म्हणाला. विमला वेड्यासारखी मोठमोठ्यानें ओरडूं



लागली—"स्वामी! प्रभो! प्राणेश्वर! मी आज सर्व जगाला ओरडून सांगणार आहें. प्राणेश्वर! आतां मी कोणाकडे पाहूं?"

वीरेंद्रसिंहाच्या डोळ्यांतून टपटप अश्रु-धारा वहात होत्या. म्हणाला—"विमला! प्रिये, कां या वेळेला मला आणखी दुख-वायला आलीस? लोक पाहतील तर मला हंसतील. मरणाच्या भीतीनें मी रडत आहें असें म्हणायला देखील मागें पुढें पाहणार नाहींत." विमला कांहींच बोलली नाहीं.

"विमला मी निघालोंच आहें! तूं देखील चल....बरोबर!" वीरेंद्रसिंह म्हणाला.

विमला कानाजवळ तोंड नेऊन म्हणाली—"येईन! पण पहिल्यानें या सैतानावर सूड उगवतें!"

वीरेंद्रसिंहाच्या तोंडावर हास्य दिसलें. त्यानें विचारलें—"शक्य होईल का तुला तें?"

विमला आपला उजवा हात दाखवीत म्हणाली—"ह्याच हातानें....सर्व दागिने काढून टाकून याच्या रक्तानें आपली तहान भागवीन!" तिनें हातांतल्या बांगड्या काढून फेंकून दिल्या.

"तुझी प्रतिज्ञा पुरी होवो! ईश्वर तुला मदत करो...." वीरेंद्रसिंह म्हणाला.



इतक्यांत चांडाळानें त्याला चलायला सांगितलें.

"जा आतां तूं...." वीरेंद्रसिंह विमलाला म्हणाला.

"नाहीं!....मी जाणार नाहीं! मी स्वतःच्या डोळ्यांनीं आपलें वैधव्य पाहणार आहें. पतीचें रक्तच मला जास्त बळ देईल...." विमला म्हणाली.

चांडाळानें तलवार उचललेली, तिनें पाहिली. तिचे डोळे क्षणभर बंद झाले. तिनें डोळे उघडले तेव्हां वीरेंद्रसिंहाचें डोकें धडापासून दूर पडलेलें तिला दिसलें.



विमला दगडाच्या मूर्तीसारखी निस्तब्ध आपल्या पतीच्या तोंडाकडे पहात होती. डोळ्यांत पाण्याचा एक थेंब नव्हता.

*　　*　　*

दैवाचा खेळच म्हणावयाचा सर्व. तिलोत्तमा व विमला कतलूखानाच्या महालांत ज्या ठिकाणीं त्यानें बळजबरीनें कांहीं पर-स्त्रियांना डांबून ठेवलें होतें त्याच जागीं होत्या. त्याला कोठें जय मिळाला कीं त्या ठिकाणीं त्याला ज्या ज्या सुंदर स्त्रिया दिसत त्यांना तो धरून आणी किंवा त्याचे अनुयायी धरून आणून त्याला नजराणा म्हणून देत.

विमला व तिलोत्तमा दोघींना त्याच नियमाप्रमाणें आणून त्या महालांत ठेवलें होतें. परंतु दोघी निरनिराळ्या जागीं होत्या. तिलोत्तमा कोणत्या स्थितींत आहे हें विमलाला माहीत नव्हतें. विमलानें स्वतःच्या भविष्याचा निर्णय घेऊन टाकला होता. परंतु तिलोत्तमे शिवाय तिला तो एकटेपणा फार जाणवत होता.

विमला उस्मानखान येण्याची वाट पहात होती. उस्मानखान पठाणांतलें एक रत्न होतें. युद्ध त्याचा धंदा होता. युद्धांत काय वाटेल तें करायला तो धजत असे. परंतु युद्ध झाल्यानंतर मात्र हारलेल्या लोकांवर अत्याचार झालेले त्याला आवडत नसत.

विमला व तिलोत्तमा यांच्यावर कतलूखानाची कुदृष्टि पडली नसती तर उस्मानखानाच्या कृपेनें दोघींना आतांपर्यंत खात्रीनें सुटका मिळाली असती. त्याच्या कृपेमुळेंच विमला शेवटच्या प्रसंगीं वीरेंद्रसिंहाची भेट घेऊं शकली.

उस्मानखान कतलूखानाच्या मोठ्या भावाचा मुलगा होता. म्हणून त्याला नबाबाच्या महालांत येण्यास मुभा होती. परंतु नबाबच्या रंग महालांत जाण्यास कोणालाच परवानगी नव्हती. उस्मानला देखील नव्हती.



विमलानें एका दासी करवी एक चिट्ठी उस्मानखानाकडे पोंचती करविली. ती वाचून उस्मान दासीला म्हणाला—“तेथें मी येणें दोघांच्या हिताचें नाहीं. दोघांच्या जीवाला धोका आहे. म्हणून तूं त्यांनाच इकडे बोलावून घेऊन ये.”

दासीनें जाऊन ही गोष्ट विमलाला सांगितली तेव्हां तिनें विचारलें—“मी तिकडे कशी काय येऊं?”

“त्यासाठीं आवश्यक व्यवस्था तेच करून ठेवणार आहेत.” दासी म्हणाली.

त्या दिवशीं आयशाच्या दासीनें येऊन अंतःपुराच्या रक्षणार्थ ठेवलेल्या कंचुकीला कांहीं सांगितलें व ती विमलाला बरोबर बोलावून घेऊन गेली. विमला आल्यावर उस्मानखानानें तिला विचारलें—“माझ्याकडून तुला कांहीं मदतीची अपेक्षा आहे का?”

“विशेष मदतीची नाहीं. एवढेंच सांगा कीं जगतसिंह अजून जिवंत आहेत कीं नाहींत.” विमला म्हणाली.

“जिवंत आहेत!”

“स्वतंत्र आहेत कीं कैदेंत?”

“अर्थातच कैदेंत! पण आतां या क्षणाला तुरुंगांत नाहींत. ते अजून आजारी आहेत.




कतलूखानाला कळविल्याशिवाय मी त्यांना आपल्या खास महालांत ठेवले आहे. तेथें त्यांच्या चिकित्सेची उत्तम व्यवस्था केली आहे.”

“कदाचित आमच्यामुळेंच त्यांची ही दशा झाली असावी! पण भाग्यांत जें लिहिलें असतें तें कधीं टळत नाहीं. एक विनंती करतें पदर पसरून! ही एक चिट्ठी त्यांच्याकडे पोंचती कराल का? याशिवाय आणखी कांहीं मी मागीत नाहीं.”

विमलानें दिलेलें पत्र परत देत उस्मान म्हणाला—“हें काम करणें बरोबर होणार



नाहीं. युवराज आजारी असो व तो माझ्या खास महालांत असो, पण तो कैदेंत आहे. आम्ही आलेली चिठ्ठी वाचल्याशिवाय कैद्याला देत नसतों. चिठ्ठींत तसें कांहीं आमच्या विरुद्ध नसेल तरच ती चिठ्ठी कैद्याकडे पोंचती होते नाहींतर नाहीं."

"तुमच्याविरुद्ध या पत्रांत कांहीं आहे का? मग एवढें काम करायला तुम्हांला हरकत असण्याचें कारणच काय? एवढेंच नव्हें, तुम्ही जसे स्वतःचे मालक आहांत तसेच माझे पण मालक व धनी आहांत." विमला म्हणाली.

"मी इतर बाबतींत नवाबाच्या आज्ञे बाहेर कांहीं करतो. पण या बाबतींत मी कोणत्याहि प्रकारें जबाबदारी घ्यायला तयार नाहीं." उस्मानखान म्हणाला.

"तर मग आपण हें पत्र वाचून नंतर पाठवावें!" त्याला माझी ना नाहीं!" विमला म्हणाली. उस्मानखान त्याला कबूल झाला व तो पत्र वाचूं लागला. पत्रांतला मजकूर येणें प्रमाणें होता.

"युवराज, मी आपल्याला पुढें केव्हां तरी आपली ओळख देईन असें वचन दिलें होतें. तिलोत्तमा अंबरच्या गादीची राणी झाल्यावर ही गोष्ट करावी असा माझा विचार होता. परंतु ती आशा विरून गेल्यासारखीच आहे. कांहीं दिवसांनीं कदाचित ही बातमीसुद्धां मिळेल कीं विमला किंवा तिलोत्तमा या जगांत नाहींत. म्हणून हें पत्र लिहायला आजच बसलें आहें. मी एक पतिता व पापीण आहे. मी न करण्या-योग्य अनेक कामें केली आहेत. म्हणून जगांत मी कीर्ति व प्रतिष्ठा मिळेल या गोष्टीची कधीं आशा बाळगली नाहीं.

"युवराज! तुम्हांला खरें वाटणार नाहीं. परंतु एवढें खरें कीं कधीं काळीं तुमच्या घराण्यांत मी सुखानें व मानानें राहीन असें मला वाटलें होतें. परंतु आमच्या जवळ असणारे किंवा येणारे जे कोणी असतील त्यांना आयुष्यभर रडत ठेवणेंच आमच्या नशिबीं लिहिलें आहे. या दासीची एक विनंती आहे. मला या दासीवेषांत पाहून लोक कुलटा, व्यभिचारिणी म्हणतील तर आपण निस्संकोच त्यांना सांगावें कीं ती एक खालच्या जातीची दुर्दैवी स्त्री होती. जरा तोंडाळ असल्या कारणानें तिच्या हातून कांहीं चुका घडल्या असतील. परंतु ती कुलटा नाहीं, व्यभिचारिणी पण नाहीं. आज जे स्वर्गलोकीं गेले आहेत त्यांनीं विमलाशीं शास्त्रोक्त पद्धतीनें लग्न केलें होतें. विमलानें त्यांना कधीं फसविलें नाहीं. पण मी वीरेंद्रसिंहाच्या घरांत दासीसारखी कां राहालें तें देखील थोडक्यांत सांगतें.

"मंथारणच्या किल्ल्या लगत एका गांवीं जयधरसिंह याच्या कांहीं दासी होत्या. त्यांत एक सुंदर दासी होती. तिचा नवरा परदेशी रहात असे, कारण तो सैन्यांत काम करीत असे. त्याला नेहमीं प्रवास करावा लागे. शशिशेखर नांवाच्या एका ब्राह्मण तरुणाची नजर तिच्यावर पडली.



दोघें परस्परावरच्या प्रेमानें बांधली गेलीं व ती गरोदर राहाली. तें कळल्यानंतर शशिशेखरच्या वडिलांनीं त्याला घराबाहेर काढलें. शशिशेखर काशीला विद्याभ्यासा-साठीं जाऊन राहाला. परंतु त्याच्या स्वभावांत कांहीं फरक झाला नाहीं. तेथें एका शूद्र जातीच्या सुंदर स्त्रीशीं त्याचा संबंध झाला. तिला एक मुलगी झाली, तीच मी.

"पुढें कांहीं दिवसांनीं शशिशेखरनें माझ्या आईला सोडून दिलें. माझ्या आईनें मोठ्या कष्टानें मला लहानाचें मोठें केलें.

मी सहा वर्षांची असेन, एक पठाण सकुटुंब दिल्लीला जात असतां वाटेंत काशीला उतरला होता. काशीच्या हिंदू लोकांनीं त्याला उतरायला जागा दिली नाहीं. त्यानें आमच्या घरीं रहायला जागा मिळेल का विचारलें. माझ्या आईनें होकार दिला. त्या काळांत मुलें चोरून न्यायचा प्रघात होता. त्या रात्रीं एक चोर भिंतीला भोंक पाडून घरांत शिरला. त्यानें त्या पठाणाच्या मुलाला उचललें. तें पाहून मी मोठ्यानें ओरडलें. पठाणाच्या बायकोनें उठून पाहिलें तेव्हां तिचा मुलगा तिच्या-जवळ नव्हता. चोर मुलाला घेऊन खाटे-खालीं लपला होता. पठाणानें त्याला केस धरून ओढलें व त्याच्या जवळच्या मुलाला सोडवून घेतलें. त्यानें चोराचा एक कान कापून त्याला सोडून दिलें. हें सर्व मला पुरें आठवत नाहीं. पण माझ्या आईनें मला सर्व सांगितलें."

तें पत्र वाचून उस्मानखान थोडावेळ आठवल्यासारखें करून म्हणाला–"तर मग तुझें नांव दुसरेंच कांहीं तरी होतें नाहीं का?"

"होय तें मुसलमान नांव होतें म्हणून माझ्या बाबांनीं तें नांव बदलून विमला ठेवलें." विमला म्हणाली.

"पहिलें नांव काय होतें? मुहर का?"

विमलानें चकित होऊन विचारलें–"तुम्हांला तें कसें काय कळलें?"

"या पत्रांत तूं ज्या मुसलमान पठाणाचें वर्णन केलें आहेस त्याचाच मी मुलगा!" उस्मानखान म्हणाला.

विमला तें ऐकून चकित झाली.

[ पुढें चालू ]



# खरी चूक कोण्याची?

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाहीं. झाडाजवळ जाऊन प्रेत खांद्यावर काढून घेतलें व नेहमींप्रमाणें स्मशानाकडे चालूं लागला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"जें काम तूं करतो आहेस तें बरोबर आहे कीं चूक हें मला माहीत नाहीं व कळत पण नाहीं. परंतु कधींकधीं चूक करीत असतांना सुद्धां धर्म संदेह आडवा येतो. त्याचें उदाहरण म्हणून मी तुला आज सिद्धवरद याची गोष्ट सांगणार आहें, ऐक." असें सांगून वेताळ गोष्ट सांगूं लागला.

पूर्वी भार्गव शर्मा नांवाचा एक धनी ब्राह्मण रहात असे. त्याच्या बायकोचें नांव नागवेणी असें होतें. त्यांना बरेच दिवस मूलबाळ झालें नाहीं. त्यांना ही काळजी वाटूं लागली कीं पुढें त्यांची पाणी देणारा कोणी उरणार नाहीं व त्यामुळें नरकांत जावें



लागेल. नागवेणीला मूल न झाल्याबद्दल फार वाईट वाटे.

एकदां एक सिद्धपुरुष त्यांच्या गांवांत आला. भार्गव शर्माला ती गोष्ट कळली. तो त्या सिद्धपुरुषाकडे गेला व त्यानें त्याला पुत्र संतती नसल्याबद्दल बायको दुःखी असल्याचें सांगितलें व विचारलें—" आमच्या भाग्यांत अपत्य आहे कीं नाहीं हें सांगावें." सिद्धपुरुषानें त्याचा हात पाहिला व म्हणाला—" बाबा, मुलाचें तोंड पाहण्याचें भाग्य तुला या जन्मीं तरी नाहीं. तरी दान धर्म करीत रहा."

भार्गव शर्मा म्हणाला—" योगीराज! आपल्या सारख्या सिद्धपुरुषांस या जगांत अशक्य असें काय आहे? आपण निश्चय केलांत तर भाग्य देखील पालटेल. आपण कृपा करून आम्हांला मुलगा होईल असा आशीर्वाद द्यावा."

त्या सिद्धपुरुषानें एक आंबा घेतला व तो मंत्रवून भार्गव शर्माला दिला आणि म्हणाला—" तो आंबा खाणाऱ्याला एक गुणवान मुलगा होईल. तूं आपल्या बायकोला आंघोळ करून मग तो खायला सांग त्यानें त्याप्रमाणें दिला. म्हणाला— " एका सिद्धपुरुषानें हा दिला आहे. तूं आंघोळ करून खा. गुणवान मुलगा होईल."

भार्गव शर्मा आपल्या बायकोला तें सांगत असतां शेजारच्या बाईनें तें ऐकलें. तिचें नांव आदिलक्ष्मी होतें. भार्गव शर्माची बायको तो आंबा पुजेच्या खोलींत ठेवीत असतां तिनें पाहिलें. नंतर ती भार्गव शर्माच्या बायकोला इकडच्या तिकडच्या गप्पांत गुंतवून व तिची नजर चुकवून तो आंबा उचलून घेऊन गेली.

आदिलक्ष्मी तो आंबा चोरून घेऊन गेली त्याला एक कारण होतें. तिला





सात मुली झाल्या होत्या, परंतु एकदेखील मुलगा झाला नाहीं. मुलाची इच्छा पुरी झाली नव्हती. मुलगा होईल असें भार्गव शर्मा बायकोला सांगत असतां तिनें ऐकलें होतें. तिनें घरीं गेल्याबरोबर आंघोळ करून कोणाला सांगितल्याशिवाय आंबा खाऊन टाकला.

नागवेणी आंघोळ करून आंबा घ्यायला गेली तेव्हां तिला जागेवर आंबा दिसला नाहीं. तिनें पुष्कळ शोधून हुडकून पाहिलें. पण आंबा जागेवर असेल तर ना मिळणार? नवरा रागावेल. आंबा हरवल्याचें कळलें तर हाय खाऊन जिवाचें कांहीं बरें वाईट करून घ्यायला मागें पुढें पाहणार नाहीं म्हणून नागवेणी खोटें बोलली. आंबा खाल्याचें तिनें नवऱ्याला सांगितलें.

परंतु नागवेणीचे कष्ट त्यामुळें दूर होण्याऐवजीं त्यांना त्याच वेळीं सुरवात झाली. सिद्धपुरुषानें दिलेलें फळ खाल्ल्या-नंतर खाणारी स्त्री गरोदर होणार व तिला मूल पण होणार. म्हणून नागवेणी तिला दिवस राहाल्याचें लोकांना सांगूं लागली. तिच्या माहेरच्या लोकांना आनंद झाला. तिची धाकटी बहीण भागीरथी तिला भेटायला आली तेव्हां भागीरथीला देखील दिवस राहाले आहेत व तिसरा महिना आहे हें कळलें. नागमणीनें आपल्या बहिणीला सांगितलें व म्हणाली—" या संकटांतून कशी काय सुटका मिळणार देवच जाणें. तुला मूल होईल तें तूं मला दे. मी तें स्वतःचें मूल म्हणून सांगेन. बिनबोभाट प्रश्न सुटेल." पण भागीरथी म्हणाली—" ताई! तें खरें ग! पण मूल होईल त्याच्या वडिलांचा होकार नको का घ्यायला?"

भागीरथी आपल्या गांवीं निघाली तेव्हां नागवेणी पण तिच्या बरोबर निघाली.










ती नवऱ्याला म्हणाली—"पहिलेंच बाळंतपण आहे. वहिणीचीं दोन तीन बाळंतणें झालेली आहेत. तेव्हां तिच्या बरोबरच जातें. नाहींतर बाळंतपणांत त्रास होण्याचा संभव आहे. बाळंत झाल्यावर मुलाला घेऊन घरीं येईन." भार्गव शर्मानें होकार दिला.

भागीरथीला चार मुलें होतीं. तिला मुलें होती व मुली पण होत्या. तिचा नवरा दुर्व्यसनी होता. त्याला खर्चाला पैसे कधींच पुरत नसत. बायकोनें विचारल्यावर तो म्हणाला—"मुलगा दे, माझी ना नाहीं. पण मुलगा घेऊन जातांना सगळे दागिने ठेवून जायला सांग!" नागवेणी त्याला देखील कबूल झाली.

भागीरथीला नागवेणीनें इच्छिल्याप्रमाणें मुलगाच झाला. स्नानवगैरे सर्व बिनबोभाट पार पडलें. नागवेणी मुलाला व बहिणीला घेऊन आपल्या गांवीं आली. तिनें आपले सर्व दागिने काढून भागीरथीच्या घरीं ठेवून दिले.

भार्गव शर्माला आनंद झाला कीं योगिराजाच्या कृपेनें त्याला एक मुलगा झाला. त्यानें मुलाचें नांव सिद्धवरद असें ठेवलें. सर्व दागिने कोठें गेले हें नवऱ्यानें विचारतां नागवेणीनें खोटें सांगितलें. म्हणाली—"मी आंघोळीसाठीं नदीवर गेलें होतें. दागिने काढून एका गाठोड्यांत बांधून काठावर ठेवून दिले होते. आंघोळ करून परत येऊन पाहातें तों तें गाठोडेंच नाहींसें झालेलें." जाऊं देत दागिने सोन्यासारखा मुलगा मिळाला पुरें झालें, असें भार्गव शर्मानें मनाचें समाधान करून घेतलें. मुलगा भागीरथीच्या दुधावरच वाढत होता."

आंबा खाल्ल्यामुळें शेजारच्या आदिलक्ष्मीला पण एक मुलगा झाला. त्याचें नांव माधव ठेवण्यांत आलें.



वरद आणि माधव शेजारींच लहानाचे मोठे झाले. पण दोघांच्या स्वभावांत किती फरक दिसून आला! हळूहळू तो फरक इतका वाढूं लागला कीं पाहणाराला जाणवूं लागला. माधव बुद्धिमान, शहाणा, विनम्र व सुशील होता तर सिद्धवरद मूर्ख, दुष्ट व उद्धट निघाला. भार्गव शर्माला माधवमध्यें सिद्ध पुरुषानें सांगितलेले सर्व गुण दिसले. पण स्वतःच्या मुलांत मात्र ते गुण दिसले नाहींत. वरदनें प्रथम आपल्याच घरीं चोरी करायला सुरवात केली. नंतर दुसऱ्यांच्या घरीं चोरी करूं लागला. बापानें त्याला पुष्कळ सुधारण्याचा यत्न करून पाहिला. पण सर्व प्रयत्न निष्फळ ठरले. शेवटीं मुलानें आपलें घर सोडलें व एका हलकट बाईबरोबर जाऊन राहूं लागला.

पुढें कांहीं दिवसांनीं तो आजारी पडला. तेव्हां त्या बाईनें त्याला घराबाहेर हांकललें. कित्येक दिवस तो उपास तापास करीत रानोमाळ हिंडला व शेवटीं मरण पावला. त्याच्या वासना पुऱ्या झाल्या नव्हत्या. म्हणून तो पिशाच रूपें हिंडूं लागला.

तो नवाच भुतांच्या जातींत आला होता. म्हणून भुतें त्याला धरून आपल्या सरदारा



कडे घेऊन गेलीं. भुतांचा पुढारी त्याला पाहून म्हणाला—"तूं भूत होण्याचें कारण एकटा तूं नसून दुसरें कोणीतरी आहे. तुझी ही स्थिति व्हायला जो कोणी कारण असेल त्याच्या मानगुटीला जाऊन बस."

येथवर गोष्ट सांगून वेताळ विचारूं लागला—"राजा, वरदाच्या भुतानें कोणाची रे मानगुटी धरावी? धनलोभानें आपला पोटचा गोळा वहिणीला देऊन टाकणाच्या निर्दयी भागीरथीच्या कीं त्याला लहानाची मोठी करणारी जी नागवेणी तिच्या? तूं या शंकांचें समाधानकारक उत्तर जाणून बुजून दिलें नाहींस तर तुला परिणाम माहीतच आहे, तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळूं लागतील."

तेव्हां विक्रमार्क म्हणाला—"वरद भूत व्हायला कारण भागीरथी खास नव्हती. तिनें आपला मुलगा आपल्याच श्रीमंत वहिणीच्या मांडीवर दिला होता. त्यांत चूक काय? लहानपणीं त्याला आपलें दूध पाजून तिनें मातृधर्माचें पालन केलें होतें. खरें पाहिलें तर श्रीमंत घराण्यांत लहानाचा मोठा झाल्यानें वरद वासनांचा गुलाम झाला व त्या राहाल्या म्हणून तो भूत झाला. चूक नागवेणीची पण नव्हती. तिच्या नवऱ्यानें किती श्रम करून तो आंबा मिळविला होता. तें हरवल्याचें ऐकून नवरा हाय खाईल म्हणून तिला खोटें बोलावें लागलें. आदिलक्ष्मीनें तो आंबा चोरून नेला म्हणूनच हा सर्व प्रकार घडला. तेव्हां तिचीच मानगुटी भूतानें धरावी."

अशा तऱ्हेनें राजाचें मौन भंग होतांच वेताळ प्रेताबरोबर नाहींसा झाला व पुन्हां झाडाच्या फांदीला जाऊन लोंबकळूं लागला.






# गंभीलोला शाप

जपान देशांत एक तरुण युवक होता.

एकदां तो समुद्रकाठीं हिंडत असतां त्याला एक मासा एका डबक्यांत तडफडत असलेला दिसला. भरतीच्या वेळीं तो मासा लाटेबरोबर येऊन त्या डबक्यांत पडला व परत वाहून गेला नसावा.

त्या तरुण मुलाला त्या माशाची दया आली. त्यानें त्याला उचलून समुद्रांत टाकलें. आपण एका मुक्या प्राण्याचा जीव वांचवला या आनंदांत तो परत फिरला. तेवढ्यांत त्याला पाठीमागून कोणीतरी हांक मारली—"थांब जरा!" त्यानें मागें वळून पाहिलें तर एक सुंदर स्त्री त्यानें तिला पूर्वीं कधीं पाहिलें नव्हतें. म्हणून ती आणखी कोणाला तरी बोलावीत असेल असा विचार करून तो पुन्हां चालूं लागला.

"तुलाच बोलावतें आहें. थांब जरा...." ती म्हणाली.

तो चकित होऊन जरा भीत भीत तिच्याजवळ गेला.

समुद्रांतल्या राजानें मला पाठविलें आहे. त्याच्या एका मुलीचा तूं जीव वांचविला आहेस. तुला आपल्या राजधानींत बोलावून आणायला त्यानें मला पाठविलें आहे. कृपा करून तूं माझ्याबरोबर चल." ती म्हणाली.

"पण मला पोहतां येत नाहीं. समुद्र राजाच्या राजधानींत मी कसा येऊं?" त्यानें विचारलें.

"तूं त्याची फिकीर करूं नकोस. मी जातीनें मासा आहें. माझ्या पाठीवर बस, मी तुला तिकडे घेऊन जाईन." ती म्हणाली.



तीं दोघें गुडघाभर पाण्यांत उभी होतीं. थोडें पुढें गेल्यावर ती स्त्री एक मासा झाली. तो तरुण तिच्या पाठीवर बसला. समुद्र राजाच्या राजधानीस जातांना वाटेंत तो मासा तिला म्हणाला—"समुद्रराज जर तुला कांहीं वर मागून घे असें म्हणाला तर मंत्रवलेल्या कानांशिवाय कांहीं नको असें सांग. तूं त्याच्या मुलीचा जीव वांचविला आहेस म्हणून राजा तुला खात्रीनें तूं मागशील तें देईल. तूं तो मंत्रवलेला कान आपल्या कानाला लावून ऐकलेंस तर तुला सर्व प्राण्यांची भाषा कळूं लागेल."

समुद्रराजानें त्या तरुणाचा आपल्या दरबारांत सत्कार केला. त्याच्या सत्कारार्थ नृत्य व गायन दोन्हींचा कार्यक्रम होता. तो तरुण समुद्र राजाचा पाहुणा म्हणून कांहीं दिवस राहाला. घरीं परत जाण्यासाठीं राजाचा निरोप घेऊं असतां राजा त्याला म्हणाला—"तूं काय वाटेल तें मागून घे, मी आठवण म्हणून तुला तें देईन."

"मला मंत्रवलेले कान द्या! त्याशिवाय मला दुसरें कांहीं नको." तरुण म्हणाला.

"समुद्रांत तसल्या कानाची जोडी एकच एक आहे तरी तूं मागितली आहेस. तेव्हां मी तुला ती देतों." असें सांगून राजानें पेटींत ठेवलेले कान काढून घेऊन त्याला दिले. जी स्त्री त्याला घेऊन आली होती तीच त्याला पोंचवायला गेली."

तरुण समुद्रकांठीं बसला होता. त्याला कांहीं पक्षांची किलबिल ऐकूं आली. ते काय बोलत आहेत हें कळावें म्हणून त्यानें ते मंत्रवलेले कान बसवून घेतले. त्या बरोबर पक्षी आपसांत काय बोलत आहेत हें त्याला कळूं लागलें.

"या माणसांना वाटतें कीं ते फार शहाणे आहेत, पण त्यांना काय कळतें!



पलीकडच्या ओढ्यांत एक दगड आहे. त्यावर पाय ठेवून हे लोक पलीकडे जातात पण तो दगड सोन्याचा आहे हें एकाला तरी कळलें का?" असें सांगून सर्व पक्षी खदखदां हंसूं लागले.

तें ऐकून त्या तरुणाला आश्चर्य वाटलें. तो त्या ओढ्यावर गेला. तो दगड उचलून बाहेर काढला. दगडावरचें शेवाळ घासून टाकल्यावर तो दगड चकचकूं लागला. त्या पक्ष्यांचें बोलणें खोटें नव्हतें.

तरुण तें सोनें उचलून देवाचे आभार मानीत घरीं निघाला असतां त्याला दोन कावळे 'काव' 'काव' करीत असल्याचें ऐकूं आला. त्यानें मंत्रवलेले कान लावून पाहिले तेव्हां त्याच्या कानीं हे शब्द पडले—

"लोक तरी किती मूर्ख आहेत! मोठमोठे वैद्य कोठून कोठून बोलावून घेऊन आले. परंतु एक तरी जमीनदाराच्या मुलीला बरा करूं शकला का! कसा कोणी ठीक करूं शकणार! तो आजार औषधानें बरा होणारा नाहीं. जमीनदाराच्या घरावरचें छप्पर पालटण्याचें काम चालू असतां गवताबरोबर एक सापदेखील त्यावर टाकण्यांत आला आणि कसून बांधल्यामुळें



अडकून राहाला आहे. तो उपाशी मरत आहे. जोंपर्यंत त्याची सुटका होत नाहीं व त्याला पोटभर खायला मिळत नाहीं तोंपर्यंत जमीनदाराची मुलगी बरी होणें शक्य नाहीं." कावळे आपसांत हेंच बोलत होते.

त्यानें विचार केला बरें झालें कीं हें मला तरी कळलें. तो जमीनदाराकडे गेला. घराबाहेर लिहिलें होतें. "माझ्या मुलीला बरें करून देईल त्याला तो मागेल तें मिळेल."

तो तरुण आंत गेला व म्हणाला—"मी तुमच्या मुलीला बरी करून दाखवितों."

तेथें जमलेले वैद्य हंसू लागले. म्हणाले—"आमच्यापैकीं एकाला देखील ज्या आजाराचा पत्ता लागला नाहीं तो हा बरा करणार म्हणे." परंतु जमीनदारानें त्यांच्या बोलाण्याकडे दुर्लक्ष केलें.

रोग्याला पाहून तो तरुण म्हणाला—"हा आजार नाहीं. एक शाप आहे. जीवहिंसा होत आहे. छप्परांत गवताबरोबर सांप अडकला आहे."

जमीनदारानें नोकराला बोलावून छप्पर पालटून पाहिलें. एक सांप एका बांबू खालीं गवताबरोबर अडकला होता. त्याला सोडवून दूध पाजवलें. तो दूध पिऊन चालूं लागला. त्याबरोबर मुलगी उठून अंथरुणावर बसली. सांप आणखी थोडा पुढें गेल्यावर मुलगी उठून उभी राहाली. सांप निघून गेल्यावर मुलगी छान बोलूं लागली. तिचा आजार बरा झाला.

त्या तरुणानें जमीनदाराच्या मुलीला बांचवलें म्हणून त्यानें त्याच्याशींच तिचें लग्न करून देऊन त्याला आपला घर जांवई करून घेतलें.





# हाता पायांची किंमत

उदयगिरीचा राजा उदयसेन एक धर्मपरायण राजा होता. त्यानें प्रजेच्या सुखसोयी-साठीं पुष्कळ कामें केलीं. त्याच्या राज्यांत कोणी भिकारी म्हणून नव्हता. सर्व प्रजा सुखी होती व राज्यांत सदा सर्वकाळ शांतता नांदत असे.

तरी एक भिकारी होताच. तो एक तरुण भिकारी होता. त्याला समजूं लागलें तेव्हांपासूनच त्यानें भीक मागण्याचा धंदा सुरू केला. पण राज्यांत सर्व प्रजेला काम मिळत असल्याकारणानें लोक भीक घालायला मागें पुढें करूं लागले. पुढें पुढें त्याला भीक मिळणें कठीण वाटूं लागलें.

एकदां सकाळपासून दुपार पर्यंत त्यानें भीक मागितली तरी त्याला कोणी मूठभर तांदूळ घातले नाहींत. एका रस्त्याच्या बाजूला बसून भीक मागूं लागला. देवाचें नांव घेत राहालों तर लोकांची कृपादृष्टि कदाचित इकडे वळेल या हेतूनें तो मोठ-मोठ्यानें ओरडून देवाचें नांव घेऊं लागला—"देवा! या गरिबावर दया कर. एक मूठभर तांदूळ दे! या दुर्दैवी लेकरापुढें भाकरीचे दोन तुकडे टाक!"

परंतु त्याच्याकडे तोंड फिरवून देखील कोणी पाहिलें नाहीं. उपाशी होताच, ओरडून दमून गेला. त्याला देवाचा राग आला. म्हणाला—"देवा! कोठें मेलास रे! लोक सांगतात, जो जन्म देतो तो उपाशी ठेवतो का? तूं मला जन्माला आणलेंस, आतां मला खायला कां नाहीं देत? तुझी आई मरो....बाप मरो...." तो देवालाच शिव्या देऊं लागला.

त्याच वेळीं राजा तिकडून जात होता. त्याला भिकाऱ्याचें ओरडणें ऐकूं आलें. घोड्यावरून उतरून तो भिकाऱ्याजवळ गेला आणि विचारूं लागला—"कोणाला रे तूं शिव्या देत आहेस?"

"आणखी कोणाला? महा पापी त्या परमेश्वराला!" भिकारी म्हणाला.

"देवाला? त्याला कां रे शिव्या? त्याची आपण पुजा करतों. त्यानें काय वाईट केलें तुझें?" राजानें विचारलें.

"आज सकाळीं उठल्यापासून एक शीत पोटांत गेलें असेल तर शपथ! कोणी एक पैसा तरी समोर टाकला का?" भिकारी म्हणाला.

"तुला पैसेच हवेत ना, मी देतों. मी या देशाचा राजा आहें. तूं आपला एक हात मला दे, मी तुला एक हजार रुपये देतों. नाहींतर एक पाय दे मी दोन हजार रुपये देतों. आपले दोन्ही डोळे दिलेस तर अर्धें राज्य देईन!" राजा म्हणाला.

"मला तुझे पैसे नकोत! मी कांहीं एक द्यायला तयार नाहीं." भिकारी म्हणाला.

"म्हणजे तूं भाग्यवान आहेस म्हणायचास. एक एक हजार रुपयाचे दोन हात, दोन हजार रुपयांचे दोन पाय व माझ्या अर्ध्या राज्याएवढे दोन डोळे आहेत. हें सर्व देणाऱ्या देवाची पुजा कर. त्याला शिव्या कां देतोस? जा देवानें हात पाय दिले आहेत. काम कर आणि आपला उदर निर्वाह कर!" असें सांगून राजा निघून गेला.

भिकारी त्या दिवसापासून मेहनत मजूरी करून आपला उदर निर्वाह करूं लागला.



# षष्ठिपूर्ति

आरवली पर्वताच्या एका दरींत एका राजाचें राज्य होतें. त्या राजानें एक हुकूम काढला—"साठ वर्षांचे म्हातारे निरुपयोगी व समाजावर ओझें असतात. म्हणून त्यांना राज्याबाहेर काढण्यांत यावें." राजाची आज्ञा कोण मोडणार ती? लोक म्हाताऱ्या कोताऱ्या माणसांना डोंगरा पलीकडच्या दुसऱ्या एका दरींत पोंचवून येऊं लागले. त्या दरीचें नांवच 'षष्ठिपूर्ति' दरी असें पडलें.

एका माणसाला साठवें वर्ष पुरें झालें तेव्हां त्यानें मुलाला स्वतःच बोलावून त्या दरींत पोंचवायला सांगितलें. राजाच्या भीतीनें मुलगा बापाला खांद्यावर उचलून घेऊन 'षष्ठिपूर्ति' दरीकडे निघाला. वाटेंत पुष्कळ झाडें होतीं. खांद्यावरून म्हातारा झाडाची फांदी हाताला लागली कीं एक डहाळी तोडून ती खालीं टाकूं लागला. तें पाहून त्याच्या मुलानें त्याला विचारलें—"काय हो बाबा! अशा डहाळ्या तोडून कां टाकत आहां खालीं?"

बाप म्हणाला—"रानांतली वाट परत जातांना तूं चुकलास तर! खुणेसाठीं म्हणून मी डहाळ्या टाकून ठेवीत आहें."

अगदीं शेवटच्या क्षणापर्यंत आपली काळजी वाहणाऱ्या बापाला स्वतःच्या हातानें मृत्युमुखांत लोटायला मी धांवतों आहें. माझ्यासारखा मूर्ख मीच. त्यानें विचार केला आणि रात्र उलटल्यावर काळोखांत बापाला घरीं आणलें आणि माळ्यावर कोणाला तो दिसणार नाहीं अशा तऱ्हेनें लपवून ठेवून दिलें.

श्री. का. रा. पवार

राजानें काढलेला हुकूम लोकांना मुळींच आवडला नाहीं. ज्या लोकांच्या आई-वडिलांचें वय साठाजवळ येऊं लागलें होतें त्यांना ही आज्ञा म्हणजे शापच वाटूं लागला. प्रजेंत असंतोष वाढत चाललेला पाहून मंत्री राजाला म्हणाला—"महाराज! आपल्या आज्ञेचा परिणाम असा झाला आहे कीं ज्ञानी व अनुभवी लोक अकालीं मरण पावल्यानें तरुणांना वळण लावणारीं माणसें कमी होऊं लागलीं आहेत."

पण राजाला तें पटलें नाहीं. मंत्री म्हणाला—"मी आपलें म्हणणें खरें आहे हें सिद्ध करून दाखवायला तयार आहें." मंत्र्यानें दिलेल्या सल्ल्याप्रमाणें राजानें एक हुकूम जाहीर केला. "जो कोणी राखेची दोरी वळून आणून दाखवील त्याला आपल्या दरबारांत पुढच्या रांगेंत बसविण्यांत येईल, असें जाहीर करण्यांत आलें."

राखेची दोरी कशी काय वळायची? राजा तरी चक्रमच दिसतो. प्रत्येक नागरिक म्हणूं लागला. आपल्या बापाला माळ्यांत लपवून ठेवणाऱ्या तरुणानें आपल्या बापाला जाऊन विचारलें कीं राखेची दोरी कशी काय वळून द्यायची?

"जळलेली दोरी नेऊन राजाला दाखव!" बाप म्हणाला.

त्यानें बापानें सांगितल्याप्रमाणें दोरी जाळून तशीच्या तशी राजाला नेऊन दाखविली. राजानें त्याला शाबासकी दिली व आपल्या दरबारीं त्याला मानाची जागा दिली. तो मंत्र्याला म्हणाला—"पाहिलेंत सूज्ञपणा म्हाताऱ्यांत आढळतो असें नाहीं. तरुणांतदेखील आढळतो."

मंत्री म्हणाला—"ही अकल या तरुणाची होती कीं इतर कोणाची याचा शोध लावण्यासाठीं आणखी एक गोष्ट जाहीर करा. प्रत्येक नागरिकानें शंखांतून आरपार दोरा नेऊन दाखवावा."

पण तें कसें करावयाचें हें एका तरुणाला देखील सुचेना. पण ज्या तरुणानें आपल्या बापाला माळावर लपवून बसविलें होतें, त्यानें जाऊन आपल्या बाबांना विचारलें, तेव्हां बाप म्हणाला—"वाळ तांदुळाची एक बारीक कणी एका दोऱ्याच्या टोकाला बांध व तो एका मुंगीला दे. त्या मुंगीला त्या शंखांत सोड. ती शंखांत जाऊन शंखाच्या भोकांतून पलीकडे त्या कणीच्या बरोबर दोरा घेऊन जाईल. कणी सोडून टाक व





राजाला शंखांतून आरपार गेलेला दोरा दाखव." बाप म्हणाला.

त्या तरुणानें बापानें सांगितलें होतें अगदीं तसेंच केलें. दोन्यासकट त्यानें शंख नेऊन दाखविला. राजा त्या तरुणाची हुशारी पाहून फार खूष झाला.

मंत्री पुढें येऊन राजाला म्हणाला—"हा तरुण तर तोच राखेची दोरी वळणारा तरुण दिसतो आहे. ह्यानें हीं दोन्हीं कामें स्वतःच्या अकलेनें केली असतील हें मानायला मी तयार नाहीं."

मंत्र्यानें राजासमोरच त्या तरुणाला विचारलें कीं तूं हें स्वतःच सर्व केलेंस कीं आणखी कोणी तुला हें शिकविलें.

मुलानें खरें खरें तें सांगून टाकलें. म्हणाला—"महाराज! माफ करा! मी साठें वर्षे पुरें होतांच आपल्या आज्ञेप्रमाणें आपल्या बाबांना षष्ठिपूर्तीच्या दरींत सोडायला खांद्यावर उचलून घेऊन चाललों होतों. परत येतांना मी वाट चुकेन या भीतीनें माझे बाबा खुणेसाठीं वाटेंत झाडाच्या डहाळ्या तोडून टाकीत होते. तें वात्सल्य पाहून मला तें क्रूर कृत्य करवलें नाहीं व मी त्यांना घरीं परत घेऊन आलों. आजपर्यंत मी त्यांना साऱ्या जगाच्या दृष्टि आड ठेवलें व त्यांचें रक्षण करीत आलों. त्यांच्याच सूचनेप्रमाणें मी राखेची दोरी आणून दिली व त्यांनींच सुचविलेल्या युक्तीनें शंखांत दोरा ओवून आणला.

तें ऐकून राजाचे डोळे उघडले. त्याच दिवशीं त्यानें आपली ती क्रूर आज्ञा रद्द केली. तेव्हां पासून 'षष्ठिपूर्ति' ही पुनर्जन्म म्हणून साजरी करण्याचा प्रघात पडला.





# पांच मूर्ख

उज्जैनचा राजा मरण पावल्यावर त्याचा मुलगा मेधावंत गादीवर बसला. तो राजा झाला व त्याचें नांवच मुळीं मेधावंत. पण होता मात्र महा मूर्ख. त्याचा एक लहानपणचा सुबुद्धि नांवाचा मित्र होता. बापानें आपला मुलगा बुद्धिमान निघावा म्हणून त्याचें नांव सुबुद्धि ठेवलें होतें इतकेंच.

मेधावंतच्या पट्टराणीचें नांव संदेह वदना असें होतें. ती नांवाला साजेल अशी नेहमींच इतरांकडे संशयास्पद नजरेनें पहात असे.

मंत्र्याचें नांव गुणपाल असें होतें. मेधावंत गादीवर बसतांच मंत्र्यानें विचार केला कीं राज्यांतली सुखशांति आतां लयास जाणार. म्हणून त्यानें मेधावंत गादीवर बसतांच आपल्या जागेचा राजीनामा दिला आणि रानांत एक आश्रम बांधून हरिभजन करीत राहूं लागला.

गुणपाल निघून मेधावंतनें आपला बाल-मित्र सुबुद्धि याला आपला मंत्री नेमलें. आतां त्याला चारही दिशा मोकळ्या भासूं लागल्या. राजा व मंत्री दोघे मिळून जें कांहीं काम करीत तें पाहून सर्व हंसत. त्यांच्या मूर्खपणाची ते समोर नाहीं, पण पाठीमागून चेष्टा करीत.

एकदां मेधावंत घरीं आला तेव्हां त्याची बायको संदेहवदना एका शंकेचें समाधान करून घेण्यासाठीं पतीकडे आली. तिनें विचारलें—"मूर्खांचीं लक्षणें काय? दरबारांत मधून मधून 'मूर्ख' 'मूर्ख' असें म्हणतांना मी अनेकदां ऐकलें. म्हणून विचारतें."

"मी देखील 'मूर्ख' शब्द पुष्कळदां ऐकला आहे. पण मूर्ख कसा असतो










हें मी नाहीं कधीं पाहिलें. ही गोष्ट सुबुद्धीला विचार, तो सांगेल." मेधावंत म्हणाला.

दुसऱ्या दिवशीं दरबारांत सुबुद्धीला पाहतांच मेधावंताला बायकोनें विचारलेला प्रश्न आठवला. त्यानें तो सुबुद्धीला विचारला. म्हणाला—"महामंत्री! मूर्ख कोणाला हो म्हणतात व ते कसे असतात?"

"महाराज! मी देखील 'मूर्ख' हा शब्द पुष्कळदां ऐकला आहे. मला चांगला आठवतो. परंतु तो असतो कसा हें मी नाहीं पाहिलें." सुबुद्धि म्हणाला.

"ठीक! तरमग मी तुला एका आठवड्याचा अवधी देतों. या अवधींत पांच मूर्खांना कोठून तरी धरून घेऊन ये. ते असतात कसे हें आम्हांला पहावयाचें आहे. या अवधींत जर का तूं पांच मूर्खांना घेऊन आला नाहींस तर तुझें डोकें उडवीन व आपल्या सिंहद्वाराला टांगून ठेवीन." मेधावंत म्हणाला.

तें ऐकून सुबुद्धि घाबरला. कारण मूर्ख कोणाला म्हणतात व मूर्ख कसे असतात हें त्याला माहीत नव्हतें. जुना मंत्री गुणपाल असता तर तो एका मिनिटांत हें काम पुरें करून दाखवूं शकला असता.

गुणपालाची आठवण होतांच सुबुद्धीच्या जिवांत जीव आला. ऊन कडक पडलें होतें तरी त्याची पर्वा न करतां तो गुणपालला भेटायला रानांत त्याच्या आश्रमाकडे निघाला. त्यानें गुणपालाला भेटून घडलेला सर्व वृत्तांत सांगितला आणि म्हणाला—"पांच मूर्खांना हुडकून काढण्याचें काम तुम्हांलाच करावें लागेल. नाहींतर राजा माझें डोकें उडवील." तो त्याच्या पायां पडला व विनवण्या करूं लागला.

कांहीं हरकत नाहीं बाळ! मी स्वतः तुझ्याबरोबर राजधानींत येतों. आपल्याला वाटेंतच पाहिजेत ते पांच मूर्ख भेटतील. असें सांगून गुणपाल सुबुद्धीबरोबर राजधानींत जाण्यास निघाला. ते एका गांवीं पोंचले तेव्हां त्यांना एक घर एका बाजूनें जळत असलेलें दिसलें. घरमालक दहा पांच जणांना मदतीला बोलावून आग विझवण्याचें काम करण्याऐवजीं तो आगींत तेल ओतीत होता."

गुणपालनें त्याला विचारलें—"काय रे बाबा! घराला आग लागली असतां ती विझवण्याऐवजीं तूं दुसऱ्या बाजूनें तेल ओतूं लागला आहेस, याचा काय अर्थ मला नाहीं कळला?"

"तुम्हांला एवढें देखील कळूं नये या गोष्टीचें मला आश्चर्य वाटत आहे. "उष्ण उष्णेन शीतलम्" ही म्हण माहीत नाहीं वाटतें तुम्हांला. आगींत आग ओतली तर आग शांत होईल." घर मालक म्हणाला.

"आम्ही राजधानींत जात आहोत. येतोस का आमच्या बरोबर? तुला राजाकडून इनाम देवविणार आहें." गुणपाल म्हणाला.

घर मालकानें होकार दिला व त्यांच्याबरोबर राजधानींत जाण्यास निघाला.





तिथें आणखी पुढें गेले व एका गांवीं येऊन पोंचले. तेथें एक मनुष्य आपल्या घरापासून कांहीं अंतरावर असलेल्या विहिरीचें पाणी काढून आणून आपल्या विहिरींत आणून ओतीत होता. कदाचित अशा तऱ्हेनें आपली विहीर पाण्यानें तुडुंब भरावी असा त्याचा विचार असावा.

गुणपालनें त्याला त्याचें कारण विचारलें तेव्हां तो म्हणाला–"काय करावें, तुम्हीच सांगा! या उन्हाळ्यांत आमची विहीर आटून गेली आहे. माझी बायको आळशी आहे. पाणी काढायला ती बाहेर दूर कोठें जायला तयार नाहीं. मग मी तरी काय करूं? तिला याच विहिरीचें पाणी काढतां यावें म्हणून मी दूरच्या विहिरीचें पाणी काढून आणून या विहिरींत ओतीत आहें."

"आम्ही राजाच्या राजधानीला चाललों आहों. येतोस का आमच्या बरोबर? राजा तुला मोठें बक्षिस देईल." गुणपाल म्हणाला.

तो मनुष्यदेखील त्यांच्याबरोबर जायला तयार झाला व निघाला पण. ते राजधानी-जवळ पोंचूं लागले तेव्हां सुबुद्धीनें गुण-पालाला विचारलें–"आपण फक्त दोघांच मूर्खांना घेऊन जात आहों. राजानें पांच मूर्खांना आणायला सांगितलें होतें?"

इतक्या मोठ्या राजधानींत मूर्खांना काय दुष्काळ? बाकी आपल्याला तेथेंच मिळतील. पांच मूर्ख दाखवून देण्याची जबाबदारी माझ्या शिरावर!" गुणपाल म्हणाला.

दोघां मूर्खांना बरोबर घेऊन गुणपाल व सुबुद्धि दरबारांत पोंचले.

सुबुद्धीला पाहून मेधावंत राजानें त्याला विचारलें–"अरे इतका लवकर आलास परत? पांच मूर्खांना घेऊन यायला मी सांगितलें होतें, पण तूं तर तिघांनाच घेऊन



आला आहेस? अरे, हे तर जुने मंत्री दिसत आहेत! हे देखील मूर्ख आहेत का?" सर्व दरबारी हंसूं लागले. सुबुद्धि घाबरून म्हणाला–"महाराज, मी यांच्या मदतीनें दोघां मूर्खांना हुडकून घेऊन आलों आहें."

"आणखी तीन मूर्ख आले नाहींत तर त्याबद्दल यांची मान छाटून टाकावी म्हणतोस?" मेधावंतनें रागाच्या भरांत विचारलें.

"महाराज आपण पांच मूर्ख पाहणार आहांत तर मी दाखवितों. पहिल्यानें या दोघांचा मूर्खपणा तर ऐकाल?" असें सांगून त्यानें घराला आग लावणाऱ्या व विहिरींत पाणी ओतणाऱ्या मूर्खांचें वर्णन करून सांगितलें.

तो त्या मूर्खांचें वर्णन करीत असतां दरबारी टाळ्या वाजवून त्यानें वर्णलेले मूर्ख खरोखरच मूर्ख आहेत या गोष्टीला दुजोरा देत होते.

मेधावंतला तें सर्व कळलें नाहीं. तो गुणपालाला म्हणाला–"बरें तें असूं दे! यांची गोष्ट सोड! इतर तिघांचें काय? लवकर बोल!"



"त्या तिघांची ओळख आपल्याला आहेच महाराज! आपण म्हणालांत कीं पांच मूर्खांना धरून आण. पण सुबुद्धि स्वतः मूर्ख कोण हें सांगू शकला नाहीं व हुडकून आणूं शकला नाहीं. माझी मदद मागणारा आपला हा महामंत्री मूर्खच आहे. आपली राणी पण तशीच एक मूर्ख आहे. कारण मूर्ख कसा असतो हें तिनें विचारलें. तिनें विचारल्यावर ज्यानें आपल्या महामंत्र्याला मूर्खांस ओळखून शोधून आणायला सांगितलें आणि एवढेंच नव्हे तर शोधून आणून दाखविलें नाहींस तर मान उडवीन अशी धमकी दिली, त्याच्याहून मूर्ख आणखी कोण असणार?" गुणपाल म्हणाला.

तो प्रत्येक मूर्खाचें वर्णन अशा तऱ्हेनें करीत असतां सर्व दरबारी टाळ्या वाजवून त्याला दुजोरा देत होते. शेवटीं त्यांनीं गुणपालचा जयजयकार केला. मेधावंतला गुणपालनें त्याला देखील मूर्ख ठरविल्याबद्दल अर्थातच राग आला. पण दरबाऱ्यांनीं त्याच्याबरोबर त्याच्या मंत्र्याला व राणीला देखील मूर्ख ठरविल्याबद्दल राग आवरून म्हणाला—"तुम्ही म्हणालांत त्यांत कांहीं सत्याचा अंश आहे खरा! मला वाटतें कीं तुम्ही पुन्हां माझें मंत्रीपद घ्यावें व पूर्वीप्रमाणें राज्य कारभार चालवावा.

"मी वानप्रस्थाश्रम घेतला आहे. मी काय मंत्रीत्व करणार? मूर्ख कोण कोण आहे याचा शोध करण्यापेक्षां मूर्खपणा कशांत आहे हें शिकून घ्या! प्रजेला सुखी करणें हें राजाचें कर्तव्य आहे. तें कर्तव्य समजून तुम्ही काम केलेंत कीं पुरें!" असें सांगून गुणपाल आपल्या आश्रमांत निघून गेला.





# परोपकारी गोपाळ

एकदां गोपाळ ज्या गांवीं रहात असे त्या गांवीं मुलांच्या आजाराची एक सांथ पसरली. दोन दिवस मुलें कांहीं खात नव्हती कीं खेळत नव्हतीं. अगदीं दमून गेल्यासारखीं पडून रहात. नंतर तीन दिवस तापानें आजारी पडत व त्याच आजरांत त्यांचें प्राणोत्क्रमण होई.

त्या आजाराची चिकित्सा करणारा डॉक्टर वैद्य त्या गांवीं एक देखील नव्हता. दहा मैलावर शिवपुर येथें चक्रवैद्य नांवाच्या एका वैद्याला त्या आजाराची माहिती होती व त्या आजारावर औषध पण माहीत होतें. पण त्या वैद्याला इतक्या दुरून आणायला खर्च करण्याची शक्ति गांवकऱ्यांत नव्हती. गरीब लोक आजारी मुलाला उचलून घेऊन त्या गांवीं जात. मुलाला पाहिल्याशिवाय वैद्य औषध द्यायला तयार नव्हता. ताप सुरू होण्यापूर्वींच औषध मिळालें तर रोगी वांचणें शक्य होतें. ताप आल्यावर रोगी वांचणें अशक्य होतें.

एके दिवशीं गोपाळच्या मुलालाच तापाचीं चिन्हें दिसूं लागलीं. गोपाळच्या बायकोनें नवऱ्याला लगेच त्याला चक्रवैद्याकडे घेऊन जायला सांगितलें. परंतु त्या वेळीं गोपाळकडे गाडी नव्हती. कारण आणखी कोणाचा तरी मुलगा आजारी होता व गोपाळनें त्याला आपली गाडी मुलाला घेऊन जायला दिली होती. म्हणून गोपाळनें वैद्याला बोलावून मुलाला दाखविण्याचें ठरविलें.

इतक्यांत शेजारच्या सोमेश्वर नांवाच्या ब्राह्मणानें त्याच्या मुलाला तापाचीं चिन्हें दिसूं

[श्री. सा. गो. मोरे



लागल्याचें घेऊन सांगितलें. त्यानें येऊन गाडी देतां का म्हणून गोपाळला विचारलें.

गोपाळ म्हणाला—"माझ्यासमोर पण तोच प्रश्न आहे. तर मग चला, आपण दोघे जाऊन वैद्याला बोलावून घेऊं या." सोमेश्वर म्हणाला.

गोपाळला आनंद झाला कीं बरोबर जायला एक सोबत मिळाली. दोघे शिव-पुरला निघाले. कांहीं अंतर चालून गेल्यावर सामेश्वर म्हणाला—"सरळ वाटेनें गेलों तर दहा मैल चालावें लागेल, मधल्या वाटेनें दोन मैल कमी चालावें लागेल."

"चला तर मधल्याच वाटेनें!" गोपाळ म्हणाला.

इतक्यांत एक घोड्याची गाडी त्यांच्या जवळून पुढें गेली. एक तरुण गृहस्थ ती गाडी चालवीत होता. एक बाई होती गाडींत. गाडी थोडी पुढें गेली व थांबली. गाडींतली बाई मोठ्यानें ओरडूं लागली—"थांबा! वांचवा!" तो एक निर्जन प्रदेश होता. तो आवाज ऐकून गोपाळ धांवत पुढें गेला. सोमेश्वरला तें आवडलें नाहीं. गोपाळनें जवळ जाऊन पाहिलें तेव्हां तो गाडी हांकणारा तरुण वांकून बसला होता व 'पाणी' 'पाणी' म्हणून म्हणत होता.

"ह्यांना एकाएकीं काय झालें कोण जाणें? निघतांना जेवलों होतों. कांहीं पोटांत गेलें कीं काय हें नाहीं आतां माहीत. पोटांत दुखतें आहे त्यांच्या. एवढेंच तर्‍हें, स्वतः गाडी घेऊन जातों असें सांगून नोकराला बरोबर घेतलें नाहीं. तो असता तर तांब्या भरून पाणी घेऊन आला असता. तुम्ही आणून देतां का तांब्याभर पाणी?" असें विचारीत तिनें पाण्याचा तांब्या काढून पुढें केला व म्हणाली—"फार कृपा होईल आपली!"

सोमेश्वर तोपर्यंत जवळ येऊन पोंचला होता. म्हणाला—"आम्हांला लवकर जायचें आहे." पण गोपाळनें त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केलें व तांब्या घेऊन पाणी आणायला निघाला.

"हेंच तर तुझें मला आवडत नाहीं." सोमेश्वर म्हणाला आणि मधल्या वाटेनें निघून गेला. गोपाळ पाणी घेऊन आला. पाणी प्याल्यावर गाडी हांकणाऱ्याला हलकें वाटलें. पण पोटांत दुखणें पूर्णपणें बंद झालें नव्हतें. तो म्हणाला—"गाडी पुढें हांकून नेणें मला तरी आतां शक्य नाहीं." तो शिवपुरच्या जमीनदाराचा मुलगा होता. तो बायकोला माहेरून बोलावून घेऊन आला होता.

"तुम्ही बसा आरामानें, मी चालवतों गाडी. तुम्हांला घरीं पोंचवून मग मी जाईन आपलें काम पहायला." गोपाळ म्हणाला.

"तुमच्या कामांत तर विघ्न येणार नाहीं ना." जमीनदाराच्या मुलानें विचारलें.

"मी शिवपूरलाच चक्रवैद्यांच्या घरीं चाललों आहें. माझ्या मुलाची तब्येत एकाएकीं बिघडली आहे." गोपाळ म्हणाला.



"आम्ही तरी शिवपूरलाच जात आहोंत." तो म्हणाला. गोपाळ गाडींत बसून गाडी हांकूं लागला व शिवपूरला लवकर पोंचला. जमीनदाराचा मुलगा व त्याची बायको गाडींतून उतरले व नोकराला सांगितलें, यांना चक्रवैद्यांकडे घेऊन जा. वैद्यबुवांना यांच्या गांवीं घेऊन जा व त्यांचें काम संपलें म्हणजे वैद्यबुवांना घरीं पोंचव.

अर्थातच गोपाळ त्याच गाडींतून वैद्य-बुवांच्या घरीं गेला. जमीनदाराची गाडी दारासमोर उभी पाहून वैद्यबुवा धांवत आले. गोपाळनें येण्याचें कारण सांगतांच इतर

रोग्यांना थांबायला सांगून गोपाळच्या बरोबर ते निघाले. वैद्यबुवा निघून गेल्या सोमेश्वर येऊन पोंचला. दमून भागून आला होता बिचारा. वैद्यबुवा घरीं नाहींत व गाडींत बसून कोठें तरी गेले आहेत हें ऐकून अगदीं हताश झाला बिचारा. पण काय करणार वाट पहात बसला.

तिकडे वैद्यबुवा गोपाळच्या घरीं पोंचले. त्याच्या मुलाला पाहून औषध दिलें. पथ्य-पाणी सांगितलें. नंतर गोपाळ वैद्यबुवांना सोमेश्वरच्या घरीं बोलावून घेऊन गेला. त्याच्या मुलाला पाहून त्याला औषध देवविलें. वैद्यबुवांना जी फी द्यायची होती ती दोघांच्या तर्फे गोपाळनें दिली.

वैद्यबुवा आपल्या गांवीं परत गेले व त्यांनीं जमीनदाराची गाडी परत पाठवून दिली. सोमेश्वरनें त्याचा मुलगा आजारी असल्याचें वैद्यबुवांना सांगितलें. तेव्हां वैद्यबुवा म्हणाले—"अहो, मी तुमच्याच गांवाला जाऊन आलों आहें. गोपाळरावांच्या मुलाला व तुमच्या मुलाला पाहून त्यांना औषध वगैरे देऊन हा येतों आहें, पहा!"

सोमेश्वरनें विचार केला, गोपाळ दुसऱ्याच्या मदतीला धांवला व देव त्याच्या मदतीला धांवला. त्यानें आपल्या मुलाबरोबर माझ्या मुलाला पण दाखवून माझ्यावर किती उपकार केले? मी मात्र स्वतःच्या स्वार्थासमोर दुसऱ्याचें दुःख ओळखूं शकलों नाहीं. गोपाळ हा मनुष्य नसून देव पुरुष आहे. 'आपणासारीखे करिती तत्काळ', असे लोक कांहीं मोजकेच या जगांत असतात. तुकारामांनीं उगीच का सांगितलें आहे कीं "तोचि साधू ओळखावा, देव तेथेंची जाणावा!"





# योग्यतेची परीक्षा

माळव्याचा राजा योग्य अधिकारी निरनिराळ्या कामावर नेमण्यासाठीं दर वर्षी परीक्षा घेत असे. अनेक तरुण उमेदवार राजाकडे येत. राजा त्यांना मंत्री सेनापती किंवा कोशाध्यक्ष यांच्या हाताखालीं कांहीं दिवस कामाला ठेवी. वरिष्ठ अधिकारी निरनिराळ्या प्रकारें त्यांची परीक्षा घेत व योग्यतेची परीक्षा झाल्यावर त्यांना त्यांच्या योग्यतेनुरूप कामावर नेमी.

एकदां राजाकडे दोन तरुण परीक्षा देण्यासाठीं आले. त्यांचीं नांवें विजय व विमल अशीं होतीं. तर्कशास्त्र व नीतिशास्त्र दोन्हीं विषयांचा त्यांनीं अभ्यास केला होता. युक्ति व लौकिक ज्ञान कोणाचें किती आहे हें पाहण्या साठीं मंत्र्यानें त्यांची परीक्षा घेण्याचें ठरविलें.

त्यानें विजय व विमल यांना एकेक टोपलें दिलें आणि गांवांचीं नांवें सांगून त्या त्या गांवीं जाऊन तें टोपलें त्या गांवच्या एका विशिष्ट व्यक्तीकडे पोंचविण्याचें काम दिलें. त्यानें त्यांना हें देखील बजावून सांगितलें कीं पावती लिहून घेऊन यावी.

विमल मंत्र्यानें सांगितलेल्या गांवीं निघाला. पोटांत कावळे कोकलूं लागले. सुदैवानें त्याला रस्त्याच्या बाजूला एक बावडी दिसली. तो त्या बावडींत उतरला. थंडगार पाणी पिऊन हात पाय स्वच्छ धुतले व एका झाडाखालीं विश्रांतीसाठीं येऊन बसला. विचार करूं लागल कीं खायला काय व कोठें मिळणार?

त्याच वेळीं त्याला त्याच वाटेनें जाणारा एक गांवकरी भेटला. त्यानें त्याला तो

सौ. शारदा राजवाडे



जाणार होता त्या विशिष्ट गांवाचे नांव विचारून तें गांव आणखी किती पुढें आहे हें विचारलें. तेन्हां तो म्हणाला—"गांव पुष्कळ पुढें आहे. निदान तीन चार तास तरी चालत जावें लागेल. जवळपास दुसरें एखादें गांव आहे का विचारतां तो म्हणाला—"नाहीं!"

विमलला मंत्र्यावर राग आला. इतक्या दूर जायला त्यानें सांगितलें आणि वाटेंत खाण्यापिण्याची कांहींच व्यवस्था कशी काय केली नाहीं! तितक्यांत त्याला आठवलें कीं टोपल्यांत असेल कांहीं तरी खायला ठेवलेलें. त्यानें टोपल्यावरचें झांकण काढून पाहिलें. त्यांत त्याला मोतीचुराचे लाडू दिसले. त्यांवर एक चिठ्ठी दिसली. "पन्नास लाडू आहेत. पोंचल्याची पावती पाठवावी."

विमलनें असें समजून कीं कदाचित ते जास्त असतील मोजून पाहिले. बरोबर पन्नासच होते.

पुढें जें होईल तें पाहून घेऊं. मी चार पांच लाडू खालेंच तर अपराधाबद्दल मंत्री मान तर उडविणार नाहींच असा एक विचार त्याच्या मनांत आला.

पांच लाडू खाऊन त्यानें आपली भूक मिटविली व निघाला आणि संध्याकाळच्या सुमारास त्या गांवीं येऊन पोंचला. ज्याच्या-कडे ती टोपली पोंचती करावयाची होती त्याच्याकडे पोंचवून दुसऱ्या दिवशीं पावती घेऊन तो परत निघाला. पावतींत ४५ लाडू पोंचल्याचें लिहिलें होतें.

विजय देखील विमल प्रमाणेंच दुपारपर्यंत चालत राहाला. अर्थातच त्याला देखील भूक लागली. त्या गांवीं पोंचेपर्यंत संध्या-काळ होणार हें कळल्यावर तर भूक जास्तच वाढली. मंत्र्यानें बरोबर खाण्या-पिण्यासाठीं देऊन ठेवलेलें नाहीं. हा देखील परीक्षेचाच एक भाग असावा असा त्यानें विचार केला.

त्यानें देखील विमल प्रमाणेंच टोपलें उघडून पाहिलें. त्यांत त्याला देखील मोती-चुराचेच लाडू ठेवलेले दिसले. बरोबर पन्नास आहेत. पोंचल्यावर पोंच कळवावी अशा मजकुराची एक चिठ्ठी लाडवावर ठेवलेली होती. त्यानें देखील लाडू मोजून पाहिले. बरोबर पन्नास होते. एक देखील जास्त किंवा कमी नव्हता.

त्यानें सर्व लाडू उचलून बाजूला ठेवले व खालीं तळाला लाडवांचा चुरा होता तोच उचलून खाला. तो पुरला नाहीं तेव्हां दोन तीन लाडवांच्या कळ्या वरच्यावर काढून घेऊन ते लाडू खालीं तळाला ठेवले व बाकीचे लाडू वर रचून ठेवले. लाडवाचा चुरा खाऊन तो एका तळ्यावर पाणी प्याला आणि पुढें निघाला.

त्याला ज्या गांवीं जायचें होतें त्या गांवीं पोंचला व टोपलें पोंचतें करून पावती लिहून घेऊन आला. त्यानें आणलेल्या पावतीत पन्नास लाडू पोंचल्याचें लिहिलें होतें. पण विमलनें आणलेल्या पावतींत ४५ लाडू पोंचल्याचें लिहिलें होतें.



"पांच लाडू कमी कां झाले?" मंत्र्यानें त्याला विचारलें. तेव्हां विमल म्हणाला– "वाटेंत मला भूक लागली व भत्ता समजून मी पांच लाडू खाले." विमल म्हणाला.

"बरोबर! भत्ता घेणें ही कांहीं चूक नाहीं." मंत्री म्हणाला. पण विजयनें आणलेल्या पावतींत पन्नास लाडू पोंचल्याचें वाचून त्याला जास्त आनंद झाला. तूं खाण्यापिण्याची काय व्यवस्था केलीस हें त्यानें विजयला विचारलें नाहीं.

दोघांच्या लौकिक ज्ञानाची आणखी एक परीक्षा घेण्यासाठीं म्हणून त्यानें दोनें गाड्या मागविल्या व प्रत्येकींत एका पात्रांत राख ठेवून दोघांना निरनिराळ्या दोघां राजाकडे ती भेट म्हणून पोंचती करण्यास पाठविलें. दोघां राजांशीं आपल्या राजाचें सख्य आहे व तें वाढविण्यासाठींच ही भेट आहे हें देखील त्यानें निघतांना दोघांना समजावून सांगितलें.

विमल अंग देशास निघाला व विजय अवंतीला. विमल अंगदेशांत पोंचल्यावर राजाच्या दर्शनास गेला व मालवदेशाच्या राजानें पाठविलेली भेट समोर ठेवून राजाचा निरोप सांगितला.

"पण आहे काय या पात्रांत!" राजानें विचारलें.

"राख!" विमल म्हणाला.

"याला दहा फटके मारून कैदेंत टाका!" राजानें आज्ञा केली.

पण राजाचा मंत्री सूज्ञ होता. त्यानें राजाला सल्ला दिला कीं मालव देशाचा मंत्री सूज्ञ आहे. त्यानें ही राख पाठविली असली तरी त्यांत कांहीं विशेष असलें पाहिजे. तो आपल्या सूज्ञपणाची परीक्षा घेत नसेल कशावरून? तेव्हां याला हेंच पात्र देऊन परत पाठवावें. राजाला तो सल्ला पसंत पडला. मंत्र्यानें तें पात्र विमलला परत देत, "आम्ही ही भेट परत करीत आहों!" असा राजाचा निरोप सांगायला सांगितलें. विमलनें विचार केला, सुटलों! मालव राज्यांत परत गेल्यावर त्याला कळलें कीं ती त्याच्या व्यवहारकौशल्याची परीक्षा होती व त्या परीक्षेंत तो अयशस्वी झाला आहे.

परंतु विजयनें पहिल्यापासूनच काय बोलावयाचें हें मनाशीं ठरवून घेतलें होतें. तो अवंतीला पोंचला व राजाच्या दरबारांत जाऊन राजाला नमस्कार करून राखेचें पात्र





राजासमोर ठेवीत म्हणाला—"महाराज! मी मालव देशाच्या राजाचा दूत म्हणून आलों आहें. आमचे महाराज व मंत्री दोघांनीं त्यांच्या वतीनें अभिवादन करून ही भेट सादर करण्यास आज्ञा केली आहे. महाराजांनीं नुकताच एक ब्रह्मयज्ञ केला व स्वत: बरोबर आपणांसहि या पुण्य कार्यांत समभागी होता यावें म्हणून हें भस्म आपणांकडे पाठविलें आहे. सर्व भूत प्रेत बाधा नष्ट होऊन आपणांस स्वास्थ्य आणि ऐश्वर्य दोन्हींचा लाभ होईल."

तें ऐकून अवंतीचा राजा प्रसन्न झाला व त्यानें तें "भस्म-पात्र" अंत:पुरांत महाराणीकडे पाठविलें. विजयला सर्व प्रकारें राजकीय सन्मान मिळाला व तो परत मालव देशास जाण्यास निघाला तेव्हां अवंतीच्या मंत्र्यानें मालवदेशाचा राजा व मंत्री दोघांना भेट म्हणून उपहार पाठविले.

विमल परत आल्यावर मंत्र्याला म्हणाला—"राजाच्या पदरीं नोकरी करणें म्हणजे मानेवर टांगलेली तलवार आहे. त्यापेक्षां मी पोटापाण्याची दुसरी व्यवस्था करीन." असें सांगून निघून गेला होता. पण विजयनें परत आल्यावर अवंतीच्या राजानें मालवदेशाच्या राजासाठीं व मंत्र्यासाठीं म्हणून पाठविलेली भेट समोर ठेवून अवंतीच्या राजानें पाठविलेला संदेश सादर केला. म्हणाला—"अवंतीच्या महाराजांनीं दोन्हीं राज्यांत अशा प्रकारें स्थापन झालेलें सख्य वाढत राहो असें आपणांस निवेदन करण्यास सांगितलें आहे."

विजयनें दाखविलेलें चातुर्य पाहून मंत्र्यानें त्याला आपला मुख्य सल्लागार म्हणून नेमलें.





# युद्ध कांड

सुग्रीव कुंभकर्णाचा कान कापून उड्डाण करून रामाकडे येऊन पोंचला. कुंभकर्णाचें पर्वतासारखें भव्य शरीर रक्तानें माखून निघालें. नंतर रणांगणावर जाते वेळीं आपल्या हातांत कांहीं शस्त्र वगैरे नाहीं या गोष्टीचें त्याला भान आलें. पण त्यानें वाटेंत एक मोठें मुदगल उचलून घेतलें. जो कोणी मनुष्य किंवा पदार्थ समोर दिसला तो त्यानें गिळून टाकला. त्या वेळीं तो खात आहे तो वानर आहे कीं राक्षस हें देखील त्याला कळलें नाहीं. वानर त्याच्या हातांतून निसटून पळूं लागल्यावर कुंभकर्ण त्यांच्या पाठी मागें धांवला व त्यानें सहस्रावधि वानर खाऊन टाकले. तें पाहून लक्ष्मणानें कुंभकर्णावर बाण वृष्टि केली. पण कुंभकर्णाला त्याची फिकीर नव्हती. तो वानरांना खात पुढें येत होता.

रामानें एक अस्त्र कुंभकर्णावर सोडलें. तें कुंभकर्णाच्या छातींत लागलें. त्याचा परिणाम असा झाला कीं कुंभकर्णाच्या तोंडांतून अग्निज्वाला येऊं लागल्या व तो धाडदिशी जमिनीवर पडला.

कुंभकर्ण उठून कदाचित उभा राहील असा विचार करून त्याला उठतां येऊं नये म्हणून लक्ष्मणानें वानरांना त्याच्यावर चढून बसायला सांगितलें. परंतु कुंभकर्णानें त्या



वानरांना कीडमुंगी झाडून टाकावी अशा तऱ्हेनें झाडून टाकलें. राम कुंभकर्ण पडला होता तेथें आला. कुंभकर्ण उठून पर्वतासारखा झुलत रामाजवळ येऊन उभा राहिला. राम कुंभकर्णाला म्हणाला—“ कुंभकर्णा ! भिऊं नकोस ! तूं इंद्राला जिंकलें होतेंस. मी इंद्र नाहीं. राम आहें. मी एका क्षणांत तुझा शेवट करतों.”

“ मी तरी विराध आहें असें वाटलें का तुला ? मी कबंध पण नाहीं. खर नाहीं, वाली नाहीं कीं, मारीच पण नाहीं. कुंभकर्ण आहें. पाहूं दे तरी तुझा पराक्रम. नंतर मी तुला खाऊन टाकीन.” कुंभकर्ण म्हणाला.

रामाच्या बाणवृष्टीचा परिणाम कुंभकर्णावर पडला नाहीं. ज्या बाणानें रामानें वालीचा वध केला होता तो बाण देखील निरुपयोगी ठरला. तो मुदगल इतक्या वेगानें फिरवीत होता कीं रामाचे बाण त्यामुळें मध्येंच पडून जात.

तेव्हां रामानें कुंभकर्णावर वायव्यास्त्राचा प्रयोग केला. वायव्यास्त्रानें कुंभकर्णाचा तो हातच तोडून टाकला. कुंभकर्ण जोरानें ओरडला. त्याचा हात जमिनीवर पडला तेव्हां सहस्रावधि वानर त्याच्याखालीं चिरडून मेले.

एक हात तुटला तरी कुंभकर्णानें माघार घेतली नाहीं. दुसऱ्या हातानें एक झाड उपटून तो रामाला मारण्यासाठीं धांवला.

रामानें ऐंद्रास्त्राचा प्रयोग करून तो हात देखील तोडून टाकला. नंतर रामानें दोन अर्धचंद्र बाण सोडून कुंभकर्णाचे दोन्ही पाय कापून टाकले. कुंभकर्ण जमिनीवर पडला तेव्हां एक पर्वत आदळावा अशी जमीन हादरली. त्याचें तोंड म्हणजे एक गुहाच. तो कांहीं बडबडत ओरडत होता. त्याचा आवाज इतका भयंकर होता कीं बाण सोडून त्याचें तोंड बंद करावें लागलें रामाला. कुंभकर्ण बेशुद्ध होऊन पडला असतां रामानें एक दिव्य अस्त्र सोडून कुंभकर्णाचें डोकें उडविलें.

महाबली कुंभकर्णाचा अशा तऱ्हेनें वध झालेला पाहून राक्षसांच्या छावणींत खळबळ उडून गेली. वानर आनंदानें किलकाऱ्या मारूं लागले. रावणाला कुंभकर्णाच्या वधाची बातमी कळल्यावर प्रथम तो बेशुद्धच होऊन पडला. शुद्धी आल्यावर भ्रातृविरहानें तो फार दुःखी झाला.

भावाचा वध झाल्यामुळें शोक करीत बसलेल्या रावणाचें सांत्वन करून व त्याला धीर देऊन त्रिशिर, अतिकाय, देवांतक, नरांतक, महोदर, महापार्श्व नांवाचे सहा राक्षस वीर युद्ध करण्यास निघाले.

पुन्हां वानर व राक्षस यांचें घोर युद्ध सुरू झालें. नरांतक वानर सैन्यांत शिरला आणि आपल्या भाल्यानें सहस्रावधि वानरांचा संहार करूं लागला. तेव्हां सुग्रीवानें अंगदाला त्याच्याशीं युद्ध करण्यास पाठविलें.

अंगद नरांतकाला म्हणाला—“ सामान्य वानरांना ठार करण्यासाठीं ह्या भाल्याचा कां प्रयोग करीत आहेस. माझ्यावर करून कां नाहीं पहात ? ”



नरांतकानें लगेच अंगदाच्या छातींत तो भाला मारला. पण तो भाला तुटून गेला. अंगदानें नरांतकाच्या घोड्यांना स्वतःच्या हातानें फिरविलें तेव्हां त्यांचीं डोकीं तुटून गेलीं. तेव्हां मात्र नरांतकाला राग आला. त्यानें एक मुष्टिप्रहार अंगदच्या डोक्यावर केला. तेव्हां अंगदाला एक जबर जखम लागली व रक्त वाहूं लागलें.

“ अस्सं ! इतकी शक्ति आहे तर तुझ्या अंगांत.” असें म्हणत अंगदानें एक



मुष्टिप्रहार नरांतकाच्या छातींत केला. तो रक्त ओकूं लागला व क्षणभरानें मरून पडला.

तें पाहून महोदर, देवांतक व त्रिशुर या तिघां राक्षसांनीं अंगदावर एकदम हल्ला केला. त्या तिघांशीं एकटा अंगद युद्ध करीत असतां हनुमान व नीलवानर त्याच्या मदतीला धांवले. त्या युद्धांत हनुमानानें देवांतकाला त्याचें डोकें पिळवटून ठार केलें व नील वानरानें महोदरला ठार केलें.

मारुतीनें त्रिशुराशीं बराच वेळ युद्ध केलें व त्याच्याच तलवारीनें त्याचा वध केला. नंतर महापार्श्व नांवाच्या एका राक्षसानें एक गदा घेऊन वानरांचा संहार सुरू केलेला पाहून ऋषभ नांवाच्या वानरानें त्याच्याशीं द्वंद्वयुद्ध सुरू केलें. त्याची गदा लागल्यामुळें तो जखमी झाला होता तरी त्यानें महापार्श्व राक्षसाच्याच गदेचा प्रहार करून महापार्श्वाचा वध केला. घाबरून जाऊन राक्षसवीर रणांगणावरून पळूं लागले.

राक्षस पळूं लागलेले पाहून अतिकाम नांवाच्या राक्षसाला फार राग आला. तो कुंभकर्णासारखाच महाबली होता. त्यानें वानरांचा संहार सुरू केला.

रामानें दुरून अतिकामाला पाहून चकित होऊन बिभीषणाला विचारलें—"पर्वताकार महाबली हा राक्षसवीर कोण? त्याचें धनुष्य सुद्धां सामान्य दिसत नाहीं."

"हा रावणाचाच धन्यमालिनीपासून झालेला मुलगा आहे. याचें नांव अतिकाम. हा एक फिरता किल्लाच आहे. ब्रह्मदेवाची आराधना करून यानें देखील दिव्यास्त्रें मिळविलीं आहेत. याला वेळेवरच वाटेला लावलें नाहीं तर हा वानरांचा संहार करील." बिभीषण म्हणाला.

कुमुद, द्विविद, मैंद, नील व शरभ नांवाच्या वानरांनीं त्याच्यावर हल्ला केला. त्यानें त्या सर्वांना लोखंडी पहारीनें बडवून काढण्याचा उपक्रम सुरू केला. नंतर तो राम उभा होता तेथें आला. आणि म्हणाला—"सामान्य लोकांशीं मी युद्ध करीत नाहीं. कोणी समर्थ असेल त्यानें माझ्याशीं युद्धाला यावें."

तें ऐकून लक्ष्मण पुढें सरसावला. त्याला अतिकाम म्हणाला—"लक्ष्मणा! तूं अजून लहान आहेस! माझ्याशीं तूं युद्ध करणार?" अतिकामानें गर्वोक्ति केली.

"या गप्पा सोड आणि पराक्रम असेल तर तो दाखव." लक्ष्मण म्हणाला.

दोघांचें धनुर्युद्ध सुरू झालें. दोघांनीं परस्परांवर बाणवृष्टि सुरू झाली. परस्परांच्या अस्त्रांचा संहार केला. अतिकामानें अभेद्य कवच धारण केलें होतें म्हणून लक्ष्मणाच्या बाणांचा त्याच्यावर कांहीं परिणाम झाला नाहीं. तें पाहून लक्ष्मणानें ब्रह्मास्त्राचा प्रयोग केला आणि अतिकामाचा शिरच्छेद केला.

सहाचे सहा राक्षसवीर ठार झाल्याचें वर्तमान ऐकून रावण घाबरला. तेव्हां इंद्रजित पुढें आला व आपल्या बापाला नमस्कार करून म्हणाला—"इंद्रजित जिवंत












आणि एका काळ्या बकरीचा बळि दिला. धुराशिवाय अग्नि प्रज्वलित झाला व जय मिळणार याची जणुं कांहीं सूचना झाली.

नंतर इंद्रजितानें ब्रह्मास्त्राचा जप करून रथ, धनुष्य इत्यादि मंत्रविले. सर्व निघून गेल्यावर इंद्रजित आपला रथ व सारथी यांच्या सह आकाशांत अंतर्धान पावला.

राक्षससैन्यानें अत्यंत उत्साहानें, त्यांनी



पर्यंत असें काळजी करण्याचें काय ण ? मी जातों व रामलक्ष्मणांचा करून येतों." रावणानें त्याला ार दिला.

उत्तमोत्तम खेचरें रथाला जुंपून इंद्रजित वसून रणांगणावर निघाला. इतर वीर हत्तीवर, घोड्यावर व इतर वाहनांत धनुष्य, तलवार, गदा वगैरे आयुधें करून इंद्रजिताबरोबर निघाले.

णांगणांत आपल्या रथाच्या चारी ा पाहाऱ्यासाठीं राक्षसवीरांना उभे इंद्रजितानें एक होम आरंभिला.

जयजयकार करून वानरांवर हल्ला केला. प्रमुख वानरवीर गंधमादन, नल, मैंद, गज, जांबवंत, सुग्रीव, ऋषभ, अंगद, द्विविद इत्यादि इंद्रजितानें सोडलेल्या बाणानें जखमी झाले. कांहीं मूर्छित होऊन पडले व असंख्य ठार झाले. इंद्रजित आकाशांत कोठें आहे हें वानरांना कळलें नाहीं.

इंद्रजितानें सोडलेले बाण रामालक्ष्मणां-वर पण येऊन पडले. राम लक्ष्मणाला म्हणाला—" या इंद्रजिताशीं कसें युद्ध करावयाचें हेंच कळत नाहीं. कारण तो अदृश्य आहे. त्याच्या बाणवृष्टीखालीं सर्व वानर सैन्याची त्रेधा उडून गेली आहे. म्हणून आपण मूर्छित होऊन पडल्याचें सोंग करावें, म्हणजे इंद्रजिताला आनंद होईल व तो निघून जाईल!"



तसेंच झालें देखील. रामलक्ष्मण बेशुद्ध होऊन पडलेले पाहून इंद्रजिताच्या मनाचें समाधान झालें व तो आनंदानें लंकेला परतला.

रामलक्ष्मण मूर्छित झालेले पाहून वानर-सैन्यांत हाहाकार उडून गेला. सुग्रीव, नील, जांबवंत, अंगद इत्यादि वानर खरोखरच बेशुद्ध होऊन पडले होते.

रामलक्ष्मणांना बेशुद्ध स्थितींत पाहून घाबरून गेलेल्या वानरांना बिभीषण म्हणाला—" तुम्ही घाबरण्याचें कारण नाहीं. कारण रामलक्ष्मणांना मूर्छा आलेली नाहीं. मूर्छा आल्याचें तें सोंग करीत आहेत."

रात्रीं चांगला काळोख पडल्यावर हनुमान व बिभीषण कोण बेशुद्ध आहे, कोण झोंपला आहे, कोण मृतावस्थेंत आहे हें पाहण्यासाठीं एक दिवा घेऊन निघाले.

इंद्रजितानें त्या दिवशीं फक्त पांच घटकाच युद्ध केलें व तेवढ्या अवधींत सदुसष्ट कोटी वानरांचा संहार केला. बेशुद्ध होऊन पडलेल्यांत सुग्रीव, अंगद, नील, शरभ आदि प्रमुख होते. राम व बिभीषण जांबवंताला शोधूं लागले. सुदैवानें त्यांना वयोवृद्ध जांबवंत दिसला. दोघे त्याच्या



जवळ गेले. बिभीषणानें त्याच्या अंगाला स्पर्श करून तो जिवंत असल्याची खात्री करून घेतली व हळू विचारलें—" आजोबा, कसें काय वाटतें ?"

जांबवंत खोल आवाजांत म्हणाला—" कोण बिभीषण का ? मला दिसत नाहीं म्हणून विचारतों आहें. मारुती कोठें आहे ?"

" आजोबा तुम्ही सुग्रीव, अंगद, रामलक्ष्मण यांपैकीं एकाचीहि चवकशी केली नाहींत ?" बिभीषणानें विचारलें.

" मारुतीचीच चवकशी मी एवढी कां केली म्हणून विचारतोस ? ऐक तर

सांगतो. वानर सैन्याची कत्तल झाली तरी वानर जातीचें नांव राखणारा तो एकटाच आहे. तोच नसेल तर वानर सैन्य जिवंत राहालें काय किंवा न राहालें काय? सारखेंच! मारुती जिवंत असेपर्यंतच मला या जिवाचा मोह आहे." जांबवंत म्हणाला.

हनुमान हें सर्व ऐकत होता. त्यानें जांबवंताजवळ जाऊन त्याच्या पायांवर डोकें ठेवलें व अत्यंत प्रेमळ आवाजांत म्हणाला—"आजोबा! मी आपलें लेंकरूं!"

मारुतीचा आवाज ओळखून जांबवानाच्या जिवांत जीव आला. म्हणाला—"बाळा! जरा जवळ ये. या वानरांच्या रक्षणाचा भार आतां तुझ्यावर आहे. तुझ्याशिवाय इतर कोणालाहि तें साध्य नाहीं. तुला समुद्रापलीकडे हिमालय पर्वतापर्यंत जावें लागेल. हिमालय. पर्वताचीं ऋषभ व कैलाश नांवाचीं दोन उच्च शिखरें आहेत. त्या दोन्हींच्या मध्यभागीं उत्तमोत्तम औषधी वनस्पतींचा एक डोंगर आहे. त्या पर्वताच्या शिखरावर चार तेजस्वी औषधी वनस्पती आहेत. त्यांचीं नांवें अनुक्रमें विशल्य करणी, संधानकरणी, मृतसंजीवनी व सौवर्णकरणी अशीं आहेत. ते वनस्पती हुडकून घेऊन लवकर ये." ते वनस्पती वेळेवर घेऊन आलास तर सर्व वानर पुन्हां जिवंत होतील.

लगेच हनुमान रात्रीच्या रात्रीं एका पर्वत शिखरावर चढला व आपलें शरीर वाढवून त्यानें एकदां गर्जन केलें. त्याची ती भयंकर गर्जना ऐकून राक्षसांच्या झोंपा मोडल्या व भीतीनें त्यांना कांपरें भरलें. नंतर हनुमानानें उड्डाण केलें.





# रुक्मांगद चरित्र

फार प्राचीन काळीं रुक्मांगद नांवाचा एक धर्मपरायण व प्रजावत्सल राजा राज्य करीत असे. त्याच्या पट्टराणीचें नांव संध्यावली असें होतें. त्याला धर्मांगद नांवाचा एक मुलगा होता. रुक्मांगद विष्णुभक्त होता. एकादशी व्रत केल्यानें सर्व पापमुक्ति मिळते असा त्याचा विश्वास होता. त्यानें आज्ञा काढली कीं प्रत्येकानें एकादशी व्रत करावें. जो कोणी हें व्रत करणार नाहीं त्याला कडक शिक्षा करण्यांत येईल.

रुक्मांगदाची प्रजा एकादशी व्रत करूं लागली. नरक ओसाड पडला. यमाला काळजी पडली कीं त्याच्या अधिकारावर गदा येणार! तो चिंताग्रस्त होऊन बसला असतां नारदानें येऊन विचारलें—"यमा! तुला रे कसली काळजी?"

यम म्हणाला—"नारदा! यमलोकाची ही अवस्था तूं पाहतोसच आहेस. रुक्मांगदानें एकादशी व्रत करण्यासाठीं आज्ञा काढल्यापासून ब्रह्महत्येचें पाप करणारा देखील स्वर्गारोहण करीत आहे. चित्रगुप्तानें आपली लेखणी खालीं ठेवली आहे. कामच नाहीं, मग ही पदवी तरी कशाला? आतां ब्रह्मदेवाकडे जाऊन आपल्या जागेचा राजीनामा देऊन मोकळा होतों!"

नारद यमाला आपले वडील ब्रह्मदेव यांच्याकडे घेऊन गेला. यम ब्रह्मदेवाच्या पायां पडला व म्हणाला—"ब्रह्मदेवा! माझें रक्षण कर! देवाधिदेवा! कोणाला माझें भय अगर भीति वाटत नाहींशी झाली आहे. घोर तपश्चर्या करूनदेखील जें पुण्य मिळत नाहीं तें फक्त एकादशी व्रत केल्यानें मिळत



आहे. मग माझी पर्वा कोण करणार? माझा राजीनामा स्वीकार करावा. हा माझा यमदंड व ह्या पापपुण्याच्या हिशोबाच्या वह्या. आजपावेतों या वह्यांत लिहिला गेलेला हिशोब खोडून टाकण्याची हिम्मत कोणी दाखविली नाहीं. पण हा रुक्मांगद कोठून जन्मला कोणास ठाऊक!" यम म्हणाला.

यमाचें बोलणें ऐकून ब्रह्मदेवाला मनस्वी राग आला. म्हणाला—"म्हणजे तुझ्या म्हणण्याचा अर्थ रुक्मांगदाच्या प्रजेनें एका-दशी व्रत करूं नये? एकादशी हा स्वतः विष्णूचा आवडता दिवस आहे. आपलें नशीब समज, तूं चालू केलेली ही मोहीम पाहून हरिभक्तांनीं तुला ठार केलें नाहीं. मी तुला या बाबतींत कोणत्याहि प्रकारें मदत करावयास तयार नाहीं."

पण यम का माघार घेणार? म्हणाला—"आजोबा! तुमच्या पायांसमोर डोकें आपटून जीव देईन पण रिकाम्या हातांनीं परत फिरणार नाहीं. रुक्मांगदाचें राज्य असेपर्यंत मला कोणी विचारणार नाहीं. रुक्मांगदाचा व्रत भंग होईल असें कांहींतरी करा. तुम्ही एवढें केलेंत तर मी कधीं चकून देखील एकादशी व्रत करणाऱ्यांजवळ फिरकणार नाहीं."

ब्रह्मदेव कांहीं वेळ डोळे मिटून ध्यान मग्न झाला. त्यानें मोहिनी नांवाच्या एका अप्सरेची सृष्टि केली. ती हात जोडून ब्रह्मदेवासमोर उभी राहाली व विचारूं लागली—"आजोबा! आज्ञा करावी!"

ब्रह्मदेवानें मोहिनीला रुक्मांगदानें व त्याच्या प्रजेनें आरंभिलेल्या एकादशी व्रताचें वर्णन केलें आणि यमधर्माच्या राज्यावर ओढवलेल्या संकटाचें वर्णन करून म्हणाला—"तूं रुक्मांगदाच्या राज्यांत जा, आणि पहा तर कीं त्याचें हें व्रत ढोंग आहे कीं सत्य आहे. तूं आपल्या सौंदर्याचें अस्त्र टाकून त्याचा व्रत भंग केलास तर माझी सृष्टि यशस्वी झाली असें मी समजेन."

मोहिनी ब्रह्मदेवाच्या आज्ञेप्रमाणें मंदर पर्वतावर गेली. त्या पर्वतावर इंद्राचें वज्रायुध पडल्यामुळें एक मोठी दरी झाली होती. तो एक रम्य प्रदेश होता. त्या दरींतच ती उतरली व एक सपाट व सुंदर अशी जागा पाहून एका सुंदर दगडावर बसून ती वीणावादन करूं लागली. त्या प्रदेशाचें नांव वृषलिंग असें होतें.



रुक्मांगद राजानें वानप्रस्थाश्रम घ्यायचा निश्चय करून आपला मुलगा धर्मांगद याला गादीवर बसविलें. त्याचें जंबूद्वीपावर राज्य होतें. त्यानें कधीं आपलें राज्य वाढविण्याचा प्रयत्न केला नव्हता. परंतु त्यानें एकादशी व्रताचा आरंभ करून आपल्या प्रजेला स्वर्गारोहण करण्यास मदत केली. अशाप्रकारें नरक ओसाड पडला व स्वर्ग त्याच्या साम्राज्यांत जातो कीं काय अशी भीति स्वतः इंद्राला पण वाटूं लागली.

धर्मांगद आपल्या बापासारखाच धर्म-परायण निघाला. रुक्मांगदाचें राज्य फक्त जंबूद्वीपांत होतें तर धर्मांगदाचें राज्य सप्त खंडांत पसरलें. इतका पराक्रम दाखवून देखील त्याला गर्व झाला नाहीं. तो आपल्या आईची व आपल्या बापाच्या तीनशें वर पत्नींची आज्ञा पालन करी.

रुक्मांगद मेरुपर्वतावर रहात असे. त्याला वृषलिंग प्रदेशांत मोहक वीणास्वर ऐकूं आला. तो आवाज कोठून येत आहे हें पाहण्यासाठीं तो निघाला. वृषलिंग पर्वतावर पोंचतांच त्याला मोहिनीचें मोहक रूप दिसलें. तो स्वतःचें देहभान विसरून तिच्या जवळ गेला व बेशुद्ध होऊन पडला.

मोहिनीनें वीणा एका बाजूला उचलून ठेवली व रुक्मांगदाच्या डोळ्यावर पाणी शिंपडून त्याला शुद्धीवर आणलें व म्हणाली—"राजा! तूं स्वतःचें राज्य सोडून सर्वसंग परित्याग करून वानप्रस्थाश्रम ग्रहण केला आहेस. आणि मला पाहतांच तुझी अशी दशा कां रे व्हावी? पण तुझें मन राखण्यासाठीं तूं सांगशील तिकडे तुझ्याबरोबर यायला मी तयार आहें. तुझ्या संगतींत मला आनंदच होईल!"

तें ऐकून रुक्मांगदाला जिवांत जीव आल्यासारखें वाटलें. तो मोहिनीला म्हणाला—"माझ्या अंतःपुरांत तीनशें स्त्रिया आहेत, पण तुझें रूप त्यांपैकीं एकीला देखील लाभलें नाहीं. तूं माझी होऊन राहालीस तर तूं मागशील तें द्यावयास मी तयार आहें. माझें सर्व राज्य तुझ्या पायांवर मी अर्पण करतों. एवढेंच नव्हें तर मी स्वतःला तुझ्या चरणीं अर्पण करतों."

मोहिनीनें रुक्मांगदाचा उजवा हात आपल्या हातांत घेतला व म्हणाली—"तर मग तूं माझ्याशीं विधिवत विवाह करून घे! नाहीं तर आपल्याला जो मुलगा होईल त्याचा कोणी आदर करणार नाहीं. चांडाळाहून नीच मानतील लोक त्याला."

रुक्मांगदानें मोहिनीशीं शास्त्रोक्त रीतीनें विवाह करून घेतला. ती म्हणाली—"आतां तूं सांगशील तशी रहावयास मी तयार आहें. आतां आपण येथेंच विहार करूं या आणखी कोणत्या तरी पर्वतावर विहार करायला जाण्याची तुझी इच्छा असेल तर तें देखील मला मान्य आहे."

मोहिनी त्याच्या बरोबर त्याच्या राजधानींत जायला तयार झाली.



# ३७. स्वर्गालय

चीन देशांतील देवळांत अति प्रसिद्ध अशा या देवालयाला स्वर्गालय या नांवानें लोक ओळखतात. चीन देशाचा चक्रवर्ती युंगलो यानें सन १४२० मध्यें हें देवालय बांधलें. या देवळांत स्वतः चक्रवर्ती आराधना करीत असे. वर्षांतून एकंदर तीन वेळां बलिदान देखील होत असे.





# भारताचा इतिहास



हुमायूनच्या मृत्यूनंतर अकबर बादशाह झाला त्या वेळीं तो पंजाब प्रांतांत बैराम खान याच्या बरोबर होता. अकबर नांवापुरताच बादशाह झाला. कारण स्वतःला बादशाह म्हणविण्याचा जितका हक त्याला होता तितकाच हक शेरशाहच्या वंशजांना पण होता.

सन १५५६ मध्यें हिंदुस्थानांतील राजकीय परिस्थिति गुंतागुंतीची होती. शेरशाह वारल्यावर त्याच्या वंशजामध्यें भाऊबंदकी सुरू झाली. शेरशाहनें राज्यकारभारांत सुधारणा केल्या होत्या. परंतु त्याचा फायदा प्रजेला मिळाला नाहीं.

देशभर जीं स्वतंत्र राज्यें होतीं त्यांचीं आपसांत युद्धें चालू होतीं. अकबराच्या सावत्र आईचा मुलगा मिर्जा मुहंमद हकीम काबूलचें राज्य स्वतंत्र असल्याचें सांगूं लागला. काश्मीर व हिमालयांत जीं लहान मोठीं मुसलमान राज्यें होतीं तेथील शासनकर्ते स्वतःला स्वतंत्र मानूं लागले. शेरशाहच्या मृत्यूनंतर सिंध व मुलतान राज्यांवरील दिल्लीच्या बादशाहाचा अंमल संपुष्टांत आला. याचप्रमाणें माळवा, गुजराथ व ओरिसा प्रांतावर देखील अधिकार राहाला नाहीं. विंध्य पर्वताच्या दक्षिणेकडे खानदेश, वऱ्हाड, बीदर, अहमदनगर, गोवळकोंडा हीं मुसलमान राज्यें व विजयनगरचें हिंदू साम्राज्य होतें. उत्तरेकडील राजकीय उलाढालींशीं त्यांचा संबंध नव्हता. पश्चिम किनाऱ्यावर पोर्तुगीज व डच जातींचा प्रभाव होता. मरणापूर्वी हुमायूननें साम्राज्याच्या ज्या भागावर पुन्हां आपला अंमल स्थापन केला होता तो प्रदेश फक्त आग्र्याहून माळव्यापर्यंतच होता. जोनपूर आदिलशाहच्या



अमलाखालीं होतें. दिल्लीहून काबूलला जाणाऱ्या वाटेवरचा प्रदेश सिकंदर शाहच्या स्वाधीन होता. शेरशाहच्या साम्राज्यांतला बराचसा भाग त्याच्या वंशजांकडे होता.

अकबर बादशाह गादीवर बसल्यानंतर आदिलशाह सूर याचा मंत्री व सेनापति हेमू यानें मोंगलांच्या मुलखावर स्वारी केली व त्यांचा सुबेदार तार्दी बेग याचा पराभव करून आग्रा व दिल्ली हीं शहरें हस्तगत करून घेतलीं. बहिरामखान यानें तार्दी बेग याला दिल्लीचें रक्षण न करूं शकल्याबद्दल मृत्युदंड दिला.



नंतर हेमूनें विक्रमजीत (विक्रमादित्य) ही पदवी धारण केली. १५०० हत्तींचें सैन्य घेऊन सुप्रसिद्ध पानिपतच्या रणांगणावर त्यानें अकबर व त्याचा सेनापति बहिरामखान याच्याशीं युद्ध केलें. सुरवातीला हेमूचाच जय होत गेला. परंतु एक बाण त्याच्या डोळ्यांत शिरला व तो बेशुद्ध होऊन पडल्यावर त्याच्या सैन्यानें पळापळ सुरू केली. त्याच युद्धांत हेमू ठार झाला. कांहीं इतिहासकारांचें मत आहे कीं स्वतः अकबर बादशाहानेंच त्याला ठार केलें व कांहींचें मत आहे कीं बहिरामखानानें अकबर बादशाहच्या इच्छेविरुद्ध त्याला ठार केलें.

पानिपतच्या दुसऱ्या युद्धांत मोंगलच अफगाणांहून ज्यास्त बलिष्ठ आहेत हें सिद्ध झालें. दिल्ली व आग्रा येथें पुन्हा मोंगलांची सत्ता कायम झाली. सन १५५७ च्या मे महिन्यांत सिकंदर सूर यानें मोंगलांच्या सत्तेसमोर आपली मान वांकविली. पूर्वेकडील एका इलाख्याची जहागीर त्याला देण्यांत आली होती. परंतु अकबरानें त्याला तेथून हुसकावून लावलें. पुढें तो १५५८-५९च्या सुमारास असहाय स्थितींतच मरण पावला.

मुहंमद आदिल बंगालच्या सुभेदाराशीं युद्ध करीत असतां मुंगेरनजीक सन १५५६ मध्यें मरण पावला. इब्राहीम अनेक देश भटकत शेवटीं ओरिसा प्रांतांत आला. तेथेंच १६६७-६८ मध्यें त्याचा खून झाला. त्यानंतर अकबर बादशाहच्या सत्तेला आव्हान करणारा कोणी सूरवंशी उरला नाहीं.

मोंगल साम्राज्याचा जयजयकार होत असला तरी अकबर नांवापुरताच बादशाह होता. कारण सर्व अधिकार बहिरामखानाच्या हातांत होता. अकबर स्वतःच सर्व सत्ता आपल्या हातांत करून घेण्याच्या विचारांत होता. त्याची आई बानुबेगम आणि त्याची मुहान नांवाची दाई व तिचा मुलगा आदमखान सर्वांनीं बहिरामखानाला काढून टाकण्यास सांगितलें. १५६० मध्यें अकबरनें सर्व सत्ता स्वाधीन करून बहिरामखानाला पदच्युत केलें. बहिरामखानानें अकबराच्या आज्ञेचें पालन करून मक्का जाण्याची इच्छा व्यक्त केली. अकबरानें मीर महंमद नांवाच्या सरदाराला तशी व्यवस्था करण्यास सांगितलें. बहिरामखानाला तें आवडलें नाहीं. कारण मीर महंमदानें पूर्वी त्याच्या हाताखालीं काम केलें होतें व तेव्हां पासूनच दोघांचें परस्पराशीं वैर होतें. म्हणून बहिरामखानानें बंड केलें. पण अकबर आपल्या उपकर्त्याला कधीं विसरला नाहीं. त्यानें औदार्यानें बहिरामखानाला माफ केलें. पुढें बहिरामखान मक्केला जात असतां वाटेंत एका लोहानी अफगाणानें त्याचा खून केला. अकबरानें त्याचा मुलगा अबदुररहीम याला आपल्या-जवळ ठेवून घेतलें. अकबराच्या नवरत्नांत तो एक होता.



# नेहरू चरित्र

[९]



पंजाबांतील हत्याकांड झाल्यानंतर जवाहरलालजी गांधीजींच्याकडे जास्त ओढले गेले. मार्शल लॉ मागें घेतल्यावर कॉंग्रेसनें कैद झालेल्या राष्ट्रीय कैद्यांना त्यांच्यावर चालू असलेल्या खटल्याविरुद्ध मदत देण्याची व्यवस्था करून दिली. ही व्यवस्था करण्याची जबाबदारी स्वामी श्रद्धानंद व पंडित मदन मोहन मालवीय यांनीं घेतली. कायद्याची मदत करण्याची जबाबदारी पं. मोतीलाल नेहरू व चित्तरंजन दास यांनीं घेतली. ह्या सर्व कामाची व्यवस्था मात्र सुरवातीपासून महात्मा गांधी पहात होते.

जवाहरलालजींना देशबंधु चित्तरंजनदास यांचे मदतनीस म्हणून नेमण्यांत आलें. दास यांच्या व्यक्तित्वाचा परिणाम जवाहरलालजींच्या मनावर फार पडला. दोघे मिळून अनेक वेळां जालियनवालाबाग पाहण्यास गेले. नांव बाग असलें तरी ही जागा चिंचोळी व खोलगट आहे. या बागेंत एकत्र जमलेल्या लोकांवरच जनरल डायरनें गोळीबार केला होता. तेथें जवाहरलालजींनीं कांहीं विचित्र गोष्टी ऐकल्या. एका इंग्रज तरुणीच्या अंगाचा स्पर्श केल्याबद्दल इंग्रजांनीं ज्या गल्लीत गोळीबार झाला होता ती गल्लीपण त्यांनीं पाहिली.

१९१९ मध्यें जवाहरलालजी अमृतसरहून दिल्लीला जात असतां योगायोग असा कीं त्याच डब्यांत जनरल डायर वगैरे इंग्रज बसले होते व ते त्यांनीं जालियनवाला बागेंत कसे अत्याचार केले त्याची गर्वोक्ति करीत होते. अर्थातच नेहरूंना त्यांची चीड आली.











२८ मे १९२० या रोजीं खिलाफत कमेटीची सभा मुंबईला भरली व असहकार चळवळीचें समर्थन झालें. त्याच वेळीं जालियनवाला बाग प्रकरणा विषयीं चवकशी कमेटीचा रिपोर्ट प्रसिद्ध झाला. देशांत खळबळ उडून गेली. असा ठराव करण्यांत आला कीं '६ एप्रिल ते १३ एप्रिल राष्ट्रीयसप्ताह' म्हणून पाळण्यांत यावा. मोठमोठ्या गोष्टी अगदीं सरळ शब्दांत सांगण्याची कला गांधीजींना अवगत होती. उदाहरणार्थ,—"फांशीला जाणें हा रोजच्या जीवनांतला भाग समजला पाहिजे." देशासाठीं स्वतःचा बळी द्यावा लागला तरी तो देण्यास तयारी असावी ही गोष्ट त्यांनींच प्रजेच्या मनावर बिंबवली.

३० मे रोजीं बनारस येथें कांग्रेस कमेटीची बैठक झाली त्यावेळीं सेप्टेंबर महिन्यांत कॉंग्रेसचें जादा अधिवेशन करण्याचें ठरलें. त्यांत गांधीजींच्या असहकार चळवळीविषयीं विचार करण्याचें व १ ऑगस्ट रोजीं असहकार चळवळ सुरू करण्याचें पण ठरलें.

त्याच दिवशीं लोकमान्य टिळक वारले. मरणसमयीं "स्वराज्याशिवाय भारताचें भाग्य उदयास येणार नाहीं." असे लोकमान्य म्हणाले होते. गांधीजी व नेहरू सिंध प्रांतांत फिरती करून त्याच दिवशीं मुंबईला आले.

टिळकांच्या शवयात्रेला गांधीजी व जवाहरलाल नेहरू हजर होते. चौपाटीच्या वाळवंटांत चंदनाची चिता रचून टिळकांचा दाहसंस्कार करण्यांत आला.

"माझा एक फार मोठा आधार तुटला!" असें गांधीजी त्यावेळीं म्हणाले. त्या पुढें देशाचें पुढारीपण त्यांच्याच शिरावर येऊन पडलें आहे या गोष्टीची त्यांना जाणीव झाली.






[१०]

[वीरेंद्रसिंहाचा शिरच्छेद झाला. उस्मानखानाच्या सहाय्यानें विमला वध्यस्थानीं त्याला भेटूं शकली. तेथें तिनें वीरेंद्रच तिचा पति असल्याचें सांगून पतीला वचन दिलें कीं त्याच्या खुनाचा ती सूड उगवील. जगतसिंह जिवंत आहे हें कळल्यावर तिनें आपलें आत्मवृत्त त्याला कळविण्यासाठीं एक पत्र लिहून उस्मानखानाच्या हातीं दिलें. उस्मानखानानें तें वाचून पाहिलें तेव्हां त्याला चकित करून सोडणारा त्याच्या लहानपणचा एक प्रसंग कळला. तेव्हा विमलानें त्याला चोरांच्या हातांतून वांचविलें होतें.

उस्माननें पुन्हां पत्र वाचण्याचा प्रयत्न करून पाहिला. विमलानें आपल्या पत्रांत पुढें लिहिलें होतें—"दुसऱ्या दिवशीं पठाण वाटेंत माझ्या आईला म्हणाला होता कीं तुझ्या मुलीनें आज माझ्यावर जे उपकार केले आहेत त्या बद्दल मी आत्तांच कांहीं परोपकार करूं शकलों नाहीं, तरी पुढें तुम्हांला कोणत्याहि वस्तूची गरज असेल तर सांगा, दिल्लीला पोंचल्यावर पाठवून देईन." माझ्या आईनें तेव्हां त्याला सांगितलें होतें कीं फक्त तिच्या पतीची म्हणजे माझ्या वडिलांची कांहीं बातमी कळली तर पुरे. त्यानें दिल्लीला माझ्या वडिलांचा शोध लावण्याचा पुष्कळ प्रयत्न

श्री बंकिमचंद्र चट्टोपाध्याय



करून पाहिला. चौदा वर्षांनंतर माझे वडील दिल्लीलाच असल्याचें कळलें व त्यांनीं स्वतःचें नांव अभिरामस्वामी असें ठेवून घेतलें होतें.

तों पर्यंत माझी आई वारली होती. वडिलांची माहिती कळल्यावर मला एक दिवस देखील काशीला राहाणें आवडलें नाहीं. माझ्या वडिलांना जगांत दुसरें कोणी नव्हतें. म्हणून मी एकटीच दिल्लीला निघालें. प्रथम ते मला पाहून फार रागावले मी रडत उभी होतें. शेवटीं त्यांनीं मला स्वतःजवळ ठेवून घ्यायचें कबूल केलें. त्यांनीं माझें नांव बदलून विमला ठेवलें. वडिलांची सेवा करायला मिळाली म्हणून मला फार आनंद झाला.

मी वर लिहिलेंच आहे कीं मंथारण येथें माझ्या वडिलांच्या चुकीमुळें एका सैनिकाची बायको गरोदर झाली होती. तिलादेखील एक मुलगी झाली. पुढें कांहीं दिवसांनीं तिचा नवरा वारला. माझ्या आईसारखेंच आयुष्य घालवून तिनें आपला उदर निर्वाह चालविला होता. त्या विधवा बाईची मुलगीच पुढें वीरेंद्रसिंहांची राणी व तिलोत्तमेची आई झाली.

तिलोत्तमेची आई तिच्या वेळीं गरोदर असतांनाच प्रथम वीरेंद्रसिंहांशीं माझ्या लग्नाची गोष्ट निघाली होती. वीरेंद्रसिंह शिष्य म्हणून माझ्या वडिलांच्या आश्रमांत आले होते. माझ्या वडिलांनीं त्यांना सांगितलें कीं मी विमलाला एकटीला सोडून मंथारणला येणें शक्य नाहीं. तूं तिच्याशीं लग्न करून घेतलेंस तर मी तुझ्याबरोबर तूं सांगशील तेथें यायला तयार आहें.

वीरेंद्रसिंह थोडे रागानेंच म्हणाले— "एका शूद्रकन्येशीं मी विवाह कसा करूं?" "तूं तरी एका कुलटा स्त्रीच्या मुलीशीं लग्न केलें आहेसच कीं नाहीं?" माझ्या वडिलांनीं त्यांना विचारलें. त्यावर ते म्हणाले कीं तिची आई कुलटा आहे हें लग्नाच्या वेळीं मला माहीत नव्हतें. माझ्याशीं लग्न करण्याचें त्यांनीं नाकारल्यावर माझ्या वडिलांनीं त्यांना आश्रमांत पाऊल टाकूं दिलें नाहीं. भेटायचें झालें म्हणजे स्वतःच किल्ल्यांत येईन असें माझ्या वडिलांनीं सांगितलें. अशातऱ्हेनें वीरेंद्रसिंहांचें आश्रमांत येणें बंद झालें. पण मला तें असह्य झालें.

माझी ती स्थिति पाहून माझ्या वडिलांनीं संन्यास घेण्याचें ठरवून मला कळविलें व म्हणाले कीं मानसिंह महाराजांच्या नव्या राणीची दासी म्हणून मला त्यांच्या वाड्यांत ते ठेवून देणार आहेत.

"युवराज! मी तुमच्या घरांत अंतःपुरांतली एक दासी म्हणून राहूं लागलें. मी बरेंच दिवस तेथें राहालें. पण तुम्हांला तें कळलें नाहीं. कारण तुम्ही आपल्या आई जवळ रहात होतां. मी जोधपुरची राजकुमारी उर्मिलादेवी हिच्या बरोबर रहात असें. त्यांचें माझ्यावर स्वतःच्या जिवापेक्षां जास्त प्रेम होतें. त्यांच्या कृपेनें मी अनेक कला अवगत करून घेतल्या. चित्रकला, संगीत, नृत्य वगैरे. त्यांनीं महाराजांजवळ



पण माझी फार प्रशंसा केली. ते माझें गाणें नित्य ऐकत असत व स्वतःच्या मुलीसारख मला वागवत असत. त्यांची माझ्या वडिलां-वर देखील फार श्रद्धा व भक्ति होती. मला एकाच गोष्टीचें दुःख होई, ज्यांच्यावर माझें प्रेम होतें त्यांच्यापासून मी फार दूर होतें.

तुम्हांला आस्मानी नांवाची दासी आठवत असेल. आमची परस्परांशीं फार मैत्री होती. स्वतःच्या वडिलांशीं भांडण झाल्या-मुळें वीरेंद्रसिंह दिल्लीला येऊन राहूं लागले होते. मी आस्मानीकरवी त्यांच्या-कडे निरोप पाठविला. परस्परांशीं पत्रव्य-











हार सुरू झाला व प्रेम वाढत गेलें. अशीं तीन वर्षें लोटलीं.

त्याच सुमारास वीरेंद्रसिंहांच्या हातून एक चूक घडली. ते एका भिस्त्याचा वेष करून मला भेटण्यासाठीं आस्मानीबरोबर अंतःपुरांत आले व माझ्या खोलींत येऊन लपून राहूं लागले. एकदां मानसिंह महाराज तेथें आले व वीरेंद्रसिंहांना माझ्या खोलींत पाहून त्यांना कैद केलें. मी घाबरून गेलें कीं वीरेंद्रसिंहांचा शिरच्छेद होणार. मी उर्मिलादेवीच्या पायां पडलें, आपल्या वडिलांच्या पायां पडलें. पण त्यांना माझी दया येण्याऐवजीं राग आला. म्हणाले–"पापिणी! तुला शरम नांवाची वस्तूच राहाली नाहीं वाटतें!"

परंतु उर्मिलादेवीनें माझ्या वतीनें महाराजांचें मन वळविलें. तेव्हां महाराज म्हणाले–"वीरेंद्रसिंहानें माझ्याशीं रीतसर लग्न केलें तर मी त्याला कैदेंतून सोडायला तयार आहें." तें ऐकून वीरेंद्रसिंहांना राग आला. ते म्हणाले–"मी कैदेंत खितपत राहून मरायला तयार आहें पण एका शूद्र स्त्रीशीं विवाह करण्यास तयार नाहीं." तेव्हां महाराजांनीं वीरेंद्रसिंहांना समजावून सांगितलें कीं त्यांनीं आपल्या बहिणीचें लग्न युवराज सलीम याच्याशीं करून दिलें आहे. मग तूं ब्राह्मणाच्या मुलीशीं लग्न करून घेण्यास कां तयार होत नाहींस? तूं तिच्याशीं लग्न केलें नाहींस तर दुसरा कोण तिच्याशीं लग्न करील?"

तरी वीरेंद्रसिंह लग्न करून घ्यायला कबूल झाले नाहीं. पण कैदेंत त्यांचे फार हाल होत होते. तेव्हां एका अटीवर ते माझ्याशीं लग्न करावयास कबूल झाले. लग्न झाल्यावर मी लग्नाची बायको आहें हें न सांगतां दासी म्हणून घरांत रहावें लागेल.



मी कबूल केलें. त्यानंतर आमचें दोघांचें लग्न झालें.

आमचें लग्न माझ्या पतीच्या म्हणजे वीरेंद्रसिंहांच्या इच्छेविरुद्ध झालें होतें. म्हणून लग्नापूर्वीं त्यांचें माझ्यावर जितकें प्रेम होतें त्यांत अंतर पडलें. बरेंच दिवसांनीं त्यांचा माझ्यावरचा राग कमी झाला, परंतु महाराज मानसिंह यांच्यावरचा राग कमी झाला नाहीं. पण तें सर्व माझें दुर्दैवच म्हणावयाचें. मला जें कांहीं सांगावयाचें होतें तें मी निवेदन केलें आहे. तिलोत्तमेविषयीं मी कांहींच लिहिलें नाहीं. विसरा तिला आतां."

उस्माननें तें पत्र वाचून दीर्घ श्वास सोडला. तो म्हणाला–"तूं माझ्यावर केलेले उपकार मी कधींच विसरणार नाहीं."

"उस्मान! नुसती आशा दाखवून फसविण्यांत काय अर्थ?" विमलानें विचारलें.

उस्मान आपली अंगठी काढून देत म्हणाला–"ही तूं आपल्याजवळ ठेव. इतक्या लवकर नाहीं, पण लवकरच कतलूखानाचा वाढदिवस येणार आहे. त्यादिवशीं मोठा उत्सव होईल. सर्व लोक त्या उत्सवांत गर्क होऊन जातील. पाहारेकरीदेखील दारू पिऊन झिंगून गेलेले असतील. त्यादिवशीं मध्यरात्रीं तूं अंतःपुराच्या दाराजवळ ये. तुला अशीच अंगठी कोणी दाखवील त्याच्याबरोबर तूं निघून ये."



विमला अनेक प्रकारें आभार मानून निघाली. तेव्हां उस्मान तिला म्हणाला–"पण तूं एकटीच ये बरें का? नाहीं तर सर्वच काम बिघडेल आणि आपण सर्वच जाळ्यांत सांपडूं."

विमलाला हें कळायला वेळ लागला नाहीं कीं तिलोत्तमेला बरोबर आणूं नये असें त्याला सुचवायचें होतें. म्हणून तिनें विचार केला कीं वांचवायचेंच असेल तर



तिलोत्तमेलाच वांचवावें. स्वतःचा बचाव होईल आणखी कांहीं तरी युक्ति करून. म्हणून ती पुन्हां एकदां उस्मानचे आभार मानून निघून गेली.

हळूहळू जगतसिंहाची तब्येत सुधारत गेली. त्याच्या अंगांत शक्तीचा संचार होऊं लागला होता. परंतु त्याची तब्येत सुधारत गेली तशीतशी तिलोत्तमेची आठवण वाढतच गेली. जो कोणी त्याला भेटे त्याच्याजवळ तो तिच्याविषयींच चवकशी करी. परंतु एकानें देखील तिची खुशाली कळविली नाहीं कीं तिच्याविषयीं आणखी कांहीं बातमी दिली नाहीं. आयशाला देखील तिलोत्तमा कोठें आहे हें माहीत नव्हतें. फक्त उस्मानला माहीत होतें. पण तो सांगायला तयार नव्हता. म्हणून "ती कोठें आहे?" हा प्रश्न सारखा युवराजाच्या मनांत घोळत होता. तो मऊ बिछाना त्यामुळेंच त्याला कांट्यांचा बिछाना वाटूं लागला.

पुढें काय? हा एक प्रश्नदेखील त्याच्या मनांत होताच. त्याचें उत्तर देणारासुद्धा जवळ कोणी नव्हता. आपण कैदेंत आहों हें त्याला माहीत होतें. तो कैदेंत पाहरेकर्‍यांच्या कडक पाहार्‍यांत नसून एका मोठ्या खोलींत मऊ बिछान्यावर पडून होता, तर तें आयशा व उस्मान दोघांच्या कृपेमुळें. कित्येक दासदासी त्याच्या सेवेला हजर होत्या. पण दारावर सक्त पाहारा असे. आयशा तर त्याच्या स्वतःच्या बहिणीहून त्याची जास्त शुश्रूषा करीत होती.

जगतसिंहाला शुश्रुषेची जरूर होती तितके दिवस आयशानें स्वतः ती केली. त्याची तब्येत सुधारत गेली तसें तिचें येणें कमी होत गेलें आणि त्याची तब्येत चांगली बरी झाली तोंपर्यंत तिचें येणें पण कायमचें बंद झालें.





एकदां जगतसिंह खिडकींतून बाहेर पहात होता तेव्हां उस्माननें पाठीमागून येऊन विचारलें—"काय पाहातो आहेस?"

"गल्लींत कोणाच्या तरी चारी बाजूला घोळका करून लोक गंमत पहात आहेत." जगतसिंह म्हणाला.

"तो मंथारण किल्ल्यांतला एक ब्राह्मण आहे." उस्मान म्हणाला.

मंथारण किल्ल्याचें नांव ऐकतांच जगतसिंहाला वाटलें कीं तिलोत्तमेविषयीं कांहीं तरी बातमी त्याच्याकडून कळेल. म्हणून त्यानें विचारलें—"त्याचें नांव काय?"

"गजपट बिजपट असें आहे कांहीं तरी!" उस्मान म्हणाला.

"बंगाली असावा! येणार्‍या जाणार्‍यांशीं थट्टा मस्करी करण्यांत हुशार व मोठा गप्पिष्ट दिसतो आहे?" जगतसिंहानें विचारलें.

दिग्गजच्याविषयीं उस्माननें पूर्वीं ऐकलें होतें. परंतु तो कितपत हुशार व वस्ताद असेल हें नव्हतें त्याला माहीत. म्हणून तो जगतसिंहाला म्हणाला—"पाहिजे तर त्याला बोलवून आणतां येईल!"

एका जणाला पाठवून उस्माननें त्या ब्राह्मणाला बोलावून आणायला सांगितलें. दिग्गज आला. उस्माननें त्याला विचारलें—"तुम्ही जातीनें ब्राह्मणच ना?"

दिग्गज हातवारे करून व्यर्थ आहे सर्व असा अभिनय करून म्हणाला—"असारे खलु संसारे सारं श्वशूर मंदिरम्" म्हणजे या निस्सार जगतांत सार कोठें असेल तर तें सासुरवाडाच्या घरीं.

जगतसिंहाला हंसूं आलें. पण तें आवरून त्यानें दिग्गजला नमस्कार केला. दिग्गज म्हणाला—"खुदा, अल्ला! खानांवर कृपा ठेव!"

तें ऐकून युवराज म्हणाला—"पंडितजी! मी मुसलमान नसून हिंदू आहें."

दिग्गजाला वाटलें कीं तो तरुण खोटें बोलून त्याला फसवीत असावा. म्हणून तो म्हणाला—“खानसाहेब! मी आपल्या चरणाचा दासानुदास आहें. आपण माझा अपमान करूं नये.”

“तुम्ही मंथारणचे का? तुमचें नांव दिग्गज आहे, होय ना? मंथारणची कांहीं हालहवाल सांगाल कीं नाहीं?” युवराजानें विचारलें.

“अभिरामस्वामी पळून गेले आहेत हो!” दिग्गज म्हणाला.

“आणि वीरेंद्रसिंह?” जगतसिंहानें विचारलें.

“नवाबानें त्यांचा शिरच्छेद केला!” दिग्गज म्हणाला.

जगतसिंहानें उस्मानकडे वळून विचारलें—“हा ब्राह्मण खोटें बोलतो आहे नाहीं का?”

उस्माननें थोडक्यांत सांगितलें कीं नवाबाच्या दरबारांत वीरेंद्रसिंहाच्या अपराधाबद्दल विचार झाला व त्यांना शिरच्छेदाची शिक्षा झाली होती. असें सांगून तो दिग्गजाला म्हणाला—“चला आतां बाहेर!”

पण युवराजानें त्याला थांबायला सांगून विमलाचें काय झालें म्हणून विचारलें. दिग्गज म्हणाला,—“विमलाला नवाबानें त्याच्या ठेवलेल्या बायांत रहायला सांगितलें आहे.” तिलोत्तमेचें काय झालें हें विचारण्याचा मोह त्याला आवरला नाहीं. “तिला देखील तोच मान मिळाला आहे वाटतें.” असें दिग्गज म्हणाला.

जगतसिंह उस्मानखानस म्हणाला—“तूं नवाबाची नव्हे, एका राक्षसाची सेवा करीत आहेस!”

[चालू]



# फुकट मेहनत

विक्रमार्कानें आपला हट्ट सोडला नाहीं. तो पुन्हां झाडाजवळ गेला. प्रेत काढून खांद्यावर टाकलें व नेहमींप्रमाणें गुपचूप स्मशानाकडे निघाला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला—“राजा! कांहीं लोक दूरदर्शी नसल्या कारणानें स्वतः कष्ट सोसतातच व इतरांना पण कष्ट झेलायला लावतात. शतकेतूसारखी तुझी मेहनत फुकट तर जात नसेल ना? मी त्याची गोष्ट सांगतो. ऐक!” असें सांगून वेताळानें गोष्ट सांगायला सुरवात केली.

शूरमागध देशाच्या राजाला शतकेतु व वीरकेतु नांवाचीं दोन मुलें होतीं. राजा वारल्यावर शतकेतु राजा झाला. वीरकेतु फार अभिमानी होता. भाऊ राजा झाल्यावर त्याची प्रजा म्हणून त्याच्या राज्यांत राहाणें त्याला आवडलें नाहीं. म्हणून तो



शतकेतूचा राज्याभिषेक होतांच शूरमागध देश सोडून निघून गेला. अश्वकर्ण नांवाच्या एका देशांत जाऊन त्यानें एका स्वतंत्र राज्याची स्थापना केली.

वीरकेतूला सहा प्रमुख सरदारांनीं मदत केली. त्यांच्यापैकीं एक गोवर्धनाचार्य म्हणून होता. तो शस्त्रविद्येंत वीरकेतूचा गुरूच होता.

अश्वकर्ण राज्य लहान होतें पण वीरकेतूचा राज्यकारभार इतका व्यवस्थित होता कीं देश सुखी व संपन्न झाला.

वीरकेतूला विजयकेतु नांवाचा मुलगा होता. तो लहानपणापासूनच शूर व साहसी निघाला. म्हणून त्याला युद्धविद्येचें शिक्षण देण्यासाठीं वीरकेतूनें गोवर्धनाचार्यांसच नेमलें. विजयकेतूनें लवकरच युद्धविद्येंत असामान्य प्राविण्य मिळविलें. चौदा वर्षांचें वय असतांनाच त्यानें मोठमोठ्या शूर योद्ध्यांशीं युद्ध करून आपलें युद्धकौशल्य दाखविलें आणि सर्वांना चकित करून सोडलें.

विजयकेतु अठरा वर्षांचा झाला तेव्हां अशी बातमी कळली कीं अश्वकर्ण देशाच्या सीमेवर दोघां राक्षसांनीं पिकें उध्वस्त करून गुरें पळवून नेलीं व गरीब प्रजेची कत्तल सुरू केली आहे. शेतें व बागबगीचे उध्वस्त झालेलीं ऐकून स्वतः वीरकेतु कांहीं सैनिकांना बरोबर घेऊन त्या राक्षसाच्या समाचाराला निघाला. तो पुष्कळ फिरला, पण त्याला राक्षस दिसेनात. ते डोंगरांत लपून बसले होते. शेवटीं हताश होऊन त्याला राजधानीला परतावें लागलें. राजाची पाठ फिरल्याबरोबर राक्षसांनीं पुन्हां धुमाकूळ सुरू केला.

विजयकेतु विचार करून आपल्या गुरूला म्हणाला—"कोणाला बरोबर न घेतां फक्त आपण दोघेच निघालों तर राक्षसांचा शोध नक्की लागेल. त्या दोघांना ठार करणें आपणां दोघांना शक्य नाहीं का ?"



आपल्या शिष्याचें तें साहसाचें बोलणें ऐकून गुरूला फार आनंद झाला. दोघे कमरेला तलवार अडकवून व हातांत भाला घेऊन निघाले. पुष्कळ फिरले, पण त्यांना देखील राक्षसांचा पत्ता लागला नाहीं.

ते आपल्या राज्याच्या दक्षिणेकडील सरहद्दीवर गेले. तो डोंगराळ प्रदेश होता. डोंगरापलीकडे दरींत व मैदानांत दाट अरण्य होतें व रानटी लोकांची त्यांत वस्ती होती.

त्या रानटी जातीच्या लोकांनीं त्यांना थोडी मदत केली. विजयकेतु व गोवर्धनाचार्य यांच्या तलवारी पाहून ते म्हणाले—"तुम्ही या लहान लहान तलवारींनीं का राक्षसांचा वध करणार ? आम्ही तुम्हांला दगड सुद्धां कापून टाकतां येतील अशा बळकट तलवारी करून आणून देतों. त्या तलवारींनीं राक्षसांचा संहार करून आमचें रक्षण करा."



त्यांनीं करून दिलेल्या तलवारी घेऊन गुरु व शिष्य त्या डोंगराळ प्रदेशाकडे निघाले. त्यांना एका जागीं राक्षसांच्या पावलांच्या खुणा दिसल्या. त्या पहात ते कांहीं अंतर चालत गेले तेव्हां त्यांना समोर एक गुहा दिसली. या गुहेंतच राक्षस रहात असावेत असा विचार त्यांच्या मनांत आला. ते आंत शिरायच्या विचारांतच होते, पण समोर एक राक्षस एक दगडी गदा हातांत घेऊन धांवत बाहेर येत असलेला त्यांना दिसला. त्यानें गोवर्धनाचार्यांना त्या गदेनें ठार करण्यासाठीं गदाप्रहार केला. परंतु चपळाईनें ते निसटून गेले. त्याच वेळीं विजयकेतूनें राक्षसाच्या पोटांत भाला भोसकण्याचा प्रयत्न केला. पण त्याच वेळीं एक राक्षसीण गुहेंतून

बाहेर आली व त्याला पाठीमागून धरून गुहेंत पळूं लागली.

गोवर्धनाचार्यांना ती गोष्ट कळली. राक्षसानें ज्या गदेचा प्रहार केला होता ती गदा वार चुकल्यामुळें खालीं जमिनीवर पडली होती. राक्षस ती उचलण्यासाठीं खालीं वांकला होता. ती संधी साधून त्यांनीं तलवारीचा एक वार करून राक्षसाचा शिरच्छेद केला आणि राक्षसिणीच्या मागें धांवत गेले आणि तिच्या खांद्यावर वार केला. तो वार मर्मी पडला होता, म्हणून राक्षसीण जी जमिनीवर पडली ती पुन्हां उठली नाहीं.

अशा तऱ्हेनें एकट्या गोवर्धनाचार्यांनीं दोघां राक्षसांचा वध केला. गुरु-शिष्य राजधानींत परत आले. तेव्हां नागरिकांनीं दोघांच्या शौर्याची स्तुति केली. त्यानंतर कांहीं दिवसांनीं वीरकेतु वारला व विजयकेतु राजा झाला. त्यानें आपल्या वडिलांच्या सर्व स्नेही मंडळींच्या मदतीनें राज्यांत सुखशांति नांदावी म्हणून त्यांच्या सल्ल्यानें राज्यकारभार चालविला.

आपल्या पुतण्याला इतकी प्रसिद्धी मिळालेली पाहून शूरमागध देशाचा राजा शतकेतु याला हेवा वाटूं लागला. त्यानें विजयकेतूकडे एक दूत पाठविला. त्यानें विजयकेतूला शतकेतूचा निरोप सांगितला. निरोप असा होता—"तूं आमचा मांडलिक राजा आहेस. परंतु तूं किंवा तुझा बाप दोघांनीं आम्हांला दर वर्षी मिळणारी खंडणी कित्येक वर्षे दिली नाहीं. तरी खंडणी वेळेवर पोंचती न केल्यास योग्य कारवाई करणें अपरिहार्य होईल."

"आम्ही कोणाचे मांडलिक नाहीं. आम्ही स्वतंत्र आहों. खंडणी वसूल करावयाची असेल तर आमच्या काकांना जाऊन सांग कीं स्वतः येऊन ती वसूल करून घेऊन जावें." विजयकेतूनें त्याच दूताच्या हातीं उत्तर पाठविलें.

तें उत्तर बरोबर होतें व त्याबद्दल मंत्र्यांनीं आपल्या राजाचें अभिनंदन केलें. पण त्याचबरोबर त्यांना एक शंका वाटत होती. समजा, शतकेतु आपलें असंख्य सैन्य घेऊन चालून आला तर त्याच्याशीं युद्ध कसें काय करावयाचें? म्हणून विजयकेतूनें एक युक्ति योजून ठेवली.

शतकेतु आपली असंख्य सेना घेऊन विजयकेतूच्या राज्यावर चालून आला. वाटेंत एका जागीं विश्रांतीसाठीं त्याच्या






Fullscreen










सैन्यानें पडाव टाकला. विजयकेतूच्या निवडक शंभर घोडेस्वारांनीं मध्यरात्रीच्या सुमारास त्याच्यावर अचानक छापा मारला, आणि शतकेतूच्या सैन्याची धुळदाण उड-वून दिली. अशा तऱ्हेनें तें युद्ध मध्येंच थांबलें.

या प्रयत्नांत विजयकेतूला अलोट धन व शस्त्रास्त्रें मिळालीं. त्यानें तें सर्व आपल्या राजधानींत नेऊन सुरक्षित ठेवलें. परंतु शतकेतूच्या अनुयायांनीं सैन्याची जमवाजमव करून विजयकेतूनें नेलेलें धन व शस्त्रास्त्रें पुन्हां सोडवून आणलीं.

अशा तऱ्हेनें विजयकेतूची ती युक्ति अयशस्वी ठरली. आपल्या चुलत्याला फक्त युक्तीनें व गनिमी काव्यानें जिंकणें अशक्य आहे हें त्याला चांगलें कळून आलें. कारण त्याच्या वडिलांचे ते पांच स्नेही व त्याचे स्वतःचे गुरू गोवर्धनाचार्य शत्रूच्या हातीं कैद झाले होते.

समोरासमोरच्या युद्धांत आपल्या चुलत्याला जिंकणें अशक्य आहे, हें त्याला कळलेंच होतें. युद्ध करून रणांगणावर मरण आलें तरी तो त्याला तयार होता. परंतु आपल्या शूरवीर गुरुवर्यांचा अमानुषपणें वध व्हावा हें त्याला पसंत नव्हतें. त्यापेक्षां अपमान सहन करून रानोमाळ हिंडत रहावें लागलें तरी चालेल असें त्याला वाटलें. त्यानें आपल्या चुलत्याकडे संधी करण्यासाठीं दूत पाठविला. दूत शतकेतूच्या दरबारीं गेला व म्हणाला—"महाराज! आपण अश्वकर्ण देशाच्या प्रौढ वीरांना सोडून दिलेंत तर आमचे महाराज आपलें राज्य आपल्या स्वाधीन करून परदेशी जावयास तयार आहेत."

शतकेतु तशी संधी करून घेण्यास कबूल झाला. विजयकेतु व त्याचे गुरुवर्य

आणि इतर मंत्री पुन्हां भेटले. आपल्या राजाबरोबर वनवास घेण्यास ते तयार झाले. परंतु त्यांना जास्त दिवस वनवास भोगावा लागला नाहीं. कारण पुढें कांहीं दिवसांनीं शतकेतु मरण पावला व त्याला कोणी वारस नसल्यामुळें विजयकेतूच शूरमागध देशाचा राजा झाला.

येथवर गोष्ट सांगून वेताळानें विचारलें— "राजा! आपल्याला कोणी मूल नाहीं व आपल्या राज्याचा वारसा हक्क विजयकेतूकडेच पोंचत आहे ही गोष्ट शतकेतुला माहीत असून देखील त्यानें अश्वकर्ण देशावर स्वारी कां केली? कशाला दूत पाठविला व कशाला खंडणी वसूल करण्याचा दुराग्रह केला? उत्तर माहीत असून तूं दिलें नाहींस तर त्याचा परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याचीं शंभर शकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळूं लागतील.

विक्रमार्क म्हणाला—"राज्य करावयाचेंच झालें तर तें निर्विघ्न करणें व तें नित्य वाढवीत राहणें प्रत्येक राजाचें कर्तव्य आहे. लोकेच्छेला नाजूक नात्याची पर्वा करण्याची गरज नसते. आपल्या मागून कोण राजा होईल याची काळजी कीर्तीच्या भुकेसमोर मनांत उद्भवतच नाहीं. राजमदानें उन्मत्त झालेला राजा स्वतःचा मुलगा जरी आडवा आला तरी त्याचा कांटा दूर करायला मागें पुढें पहात नाहीं. म्हणून शतकेतूच्या वागणुकींत मला गैर कांहींच दिसलें नाहीं."

अशा तऱ्हेनें राजाचें मौनभंग होतांच वेताळ प्रेताबरोबर अदृश्य झाला व पुन्हां झाडाच्या फांदीला जाऊन लोंबकळूं लागला.

(कल्पित)





# पुरें कर पुराण

विजयनगर साम्राज्याचा अधिपति श्री कृष्णदेवराय याच्या दरबारीं अष्टदिग्गज कवि होते. त्यांत तेनाली रामलिंग नांवाचा एक विद्वान कवि होता. तो हजर जबाबी पण तसाच होता.

एकदां कृष्णदेवरायानें रामलिंग कवीला एका राजकीय कार्यासाठीं दिल्लीच्या बादशाहकडे पाठविलें. सुभद्र नामक एका मित्राबरोबर रामलिंग कवि दिल्लीला निघाला. वाटेंत एकदां ते सायंकाळीं भर्गदुर्ग नांवाच्या गांवीं येऊन पोंचले.

एका ब्राम्हणाच्या घरीं ते उतरले. बोलत असतां त्या गांवच्या जमीनदाराच्या विचित्र गोष्टी त्यांच्या ऐकीवांत आल्या.

त्या जमीनदाराचें नांव दुष्टवर्मा असें होतें. तो जमीनदार त्या गांवच्या ब्राह्मणांना आपल्या घरीं पुराण सांगायला पाळीपाळीनें बोलवी. कोणी पुराण वाचून त्याचा अर्थ सांगितला कीं तो म्हणे—"अहो पुराणिक-बुवा! तुम्ही सर्वांना माहीत असलेलाच अर्थ सांगतां आहां! कांहीं विशेष गूढार्थ असेल तो सांगा!" कोणी गूढार्थ सांगितला तर तो सांगे—"म्हणजे तुम्हांला कांहींच कळलें नाहीं म्हणावयाचें!" त्याच्या घरीं पुराण सांगायला कोणी येत नाहीं म्हणून उत्तर दिलें तर तो त्यांना निरनिराळ्या प्रकारें त्रास देऊन भंडावून सोडी.

दुष्टवर्माच्या या दुष्टपणाचें वर्णन ऐकून रामलिंग कवीनें त्याची खोड मोडण्याचें मनाशीं ठरविलें. त्यानें व त्याचा मित्र सुभद्र दोघे दुसऱ्या दिवशीं सरळ दुष्टवर्माच्या घरीं गेले.

रामलिंग कवीला पाहून दुष्टवर्मानें विचारलें—"कोण रे बुवा तूं!"



“आम्ही दोघे काशीहून आलों आहोंत. अद्‌भुत पुराणिक म्हणतात आम्हांला!” रामलिंग कवी म्हणाला.

“मला ओळखलेलें दिसत नाहीं तुम्हीं, नाहीं तर अद्‌भुत पुराणिक म्हणून गर्वानें आपली ओळख सांगितली नसतीत.” दुष्टवर्मा म्हणाला.

“आपली कीर्ति काशीला ऐकली आम्ही. पुराण ऐकून आपण पुराणिकाचा यथोचित सत्कार करतां हें कळलें म्हणूनच तर आलों आहों मोठी अशा धरून! एकशें दहा पद्धतीनें पुराण प्रवचनाचा अभ्यास केला आहे आम्हीं. जुन्या प्राचीन कथा सांगतांना ऐकणाराला त्या काल परवां घडलेल्या भासतील अशा तऱ्हेनें आम्हांला सांगतां येतात. महाभारतांत रामायण व रामायणांत महाभारत बसविण्याची कला अवगत आहे आम्हांला. याहून जास्त स्वतःचा परिचय आतां आम्हीं काय देणार?”

रामलिंग कवीच्या त्या वल्गना ऐकूनच दुष्टवर्मा गार झाला व त्यानें त्याचें पुराण ऐकण्याची व्यवस्था त्याच दिवशीं केली. रामलिंग ज्या गृहस्थाच्या घरीं उतरला होता त्याच्याकडे आला. पूर्वी ठरल्याप्रमाणें त्या गृहस्थाकडे जमलेल्या ब्राह्मणांना जें कांहीं सांगावयाचें होतें तें सांगून त्या दिवशीं संध्याकाळीं मित्रालाबरोबर घेऊन निघाला. ब्राह्मण त्याच्या मागोमाग एक एक काठी घेऊन निघाले. सर्व दुष्टवर्माच्या घरीं येऊन पोंचले. तेथें दुष्टवर्मा गांवच्या इतर ब्राह्मणांसह प्रथमच हजर झाला होता. रामलिंग कवी व त्याचा मित्र सुभद्र यांच्या-साठीं निराळें आसन ठेवण्यांत आलें होतें त्यांवर दोघे बसले.

दुष्टवर्मानें महाभारताच्या युद्धाचें पुराण सुरू करायला सांगितलें. सुभद्र महाभारतांतला एक प्रसंग घेऊन एक श्लोक म्हणूं लागला. संस्कृत भाषेंत एका शब्दाचें अनेक अर्थ असतात. रामलिंग कवीनें श्लोकाचा अर्थ सांगितला कीं रावणानें पांडवांची मदत मागितली आणि युद्धांत कर्णानें रावणाचा पराभव केला. वायुसुत हनुमानानें सुशर्मा याचा वध केला. गुरु द्रोणाचार्य पुत्र शोकानें शस्त्र खालीं ठेवून बसले असतां धृष्टद्युम्नानें त्यांचे केस धरून छाटून टाकले. रामलिंग कवीनें त्या प्रसंगाचा अर्थ निराळाच लावला. गुरु शब्दाचा अर्थ गुरु द्रोणाचार्य न लावतां बृहस्पति लावून बृहस्पतीचे केस धरून धृष्टद्युम्नानें ते छाटून टाकले असा अर्थ लावला. हरि शब्दाचा अर्थ वानर असा-देखील आहे. म्हणून कंसाचा वध करण्या-साठीं हरिनें पुढें पाऊल टाकलें याचा अर्थ रामलिंग कवीनें सुग्रीवानें कंस वध केला असा लावला.

दुष्टवर्मा तें पुराण ऐकून थक्क झाला. म्हणाला—“हें काय पुराण झालें? पिंपळाच्या झाडाला असे आंबे लागतात का कधीं कोठें?”

“रामायणांत महाभारत व महाभारतांत रामायण आहे व दोन्ही मध्यें भागवत



आहे. हें मी सुरवातीलाच सांगितलें होतें.”

“पण पुराणांतल्या गोष्टी काल परवां घडल्यासारख्या तुला सांगतां येतात असें देखील म्हणाला होतास तूं! तें कसें तें दाखव व त्यानंतर पुरें कर तुझें पुराण!”

“आपली आज्ञा शिरसावंद्य आहे!” असें सांगून रामलिंग पुढें म्हणाला—“कर्णानें रावणाला अशी....,” असें म्हणत त्यानें दुष्टवर्मालाच लाथ मारली. धृष्टद्युम्नानें बृहस्पतीचे केस धरून असे छाटले” असें म्हणत त्यानें तलवार घेऊन दुष्टवर्माचे केस











छाटले. “मारुतीनें सुशर्मांचें घर असें....” सांगत त्यानें दुष्टवर्माच्या घराला आग लावली.

दुष्टवर्मा रामलिंग कवीला मारण्यासाठीं धांवला. पण ब्राह्मणांनीं पूर्वी ठरल्याप्रमाणें आपापल्या काठ्यांनीं दुष्टवर्मालाच चोपून काढलें व रामलिंगचें रक्षण केलें. दुष्टवर्मानें पंचांसमोर गाऱ्हाणें नेलें व रामलिंग कवीनें दुष्टपणानें त्याचे घर कसें जाळलें व कसे त्याचे केस कापून त्याला लाथ मारली हें सांगून त्याला शिक्षा करायला सांगितलें.

ग्रामपंचांनीं रामलिंगाला तसें करण्याचें कारण विचारलें तेव्हां रामलिंग म्हणाला— “मी दुष्टवर्माच्या आज्ञेप्रमाणेंच सर्व केलें आहे. पाहिजेतर हजर असलेल्या ब्राह्मणांना विचारून पहा!”

“चोर आणि वर शिरजोर! माझे केस कापून व माझ्या घराला आग लावून वर हें बोलतो आहेस होय?” असें म्हणत दुष्टवर्मा रामलिंगाला मारायला धांवला तेव्हां रामलिंग म्हणाला—“खबरदार! मी पुराण चुकीचें सांगितलें आहे असें कोणी म्हणेल तर मी त्याचें डोकें उडवीन! मला तुम्ही ओळखलें नाहीं वाटतें? मी विजयनगरच्या चक्रवर्तीचा दूत आहें व दिल्लीच्या बादशाह-कडे राजाचा निरोप घेऊन जात आहें.” रामलिंगानें सर्वांना ऐकूं जाईल इतक्या मोठ्या आवाजांत सर्व सांगितलें.

त्याचें अधिकार पत्र वाचून सर्व थक्क झाले. शेरास सव्वाशेर भेटलेला पाहून सर्वांस आनंदच झाला. सर्वांनीं मिळून राजाच्या विचक्षण प्रतिनिधीला आदरपूर्वक निरोप दिला.





# अप्सरेचा वंश

मनुष्य सुरवातीला फार कुरूप होता असें सांगतात. पण पुढें मनुष्य जातींत देखील सुंदर लोक जन्माला आले. त्याला कारण एक अप्सरा आहे. ती गोष्ट अशी.

देवलोकांत सुभ्रम नांवाची एक अप्सरा रहात असे. एखाद्या देवाशीं लग्न करून घेऊन तिला सुखी होतां आलें असतें. पण तिला भूलोकीं वास करण्याची इच्छा उत्पन्न झाली. तिला तिच्या मैत्रिणींनीं समजावून सांगितलें कीं मर्त्यलोकांत स्वर्गलाभ व्हावा म्हणून लोक दानधर्म करतात व तुला हें काय सुचलें आहे? पण तिला तें पटलें नाहीं. इंद्रानें तिला बोलावून पुष्कळ समजावून सांगितलें. म्हणाला—“हें पहा भूलोकीं तुझी जाण्याची इच्छा आहे, जा. पण एक गोष्ट लक्षांत ठेव. तूं तेथल्या एकाहि वस्तूला हात लावलास तर तूं दगड होऊन जाशील. एवढें लक्षांत ठेव.”

इंद्रानें एवढें सांगितल्यावर तिनें विचार केला कीं इंद्रानें मला सावध केलें आहे. भूलोकीं जाण्यास नकार दिलेला नाहीं. सहजीं इंद्राची परवानगी मिळेल असें तिला स्वप्नांत देखील वाटलें नव्हतें. म्हणून तिला आनंद झाला व ती आपल्या मैत्रिणींचा व इंद्राचा निरोप घेऊन भूलोकीं प्रस्थान करण्यास तयार झाली.

ती आपल्या एका मैत्रिणीला बरोबर घेऊन आली. आकाशांत विचरण करीत जमिनीकडे चकित होऊन ती पहात राहाली.

ती अगदीं जमिनीजवळ आकाशांतच बराच वेळ घिरट्या घालीत असतां तिला एक मनुष्य एका चाफ्याच्या झाडावर चढून

श्री. शामराव पाटील









फुलें तोडीत असलेला दिसला. त्या दोघींना पाहून त्याला आश्चर्य वाटलें. आकाशांत उडत त्या थोड्या जवळ आलेल्या पाहून त्यानें कांहीं फुलें त्यांच्यावर फेंकलीं. त्यांतलें एक फूल सुभ्रमला लागलें व ती दगड होऊन खालीं जमिनीवर आदळली.

तिच्या मैत्रिणीनें आपल्या अंगाला एकाहि फुलाचा स्पर्श होऊं दिला नाहीं. ती परत इंद्राकडे गेली व सुभ्रम कशी दगड होऊन खालीं पडली हें वर्णन करून सांगितलें.

इंद्र तें सर्व ऐकून म्हणाला—"तेथून तो दगड कोणी बाजूला सारला तर तिला स्वतःचें रूप पुन्हां मिळेल. तिनें मर्त्य-लोकांत कोणाशीं लग्न करून घेतलें व तिला मुलें बाळें झालीं तर मी तिला पुन्हां स्वर्गांत बोलावून घेईन."

"देवेंद्रा! रानांत पडलेला दगड उचलून नेण्याची गोष्ट कोणाला सुचेल? माझ्या मैत्रिणीला त्या स्थितींत किती दिवस कंठावे लागतील कोण जाणें?" सुभ्रमची मैत्रीण म्हणाली.

"त्याकरितां सुद्धां कांहीं उपाय करावा लागेल व मी तो करीन." इंद्र म्हणाला.

तिकडे मर्त्य लोकांतल्या त्या माणसाला दोघी अप्सरा अदृश्य झालेल्या दिसल्या. बराच वेळ तो त्या पुन्हां दिसतील म्हणून वाट पहात राहाला. शेवटीं आपलें काम संपवून झाडावरून तो खालीं उतरला व घरीं जाऊं लागला तेव्हां त्याला एक काळा दगड पडलेला दिसला. तो आला तेव्हां तो दगड तेथें त्याला दिसला नव्हता. आतां कोठून आला असा एक विचार त्याच्या मनांत आला व त्यानें पाय लावला. पण आश्चर्य असें कीं पाय लागतांच त्या दगडावर चार मोती लकाकत असलेले त्याला दिसले. त्यानें ते मोती उचलून घेतले. त्यानें पुन्हां एकदां त्या दगडला पाय लावला. पण या खेपेस त्या दगडांतून कांहीं निघालें नाहीं.

त्यानें आपल्या गांवीं जाऊन गांव-कऱ्यांना तें विचित्र वृत्त वर्णन करून सांगितलें. पण कोणाला तें खरेंच वाटेना. आकाशांत बायका उडत असलेल्या दिसल्या म्हणे, आणि दगडांतून मोती निघाले, म्हणे, परंतु कांहीं लोकांना कुतूहल वाटून ते तो दगड पहायला निघाले. प्रत्येकानें त्या दगडाला पाय लावला व प्रत्येकाला एकेकदां चार मोती मिळाले.

प्रत्येकाला चार मोती मिळाले होते म्हणून ती गोष्ट लपविण्याचें कारण राहालें नाहीं. गांवभर ती गोष्ट पसरली व जवळ-पासच्या गांवीं पण पसरली. लोक तेथें तीर्थ स्नानाला जमतात तसे येऊं लागले व मोती घेऊन परत जाऊं लागले.

त्या दगडाजवळ रात्रंदिवस गर्दी राही. मोती मिळावा म्हणून लोकांची मारामारी पण होऊं लागली. अधिकाऱ्यांनीं शांतता व सुव्यवस्था रहावी म्हणून रांगेनें लोकांना उभें केलें. राजाला देखील ही गोष्ट कळली.



राजानें आज्ञा काढली कीं मोती मिळविणा-रांनीं त्यांतले दोन मोती कर म्हणून खजिन्यांत जमा करावेत. दूरदूरचा प्रवास करून लोक येऊं लागले. त्यांच्या उतरण्या-साठीं जागोजागीं धर्मशाळा बांधण्यांत आल्या.

शेजारच्या राजेरजवाड्यांकडे देखील ही बातमी पोंचली व तो दगड म्हणजे चिंता-मणि किंवा कल्पवृक्षासारखा वाटला सर्वांना. नवीन जन्माला आलेले लोक सुद्धां दगडाला पाय लावून मोती जमा करूं लागले. राजाचा खजिना भरूं लागला. म्हणून शेजारच्या










राजांना त्या राजाचा हेवा वाटूं लागला. त्यांनीं त्याच्या राज्यावर स्वारी करण्याचें ठरविलें. तें कळल्यावर राजानें तो दगड उचलून आणून आपल्या किल्ल्यांत ठेवून देण्यास सैन्य पाठविलें. सैनिकांनीं मोठ्या कष्टानें तो दगड एका जागेवरून दुसऱ्या जागेवर हलवून पाहिला, आणि आश्चर्य म्हणजे तो दगड अदृश्य झाला. व त्याच्या जागीं एक सुंदर स्त्री उभी असलेली त्यांना दिसली. त्यांना आश्चर्य वाटलें, कांहीं जणांना भीति पण वाटली.

"कोण तूं? या दगडाचें रूप घेऊन तूं येथें कशाला पडून होतीस इतके दिवस? कोठली राहणारी तूं? तुझ्या पतीचें नांव काय?" त्यांनीं प्रश्नांचा भडिमार केला.

"मला देश नाहीं. पति नाहीं. मी स्वतःच्या हट्टामुळें व चुकीमुळें दगड होऊन गेले होतें. आतां तुमच्या कृपेनें मला माझें पूर्वरूप मिळालें आहे. कोणी माझ्याशीं लग्न करून घेण्यास तयार असेल तर मी त्याची पत्नी व्हायला तयार आहें." सुभ्रम म्हणाली.

त्या सैनिकांपैकीं फक्त एकच सैनिक साहस करून म्हणाला—"माझें लग्न अद्याप झालेलें नाहीं. मी तयार आहें तुझ्याशीं लग्न करून घ्यायला."

त्या दोघांचें लग्न झालें. सुभ्रमला एक जुळें झालें, एक मुलगी व एक मुलगा आणि नंतर ती परत इंद्रलोकीं निघून गेली.

तोंपर्यंत मनुष्याला हलींचें रूप नव्हतें. परंतु सुभ्रमच्या दोघां मुलांना देवांसारखें सुंदर रूप होतें. आज सुंदर स्त्री-पुरुष मनुष्य जातीत दिसतात, म्हणे, ते त्यांचेच वंशज होत.





# स्फटिकाच्या डोंगरावर राजकुमारी

उत्तान देशाचा राजा स्वाभिमानी व पराक्रमी होता. युद्ध नसलें म्हणजे तो शिकारीला जाई. तो भयंकर व क्रूर अशा जनावरांची शिकारच करीत असे. इतर शिकाऱ्यांसारखा लहान गरीब प्राण्यांची शिकार त्याला आवडत नसे.

एकदां तो शिकारीला गेला असतां त्याला एक देखील क्रूर जनावर दिसलें नाहीं. काळोख पडल्यावर तो घरीं परत निघाला असतां त्याला झुडपाआड कांहीं तरी हलल्याचा भास झाला. राजानें त्याचा पाठलाग केला. तें जनावर नसून तो एक खुजा रानटी जातीचा मनुष्य होता. त्याचे केस पिंजारलेले होते व दाढी लांब होती.

त्या रानटी माणसाला धरून राजा आपल्या घरीं घेऊन गेला. त्याच्यासाठीं राजानें एक खोली बनविली. त्या खोलीला खिडक्या नव्हत्या. खालीं जमिनीजवळ अन्न व पाणी पोंचवण्यापुरेसें एक भोंक ठेवलें होतें. त्यानें खोलीला बाहेरून कुलुप लावलें व किल्ली अंतःपुरांत ठेवली. राजानें असें जाहीर केलें कीं रानटी माणसाला जो पळून जायला मदत करील त्याचा शिरच्छेद करण्यांत येईल.

कांहीं दिवसांनीं उत्तान देशाच्या शेजारच्या राज्यावर शत्रूनें स्वारी केली. त्या देशाच्या राजानें उत्तान देशाच्या राजाकडे मदत मागितली. राजा मदतीला गेला व त्यानें जातेवेळीं त्या रानटी माणसाला कोंडून ज्या खोलींत ठेवलें होतें त्या खोलीची किल्ली आपल्या राणीजवळ ठेवून दिली. राणी ती किल्ली सतत



आपल्या कनवटीला किंवा पदराला बांधून ठेवीत असे.

उद्यान देशाच्या राजाला एकच एक मुलगा होता. त्याचें नांव प्रमद्वर असें होतें. राजाचें त्याच्यावर फार प्रेम होतें. मुलगा चेंडू घेऊन खेळत खेळत रानटी माणसाच्या खोलीकडे गेला. चुकून त्याचा चेंडू नेमका भोकांतून आंत खोलींत गेला व आश्चर्य म्हणजे पुन्हां बाहेर तो तसाच परत आला. मुलाला गंमत वाटली. त्यानें पुन्हां चेंडू आंत टाकला व चेंडू पुन्हां बाहेर आला. असें दोनतीनदां झालें. त्यानें पुन्हां चेंडू आंत टाकला. या खेपेस चेंडू बाहेर आला नाहीं. प्रमद्वरनें भोकाजवळ जाऊन आंत पाहिलें. रानटी माणसाच्या हातांत चेंडू होता. तो त्याला म्हणाला—"माझा चेंडू आहे. परत दे मला!"

"मला या खोलींतून सोडवलेंस तर मी देईन." रानटी मनुष्य म्हणाला.

मुलानें आपल्या आईच्या पदराला बांधलेली किल्ली तिच्या नकळत काढून घेतली व कुलूप काढून खोलीचें दार उघडलें. रानटी मनुष्य बाहेर आला. त्यानें राजकुमाराला त्याचा चेंडू देऊन टाकला. राजकुमारानें पुन्हां किल्ली नेऊन आईच्या पदराला बांधून ठेवली. राजधानीभर रानटी खुजा पळून गेल्याची वार्ता पसरली. पण तो कसा पळून गेला हें कोणाला कळलें नाहीं. दुसऱ्या दिवशीं राजा परत आला. त्यानें आपल्या शेजारच्या राजाला जय मिळवून दिला होता. रानटी खुजा मनुष्य नाहींसा झाल्याचें त्याला कळलें. राजाला मनस्वी राग आला व त्यानें चवकशी सुरू केली. वडिलांना राग आला होता तरी प्रमद्वरनें खरें खरें तें सर्व सांगून टाकलें.



राजा धर्मसंकटांत पडला कीं आपणच जाहीर केलें होतें व आतां जाहीर केल्याप्रमाणें आपल्या हातानें स्वत:च्या एकुलत्या एका मुलाला मृत्यूच्या मुखांत लोटावा लागणार. तरी स्वत:च्या स्वाभिमाना खातर त्यानें दोघां सैनिकांना हुकूम दिला कीं राजकुमाराला रानांत घेऊन जाऊन त्याचा शिरच्छेद करावा व त्याचें हृदय काढून आणून हजर करावें. राजाज्ञा ऐकून राजधानीभर हाहाकार उडून गेला.

सैनिक राजकुमाराला घेऊन रानांत गेले. परंतु त्या लहान मुलाचा वध करण्यास त्यांचा हात धजेना. ते प्रमद्वरला दूर रानांत घेऊन गेले व म्हणाले—"राजकुमार तुमचा वध करण्यास आम्ही तयार नाहीं. तुम्ही दुसऱ्या राज्यांत जाऊन रहावें. या राज्यांत तुम्ही कधीं आलांत व दिसलांत तर आमचा शिरच्छेद झाल्याशिवाय राहणार नाहीं. ईश्वर तुमचें रक्षण करो!"

प्रमद्वर रानांत दूर निघून गेला. सैनिकांनीं एक डुकर ठार करून त्याचें हृदय काढून नेऊन राजाला दाखविलें.

रानांत बराच वेळ चालत राहाल्यावर प्रमद्वराला दुरून एका किल्ल्याचा तट



दिसला. तो त्या किल्ल्याकडे निघाला. वाटेंत त्याला एक धनगर भेटला. त्याचे कपडे त्यानें मागून घेतले व स्वत:चे त्याला दिले. धनगराचे कपडे घालून तो किल्ल्यांत गेला. तो राजाला म्हणाला—"महाराज मला आपल्या पदरीं कांहीं तरी काम द्यावें. आपण जें काम द्याल तें मी करीन. राजानें त्याला बकऱ्या व मेंढरें चरायला घेऊन जाण्याचें काम दिलें.

त्या राजाचें नांव शशिवर्ण असें होतें. त्याला शशिकला नांवाची एक रूपवती मुलगी होती. किल्ल्यांत ती सर्वांची लाडकी













होती. प्रमद्वरला देखील तिला पाहून फार आनंद झाला.

दहा बारा वर्षें लोटलीं. शशिकला लहानाची मोठी झाली. तिच्या सौंदर्याची कीर्ति जगभर पसरली. दूर दूर देशाचे राजकुमार तिच्याशीं विवाह करण्याच्या हेतूनें येऊं लागले. परंतु तिला त्यांपैकीं एकदेखील पसंत पडला नाहीं.

शशिवर्ण आपल्या मुलीला म्हणाला—"मुली! तुला मागणी घालायला शंभरावर तरुण राजकुमार आले. त्यांपैकीं कित्येक उच्च कुळांत जन्मले आहेत व मोठ्या साम्राज्याचे वारस पण आहेत. त्यांच्यापैकीं तूं वाटेल त्याला निवड. म्हणजे सर्वांचीं तोंडें बंद होतील. परंतु तूं एकाला देखील निवडलें नाहींस तर सर्व मिळून हें आपलें राज्य धुळीला मिळवितील. तूं तरी निवड कर, नाहींतर मला तरी एकाची निवड करूं दे. पण मग त्याच्याशीं तूं विवाह केला नाहींस तर मात्र मला तें खपणार नाहीं.

तें ऐकून शशिकला म्हणाली—"बाबा! मी स्वयंवराला तयार आहें असें जाहीर करा. जो कोणी माझी एक अट पुरी करून दाखवील त्याच्याशीं मी लग्न करीन. आपल्या राजवाड्यालगतच्या स्फटिकाच्या डोंगरावर मी एक फळ घेऊन बसेन. जो कोणी घोड्यावर बसून येऊन माझ्या हातांतलें फळ घेईल मी त्याच्याशीं लग्न करीन."

राजाला देखील ती अट पसंत पडली. त्यानें सर्व राजकुमारांना मुलीनें सांगितलेली अट कळविली.

एका सुमुहूर्तावर ती अट पुरी करण्याची पैज ठरली. शशिकलेला त्या डोंगराच्या शिखरावर एक सिंहासन ठेवून त्यावर बसविण्यांत आलें. राजकुमार उत्तमोत्तम



वस्त्रें धारण करून त्या डोंगराच्या पायथ्याशीं आपापल्या घोड्यावर बसून हजर झाले. प्रत्येकानें आपला घोडा त्या स्फटिकाच्या डोंगरावर सोडला व सर्व घोडे चार पावलें देखील चढूं शकले नाहींत. कित्येकांचे हात पाय मोडले, कांहींची कंबर मोडली तर कांहींचें डोकें फुटलें.

किल्ल्याबाहेर प्रमद्वर मेंढरें चरायला घेऊन गेला होता. त्याला थोरडा ऐकूं आला. आतां तो लहान मुलगा नव्हता. शशिकलेशीं लग्न करण्याची इच्छा इतरांप्रमाणें त्याच्या मनांत सुद्धां होतीच.

मी राजकुमार आहें व इतर राजकुमारांबरोबर मी ही पैज लावायला हरकत नव्हती. परंतु या धनगराच्या वेषांत मला कोण राजकुमार मानणार? प्रमद्वर मनांत विचार करीत होता.

तो या विचारांत एका जागीं उभा असतां तो रानटी खुजा मनुष्य त्याचा शोध काढीत तेथें आला. त्यानें प्रमद्वरला विचारलें—"काय रे असा खिन्न उदास कां बसला आहेस?"

"मला आज खरोखर तुझीच आठवण सारखी होत होती. मी त्या राजकुमारीच्या



स्वयंवराला हजर राहूं शकत नाहीं, बघ!" प्रमद्वर म्हणाला.

"कोण म्हणतें कीं शक्य नाहीं? चल माझ्या बरोबर! मी तुला राजकुमाराला साजेल असा पोशाख व एक उत्तम घोडा देववितों." असें सांगून तो खुजा प्रमद्वरला रानांतल्या एका डोंगरावर बोलावून घेऊन गेला. तेथें एका गुहेंत त्यानें राजाला शोभतील अशीं वस्त्रें व उत्तमोत्तम घोडे त्याला दाखविले व म्हणाला—"यांतलीं वाटेल ती वस्तु तूं उचलून घे व वाटेल तो घोडा घेऊन जा."



प्रमद्वर त्याच्या आवडीचा पोशाख करून एका उत्तम घोड्यावर बसून किल्ल्यांत गेला. तो स्फटिकाच्या डोंगरांच्या पायथ्याजवळ पोंचला. तोंपर्यंत कित्येक राजकुमार दहा-दहा वेळ प्रयत्न करून दमून भागून एका बाजूला हताश होऊन बसले होते. त्यांनीं प्रमद्वरला येतांना पाहिलें तेव्हां त्यांना आश्चर्य वाटलें.

प्रमद्वरनें शशिवर्ण राजाला नमस्कार केला व घोड्याला टांच मारून स्फटिकाच्या डोंगरावर चढायला घोड्याला खूण केली. त्याचा घोडा बाणासारखा त्या डोंगराच्या टोंकाला जाऊन पोंचला. घोड्यावरून खालीं उतरतांच राजकुमारीनें पुढें जाऊन त्याला तें फळ दिलें. तो तें फळ घेऊन तसाच खालीं डोंगरावरून आला व सरळ किल्ल्याबाहेर निघून गेला. डोंगराच्या पायथ्याशीं जमा असलेले लोक त्याच्या अभिनंदनार्थ आनंदानें टाळ्या वाजवूं लागले. राजानें जाहीर केलें कीं माझ्या मुलीनें ठेवलेली स्वयंवराची अट एका राजकुमारानें पुरी केली आहे व त्याच्याशींच मुलीचें लग्न होईल. शशिकलेनें पण त्या राजकुमाराविषयीं आपली पसंती दर्शविली.

आतां लग्न होण्याचेंच काय तें उरलें होतें. परंतु स्वयंवराची अट पुरी करून दाखविणाऱ्या राजकुमारानें राजाला आपलें कुळ, गोत्र वगैरे कळविलें नव्हतें. राजानें त्याच्याविषयीं चवकशी सुरू केली. परंतु राजाला त्याच्याविषयीं माहिती देणारा एक जण देखील भेटला नाहीं. प्रमद्वरनें त्या खुजाच्या गुहेंत जाऊन राजकुमाराचीं वस्त्रें परत जागच्या जागीं ठेवून दिलीं व आपलीं धनगराचीं वस्त्रें धारण करून सायंकाळच्या सुमारास मेंढरें चरत होतीं तेथें येऊन पोंचला. राजकुमारीच्या स्वयंवराची अट जिंकणारा एक धनगर असेल असें कोणाला वाटलें देखील नाहीं. प्रमद्वरनें स्वतः कोणाला सांगितलें नाहीं.

राजाला व राजकुमारीला वाईट लागलें कीं स्वयंवराचा सर्व सोहळा फुकट गेला. काय करावें हें राजाला सुचेना. राजानें आज्ञा काढली कीं राज्यांतील सर्व तरुणांनीं राजवाड्यासमोरच्या पटांगणांत हजर रहावें. त्या आज्ञेप्रमाणें श्रीमंतापासून गोरगरिबांपर्यंत भिकारी देखील हजर झाले. राजकुमारीनें त्यांपैकीं प्रत्येकाला जवळ जाऊन न्याहाळून पाहिलें. तिनें ज्याला फळ दिलें होतें तो त्यांत नव्हता.

त्यानंतर राजानें आपल्या सैन्यांतील प्रत्येक सैनिकाला राजवाड्यांतील नोकरां-चाकरांना देखील जवळून पहायला सांगितलें. शेवटीं धनगरांची पाळी आली. राजकुमारीनें त्यांना पाहिलें व प्रमद्वरच्या समोर येतांच म्हणाली—"हाच ! हाच !"

बाकी सर्व नोकर व धनगर हंसूं लागले. राजाला वाटलें कीं मुलीला वेडतर नाहीं लागलें ? पण ती म्हणाली कीं तो धनगरच स्फटिकाचा डोंगर चढून वर आला होता.

राजानें प्रमद्वरला जवळ बोलावून त्या विषयीं विचारलें तेव्हां त्यानें आपलें सर्व आत्मचरित्र राजाला सांगितलें. आपल्या मुलीनें ज्याची निवड केली तो राजकुमारच आहे हें राजाला कळलें तेव्हां त्याला फार आनंद झाला. त्यानें उत्तान राजाकडे दूत पाठवून ती आनंदाची बातमी कळविली व आग्रहानें लग्नाला हजर राहण्यास विनंति केली. उत्तान देशाचा राजा व राणी लवाजम्यासह लग्नाला आलीं. लग्न मोठ्या थाटानें झालें.





#  वाक्सिद्धी 

एका गांवीं एक वैदिक ब्राह्मण रहात असे. त्याचें नांव हरभट असें होतें. भिक्षुकीचा धंदा तो करी. पण तेवढ्यावर त्याचें पोट भरत नसे. एका ज्योतिष्यानें त्याची कुंडली पाहून लग्नाचा योग आहे असें सांगितलें व लग्न झाल्यावर भाग्य उदयास येईल असें देखील सांगितलें.

ज्योतिष्याच्या बोलण्यावर विश्वास करून स्वत:चें पोट भरण्याची मारामार होती तरी त्यानें भागीरथी नांवाच्या एका गरिबाच्या मुलीशीं लग्न केलें.

लग्न झाल्यावर त्याची भिक्षुकी बरी चालूं लागली. परंतु एकाच्या जागीं दोन पोटें भरण्या इतकी प्राप्ती वाढली नाहीं. म्हणून गरीबी कमी झाली नाहीं. नंतर त्यानें पुन्हां आपली जन्मकुंडली. ज्योतिष्याला दाखविली. कुंडली पाहून ज्योतिषी म्हणाला—“ मुलाचा योग आहे. मुलगा झाल्यानंतर भाग्य पालटेल.

पुढें कांहीं दिवसांनीं भागीरथी गरोदर राहाली व तिला एक मुलगा झाला. हरभटाचा ज्योतिष्याच्या बोलण्यावर विश्वास बसला. त्यानें मुलाचें नांव सिद्धवेदी असें ठेवलें.

सिद्धवेदीच्या जन्मानंतर भिक्षुकी जास्त चांगली चालूं लागली. परंतु खर्च देखील वाढला. म्हणून हरभटाला आपली स्थिति सुधारल्यासारखें भासलें नाहीं.

परंतु हरभटाचा ज्योतिष शास्त्रावरच नव्हें तर गावठी भविष्य सांगणाऱ्यांवर देखील विश्वास होता. सिद्धवेदी बोलूं लागल्यावर त्यानें मुलाला विचारलें— “ राहील कीं जाईल ? ”



“ जाईल ! ” सिद्धवेदी म्हणाला.

नवऱ्याच्या मनांत अंधविश्वासानें घर केल्याचें भागीरथीला माहीत होतें. तेव्हां मुलानें ‘ जाईल ’ असें उत्तर दिल्यावर नवरा रागावेल असें तिला वाटलें. कारण मनासारखी गोष्ट घडली नाहीं म्हणजे तो आकाश पाताळ एक करी.

परंतु मुलाचें तें उत्तर ऐकून त्याला राग आला नाहीं उलट त्याला आनंद झाला व तो म्हणाला—“ शाबास बाळ ! तुझ्या तोंडांत साखर पडो ! तूं म्हणालास तें खरें होवो ! ”

भागीरथीनें चकित होऊन पतीला विचारलें—“ तुम्ही मुलाला काय विचारलेंत व त्यानें काय उत्तर दिलें हें तरी सांगा ! ”

“ आपलें दारिद्र्य असेंच राहील कीं जाईल हा प्रश्न मी केला होता, व त्यानें नि:संकोच जाईल म्हणून उत्तर दिलें.” हरभट म्हणाला.

त्या दिवसापासून तो आपल्या मुलाकडे जास्त लक्ष देऊं लागला.

एकदां त्याला एका भिंतीवर एक मांजर बसलेलें दिसलें. हरभटानें तें मांजर बोटानें दाखवून मुलाला विचारलें—“ तें मांजर आपल्याकडे उडी मारेल कीं पलीकडे ? ”

“ आपल्याकडे ! ” मुलगा म्हणाला. कांहीं वेळानें मांजर त्यांच्या बाजूलाच उडी मारून आलें. अशा लहान सहान गोष्टी देखील सिद्धवेदीच्या सांगण्याप्रमाणें घडल्या. हरभटाला वाटूं लागलें कीं आपला मुलगा बृहस्पतीच आहे. त्याच्या जिह्वाग्रावर सरस्वतीचा वास आहे. त्याला स्वत:ला तसें वाटूं लागलें यांत कांहीं विशेष नाहीं, तो इतरांजवळ देखील आपल्या मुलाचे गुणानुवाद करून सांगूं लागला—“ माझ्या



मुलाच्या तोंडून निघेल तें ब्रह्मवाक्यच समजा! पाहिजे तर तुम्ही स्वतः परीक्षा करून पहा!"

जवळ पासच्या लोकांनीं पण हरभटाच्या बोलण्याची परीक्षा घेण्याचें ठरविलें. त्यांनीं देखील मुलाला जे जे प्रश्न विचारले व त्यानें त्यांचीं जीं उत्तरें दिलीं तेंच घडलें. एके दिवशीं एकानें येऊन विचारलें—"कायरे सिद्धवेदी, माझी आई आजारी आहे, ती बरी होईल का?" तो म्हणाला—"नाहीं, परवां दुपारी तिला मरण येईल." त्याच्या म्हणण्याप्रमाणें खरोखरच तिला मरण आलें.

आतां सर्वांची खात्री पटली कीं सिद्धवेदीला वाक्‌सिद्धी प्राप्त आहे. "म्हणून लोक त्याला वाक्‌सिद्धी म्हणून हाक मारूं लागले. तो म्हणे तें होई. म्हणून कांहीं लोकांना प्रश्न विचारण्याची पण भीति वाटूं लागली. कारण त्याच्या तोंडांतून निघे तें खरें होई!

तरी कांहीं लोक प्रश्न विचारायला येत. कोणाकडे चोरी झाली किंवा गायगुरें नाहींशीं झालीं कीं लोक प्रश्न विचारायला येत. अशा तऱ्हेनें ज्यांना फायदा होई ते वाक्‌सिद्धीला इनाम बक्षिसें देऊं लागले.

सिद्धवेदींची कीर्ति राजाच्या कानावर गेली. राजानें सुरवातीला त्या सर्व गप्पा म्हणून त्यांच्याकडे दुर्लक्ष केलें. परंतु त्याच्या मंत्र्यांचा सुद्धां त्या मुलाच्या बोलण्यावर विश्वास बसला आहे हें कळल्यावर मात्र तो विश्वास त्यांच्या मनांतून काढून टाकण्याचा विचार त्यानें केला.

एके दिवशीं राजाच्या सैनिकांनीं हरभटाच्या घरीं सैन्याच्या एका अधिकाऱ्याला पाठविलें. त्यानें राजाचा निरोप हरभटाला सांगितला. म्हणाला—"तुम्ही आपल्या मुलाला घेऊन दरबारीं हजर रहावें."



हरभटाला वाटलें कीं राजा आपल्या मुलाचा सत्कार करणार असेल म्हणून त्याला आनंद झाला.

ते दरबारांत येत असतां नेमका त्याच वेळीं राजा दरबारांत येऊन पोंचला. सिंहासनावर जाऊन बसण्यापूर्वीच राजानें सिद्धवेदीला विचारलें—"तुझें नांव सिद्धवेदी असलें तरी तुला वाक्‌सिद्धी मिळाली आहे असें ऐकतों. मी तुला तीन प्रश्न विचारतों त्यांचीं उत्तरें तूं कागदावर लिहून ठेव. मी तीं दरबारांत वाचून दाखवितों."

सिद्धवेदीला कागद व लेखणी देण्यांत आली.

पहिला प्रश्न—"मी सिंहासनावर उजव्या बाजूनें बसेन कीं डाव्या बाजूनें कीं समोरून? याचें उत्तर दे!" राजानें प्रश्न विचारला.

सिद्धवेदीनें त्या प्रश्नांचीं उत्तरें लिहून राजाकडे पाहिलें.

"उत्तर लिहून झालें असेल तर माझ्याबरोबर बागेंत चल." असें सांगून राजानें सिंहासनावर बसण्याचा विचार सोडला व बाहेर जाऊन कागदावर लिहिलेलें उत्तर वाचून पाहिलें.



राजा आपल्या मुलाची परीक्षा घेत आहे हें कळल्यापासून हरभटाच्या अंगाला घाम सुटला. परंतु सिद्धवेदीचें उत्तर बरोबर होतें. "राजा आतां सिंहासनावर बसणारच नाहीं." असें उत्तर होतें.

बागेंत एका नारळाच्या झाडावर लहान मोठे नारळ लागले होते. त्यांपैकीं एक तयार नारळ दाखवून राजानें विचारलें—"हा नारळ केव्हां तयार होईल व कोठें पडेल?"

"एका क्षणांत येथेंच...." सिद्धवेदीनें नारळाच्या झाडाखालीं एक रेघ काढून खूण करून दाखविली.

लगेच राजानें माळ्याला बोलावून नारळ खालीं पाडायला सांगितलें.

परंतु त्यावेळीं जो माळी आला होता त्याला झाडावर चढतां येत नव्हतें. तो शिडी आणायला गेला. अर्थातच एक क्षण होऊन गेला होता. जो नारळ गळून पडणार होता तो त्याचा हात लागतांच सिद्धवेदीनें केलेल्या खुणेवर पडला.

"आणखी एक प्रश्न विचारतों! मी आतां किल्ल्याबाहेर जाऊन किल्ल्यांत येणार आहें. तेव्हां मी कोणत्या द्वारानें बाहेर जाऊन व कोणत्या द्वारानें आंत येऊं हें कागदावर लिहून ठेव. मी परत आल्यावर तुझें उत्तर पाहून तें ठीक आहे कीं चूक हें सांगेन." राजाला सिद्धवेदीच्या वाक्‌सिद्धि-वर तोंपर्यंत विश्वास बसल्यासारखें झालें होतें.

सिद्धवेदीनें लगेच उत्तर लिहून ठेवून दिलें. राजानें किल्ल्याच्या तटाला टेंकून शिडी ठेवविली. नंतर तो वर चढला व पलीकडे पुन्हां शिडी ठेवून उतरूं लागला. पण त्याचा पाय चुकला व तो खालीं जमिनीवर येऊन आदळला. लगेच सैनिक बाहेर जाऊन जवळच्या दारानें राजाला आंत घेऊन आले.

त्याला बबर जखम झाली होती तरी राजानें तिकडे दुर्लक्ष केलें व सिद्धवेदीनें लिहिलेलें उत्तर वाचून दाखविलें—"राजा कोणत्याहि दरवाज्यानें बाहेर जाणार नाहीं, पण या जवळच्या द्वारांतून आंत येईल."

आतां सिद्धवेदीच्या वाक्‌सिद्धीवर अविश्वास करायला जागाच उरली नाहीं. त्यानें त्याला बक्षिसें व इनाम देऊन त्याचा सत्कार केला.






# परोपकारी गोपाळ

गोपाळ ज्या प्रदेशांत रहात असे त्या प्रदेशांत एका वर्षी अतिवृष्टि झाली व पूर आला आणि नदीलगतचा प्रदेश पाण्याखालीं बुडून गेला. गोपाळ ज्या गल्लींत रहात असे त्याच गल्लींत शंकरराव नांवाचा एक गृहस्थ रहात असे. तो गोपाळला म्हणाला—"काय रे गोपाळ! तूं दुसऱ्याच्या मदतीला धांवणारा आज असा काय स्वस्थ बसून राहिला आहेस! गरीबांच्या गांवें पुरामुळें वाहून गेलीं आहेत व लोक आपलें सामान सुमान घेऊन उंचवट्याच्या जागीं जाऊन बसले आहेत." हाच का तुझा परोपकार? एका दोघांना मदत करतां आली तरी ती पुरे आहे. चल जाऊंया!"

दोघे मिळून पूर आलेल्या एका गांवीं गेले. तें गांव बेटासारखें दिसत होतें. चारीबाजूला पाणी होतें. त्या गांवचे लोक होडक्यांतून सामान घेऊन उंचवट्याच्या जागीं जात होते.

उंचवट्याच्या जागीं पोंचलेल्या लोकांना तरी कमी काळजी नव्हती. गोपाळला एक बाई व तिचीं मुलें दिसलीं. ते जो कोणी दिसेल त्याला मदतीला बोलावीत होते. पण कोणाचें लक्ष त्यांच्याकडे गेलें नाहीं. गोपाळनें व शंकरनें त्यांच्या जवळ जाऊन विचारलें—"काय पहिजे तुम्हांला?"

"तें पहा घर! त्याच्या माळ्यावर मुलांचे आजोबा अडकले आहेत. काल रात्रीं पाऊस पडूं लागल्यावर आम्हां सर्वांना या उंचवट्याच्या जागीं पोंचते करून मुख्य मुख्य सामान आणायला ते परत गेले. ते माळ्यावर चढले व त्यानंतर पुर आला व




ते तेथें अडकून राहाले आहेत. थोड्या वेळानें घर कोसळेल व आमचे आजोबा त्यांत सांपडतील. तरी लवकर जाउन त्यांना वांचवा. नाव किंवा होडकें घेऊन जायला आमच्याकडे पैसे नाहींत. आमच्या घरांतला माल पाण्यांत बुडून वाहून गेला तरी हरकत नाहीं. कांहीं तरी करून आमच्या आजोबांना वांचवा!"

तें ऐकून गोपाळ नावा व होडकीं उभी होतीं तिकडे धांवत गेला. शंकर मागेंच राहून गेला. तो त्या बाईला म्हणाला—"पैशाशिवाय कोण नाव देणार? पैसे मिळवायला त्यांना तरी हीच वेळ आहे नाहीं का? तू आपली नथ काढून दे. मी नाव ठरवून घेतों."

त्या बिचारीनें आपली नथ काढून दिली. शंकरनें ती खिशांत टाकली. पण तिकडे गोपाळनें आपली अंगठी काढून देऊन नाव ठरविली होती. नावेंत बसून गोपाळ व शंकर त्या बाईच्या घराजवळ गेले. पण सुदैवानें तोंपर्यंत पुराचें पाणी ओसरूं लागलें होतें. दोघांनीं मिळून म्हाताऱ्याला माळ्यावरून खालीं उतरविलें. पण तो म्हणाला—"मी घर सोडून कोठें जाऊं? कारण सर्व कांहीं घरांतच तर आहे."

आम्ही घरांतली वस्तु घेऊन हलूं देणार नाहीं. तुम्ही जाऊन आपल्या नातवंडांना भेटा. तीं घाबरून गेलीं आहेत." असें सांगून गोपाळनें म्हाताऱ्याला नावेंत बसविलें व ज्या जागीं त्याची नातवंडें व त्यांची आई होती तेथें पोंचतें केलें.

गोपाळ नावेंत बसून पुन्हां परत गेला. सामान भरून शंकरच्या बरोबर नाव पलीकडे पाठविली. नंतर उरलेलें सामान भरून घेऊन गोपाळ स्वतः पलीकडे आला. नावाडी आपलें होडकें घेऊन निघून गेला.



म्हातारा आपलें सामान न्याहाळून पहात होता. त्याच्या चेहऱ्यावरून कांहींतरी वस्तु तो पहात होता असें दिसलें. तें पाहून शंकर म्हणाला—"एखादी वस्तु राहाली असेल तर मिळेल ती मागाहून. काळोख पडूं लागला आहे. चला जाऊं या."

"अरे पण या लोकांच्या जेवणाखाण्याची व्यवस्था?" गोपाळनें शंकरला विचारलें.

"आमच्या जवळ आहेत पोळ्या!" ती बाई म्हणाली. गोपाळ शंकर बरोबर निघाला. ते थोडें अंतर चालून गेले असतील, पण शंकर थांबला व काठाला एका झुडपांतून एक तांब्या काढून आणला. तो गोपाळला म्हणाला—"हा पहा एक तांब्या सांपडला मला. पाण्यांत वहात आला असावा. यांत पैसे पण आहेत. अर्धे तूं घे अर्धे मी घेतों."

"तांब्याचें तोंड सील बंद आहे." गोपाळ म्हणाला. "त्या म्हाताऱ्याचाच तांब्या असेल कदाचित! तोच तो शोधत असावा. चल त्याला जाऊन विचारूं या." असें सांगून तो मागें वळला.



शंकरला राग आला. गोपाळ असें कांहींतरी करणार हा संशय त्याला होताच. म्हणूनच त्यानें झुडपांतून दुसरा तांब्या काढला नव्हता. मनांत म्हणाला—"मूर्ख! तुझ्या नशिबींच नाहीं तर तूं तरी काय करणार?" त्यानें दुसरा तांब्या काढला. आपल्या पंच्यांत वांधून घेतला व सरळ घरीं निघाला.

शंकर थोडें अंतर चालून गेल्यावर एका निर्जन स्थानीं एकानें त्याला अडवलें व चाकू दाखवून जवळ जें कांहीं असेल तें काढून ठेवायला सांगितलें. शंकरचा तो पंच्यांत गुंडाळलेला तांब्या गेला.

चोरानें तांब्याचें तोंड चाकूनें उघडलें तेव्हां आंत वाळू व कवड्या-शंख वगैरे दिसले. पैसे असतील असें त्याला वाटलें होतें. त्यानें तो तांब्या शंकरच्या टाळक्यांत घातला व त्याच्याजवळ जे पैसे होते ते घेऊन व त्याची अंगठी काढून घेऊन निघून गेला. शंकर बेशुद्ध स्थितींत तेथेंच पडून होता.

तिकडे गोपाळनें तांब्या आणून दाखविल्यावर म्हाताऱ्याच्या जिवांत जीव आला. म्हणाला—"हा तांब्या आम्हांला पाण्यांत सांपडला."

"तूं आमच्या घराचें रक्षण केलेंस. माझा मुलगा परदेशीं गेला आहे. घर जुनें आहे. नवें घर बांधण्यासाठीं मी या तांब्यांत रुपये व दागिने जमा करून ठेवले होते. वादळी हवा पाहून मी घाबरून गेलों होतों. मीच तोंड बंद करून थोड्या वेळापूर्वी ठेवलें. देवाच्या कृपेनें मला ही गेलेली वस्तु परत मिळाली. याच्याच सारखा आणखी एक तांब्या आहे. त्यांत कन्याकुमारीहून आणलेली लाल व पांढरी वाळू आणि शंख-शिंपा आहेत." म्हातारा म्हणाला.

गोपाळ घरीं जात असतां वाटेंत बेशुद्ध स्थितींत पडलेला शंकर त्याला दिसला. तो कण्हत होता व जवळ तो वाळूनें भरलेला तांब्या पण होता. अरे हा तांब्या पण त्या म्हाताऱ्याचाच आहे. असें म्हणत तो तांब्या उचलण्यासाठीं वांकला तेव्हां त्याला नथ खालीं पडलेली दिसली. चोराशीं झटापट झाली तेव्हां ती खालीं पडली होती. गोपाळनें ती नथ व तांब्या म्हाताऱ्याकडे पोंचता केला. शंकर खजील होऊन गोपाळ बरोबर आपल्या गांवीं परत आला.





# युद्धकांड

जांबुवंताच्या सूचनेप्रमाणें हनुमान वायुवेगानें आकाशमार्गें हिमालय पर्वतावर गेला. तेथें बर्फाच्छादित हिमालयाची शिखरें, गुहा, ब्रह्मकोश, कैलास, हयग्रीव, ब्रह्म, कपाल, कुबेरस्थल, पाताल रंध्र, कांचन श्रृंग व रात्रीच्या वेळीं दिवसासारखा उजेड असलेला सर्वौषधि प्रांत पाहिला. त्या प्रांतांत उतरून जांबवंतानें सांगितलेले वनस्पती हुडकूं लागला. परंतु त्या सर्व दिव्य औषधी अदृश्य झाल्या.

मारुतीला त्या गोष्टीचा मनस्वी राग आला. तो सिंहनाद करून पर्वताला संबोधन करून म्हणाला—"तूं रामावर कृपा न करण्याचें ठरविलें आहेस का? मी तुझा चुरा करून टाकीन समजलास काय? असें सांगून मारुतीनें तो पर्वत तसाच उचलला व आकाशमार्गें निघाला.

मारुतीला पर्वत घेऊन आकाशमार्गानें येत असलेला पाहून वानर मोठमोठ्यानें ओरडूं लागले. मारुतीनें देखील काम पुरें झाल्याबद्दल आनंदातिरेकानें एकदां सिंहगर्जना केली. ती गर्जना ऐकून राक्षसांच्या हृदयांत धडकी भरली.

मारुती त्या औषधी वनस्पतीला खालीं ठेवून त्यावर वानरांसह हिंडला. नंतर त्यानें प्रमुख वानरांना नमस्कार केला व विभीष-



पाला कडकडून भेटला. त्याला त्यावेळीं जो आनंद झाला होता तो काय वर्णावा !

रामलक्ष्मण व इतर वानरवीरांच्या दुरुस्त असलेल्या जखमा सुगंधी औषधी वनस्पतींच्या वासानेंच बऱ्या झाल्यासारख्या वाटल्या. मरून पडलेले वानर त्या औषधींचा वास लागतांच उठून बसले, जणुं कांहीं झोपेंतून जागे झाले.

वानरांनीं उठून युद्धांत मरण पावलेल्या राक्षसांना उचलून समुद्रांत फेंकून दिलें. मारुतीनें तो पर्वत नेऊन पुन्हां जागच्या जागीं नेऊन ठेवून दिला.

तेव्हां सुग्रीव हनुमानाला म्हणाला—"भावाचा व मुलांचा युद्धांत नाश झाला आहे म्हणून रावण स्वतः युद्धाला येईलसें वाटत नाहीं. म्हणून आपण सर्व बलवान वानरांनीं मिळून मशाली पेटवून लंकेवर हल्ला केला पाहिजे."

सूर्यास्त झाल्यावर मध्यरात्रीच्या सुमारास काळोख पडला असतां व सर्व राक्षस डाराढूर झोंपले असतां वानरांनीं मशाली पेटविल्या व लंकेवर हल्ला केला. द्वारपाल वानरांचें प्रचंड सैन्य पाहून पळून गेले. लंकेचें सिंहद्वार उघडें पाहून वानर आंत शिरले. त्यांनीं किल्ल्याचें द्वार, बुरुज राजमार्ग व लहान मोठ्या गल्ल्या चहूंकडे आग लावली.

लंकेला आग लागली गगनचुंबी राजवाडे जळून भस्म झाले. मोठमोठ्या इमारतींबरोबर घरांतली वस्त्रें, दागदागिने, शस्त्रास्त्रें सर्वांची राख रांगोळी झाली. अनेक राक्षसदेखील त्या आगींत जळून गेले.

राक्षस स्त्रियांची त्रेधा उडून गेली. हत्ती व घोडे साखळदंड तोडून अग्नीपासून स्वतःचा बचाव करण्यासाठीं सैरावैरां पळूं लागले. जळत असलेल्या लंकेचें प्रतिबिंब समुद्रावर



पडलें व तोदेखील ज्वालामुखीच्या लाव्हासारखा दिसूं लागला.

एका बाजूला वानर आनंदानें किलकाऱ्या मारीत होते तर दुसरीकडे राक्षस दुःखानें आक्रोशकरीत होते. परंतु त्या दोघांच्या ओरडण्यापेक्षां रामाच्या शरवृष्टीचा आवाजच भयंकर होता.

सुग्रीवानें वानरवीरांना आज्ञा केली कीं त्यांनीं रावणाच्या अंतःपुराच्या दारावर जाऊन रावणाला आव्हान करावें. रावणानें वानरांना मशाली घेऊन अंतःपुराकडे येत असलेले पाहिलें. त्यानें कुंभ व निकुंभ या दोघां राक्षसांना व कुंभकर्णाच्या मुलांना वानरसेनेला थोपवून ठेवण्यासाठीं पाठविलें. ते अनेक राक्षस वीरांना बरोबर घेऊन निघाले.

वानर व राक्षस दोघांचें घनघोर युद्ध सुरू झालें. कित्येक राक्षसवीर ठार झाले. अंगद बेशुद्ध होऊन पडला. शेवटीं सुग्रीवानें कुंभराक्षसाला ठार केलें व मारुतीनें त्याचा भाऊ निकुंभ याला ठार केलें. कुंभ व निकुंभ ठार झाल्यावर रावणानें खर राक्षसाचा मुलगा मकराक्ष याला वानरांशीं युद्ध करण्यास पाठविलें. मकराक्ष राक्षस सैन्य घेऊन वानरांशीं युद्धास निघाला. राक्षसांच्या बाणांनी सर्व



वानर सैन्य पळूं लागल्यावर रामानें बाणवृष्टि सुरू केली व राक्षस सैन्याला थोपवून धरलें मकराक्ष घमेंडीत म्हणाला—"रामा, उभा रहा समोर ! मी बापाच्या व भावाचा सूड तुझा वध करून उगवणार आहे."

"गप्पा मारून कधीं जय मिळत नसतो. आपलें शौर्य काय तें दाखव!" राम म्हणाला. दोघांचें युद्ध सुरू झालें. त्यांत मकराक्षाचा रथ मोडून सारथी व घोडे मरण पावल्यावर त्याला रथांतून जमिनीवर उतरून रामाशीं युद्ध करावें लागलें. त्याच्यावर रामानें आग्नेयास्त्र सोडलें व त्याचा वध



केला. त्याच्या बरोबर आलेले सर्व राक्षस लंकेला पळून गेले.

मकराक्षाच्या वधाची वार्ता कळतांच रावण दांतानें ओठ चावीत आपला मुलगा इंद्रजित याला बोलवून म्हणाला—" बाळ! दृश्य किंवा अदृश्य रूपें तुला जसें वाटेल तसें युद्ध करून त्यांचा वध करून त्यांचा वध करून ये. तूं स्वतः इंद्राला जिंकून इंद्रजित हें नांव मिळविलें आहेस. मग या पामर मानवांची काय कथा?"

इंद्रजितानें वडिलांची आज्ञा मिळतांच हवन केलें व एका काळ्या बकरीचा बळी दिला. होमकुंड प्रज्वलित झालें व विजय मिळणार याची सूचना मिळाली. इंद्रजित एका अदृश्य रथावर बसला व रणांगणावर गेला. वानरसैन्यांत रामलक्ष्मण कोठें उभे आहेत हें नीट पाहून घेतलें व त्यांच्यावर बाणांचा मारा सुरू केला. रामलक्ष्मणांना हें कळलें नाहीं कीं इंद्रजित आकाशांत कोठें आहे. त्यांनी दिव्यास्त्र व बाण सोडून सर्व आकाश आच्छादून टाकलें. पण त्यां पैकीं एकदेखील इंद्रजिताला लागला नाहीं.

इंद्रजिताचे बाण ज्या दिशेनें येत होते त्या दिशेच्या रोखानें रामलक्ष्मणांनीं आपले बाण सोडायला सुरवात केली. परंतु इंद्रजित एका जागीं उभा राहून युद्ध करीत नव्हता. तो आकाशभर विचरण करीत युद्ध करीत असल्या कारणानें रामाचा एक बाण-देखील त्याला लागला नाहीं.

इंद्रजिताच्या बाणांमुळें रामलक्ष्मणांचें शरीर रक्तबंबाळ झालें. वानरांचें फार मोठें सैन्य मारलें गेलें. लक्ष्मणाला राग आला. म्हणाला—" आतां ब्रह्मास्त्राचा प्रयोग केल्या-शिवाय राक्षसांचा वध होणें शक्य नाहीं.

" एकावरचा राग सर्वांवर काढणें बरोबर नाहीं. पाहिजेतर एकट्या इंद्रजिताचा शेवट



कर" रामानें लक्ष्मणाला सूचना केली. इतक्यांत इंद्रजितानें एक युक्ति काढली. त्यानें माया करून एक प्रति सीता निर्मिली. तिला आपल्या रथांत बसविलें व वानरां-समक्ष तिचा वध केला. रामालक्ष्मणांना दुःखी करण्यासाठीं तो अशा तऱ्हेनें प्रगटरूपें समोर आला.

इंद्रजिताला पाहून वानर घाबरून ओरडूं लागले. मारुतीनें एक पर्वतच छत्रीसारखा उचलून धरला व सर्वांचें रक्षण केलें. इतक्यांत मारुतीला इंद्रजिताच्या रथांत सीता दिसली. तिचीं वस्त्रें मळकीं होतीं. तोंड उतरलेलें, मागें अशोकवनांत त्यानें पाहिलें होतें तेंच खिन्न रूप. सीतेला रथांत पाहून मारुतीला फार वाईट वाटलें. इंद्रजित सीतेला असा येथें कां घेऊन आला आहे हें विचारीतच होता, तेवढ्यांत इंद्रजितानें त्या प्रति सीतेची वेणी धरून ओढली व तिच्यावर मारहाण करूं लागला. ती 'हे राम!' 'हे राम!' असे ओरडत होती. मारुतीनें इंद्रजिताला विचारलें—"सीतेनें काय अपराध केला आहे रे तिला असें मारायला?"

"या सीतेमुळेंच तर रामलक्ष्मणांनीं सुग्रीवाला घेऊन लंकेवर स्वारी केली. प्रथम तिला ठार करून मग राम, लक्ष्मण, आणि तुम्हां सर्वांच्या समाचाराला येतों. विश्वास-घातकी विभीषण पण सुटणार नाहीं." इंद्रजित म्हणाला. त्यानें तलवारीनें प्रति सीतेचा वध केला व म्हणाला—"जिच्या साठीं तुम्ही युद्धाला आलांत तिचा कांटाच दूर केला आहे. आतां तुमचें युद्ध फुकट आहे." असें सांगून त्यानें सिंहगर्जना केली. वानर घाबरून पळून गेलें.

पण मारुतीनें त्यांना थोपवून विचारलें—कोठें निघालांत पळपुट्यांनो? मी पुढें जातों, या माझ्यामागें!" असें म्हणत त्यानें



वानरांना पुन्हां मागें फिरायला सांगितलें. आतां वानरांना चेव चढला व त्यांनीं राक्षसांचा संहार सुरू केला.

मारुतीला इंद्रजिताचा राग आलाच होता. त्यानें रागांत एक मोठी शिळा उचलून इंद्रजितावर फेंकली. पण ती त्याला लागली नाहीं. ती खालीं पडली तेव्हां तिच्या खालीं कित्येक राक्षसांचा चेंदामेंदा होऊन गेला.

मारुती वानरांना म्हणाला—"आपण ज्या सीतेला सोडविण्यासाठीं येथवर आलों व प्राणाहुती दिली ती स्वर्गलोकीं निघून गेली. जाऊन रामलक्ष्मण व सुग्रीवाला सांगा कीं इंद्रजितानें सीतेचा वध केला. नंतर ते सांगतील तसें करूं या." वानर मागें फिरले व रामलक्ष्मणाकडे गेले. तिकडे इंद्रजित होम करण्यासाठीं निकुंभिक चैत्य येथें निघून गेला.

तिकडे रामाला पश्चिमेकडील द्वारावर युद्धाचा ओरडा ऐकूं आला. त्यांनीं जांब-वंताला विचारलें—"हा आपला मारुती असेल का? राक्षसांचा संहार करीत असेल नाहीं? त्याच्या मदतीला जा!" तें ऐकून जांबवंत पश्चिमेकडील द्वाराकडे निघाला.



त्याला वाटेंतच मारुती व इतर वानरवीर परत येत असलेले भेटले.

मारुतीनें जांबवंताबरोबर निघालेल्या अस्वलांच्या सैन्याला परत फिरायला सांगि-तलें. नंतर तो स्वतः रामाकडे गेला आणि म्हणाला—"इंद्रजितानें सीतेचा वध केला आहे!"

तें ऐकून वृक्ष मुळासकट तुटून पडावा तसा राम धाडदिशी जमिनीवर बेशुद्ध होऊन पडला. वानर रामाकडे धांवले. रामाच्या तोंडावर पाणी शिंपडण्यांत आलें. लक्ष्मणानें रामाला गोंजारून शुद्दीवर











आणलें. राम लक्ष्मणाच्या मांडीवर डोक टेंकून पडून होता.

इतक्यांत तेथें बिभीषण आला व सर्वांना दु:खी पाहून विचारूं लागला—"सर्व असे दु:खी कां? काय झालें तरी काय?"

"मारुतीनें येऊन सांगितलें कीं इंद्रजितानें सीतेचा वध केला तेव्हांपासून राम हतोत्साह होऊन पडून आहे." लक्ष्मण बिभीषणाला म्हणाला.

"हें सर्व खोटें. रावण सीतेचा वध कदापि करणार नाहीं कीं करूं देणार नाहीं. मी सांगितलें असूनदेखील ज्यानें सीतेला रामाच्या स्वाधीन केलें नाहीं त्याला सीतेचा वध असा झालेला कसा खपेल? इंद्रजिताला तर सीतेकडे पाहाण्याची सुद्धां छाती होणार नाहीं. तिच्या अंगाला शिवण्याची हिम्मत तो कशी काय करील? रावणाकडे इंद्रजिताशिवाय आणखी कोणी वीर उरला देखील नाहीं. इंद्रजित यज्ञ करण्यासाठीं निकुंभिक क्षेत्रांत जायला निघत आहे. वानरांनीं येऊन त्याचा यज्ञ भंग करूं नये म्हणून त्यानें ही सर्व माया केलेली आहे. त्याची युक्ति बरोबर साधली व तो आतां निर्विघ्नपणें आपला यज्ञ पुरा करील. नंतर देव व दानव दोघांनीं मिळून त्याला जिंकायचें म्हटलें तरी तें शक्य होणार नाहीं. म्हणून त्याचा यज्ञ पुरा होण्यापूर्वीं आपण सर्वांनीं निकुंभिक क्षेत्रीं गेलें पाहिजे. रामचंद्रा, तूं येथेंच रहा. काळजी करण्याचें कारण नाहीं. लक्ष्मणाला माझ्याबरोबर जायला परवानगी दे. त्याच्या हातीं इंद्रजिताचा वध निश्चित आहे. जास्त उशीर न करतां आतां आपण निघालें पाहिजे." बिभीषण म्हणाला.





# रुक्मांगद चरित्र

[ २ ]

मोहिनीबरोबर रुक्मांगद राजधानीकडे परत येत असतां वाटेंत घोड्यांच्या पायांखालीं एक गाय तुडवली गेली. रुक्मांगदानें खालीं उतरून तिच्या तोंडावर पाणी शिंपडून तिला सावध केलें. तेव्हां ती म्हणाली—"राजा! मी एका ब्राह्मणपत्नी आहें. माझा नवरा इतरांबरोबर नीट वागतो पण मला पाहून त्याच्या अंगाचा जणुंकांहीं भडकाच उडून जातो. औषधपाणी करून पतीला वश करून घेणें शक्य आहे हें मला मैत्रिणींकडून कळलें. तसें औषधपाणी करणारी एक योगिणी होती. तिनें दिलेला ताईत आणून मी पतीच्या गळ्यांत बांधला. तेव्हां पासून ते क्षयरोगानें आजारी पडले. कांहीं दिवसांनीं त्याच्या तोंडावर मला मृत्युकळा दिसूं लागली. ते म्हणाले—"मला वांचव! मी तुझा दास होऊन राहीन." मी घाबरून पुन्हां त्या योगिणीकडे गेलें व हात जोडून विनंति केली कीं काय वाटेल तें करून माझ्या पतीला वांचव. योगिणीनें मला एक मंत्रवलेली मुळी दिली. ती उगाळून मी पतीला दिली. त्यामुळें माझ्या पतीची तब्येत सुधारली व ते माझ्या मताप्रमाणें वागूं लागले. परंतु माझ्या हातून हें पापच घडलें. त्याबद्दल मी अनेक नरकयातना सहन केल्या. शेवटीं मला हा गाईचा जन्म मिळाला. म्हणून श्रावण द्वादशीचें व्रत करून तुला मिळालेला पुण्यलाभ मला दे व माझें रक्षण कर."

तें ऐकून मोहिनी म्हणाली—"प्रत्येकानें स्वतःच्या वांट्याचा कर्मभोग भोगावयाचा



असतो. जर या पापिणीचें रक्षण केलें तर सर्पिणीला दूध पाजल्या सारखें होईल."

"तुझें म्हणणें बरोबर नाहीं, मोहिनी! परोपकार करणें प्रत्येक मानवाचा धर्म आहे!" असें म्हणत रुक्मांगदानें आपली पुण्याई गाईला दान केली. त्या गोरूपांतू एक दिव्य स्त्री निघाली व वैकुंठ लोकीं निघून गेली. नंतर रुक्मांगद मोहिनीसह राजधानींत पोंचला. राजधानींत सर्वत्र आनंद पसरला. धर्मांगदाचा राज्य कारभार पाहून रुक्मांगदाला आनंद झाला. आपल्या वडिलांशीं लग्न करून आलेल्या मोहिनीला माता समजून चित्रांगदानें आदरपूर्वक वागविलेंच, त्याचबरोबर आपल्या आईची समजूत घालून तिचें चित्तपण शांत केलें.

तें सर्व पाहून मोहिनीला आश्चर्य वाटलें. रुक्मांगदाच्या इतर पत्नींना सुद्धां रुक्मांगदाचा मनस्वी राग आला. पण धर्मांगदानें त्यांची समजूत घालून त्यांचा राग देखील शांत केला.

रुक्मांगद संध्यावलीला कधीं भेटला देखील नाहीं, हें पाहून ती रागावेल या विचारानें मोहिनीनें त्याला स्वतः होऊन तिच्याकडे पाठविलें. रुक्मांगदाच्या इतर राण्यांच्याकडे उत्तमोत्तम वस्त्रालंकार पाठवून धर्मांगदानें त्यांचा राग पूर्वीच शांत केला होता.

धर्मांगद एकदां ससैन्य मलयगिरि पर्वतावर गेला. तेथील राजांना जिंकून तो पांच मणी घेऊन आला. एका मण्याच्या मंत्रशक्तीनें सोनें दुसऱ्या मण्याच्या प्रभावानें अलंकार मिळत. एका मण्याच्या सहाय्यानें यौवन येई. एक मणी उत्तम राजवाडा देई तर एका मण्याच्या सहाय्यानें आकाशांत उडतां येई. धर्मांगदानें ते पांचहि मणी आणून आपल्या वडिलांना दिले आणि प्रार्थना केली कीं यौवन देणारा मणी मोहिनीला द्यावा.

रुक्मांगदानें आपल्या मुलास विवाह करून घेण्यास सांगितलें. त्यानें वरुण-कन्येशीं आणि नागकन्यांशीं लग्न करून घेतलें.

मोहिनीला रुक्मांगदाबरोबर येऊन आठ वर्षें लोटली होतीं. त्यानें मोहिनीला कार्तिक मासाचें व्रत व दान धर्म करायला सांगितला व म्हणाला, सर्वांत उत्तम दान म्हणजे दीपदान होय. कार्तिक महिन्यांतल्या सर्व व्रत संस्कारांचें वर्णन ऐकून मोहिनी म्हणाली—"माझ्याकडून नाहीं होणार हीं व्रतें वैकल्यें, पाहिजे तर आपण आपल्या थोरल्या पत्नीबरोबर व्रतें करावीं."

रुक्मांगदानें संध्यावलीला विचारलें—"तूं करशील का कार्तिक व्रत? मी मोहपाशांत सांपडून कार्तिक व्रत केलें नाहीं. या वर्षी करण्याचा विचार आहे व तें तुझ्याबरोबर!" संध्यावली त्या गोष्टीस कबूल झाली.

कांहीं काळ लोटला. एकदां रुक्मांगद मोहिनीबरोबर विहार करीत असतां त्याला—"एकादशी व्रत न करणाऱ्याला शिक्षा होईल!" अशी राजाज्ञा कोणी तरी सांगत














असल्याचें ऐकूं आलें. रुक्मांगदानें मोहिनीला एकादशी व्रत करण्यास सांगितलें.

मोहिनीला त्या गोष्टीचा राग आला. ती म्हणाली–"तूं विवाहप्रसंगीं एक वचन दिलें होतेंस. तें पालन कर. नाहीं तर तूं जेवढी पुण्याई मिळविली आहेस ती नष्ट होईल. आणखी एक गोष्ट, गरोदर स्त्री, गृहस्थ, अशक्त मनुष्य, लहान मूल युद्ध करीत असलेला वीर यांनीं प्रत्येक व्रत करण्याची आवश्यकता नाहीं, असें मला स्वतः गौतम ऋषींनीं सांगितलें आहे."

रुक्मांगदानें अनेक प्रकारें मोहिनीचें मन वळविण्याचा यत्न करून पाहिला. तो म्हणाला–"एक व्रत न करण्याची गोष्ट सोडून तूं सांगशील तें करावयास मी तयार आहें." ती म्हणाली,–"या गोष्टी वेदांत कोठें आहेत?" त्याला रुक्मांगद म्हणाला–"प्रत्येक गोष्ट वेदांत आहे का? ज्या गोष्टी वेदांत नाहींत त्या पुराणांत व इतिहासांत सांगितल्या आहेत."

"कोणी सर्वज्ञ ब्राह्मण येऊन माझ्याशीं या विषयावर शास्त्रार्थ करील तर तो देखील तुला व्रत करण्याची गरज नाहीं हेंच सांगेल." मोहिनी म्हणाली.

रुक्मांगद राजानें गौतम मुनींना बोलाविलें. मोहिनी म्हणाली–"अन्न ब्रह्मस्वरूप आहे. प्राणरक्षणासा आवश्यक आहे. जीव असेल तर कर्म घडेल. कर्म करण्याची शक्ति असेल तरच धर्माचरण घडेल. प्रजारंजन राजाचें कर्तव्य आहे. त्यानेंच उपवास करून प्रजेला दुःखी केलें तर त्याला नरकवास भोगावा लागेल." मोहिनीचें म्हणणें बरोबर असल्याचें गौतमादिक मुनींनीं सांगितलें.

(पुढें चालू)



## ४०. अरुणालय - सयाम

सयामची राजधानी बँकॉक येथें मेन नदीच्या पश्चिमेकडील तीरावर अत्यंत सुंदर असें वाक अरुण (अरुणालय) आहे. त्याची उंची २०० फूट आहे. सर्व देऊळ चित्रविचित्र रंगाच्या चिनीमातीच्या विटांनीं बांधलेलें आहे. सूर्यप्रकाशांत त्या विटा चकाकत असतात. हें एक सुप्रसिद्ध बौद्ध तीर्थक्षेत्र आहे.






बहिरामखानाला वाटेला लावल्यानंतर अकबराला दोन वर्षें थोडी स्वस्थता मिळाली. त्याची दाई व तिचा मुलगा आदम अकबरावर आपला अधिकार गाजवूं लागले. पुष्कळ दिवस अकबर बादशहानें तें सहन केलें. नंतर त्यानें आदमचा कांटा दूर केला.

चाळीस दिवस पुत्रशोक करीत राहल्यावर आदमची आई पण वारली.

१५६२ च्या मे महिन्यानंतर अकबर पूर्ण स्वतंत्र झाला. त्यानें मोगल साम्राज्याचा बळकट पाया घातला. साम्राज्य स्थापन करण्याच्या कामीं त्याला जेवढें यश मिळालें तेवढें इतर एकाहि मुसलमान राज्यकर्त्याला मिळालें नाहीं. त्यानें ४० वर्षें राज्य केलें. आपलें साम्राज्य वाढविण्यासाठीं व तें बळकट करण्यासाठीं तो सतत खटपट करीत राहाला.

मध्यप्रदेशांतल्या उत्तर कडील प्रांतांतला गरह्‌ कटंग राज्याचा राजा वीर नारायण-राज्य करीत असे. तो वयानें लहान होता. त्याच्या आईचें नांव दुर्गावती असें होतें. तिच्या शिरावरच राज्यकारभाराची मुख्य जबाबदारी होती. आपल्या असामान्य सौंदर्यामुळें व पराक्रमामुळें तिची देशभर ख्याती होती.

सन १५६४ सालीं अकबरानें ह्या राज्यावर स्वारी करण्यासाठीं आसफखानाला पाठविलें. आसफखानाचा जय झाला. दुर्गावतीला हा पराभव फार अपमानकारक वाटला व तिनें आत्महत्या करून घेतली. वीर नारायण यानें देखील मरेपर्यंत आपलें राज्य स्वतंत्रच रहावें म्हणून युद्ध केलें. अकबरानें ह्या राज्याचा कांहीं भाग आपल्या अमलाखालीं ठेवला व बाकी दुर्गावतीच्या वंशजांना देऊन टाकला. अकबर बादशहानें आपल्या अमलाखालीं आणलेला भागच पुढें भोपाळ या नांवानें प्रसिद्ध झाला.

उत्तर हिंदुस्थानांत रजपुतांचें वर्चस्व त्या काळांतहि होतें. भारताच्या त्या काळच्या इतिहासांत प्रामुख्यानें भाग घेणारे तेच होते. त्यांच्या मदतीशिवाय साम्राज्य स्थापन करणें अशक्य आहे याची जाणीव अकबर बादशहाला होती.

मोंगल पठाणांसारखे याच देशांतले रहिवाशी नव्हते. ते बाहेरून आले होते. म्हणून अकबर बादशहानें रजपुतांशीं सख्य करून घेण्याचें ठरविलें. औदार्य व चातुर्य दोन्हींचा प्रयोग करून त्यानें रजपुतांचीं मनें वळवून घेतलीं, इतकीं कीं त्यांनीं अकबराच्या साम्राज्याची सेवा मनोभावें केली. त्यांचें शौर्य व मोंगलांचें चातुर्य या दोन्हींची जोड होती म्हणूनच मोंगलांचें साम्राज्य स्थापन होऊं शकलें.

१५६२ मध्यें (अंबर) जयपुरचा राजा बिहारीमल याला अकबरासमोर मान तुकवावी लागली. त्यानें अकबराशीं विवाह संबंध स्थापन केला. तो आपला मुलगा भगवानदास व नातू मानसिंह याला घेऊन आग्रा



येथें जाऊन राहूं लागला. अकबराच्या पदरीं पंच हजारी म्हणून त्यानें नोकरी धरली. त्याचा मुलगा व नातू दोघे अकबराच्या सैन्यांत नोकरी करूं लागले. अशा तऱ्हेनें मोगलांना अनेक पिढ्या नोकरी करीत राहणाऱ्या रजपूत कुटुंबाचें सहाय्य लाभलें.

परंतु मेवाडच्या राणानें अकबरासमोर आपली मान तुकविली नाहीं. त्यांनीं गुजराथ मधून पळून आलेल्या बाजबहादुर नांवाच्या सुलतानाला आपल्या आश्रयीं ठेवून घेतलें.

मेवाडचें राज्य अकबराच्या डोळ्यांत सलत होतें. परंतु राणासंग याच्या मृत्यूनंतर

त्याचा मुलगा उदयसिंह योग्य शासक नव्हता. आपसांतल्या भाऊबंदकीचा पण फायदा अकबराला मिळाला. मेवाडवर स्वारी करण्यासाठीं तो संधी पाहूं लागला व त्यासाठीं तयारीपण करूं लागला.

१५६७च्या आक्टोबर महिन्यांत अकबरानें चित्तोडच्या किल्ल्याला वेढा दिला. उदयसिंह आपला किल्ला दैवाच्या भरंवशावर सोडून डोंगराळ प्रदेशांत पळून गेला. परंतु त्याचे दोन वीर जयमल्ल व पट्टा चार महिने अकबराच्या सैन्याला थोपवून होते. शेवटीं अकबर बादशाहची गोळी लागल्यानें जयमल्ल रणांगणावर पडला. नंतर पट्टादेखील युद्ध करीत असतां मरण पावला. इतर सैनिकदेखील एकेक करून मरण पावले. रजपूत स्त्रियांनीं जोहर करून स्वतःचें रक्षण केलें.

नंतर अकबरानें ससैन्य चित्तोडच्या किल्ल्यांत प्रवेश केला. चित्तोडचा किल्ला सर झाल्यावर इतर रजपूत राज्यकर्त्यांनीं पटापट अकबर बादशाहचें आधिपत्य स्वीकार केलें.

१५६७ मध्यें रणथंभोरच्या राजानें किल्ल्याची किल्ली अकबरबादशाहच्या हातीं दिली व त्याच्या पदरीं नोकरी स्वीकारली. त्याच वर्षी कालिंजरचा राजादेखील अकबर बादशाहचा मांडलिक झाला. कालिंजरचें पतन हें मोगल साम्राज्याच्या वाढीला फार उपयोगी पडलें.

१५७० मध्यें बिकानेर व जेसलमीरच्या राज्यकर्त्यांनीं अकबर बादशाहसमोर गुडघे टेंकलेच, त्याचबरोबर त्यांनीं आपल्या राजकन्यांचा विवाह अकबर बादशाहाशीं करून त्याच्याशीं सख्य केलें.



# नेहरू चरित्र

[१०]



जवाहरलाल नेहरू सर्वांत प्रथम १९२१ सालीं तुरुंगांत गेले. पांच वर्षें पूर्वी त्यांचा विवाह दिल्ली येथें वसंत पंचमीच्या-दिवशीं झाला. वधूचें नांव कमला कौल असें होतें. कौल हें काश्मीरी कुटुंब दिल्ली येथें कायम राहूं लागलें होतें. कमला सडपातळ व उंच बांध्याची होती.

कमला नेहरू यांचा स्वभाव पती-सारखाच होता. अपरिचित व अनोळखी लोकांजवळ त्या बोलत नसत. परंतु आपल्या नातेवाइकांबरोबर व मित्रमंडळी-बरोबर त्या मोकळेपणीं बोलत. त्या फार हुशार व व्यवहार कुशल होत्या. त्यांचे विचार स्पष्ट होते व ते त्या मोकळेपणानें इतरांसमोर मांडीत.

दोघांचा तो प्रेमविवाह नव्हता. वडील-धाऱ्या लोकांनींच तो संबंध जुळवून आणला होता. नेहरूंच्या मातोश्री स्वरूपराणी नेहरू यांनीं कोणाकडे तरी त्या जेवायला गेल्या असतां कमलाला पाहिलें व या रूपवती मुलीलाच आपली सून करून घ्यायचें मनाशीं ठरविलें.

कमला सासरी आली तेव्हां मोतीलाल-जींच्या कुटुंबांत राजकीय वावटळ शिरली नव्हती. चार वर्षें राजवाड्यांतल्या राजकन्ये-सारखी कमला नेहरू राहाली. आनंद भवनासारखा राजवाडा, नोकर चाकर, कुत्री, घोडे, वाहनें वगैरे सर्व बादशाही थाट होता. घरांत सर्वत्र गालीचे अंथरलेले असत. मूल्यवान चिनी मातीचीं व कांचेचीं सुंदर व उत्तमोत्तम भांडीं. लहानांसाठीं लहान तट्टू तर मोठ्यांसाठीं अरबी घोडे. पाहुण्यांचें

गुहा फक्त आठ मैलावर आहे असें त्यांना सांगण्यांत आलें. वाटेंत बर्फाच्छादित उंच डोंगर होता. परंतु त्या सर्वांची फिकीर न करून एका धनगराला बरोबर घेऊन ते कांहीं लोकांसह पुढें निघाले. परस्परांना दोरखंडांनीं बांधून ते बर्फावर चढूं लागले. कित्येक ग्लेशियर व उंच डोंगर. एकेक पाऊल टाकणें कठीण झालें.

पहाटे चार वाजतां निघाले ते दुपारीं बारा वाजतां एका विस्तीर्ण मैदानांत पोंचले. सहा मैलांचें मैदान पार केल्यानंतर डोंगर उतरून गेल्यावर अमरनाथची गुहा होती. त्या बर्फाच्या मैदानांत जागोजागीं मोठमोठ्या चिरा व भेगा होत्या. त्यांवर नवीन बर्फ पडलें होतें. त्यावर पाय ठेवतांच जवाहर लाल घसरून खालीं पडले. तो एक मोठा खड्डा होता. कमरेला बांधलेलें दोरखंड न तुटल्यामुळें ते संकटांतून वांचले. नाहींतर त्यांचा शोध लावायलाच कित्येक दिवस लागले असते. इतकें झालें तरी ते हिंमत हारून बसले नाहींत, पुढें निघाले. जितकें पुढें जावें तितक्या चिरा व खंदक वाढतच गेले. शेवटीं हताश होऊन सर्वांना परत फिरावें लागलें.

पुढें मानससरोवर कैलाश पर्वत वगैरे प्राकृतिक सौंदर्य पाहण्याचीं स्वप्नें त्यांनी कित्येकदां पाहिलीं. परंतु सवड कधींच मिळाली नाहीं. कारण त्यांच्या आयुष्याला एक निरालेंच वळण लागलें. काश्मीर यात्रा करण्या ऐवजीं जेलयात्रा करण्याकडे त्यांचें मन जास्त जास्त आतुर होत गेलें. भारताचे प्रधान मंत्री झाल्यावर मात्र ते काश्मीरला पुन्हां गेले, बर्फाच्छादित डोंगर पाहिले व लद्दाखला पण गेले.






[ ११ ]

[विमलानें जगतसिंहाच्या नांवीं लिहिलेल्या पत्रांत खेणेंप्रमाणें मजकूर लिहिला– "अभिरामस्वामीचा संबंध एका शूद्र स्त्रीशीं संन्यास घेण्यापूर्वी झाला होता व तींच दोघें तिचे आईवबील होत. वीरेंद्रसिंहांचें विमलेवर प्रेम होतें. परंतु मानसिंहांनीं तिच्याशीं लग्न करावयास सांगितलें तेव्हां त्यांनीं एका शूद्र स्त्रीच्या मुलीशीं लग्न करण्याचें नाकारलें. परंतु शेवटीं वीरेंद्रसिंहांना विमलेशीं लग्न करावें लागलें. त्यामुळें वीरेंद्रसिंहांच्या मनांत विमलेविषयीं थोडी अढी पडली व ते मानसिंहांचे हाडवैरी झाले. पत्नी असून तिला वीरेंद्रसिंहांची दासी म्हणून रहावें लागलें. नंतर दिग्गजाकडून विमला व तिलोत्तमा नवाबाच्या महालांतल्या दासींत ठेवल्या गेल्याचें ऐकून तर त्याच्या मनाला धक्काच बसला.]

रात्रभर जगतसिंह अंथरुणावर तळमळत पडून राहाला. तिलोत्तमेनें नवाबाची एक बाई म्हणून जगण्यापेक्षां आत्महत्त्या कां करून घेऊं नये असें देखील त्याच्या मनांत आल्याशिवाय राहालें नाहीं.

याच विचारांत मग्न असतां केव्हां त्याचा डोळा लागला हें त्याचें त्यालाच कळलें नाहीं. दुसऱ्या दिवशीं सकाळीं उस्मानखानानें त्याला उठविलें व त्याच्या हातांत एक पत्र दिलें व म्हणाला–"युवराज! हें

श्री बंकिमचंद्र चट्टोपाध्याय



पत्र लिहून देणारीला मी तें आपणांकडे पोंचवीन असें वचन दिलें होतें. सवडीनें वाचावें. मी दुपारीं पुन्हां येईन व या पत्राचें कांहीं उत्तर असल्यास तें तिच्याकडे पोंचतें करीन." असें सांगून तो निघून गेला.

जगतसिंहानें तें पत्र सुरवातीपासून शेवटपर्यंत वाचलें. पत्र वाचून झाल्यावर त्यानें तें जाळून टाकलें. त्या पत्रामुळें जगतसिंहाच्या मनांत विचारांचा जणुं कांहीं अग्नीच पेटला.

उस्मान दुपार उलटल्यावर जगतसिंहाकडे गेला. जगतसिंहानें उत्तर लिहून ठेवलें होतें. तें त्यानें उस्मानला दिलें. उस्माननें तें पत्र वाचलें त्यांत दोनच दोन ओळी होत्या—"दैवगतीच ही. परंतु तूं माझ्यावर जे उपकार केलेस ते मात्र मी कधीं विसरणार नाहीं. तूं खरोखरींच पतिव्रता असशील तर तूं देखील वीरेंद्रसिंहांच्या पाठोपाठ निघून जावेंस." —जगतसिंह.

उस्मान तें पत्र वाचून म्हणाला—"युवराज! किती कठोर मनाचा आहेस तूं!"

जगतसिंहानें व्यंग्य केलें—"पठाणांहून जास्त?"

उस्मान खोचक शब्दांत म्हणाला—"म्हणून पठाणांनीं तुझी सेवा शुश्रूषा करण्यांत मागें पुढें पाहिलें नाहीं वाटतें!"

जगतसिंह थोडा नरमला व म्हणाला—"तुझ्या विरुद्ध मला कांहीं बोलावयाचें नाहीं. तूं फार प्रेमानें मला वागविलेंस. मी कैदेंत असलों तरी तूंच मला प्राणदान दिलें आहेस. तूं आपल्या एका हाडवैऱ्यावर उपकार केले आहेस. मी तुझा कैदी आहें. मला तुझ्या दयेची व कृपेची अपेक्षा ठेवण्याचें कारण नाहीं. मला साखळदंडांनीं बांधून ठेव. या सोन्याच्या पिंजऱ्यांत ठेवण्याचें काय कारण?"



"युवराज! संकटांना आव्हान करण्याची गरज नाहीं. तीं स्वतःच चालून येतात." उस्मान म्हणाला.

"मऊ गादीच्या ऐवजीं टणक दगडावर झोंपणें खऱ्या रजपुताला अवघड वाटत नाहीं. कतलुखानाचा सूड उगवणें मला शक्य झालें नाहीं तर मरणाची शिक्षा मी हसत हसत भोगूं शकेन." जगतसिंह म्हणाला.

"युवराज! खबरदार! पठाण जें बोलतो तें प्रमाण करून दाखवतो." उस्मान म्हणाला.

"धमकी दिल्यानें भिऊन जाईन असें वाटलें होय?" जगतसिंहानें विचारलें.

उस्मानाला त्याला करावयाचें होतें तें काम त्यावेळींच आठवलें. म्हणाला—"होय! पण मी एका विशिष्ट कामासाठीं म्हणून आलों आहें."

जगतसिंहानें चकित होऊन विचारलें—"तें कोणतें बुवा?"

"मी जें कांहीं बोलत आहें तें नवाबा-तर्फेंच बोलत आहें!" उस्मान म्हणाला.

"ठीक!"

"या युद्धाचा परिणाम रजपूत व पठाण या दोघांचे बळी पडण्यांत झाला आहे."



"पठाणांचा संहार करण्याचेंच आम्ही व्रत घेतलें आहे."

"तें खरें असेल! पण दोन्ही बाजूचे कित्येक लोक प्राणास मुकले आहेत. एकाच पक्षाचे लोक मरतील असें थोडेंच आहे. ज्यांनीं मंधारणचा किल्ला जिंकला ते अगदींच भित्रे असतील असें का वाटतें तुला?"

"नाहीं ते चांगले सशक्त व पराक्रमीच आहेत."

"तें कांहीं असो, आपल्या पराक्रमाच्या फुशारक्या मारणें माझा उद्देश नाहीं. मोंग-



लांशीं वैर करून ओरिसा प्रांतांत पडून राहाल्यानें पठाणांचें हित आहे असें नाहीं वाटत मला. परंतु त्याच बरोबर ओरिसा प्रांतांतल्या पठाणांना वश करून घेणें देखील दिल्लीच्या बादशहाला तितकेंसें सोपें काम नाहीं, ओरिसा दिल्लीपासून किती दूर आहे हें तुला माहीतच आहे. इतक्या दुरून उंटावरून शेळ्या हाकलणें बादशहाला शक्य आहे का? या युद्धाचा परिणाम फक्त दोन्ही पक्षांची प्राणहानि!"

"त्याला आतां काय उपाय?" जगतसिंह म्हणाला.

"आमच्या नवाबसाहेबांची संधी करून घ्यायची इच्छा आहे!"

"ही कशी काय संधी?"

"दोघांना स्वतःचा हक्क थोडा थोडा सोडावा लागेल. कतलखानानें बंगाल प्रांतांतला जो भाग जिंकला आहे तो सोडायला तो तयार आहे. बादशहा कडून जी कुमक येईल ती मानसिंहानीं परत करावी व आमच्यावर स्वारी करून आम्हांला जिंकण्याचा विचार सोडून द्यावा. या संधीमुळें पठाणांचें नुकसान आहे, बादशहाचें नाहीं. कारण इतकें रक्त सांडून जिंकलेला सर्व प्रदेश परत द्यायला आम्ही तयार आहों. अकबरानें जो प्रदेश जिंकला नाहीं तोच प्रदेश अकबराला सोडावा लागेल."

"पण हें सर्व माझ्याजवळ बोलण्याचा काय अर्थ? संधी वगैरे जी कांहीं करावयाची असेल तिचा हक्क राजा मानसिंह यांच्याकडे आहे. त्यांच्याकडे दूत पाठव."

"दूत पाठवले आहेत. परंतु मानसिंहांना पठाणांनीं तुला ठार केल्याचें कोणी सांगितलें आहे असें कळतें. पुत्रशोकानें त्यांना एकहि काम सुचत नाहीं. जगतसिंह जिवंत आहे ही गोष्ट दूतानें त्यांना सांगितली तरी ती त्यांना खरी वाटणार नाहीं. परंतु तूं स्वतः जाऊन त्यांच्याशीं हें सर्व बोललास तर ही संधी घडून येईल."

"माझें हस्ताक्षर ओळखून महाराजांचा विश्वास बसेल. मी स्वतः जाण्याची काय गरज?"

"महाराजांना वस्तुस्थितीची कल्पना असणें शक्य नाहीं. याशिवाय तुझी प्रत्यक्ष भेट झाल्यानें त्यांना जें समाधान होईल तें तुझें पत्र पाहून होणें शक्य नाहीं. मुख्य गोष्ट म्हणजे तुला सुटका मिळेल. या सर्व गोष्टींचा विचार करून नवाबांनीं तुलाच महाराजांकडे पाठविण्याचें ठरविलें."

"वडिलांकडे जाण्यास मला कांहीं हरकत नाहीं."

"ठीक, संधी करणें महाराजांना मान्य नसेल तर तुला परत यावें लागेल! हें वचन दे."

"वचन दिल्यावर मी त्याप्रमाणें वागेनच हें कशावरून?"

उस्मान स्मित करून म्हणाला—"रजपूत वचन देऊन तें मोडत नाहीं ही गोष्ट प्रत्येकाला माहीत आहे."



"मी वडिलांना भेटून परत येईन हें वचन देतों."

"ज्या अटी आमच्या तर्फे सुचविण्यांत आल्या आहेत त्यादेखील आपल्या वडिलांकडून मान्य करवून घेण्यास तूं यथाशक्ति यत्न करशील असें वचन देखील तूं दिलें पाहिजेस."

"हें वचन द्यायला मी तयार नाहीं. पठाणांचा पराभव करून हा प्रदेश जिंकण्यासाठीं बादशहानें आम्हांला पाठविलें आहे. संधी करण्यासाठीं पाठविलें नाहीं. संधी करायला किंवा ती तोडायला आम्हांला अधिकार दिलेला नाहीं."













उस्मानखानाच्या तोंडावर आनंद व दुःख दोन्हींचा आभास झळकूं लागला. तो जगतसिंहाला म्हणाला—"युवराज! तूं रजपूत जातीला शोभेल असेंच बोललास. पण विचार कर स्वतःची सुटका करून घेण्यास याहून चांगली संधी तुला मिळणें शक्य नाहीं."

"मला सुटका मिळाली नाहीं तर बादशहाला त्याची फिकीर करण्याचें कारण नाहीं. कारण माझ्यासारखे कित्येक रजपूत आहेत त्यांच्या पदरीं."

"मी म्हटल्याप्रमाणें तूं वचन दिलें नाहींस तर नवाब तुझ्याशीं कसा वागेल हें नाहीं सांगतां येणार." "मला कैदेंत टाक. मी पूर्वीच सांगितलें आहे." जगतसिंह म्हणाला.

"एवढ्यावर नबाबाच्या मनाचें समाधान होईल हें कोण सांगूं शकेल?" उस्मान म्हणाला.

"फार तर वीरेंद्रसिंहांना त्यानें जसें ठार केलें तसा मला ठार करील. यापेक्षां जास्त काय करणार?" युवराज म्हणाला.

"ठीक, तर मग मी येतों." असें सांगून उस्मान निघून गेला.

कांहीं वेळानें एक अधिकारी बरोबर चारसहा सशस्त्र सैनिकांना घेऊन आला. त्यांना पाहून जगतसिंहानें त्यांना विचारलें—"तुम्ही कशाला आलां आहां इकडे?"

"आपल्याला आणखी एका जागीं घेऊन जाण्यासाठीं." तो अधिकारी म्हणाला.

"मी तयार आहें. चला." असें म्हणत जगतसिंह उठून त्यांच्याबरोबर निघून गेला.

त्याचदिवशीं नवाबाचा वाढदिवस होता. सकाळपासून सर्वत्र आनंदाचें वातावरण होतें. जागोजागीं नृत्य गायनादि चालू होतें, दानधर्म चालू होता, किंवा मेजवान्या चालू होत्या. गप्पा गोष्टींत लोक रंगून गेले होते.





रात्रीं विमलानें नबाबाचा सारा महाल पालथा घातला व कशी तरी तिलोत्तमेच्या खोलींत जाऊन पोंचली. "तिनें मी आलें आहें तिलोत्तमा!" म्हणतांच ती उठून उभी राहाली व तिच्याकडे टक लावून पहात उभी राहाली.

"येईन म्हणून सांगितलें होतें त्या प्रमाणें आलें आहें. मग बोलत कां नाहींस?"

"काय बोलायचें? व्हायचें तें होऊन गेलें." तिलोत्तमा म्हणाली. तिच्या आवाजावरून ती बराच वेळ रडत होती हें स्पष्ट कळण्यासारखें होतें.

"अशी रात्रंदिवस रडत राहालीस तर कसें होईल?" विमला म्हणाली.

"मेलेंच तर कोण आहे रडायला मागें? जितकें लवकर मरण येईल तितकें बरें. इतके दिवस मी जगलें कशी हेंच कळत नाहीं मला." तिलोत्तमा म्हणाली.

विमलेच्या डोळ्याला देखील टिपें आलीं. डोळे पुसून व श्वास सोडून ती म्हणाली—"वेळ नसल्यामुळें म्हणा किंवा आपण या नव्या परिस्थितींत थोड्या बदलत जाऊं ही आशा बाळगून त्यानें आपणांकडे लक्ष दिलें नसावें. आज आपण दिसलों नाहीं तर तो काय करील हें नाहीं सांगतां येणार."

"दुसरा कांहीं मार्ग नसेल तर मी आत्महत्त्या करून घेण्यास तयार आहें." बोलतांना तिलोत्तमेचें सर्व अंग हादरून गेलें.

"अशी हताश झालीस तर कसें चालेल? थोडा धीर धर. येथून बाहेर पडून जाण्याची व्यवस्था मी केली आहे." असें म्हणत कमलानें आपल्या पोशाखांत लपवून ठेवलेली एक कट्यार व उस्माननें दिलेली अंगठी काढून दाखविली.

"ही कट्यार कोठें मिळाली?"

"काल आस्मानीला नव्हते का भेटलें? अभिरामस्वामींनीं त्यांच्याबरोबर ही पाठविली होती."

"अन ही अंगठी?"

"मला पळून जाण्यासाठीं म्हणून उस्मानानें दिली आहे."

तिलोत्तमेच्या तोंडांतून थोडा वेळ शब्दच उमटेना. तिची छाती धडधड होत होती.

"हे जुने कपडे राहूं देत! चांगले नेसून जा नृत्यगान चालू आहे तिकडे." विमला म्हणाली.

"उंहूं...." तिलोत्तमेनें नकार दिला.

"नाहींतर तुला बाहेर जातां येणार नाहीं."

तिलोत्तमा रडूं लागली.

"धीर धरून मी सांगेन तें मुकाट्यानें कर. तुझ्या रक्षणासाठीं मी आणखी एक युक्ति योजून ठेवली आहे." विमला तिला धीर देत म्हणाली.

"ही अंगठी जवळ ठेवून घे. तूं नृत्यगान चालू आहे तिकडे जाण्याची सुद्धां गरज नाहीं. "मध्य रात्र उलटेपर्यंत गायन वादनादि चालू राहील. अंगठी घेऊन तूं अंतःपुराच्या दाराजवळ जाऊन उभी रहा. तेथें तुला एक सैनिक दिसेल. त्यानें तुला अंगठी दाखविली तर तूं ही अंगठी दाखव. तो तुला अभिरामस्वामींकडे पोंचता करील किंवा तुला वाटेल तिकडे तो घेऊन जाईल. अगदीं निर्भयपणें तूं त्याच्याबरोबर जा. वाटेंत तुला कोणी अडवलें तर त्याला ही अंगठी दाखव. कोणी अडविणार नाहीं." असें सांगून विमला निघून गेली. [चालू]



# मित्रद्रोह

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाहीं. तो पुन्हां झाडाजवळ गेला व झाडावरून प्रेत खांद्यावर काढून घेऊन स्मशानाकडे निघाला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा! तूं कोणाकरितां इतके कष्ट सहन करीत आहेस हें मला नाहीं कळलें. पण मार्गसिंहासारखें अपयश तुझ्या पदरीं पडूं नये म्हणजे झालें. तुला कंटाळा येऊं नये म्हणून मी त्याची गोष्ट सांगतों. ऐक!" असें सांगून वेताळ गोष्ट सांगूं लागला.

चतुरगिरी नांवाच्या राजाला चित्रसेन नांवाचा एक मुलगा होता. चित्रसेनाची मार्गसिंह नांवाच्या एका शिकाऱ्याच्या मुलाशीं लहानपणापासून मैत्री होती. त्याचें नांव मार्गसिंह असें होतें. दोघे समवयस्क होते. दोघे नेहमीं बरोबरच हिंडत फिरत.

## वेताळाच्या गोष्टी











युवराज चित्रसेन वयांत आल्यावर राजानें त्याचा राज्याभिषेक करविला व स्वतः वानप्रस्थाश्रमांत प्रवेश केला.

राजा झाल्याबरोबर चित्रसेनाच्या स्वभावांत फार मोठा बदल झाला. आतां त्याला मार्गसिंहासारख्या सोबत्यांची गरज उरली नाहीं. परंतु मार्गसिंह मात्र आपल्या जुन्या मित्राला कधीं विसरला नाहीं. आपला बालमित्र आतां राजा झाला आहे आपल्याला कोणत्या गोष्टीची कमतरता? असें त्याला वाटे. ह्या खुळेपणामुळें त्यानें स्वतःच्या राहाणींत कांहीं बदल केला नाहीं. आपल्या वंशाला शोभेल असें कांहीं शिकून त्यानें नांवलौकिक मिळावा म्हणून देखील कांहीं प्रयत्न केला नाहीं. त्याच्या वडिलांकडून त्याला जी थोडी फार पैतृक संपत्ति म्हणून मिळाली होती तेवढ्यावर त्याचा किती दिवस निभाव होणार? थोड्याच दिवसांत त्याच्या जवळ होतें नव्हतें तें सर्व खर्च होऊन गेलें व त्याच्या हातांत करवंटी आली.

अगदीं नाइलाज झाला तेव्हां मार्गसिंह आपला बालपणचा मित्र चित्रसेन याच्या कडे मदतीसाठीं आला व सरळ दरबारांत जाऊन राजाची वाट पहात बसला. राजा दरबारांत आला व त्यानें मार्गसिंहाला पाहिलें व ओळखलें देखील. परंतु एक शब्द बोलल्याशिवाय किंवा ओळख दाखविल्याशिवाय पुढें निघून गेला. मार्गसिंहाला अर्थातच फार वाईट वाटलें. लहानपणची मैत्री उपयोगाची नाहीं हें त्याच्या लक्षांत आलें.

तो अगदीं निराश व हताश झाला. त्याच्या जातीच्या लोकांनीं त्याची समजूत घातली. म्हणाले—"शिकारीचा धंदा करणाऱ्याला मरण नाहीं. आज आम्ही सर्व शिकारीला जात आहों. चल तूं पण." मार्गसिंह त्यांच्याबरोबर निघाला.

रानांत इतरांनीं शिकार करून हरण वगैरें जनावरें धरलीं. कोणी पक्षी तर कोणी वाघ, चित्ता इत्यादींची शिकार केली. पण मार्गसिंहाला एक ससादेखील मिळाला नाहीं. म्हणून हिरमुसल्यासारखा होऊन त्यांच्या बरोबर न जातां तो एकटाच एका पाऊलवाटेनें घरीं निघाला.

कांहीं अंतर चालून गेल्यावर मार्गसिंहाला एक गुहा दिसली. त्याला गुहेंत एक सुंदर स्त्री बसलेली दिसली. तिच्या मांडीवर डोकें टेंकून एक ऋषि झोपलेला होता. मार्गसिंह थक्क होऊन बराच वेळ पहात उभा राहाला. त्या बाईनें खुणेनें त्याला निघून जायला सांगितलें. त्याला वाटलें कीं ही सुंदर स्त्री चित्रसेनाची राणी होण्यालायक आहे. जाऊन त्याला ही गोष्ट कळविली तर कदाचित या निमित्तानें जुनी मैत्री ताजी होईल व आपलें भाग्य पालटेल, असा विचार करून तो सरळ राजवाड्याकडे गेला. पाहारेकऱ्यांकरवीं आपली ओळख सांगून अत्यंत जरूरीच्या कामानें भेटायला आल्याचें त्यानें कळविलें. राजानें त्याला बोलावून घेऊन येण्यास सांगितलें.





मार्गसिंह आल्यावर राजा जणुं कांहीं प्रथमच इतक्या दिवसांनीं भेट झाल्याचें दाखवून त्याला म्हणाला—"आपण दोघे भेटून किती किती दिवस झाले नाहीं? राजा म्हणजे पिंजऱ्यांतला पक्षी समज. पूर्वी मला जें स्वातंत्र्य होतें तें आज नाहीं. बरें तर तूं कशासाठीं इतका घाईनें आलास तें सांगशील कीं नाहीं.."

"रानांत एका गुहेंत मी अप्सरेसारखी एक अत्यंत रूपवती स्त्री पाहिली आहे. पण आश्चर्य म्हणजे तिच्या बरोबर एक मुनि राहतो. तुझ्या अंतःपुराची शोभा वाढवील अशी आहे ती. तो मुनि झोंपलेला आहे. तिला घेऊन यायला छान संधी आहे!" मार्गसिंह म्हणाला.

चित्रसेनानें त्या सुंदर स्त्रीला घेऊन यायचें ठरविलें. दोघे घोड्यावर बसून निघाले. मार्गसिंह पुढें चालत होता. रानांत ती गुहा होती त्या जागीं ते तेथें येऊन पोंचले. दोघे गुहेपासून थोड्या अंतरावर उतरले. चित्रसेन आपल्या मित्राला म्हणाला—"तूं गुहेंत डोकावून तर पहा कीं तो ऋषि अजून झोंपला आहे कीं जागा आहे. तो झोंपला असेल तर त्याचें डोकें आपल्या मांडीवर ठेवून घेऊन तूं त्या स्त्रीला माझ्याकडे बाहेर पाठव. नंतर मी आंत येऊन त्याला ठार करीन व नंतर आपण सर्व राजधानीस परत जाऊं."

मार्गसिंह गुहेंत शिरला अगदीं मांजराच्या पावलांनीं. तो मुनि तसाच झोंपलेला होता. मार्गसिंह त्या बाईच्या कानाजवळ तोंड नेऊन तिला म्हणाला—"बाहेर राजा चित्रसेन तुला सोडवून घेऊन जायला उभा आहे. तूं साधूचें डोकें माझ्या मांडीवर ठेवून दे व तूं बाहेर जाऊन त्याला भेट!"

तें ऐकून त्या बाईनें मुनीचें डोकें मार्गसिंहाच्या मांडीवर ठेवून दिलें व पिंजऱ्यांतून पक्षी उडून जावा तशी उडून गुहेबाहेर निघून गेली. चित्रसेन तिचें सौंदर्य पाहून चकित झाला. मार्गसिंहानें वर्णन केलें होतें त्याहि पेक्षां ती जास्त सुंदर होती. तो तिला घेऊन राजधानीला निघून गेला.



मार्गसिंह बराच वेळ वाट पहात बसला. आपल्या बालपणच्या मित्रानें आपल्याला फसविलें. आपण किती मूर्खपणा केला? त्याच्या बोलण्यावर विश्वास केला. असा विचार करीत बसला असतां त्याच्या डोळ्याला टिपें आलीं. दोन थेंब त्या ऋषीच्या तोंडावर पडले व त्याची झोंप मोडली. एका पुरुषाच्या मांडीवर आपलें डोकें आहे हें पाहून चकित मुद्रेनें त्यानें त्याला विचारलें—"कोण रे तूं? आणि ती कोठें गेली?"

चोर मुद्देमालासकट धरला जावा तशी झाली त्याची स्थिति! त्यानें खरी गोष्ट सुरवातीपासून सांगून टाकली. तें ऐकून ऋषीनें त्याला शाप दिला—"दुष्टा! तुझ्या या पापाचें फळ तुला आतां या घटकेला मिळेल पहा! तुला तत्काळ मरण येईल." मार्गसिंह तेथल्या तेथें गार झाला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"राजा मला ही गोष्ट कळत नाहीं कीं



त्या ऋषिनें मित्रद्रोही चित्रसेनाला कां शाप दिला नाहीं? त्याच्या बायकोला पळवून नेणारा खरा अपराधी तोच तर होता. फक्त एका सुंदर पुरुषाचें वर्णन ऐकून व त्याला पाहून मोहाला बळी पडलेल्या त्या स्त्रीला ऋषीनें कां शाप दिला नाहीं? बिचाऱ्या मार्गसिंहाला कां शाप दिला? त्याचा प्रामणिकपणा ओळखून तरी थोडी दया करायला हवी होती त्यानें? तूं या प्रश्नांचीं उत्तरें माहीत असून दिली नाहींस तर त्याचा परिणाम तुला माहीतच आहे. तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायावर पडतील."

विक्रमार्क म्हणाला—"राजा कृतघ्न होता हें कबूल! दुष्टांना सुंदर स्त्रियांना आणून आपल्या अंतःपुराची शोभा वाढविणें यांत एका राजाला विलक्षण असें कांहींच नाहीं. इतरांप्रमाणेंच त्यानें तें केलें होतें. म्हणून ऋषीनें त्याला शाप दिला. एवढेंच नव्हें शिक्षा करणें हें साधूचें काम नाहीं. बरें त्याची बायको त्याची सेवा करायला तयार नव्हती व राजाच्या अंतःपुरांत जायला तयार झाली तर तें तिचें दुर्दैव म्हणावयाचें! तिला शिक्षा करण्याचा काय अर्थ? परंतु मार्गसिंहानें फक्त स्वतःच्या स्वार्थाला बळी पडून हें घृणित कृत्य केलें. त्याला शिक्षा करून साधूनें त्याच्यावर उपकार केला. तो दंड किंवा शिक्षा नसून त्याला मिळालेली मुक्तता होती."

अशा तऱ्हेनें राजाचें मौन भंग होतांच वेताळ अदृश्य झाला व पुन्हां झाडाला जाऊन नेहमीं प्रमाणें लोंबकळूं लागला.

(कल्पित)

(जी. संजीवरेड्डी यांच्या गोष्टीच्या आधारें.)





# सूड

मलय पर्वतानजीकच्या प्रांतांत मारुदेव नांवाचा एक जादुगार रहात असे. मंत्रविद्येंत त्याचा हात धरणारा जवळ पास कोणी नव्हता. परंतु त्यानें पोटा पाण्यासाठीं त्या विद्येचा कधीं उपयोग केला नाहीं. नेहमीं गरीबींतच त्याचे दिवस जात होते. त्याला लव नांवाचा एक मुलगा होता. बापानें त्याला मंत्र विद्या शिकवून तयार केलें.

लवनें आपल्या विद्येचा उपयोग धनार्जनासाठीं करण्याचें ठरविलें. म्हणून तो आपलें गांव सोडून परदेशीं निघून गेला. त्यानें अनेक राजांच्या दरबारीं आपल्या विद्येचा चमत्कार दाखवून पुष्कळ बक्षिसें व उपहार मिळविले. फिरत फिरत तो तोरण देशीं गेला. त्यानें तेथील राजाजवळ आपल्या विद्येचें प्रदर्शन करण्यासाठीं परवानगी मागितली.

तोरण देशाच्या राजाला एकच एक मुलगा होता. त्याची जन्मकुंडली पाहून ज्योतिष्यांनीं भविष्य वर्तवलें होतें कीं तो दोन वर्षांचा होईल तेव्हां एक जादुगार येईल व त्याच्यामुळेंच मुलाची ग्रहदशा सुरू होईल. तेव्हांपासून राजा जादुगाराचें नुसतें नांव ऐकूनच घाबरून जाई. लव आल्यावर राजा घाबरून गेला.

राजानें बराच विचार करून आपल्या मंत्र्याला बोलावून जादूगाराला कांहीं तरी करून परत पाठवून द्यायला सांगितलें. मंत्री त्या मांत्रिकाला एकांतांत बोलावून म्हणाला—"मंत्रविद्येची आमच्या महाराजांना फार आवड आहे. म्हणून तुमच्या सत्काराची उत्तम व्यवस्था करायला त्यांनीं मला सांगितलें आहे. राज्याच्या अतिथिगृहांत



तुमच्या खास स्वागताची व्यवस्था करण्यांत आली आहे. उद्यां तुमच्या मंत्रविद्येच्या प्रदर्शनाचा कार्यक्रम ठेवण्यांत आला आहे."

तें ऐकून लवाला फार आनंद झाला. अतिथिगृहांत त्याच्या जेवणाची उत्तम व्यवस्था करण्यांत आली होती. पण पक्वान्नांत विष घातलेलें होतें. पहाटे उजाडण्यापूर्वी त्याचें प्राणोत्क्रमण झालें व त्याला पुरून टाकण्यांत आलें.

ही गोष्ट कोणाला कळूं नये याची पुष्कळ काळजी बाळगण्यांत आली होती. परंतु ती बातमी देशभर पसरली. मारुदेव याला पण ती गोष्ट कळली. तो देखील आपले जादूचे प्रयोग करीत लव गेला होता त्याच वाटेनें तोरण देशीं येऊन पोंचला. लव कोठून व कसा आला हें कोणाला माहीत नव्हतें. परंतु त्याला अतिथिगृहांत विष देऊन त्याचें प्रेत पुरून टाकल्याची गोष्ट मात्र प्रत्येकाला माहीत होती.

मारुदेव स्वतः फार सद्गुणी होता. परंतु राजानें आपल्या निरपराध मुलाचा असा वध केलेला ऐकून त्याला राग आला. त्यानें सूड उगविण्याचें ठरविलें. आपण कोण काय हें कोणाला कळूं दिलें नाहीं आणि राजवाड्याच्या जवळ पास संधी पहात हिंडूं फिरूं लागला.

एकदां दासी राजकुमाराला घेऊन बागेंत गेल्या होत्या. तेथें मारुदेवानें त्यांच्यावर मंत्र टाकला व त्या बेशुद्ध झाल्यावर राजकुमाराला उचलून घेऊन निघून गेला. घरीं पोंचल्यावर त्यानें राजकुमाराचे कपडे काढून एका पेटींत ठेवून दिले व त्याला दुसरे कपडे घालायला देऊन त्याला स्वतःच्या मुलासारखा वागवूं लागला.

तोरण राजाला राजकुमार नाहींसा झाल्याची बातमी ऐकून फार वाईट वाटलें. राज्यकारभारांत त्याचें मन लागेनासें झालें. तेव्हां त्याचा मंत्री त्याला म्हणाला—"महाराज! शोक करण्यांत काय अर्थ? जें भाग्यांत असतें तेंच होतें. मुलाला उचलून नेणारादेखील जादुगारच असला पाहिजे. आपण ज्या मंत्रिकाचा वध केला आहे त्याच्या बापानेंच किंवा दुसऱ्या कोणी नातेवाइकानें हें कृत्य केलें असावें. आपणच या सर्वांला कारणीभूत आहों. परंतु मुलाच्या जीवाला अपाय नाहीं हें ज्योतिष्यांनीं सांगितलें आहे. ग्रहदशा संपल्यावर नक्कीच त्याची व आपली भेट होईल.

लवाचा वध झाला तेव्हां त्याचें वय सुमारें सोळा वर्षांचें असेल. राजकुमाराला सोळावें वर्ष लागल्यानंतर सूड घेण्याचें मारुदेवानें ठरविलें होतें. त्याला सोळावें वर्ष लागल्यावर मारुदेव त्याला घेऊन तोरण देशांत आला. तो राजकुमाराला म्हणाला—"बाळ! तूं ही पेटी घेऊन जाऊन नजराणा म्हणून राजाला दे. तूं ल्हान असतांना तुझा मोठा भाऊ तोरण देशाच्या राजाकडे गेला होता. त्यावेळीं राजानें तुझ्या भावाचा जो सत्कार केला होता त्याबद्दल कृतज्ञता स्वरूप ही पेटी घ्यावी अशी विनंति कर!"



"मला कोणी भाऊ होता का? मग मला इतके दिवस कां नाहीं सांगितलेंत?" राजकुमारानें विचारलें.

"कळेल तुला सर्व! तू प्रथम जाऊन ही पेटी दे राजाला. नंतर तेथेंच कदाचित तुझी भेट होईल तुझ्या भावाशीं." मारुदेव म्हणाला.

राजकुमार पेटी घेऊन राजदरबारीं राजाच्या भेटीला गेला. त्यानें नमस्कार करून राजासमोर ती पेटी ठेवली व म्हणाला—"महाराज! मी मारुदेव नांवाच्या मांत्रिकाचा मुलगा आहें. कांहीं वर्षां पूर्वीं माझा मोठा

भाऊ आपल्या मंत्रविद्येचें प्रदर्शन करण्यासाठीं आपल्या दरबारीं आला असतां आपण त्याचा जो सत्कार केलांत त्याबद्दल आभार म्हणून माझ्या वडिलांनीं ही पेटी आपणांकडे पाठविली आहे." त्यानें ठेवलेली पेटी राजानें उघडून पाहिली तेव्हां त्याला त्याच्या मुलाचीं तो नाहींसा झाला होता त्या दिवशीं त्यानें अंगांत घातलेलीं वस्त्रें दिसलीं.

राजाला दुःखवेगाबरोबर भयंकर राग आला. तो तलवार उपसून त्याचा वध करायला तयार झाला. परंतु मंत्री जवळच उभा होता. म्हणाला—"महाराज! थांबावें. घाई करूं नये. हीं वस्त्रें राजकुमाराचीं आहेत ही गोष्ट खरी आहे. परंतु राजकुमाराचा वध झाला असता तर पूर्वींच हीं वस्त्र आपणांकडे आलीं असतीं. या मुलाचें वयदेखील राजकुमार जिवंत असतां तर त्याचें वय जितकें असतें तितकेंच दिसत आहे."

मंत्र्यानें तीं वस्त्रें हातांत घेऊन पाहिलीं तेव्हां त्यांत त्याला एक पत्र दिसलें. पत्रांत असा मजकूर होता—"राजा! तूं माझ्या मुलाचा वध केलास. तुझ्या हातून झालेल्या माझ्या मुलाच्या वधाबद्दल मी अशा तऱ्हेनें सूड उगविला आहे"

तें पत्र पाहून राजा चकित झाला. मंत्र्याला तें कोडें उलगडलें. तो हजर नसता तर राजानें आपल्या मुलाचा वध स्वतःच्या हातानेंच केला असता. आपल्या मूर्खपणाबद्दल राजानें पश्चात्ताप करून आपल्या मुलाला पोटाशीं धरलें. नंतर त्यानें मारुदेवाला बोलावून त्याची माफी मागितली व त्याच्या औदार्याबद्दल कृतज्ञता व्यक्त केली.





# मंत्र्याचें चातुर्य

मणिपुराच्या राजानें आपल्या मुलीच्या वाढदिवसाच्या समारंभाच्या वेळीं तिला एक नवरत्नांचा हार तयार करवून घातला. तो मूल्यवान हार रात्रीं चोरीला गेला.

अंतःपुरांत राहणाऱ्या व झोंपणाऱ्या मुलीच्या गळ्यांतला हार बाहेरचा मनुष्य येऊन चोरून घेऊन जाणें शक्य नव्हतें. परंतु चोरी कोणी केली या गोष्टीचा शोध लावणें सोपें नव्हतें. प्रत्येकाला जाऊन "तूं चोरला होतास का हार?" असें विचारणारा मुर्ख ठरला असता. म्हणून मंत्र्यानें एक युक्ति योजली. त्यानें तिघां जणांना गुप्तपणें जें करावयाचें तें नीट समजाऊन सांगून त्या कामावर नेमलें.

दुपारीं राजवाड्याच्या मंडपांत राजवाड्यांत राहणाऱ्या प्रत्येकास एकत्र जमण्यास सांगितलें. सर्व एकत्र जमल्यावर तो म्हणाला—"राजकन्येच्या गळ्यांतला हार रात्रीं कोणी तरी चोरी करून काढून नेला आहे. ज्यानें चोरी केली असेल त्यानें तो हार स्वतः होऊन आणून दिला तर त्याला या खेपेस माफ करण्यांत येईल. दिला नाहीं व चोरी पकडली गेली तर जो दंड किंवा शिक्षा होईल ती मात्र त्याला जन्म भर आठवेल, हें मी पहिल्यानेंच सांगून ठेवतों." परंतु कोणीच कांहीं बोलला नाहीं.

त्याच सुमारास राजधानींत एक मांत्रिक आला. त्याला भूतविद्या माहीत होती. मंत्र्यानें त्याला बोलाविलें व म्हणाला—"तुमच्या मदतीची आम्हांला गरज आहे." असें सांगून मंत्री त्या मांत्रिकाला राजवाड्याच्या दिवाणखान्यांत बोलावून घेऊन आला.

त्या वेळीं एक मनुष्य धांवत एका व्यापाऱ्याच्या वेशांत प्रवेश करून म्हणाला—"महामंत्री! मायबाप! रक्षण करा गरिबाचें. काल रात्रीं आमच्या घरीं दहा हजार रुपयांचा माल चोरीला गेला." असें सांगून त्यानें मंत्र्याच्या पायांवर लोटांगण घातलें.

लगेच मंत्री भूतविद्या जाणणाऱ्या मांत्रिकाला बोलावून म्हणाला—"महात्मन्! ज्या चोरानें या विचाऱ्याच्या घरीं चोरी केली आहे, त्याच्या घराचा पत्ता सांगावा."

मांत्रिकानें आपल्या कमंडलूंतलें थोडें पाणी घेऊन मंत्र म्हटल्यासारखें कांहीं तरी म्हटलें व तेथें जमलेल्या सर्व लोकांवर तें शिंपडलें. त्याबरोबर एक जण जोरजोरानें ओरडूं लागला व जमिनीवर बेशुद्ध होऊन गडबडा लोळूं लागला. म्हणाला—"वांचवा मला! माझा जीव घेऊं नका! मीच चोरी केली आहे. मी सर्व माल पोंचता करायला तयार आहें! कान धरला, यापुढें कधीं चोरी करणार नाहीं."

"मरूं दे त्या मूर्खाला! राजवाड्यांतून रत्नहार चोरीला नेणाऱ्या त्या मूर्खाचें नांव व पत्ता सांगावा!" मंत्री मांत्रिकाला म्हणाला.

लगेच एक दासी पुढें येऊन हात जोडून क्षमा मागू लागली—"महामंत्री! माफ करा, मीच तो हार चोरला होता. पुन्हां कधीं चोरी करणार नाहीं. पायां पडतें आपल्या!"

भूतबाधेमुळें जमिनीवर गडबडा लोळणारा मनुष्य उठून उभा राहिला. त्या मांत्रिकानें व व्यापाऱ्यानें आपला नकली वेश काढून फेंकून दिला. अशा तऱ्हेनें मंत्र्यानें नेमलेले तिघे तेच होते. मंत्र्याच्या चातुर्यामुळें चोरी गेलेला रत्नहार सांपडला.





# कोट्याधीश

कांचीपुरींत एक कोट्याधीश व्यापारी रहात असे. त्याला लोक कुबेरच म्हणत. इतका श्रीमंत होता तो. त्याला पुष्कळ मुलें व मुली होत्या. त्यानें आपल्या जावयांना देखील आपल्या घरांत मोठमोठ्या हुद्यांवर नेमलें होतें. अशा तऱ्हेनें त्याला व्यापारांत पुष्कळ फायदा मिळूं लागला. नातेवाईक व नागरिक नेहमीं त्याच्या कृपाकटाक्षाची अपेक्षा करीत.

परंतु मर्त्यलोकांतला हा कुबेर फार लोभी होता. त्यानें दानधर्म केला नाहीं कीं गरिबांच्या सुखसोयीसाठीं कांहीं धर्म कार्य केलें नाहीं.

एकदां एक बैरागी कुबेराच्या घरीं आला व म्हणाला—"अन्नदाता! एक वेळचें जेवण मिळेल या अपेक्षेनें आलों आहें."

"पुढें हो पुढें! आला आहे भीक मागायला! चोर कुठला!" कुबेर म्हणाला.

"मी चोर असतों तर भीक मागायला कां आलों असतों!" बैराग्यानें विचारलें.

याच्याशीं गप्पांत वेळ घालविण्यापेक्षां याला बाहेर काढावें असा विचार करून त्यानें नोकरांकरवीं बैराग्याला धक्के मारून बाहेर काढविलें. पण तो सामान्य बैरागी नव्हता. तो हट्टाला पेटला. "खाण्यापिण्यासाठीं शिधा तरी द्यावा किंवा जेवायला वाढावें. तोंपर्यंत मी येथून हटणार नाहीं." असें सांगून तो संध्याकाळपर्यंत त्या कुबेराच्या दारासमोर उपाशी ठाणें देऊन बसला.

"तूं मेलास तरी मी तुला एक दमडी देखील देणार नाहीं." कुबेर म्हणाला. बैरागी तीन दिवस त्याच्या घरासमोर धरण



देऊन बसला. कुबेराच्या नातेवाइकांना वाटलें कीं बैरागी कुबेराला शापबीप देईल. परंतु तो मुळींच भ्याला नाहीं. उलट त्यानें आपला दरवाजा आंतून बंद करून घेतला. बाजूच्या एका दारानें तो बाहेर जाऊं येऊं लागला. कांहीं दिवसांनीं बैरागी निघून गेल्याचें त्याला आढळून आलें. कुबेराला स्वर्ग जिंकून आल्यासारखा आनंद झाला. पण त्यानें दार उघडतांच बैरागी पुन्हां आला.

"हा बैरागी शनीसारखा लागला आहे माझ्या पाठीस! चवकशी करून तर पहा कीं त्याला काय हवं आहे." कुबेरानें एका नोकराला विचारून यायला पाठविलें.

"मी कांहीं भीक मागायला तुझ्याकडे आलों नाहीं. तुझ्याशीं मला कांहीं बोलावयाचें आहे." नोकराच्या हातीं बैराग्यानें कुबेराकडे निरोप पाठविला. सहा महिने कोणाला भेटायला मला सवड नाहीं असें उत्तर कुबेरानें बैराग्याकडे पाठविलें. बैरागी निघून गेला व बरोबर सहा महिन्यांनीं पुन्हां आला. कुबेरानें असें अनेक वेळां बैराग्याला झुलविलें. अशातऱ्हेनें एक वर्ष लोटलें. आतां सुटका नाहीं असा विचार करून कुबेरानें त्याला भेटण्याचें ठरवून बोलाविलें.

"पुरें एक वर्ष लोटलें, मी पाहातों आहे, स्वतःचीं बायको पोरें व नातेवाईक यांच्या मायेमुळें आणि मोहामुळें तुला डोळे असूनहि दिसत नाहीं." बैरागी म्हणाला.

"आपल्या बंधुभावडांना सोडून देण्याचा उपदेश देण्यासाठींच का तूं येत होतास इतके दिवस?" कुबेरानें विचारलें.

"तूं ज्यांना आपला आपला म्हणतो आहेस, त्यांपैकीं तुझा असा कोण आहे? तुझ्याजवळ पैसा आहे तोपर्यंतच गुळावरच्या माशासारखे हे बंधुबांधव तुझ्या भोंवती आहेत. त्यानंतर तूं जिवत आहेस कीं मेला आहेस हें पहायला देखील कोणी राहणारा नाहीं. पाहिजेतर मी ही गोष्ट सिद्ध करून दाखवितों." बैरागी म्हणाला.

त्या गोष्टीस कुबेर कबूल झाला व बैरागी एका उपाय सांगून निघून गेला.

पुढें कांहीं दिवसांनीं कुबेरानें आजाराचें सोंग केलें. तो बायकोला म्हणाला—"मरण जवळ येत चालल्याचें दिसतें आहे. इतके दिवस मी धर्मकार्य केलें नाहीं. एका वर्षानंतर मरण आलें असतें तर किती बरें झालें असतें?" असें बोलत असतांनाच त्याची दातखीळी बसली व तो बेशुद्ध होऊन पडला. त्याची बायको घाबरली. तिनें वैद्याला बोलावून औषध द्यायला सांगितलें. पण डॉक्टराला आजार काय आहे हें कळेल तर ना तो कांहीं औषधपाणी करील? वैद्य निघून गेला. बैराग्यानें सांगितल्याप्रमाणें कुबेरानें पोट दुखीचें सोंग केलें होतें.

कुबेराकडे पंक्तीला दोनशें वर लोक जेवायला असत. ते कुबेराच्या पलंगाला गराडा घालून रडूं लागले. मोठमोठे लोक राम, कृष्णदेखील मृत्यूच्या मुखांतून सुटले नाहींत मग आपल्या सारख्या पामर मानवांची काय कथा?













नेमका त्याच वेळीं बैरागी तेथें आला. त्यानें एका भांड्यांत दूध घेऊन सर्वांना गपचुप बसायला सांगितलें व म्हणाला— "कुबेर जिवंत रहावा असें कोणाला वाटत असेल तर त्यानें समोर यावें. हें औषध उगाळून प्यावें लागेल.

कुबेराची बायको म्हणाली—"काय वाटेल तें औषध द्या. पण यांना वांचवा हो!"

बैरागी म्हणाला—"ही मंत्रवलेली मुळी आहे. ही उगाळून पिणाराला तत्काळ मरण येईल. परंतु जो मरेल त्याचें उरलेले आयुष्य रोग्याला मिळेल. आपलें आयुष्य कुबेराला देण्याची ज्याची तयारी असेल त्यानें हें औषध उगाळून प्यावें."

एकाच्या तोंडून ब्र देखील निघाला नाहीं. बैराग्यानें विचारलें—"तर मग नाहीं कोणी तयार?" परंतु त्याचें उत्तर कोणी दिलें नाहीं.

"काय पण मूर्ख आहे हा कुबेर ज्यानें स्वतः झीज सोसून तुम्हां सर्वांना सुखी केलें आतां मरायला टेंकला आहे त्याला जिवंत ठेवण्यासाठीं तुमच्या पैकीं एकजण देखील पुढें यायला तयार नाहीं? दुर्दैव त्याचें! त्यानें तुम्हांला सुखी करण्यासाठीं दानधर्म केला नाहीं कीं पर लोकाची देखील पर्वा केली नाहीं. पण आज मरणसमयीं तुमच्यापैकीं एक जणदेखील त्याच्या मदतीला येत नाहीं."

"उघडले माझे डोळे!" असें म्हणत कुबेर उठून बसला. सर्व चकित होऊन त्याच्याकडे पाहूं लागले. कुबेरानें आपल्या सर्व नातेवाइकांना घराबाहेर काढलें व आपली सर्व इस्टेट धर्मार्थ खर्च केली, व्यापार मुलांच्या हातीं दिला व स्वतः वानप्रस्थाश्रमांत प्रवेश केला.





# परोपकारी गोपाळ

गोपाळ ज्या गांवीं रहात असे त्या गांवीं गोपीनाथ नांवाचा एक गृहस्थ रहात असे. दोघे समवयस्क व मित्र होते. दोघांचे स्वभाव पण सारखेच होते. थोडा फरक दोघांत होता तो एवढाच कीं गोपीनाथाला मुलेंबाळें पुष्कळ होतीं. त्या मानानें प्राप्ति अगदीं बेताची. वडिलोपार्जित इस्टेटसुद्धां नव्हती. परंतु त्यानें कोणासमोर कधीं हात पसरला नाहीं.

गोपाळ गोपीनाथाच्या घरीं जाई तेव्हां त्याचीं मुलें त्याला 'काका' 'काका' म्हणून हाक मारीत. गोपाळ त्यांना खाऊ आणून देई व त्यांना प्रेमानें जवळ बोलावून त्यांच्याशीं बोले.

एकदां गोपाळ गोपीनाथाच्या घरीं गेला असतां घरांत गोंधळ उडून गेलेला त्याला दिसला. कारण कांहीं वर्षांपूर्वी गोपीनाथानें एका मारवाड्याकडून कर्ज घेतलें होतें व तें चक्रवाढ व्याजानें इतकें वाढलें होतें कीं गहाण ठेवलेलें घर लिलावांत निघालें. पुरे दोन हजार रुपये द्यायचे होते. गोपीनाथ कोठून आणून देणार?

गोपाळ गोपीनाथाच्या घरीं पोंचला तेव्हां तो बायकामुलांसह घरा बाहेर अंगणांत उभा होता. त्याची आई त्याला रागावत होती— "कोणी सांगितलें होतें तुला कर्ज काढायला? आतां बायकापोरें उघडीं पडली कीं नाहीं."

सावकार म्हणाला—"आजी! तुम्हीच विचार करा, अहो, महिना, दोन महिने वर्ष दोन वर्षें माणसानें वाट पहावी. त्यानंतर वाट पहाणारा मूर्ख! मी आतांपर्यंत दहा वेळां तरी निरोप धाडला असेल."



अशाप्रसंगीं गोपाळ तेथें आला. तें गोपीनाथाला आवडलें नाहीं. त्यानें विचार केला, गोपाळ सर्व कर्जाची जबाबदारी स्वतः-वर घेईल. मग त्याच्या उपकाराची फेड कशी केव्हां करावयाची ? म्हणून तो गोपाळची मदत कधींच घेत नसे.

गोपाळ त्या सावकाराला व गांवच्या पाटलाला एका बाजूला बोलावून घेऊन गेला व सर्व परिस्थिति समजून घेतली. सावकार एक दिवसाची देखील सवड द्यायला तयार नव्हता. तो म्हणाला—"संसाराचा व्याप आतां मला होत नाहीं. मुलावर सावकारीचें काम टाकून मी वानप्रस्थाश्रमांत प्रवेश करणार आहें. तेव्हां जुन्या बाक्या वसूल करून मोकळा होण्यासाठीं मला हें सर्व करावें लागत आहे."

गोपाळ त्याला जें कांहीं सांगावयाचें होतें सांगून गोपीनाथाकडे येऊन म्हणाला—"चल घरांत, मी आहें तोंपर्यंत मी तुला घराबाहेर जाऊं देईन असें वाटलें होय तुला ?" गोपीनाथाच्या इच्छेविरुद्ध त्याच्या मुलांबाळांना तो घरांत बोलावून घेऊन गेला. म्हणाला—"यारे मुलांनो आंत !"

गोपाळचें तें औदार्य पाहून गोपीनाथाचे डोळे ओले झाले. मित्र असावा तर असा. संकटाच्या वेळीं जो मदतीला धांवून येतो तोच खरा मित्र ! म्हणाला—"अरे गोपाळ तूं माझ्यासारख्यांचा उद्धार काय करणार आम्ही तर बुडतच आहों, आमच्याबरोबर तूं देखील बुडशील आणि आज तूं वांच-विलेंस म्हणून काय झालें ? उद्यां नाहीं तर परवां पुन्हां केव्हांतरी घर लिलावांत निघणारच आहे."

"हें सर्व ऐकायला मी येथें आलों नाहीं ! मुकाट्यानें घरांत चल बघूं आधीं." गोपाळ म्हणाला.



तो त्या सावकाराला बोलावून घेऊन आपल्या घरीं गेला. गोपीनाथावर कर्जाचें जेवढें ओझें होतें तें फेडण्याची शक्ति खरोखरी गोपाळच्या अंगांत नव्हती. कोणाकडे जाऊन कर्ज मागून घेऊन यावें तर त्याला कोण कर्ज देणार ? कारण त्या भोळ्या तुकारामाकडून कर्जाची फेड अशक्यच होती. त्याचा नांवलौकिक दांडगा !

सावकार म्हणाला—"गोपाळराव ! तुमच्या शब्दावर माझा विश्वास आहे. परंतु मला पैशाची गरज आहे. नकद रक्कम देणें तुम्हांला शक्य नसेल तर कोणती तरी वस्तु किंवा दुसरें जास्त किमतीचें घर गहाण ठेवून घ्यायला माझी तयारी आहे."

"ठीक आहे ! मी आपलें घर व शेत गहाण ठेवतों." गोपाळ म्हणाला.

सावकार त्याला कबूल झाला. गोपाळचें घर व शेतजमीन स्वतःच्या नांवीं लिहून घेऊन वर शंभर रुपये त्यानें गोपाळाला दिलें.

हें सर्व झाल्यावर गोपाळ आपल्या सासुरवाडी गेला. त्याची बायको आईबापाची एकुलती एक मुलगी होती.



म्हणून माहेरची सर्व इस्टेट तिच्याच वांट्याला आली होती. माहेरचें घर व शेत जमीन तिला मिळाली.

स्वतःचें घर सावकाराच्या नांवीं लिहून देऊन गोपाळ घराबाहेर पडला तेव्हां त्याची आई त्याला म्हणाली—"तुझीं लक्षणें मी पहातच होतें. बापानें दिलें तें तूं घालवून बसलास. स्वतःची मिळकत शून्यच !"

"आई ! त्यांत काय झालें. सारें जग आहे आपल्याला रहायला. हें एकच घर काय घेऊन बसली आहेस ?"



सावकाराचा मुलगा आपल्या बायका मुलांना घेऊन गोपाळच्या घरांत येऊन राहूं लागला. तेव्हांपासून त्याच्या स्वभावांतच पालट झाला. त्यानें गोपाळच्या घरांत दुरुस्ती करून घेऊन तीनचार नवीन खोल्या वाढवल्या. मजुरांना जास्त मजुरी देऊं लागला. याशिवाय तो दानधर्म पण करूं लागला. त्यानें इतका दानधर्म केला कीं लोक त्याला कलियुगांतला कर्ण म्हणूं लागले. पूर्वी तो आपल्या बापासारखाच चिक्कू मारवाडी आहे अशी त्याची कीर्ति होती. 'कवडीचुंबक' ही पदवी गांवकऱ्यांनीं त्याला बहाल केली होती. असा मनुष्य दानधर्म करूं लागलेला पाहून अर्थातच सर्वांस अश्चर्य वाटलें.

गोपाळ घर सोडून निघाला तेव्हां सर्व गांवकऱ्यांना वाटलें कीं मूर्तिमंत परोपकारच घराबाहेर पडला आहे. परंतु त्या सावकाराचा दानधर्म पाहूनतें गोपाळ पेक्षां त्या सावकारालाच जास्त मान देऊं लागले. दोघे परोपकारी होते. दोघांत फरक होता तो एवढाच कीं सावकार सावकारच होता. परंतु गोपाळनें पैशांची मदत करण्याऐवजीं श्रमदान करूनच गरिबांचीं मनें जिंकली होतीं.

परंतु पुढें कांहीं दिवसांनीं लोकांना कळलें कीं सावकार जातीचा परोपकारी नसून गोपाळच्या घरीं राहूं लागल्यापासूनच त्याच्या मनांत एवढा पालट झाला आहे. म्हणजे तें त्या घराचें महात्म्य आहे. लोकांचा त्या गोष्टीवर विश्वासपण बसत गेला.

सावकाराचा म्हातारा बाप एका मोठ्या पेठेच्या गांवीं रहात असे. त्याच्या पेढीवर लक्षावधि रुपयांची देवघेव होई. त्याच्या कानावर मुलाच्या दानी स्वभावाचीं वर्णनें पोंचलीं. मुलगा गोपाळच्या गांवीं जाऊन कामधंदा सुरू करून तो वाढविण्याऐवजीं दान-धर्म करून पैसा उडवीत असल्याचें कळलें तेव्हां त्याला मुलाचा फार राग आला. मुलाचा स्वभाव बदलल्याचें मूळ कारण तें कुलक्षणी घर असल्याचें ऐकून तो जास्तच काळजींत पडला. तो सरळ आपल्या मुलाकडे गेला व म्हणाला—"हें कुलक्षणी घर विकून टाक बघूं! दिवाळें निघायची वेळ आली आहे तरी तुझे डोळे कसे नाहीं उघडत?"

सावकारानें आपल्या म्हाताऱ्या बापाला पुष्कळ समजावून सांगितलें कीं तें घर चांगलें आहे. त्या गांवचें हवापाणीपण सर्वांना मानवलें आहे. परोपकार करण्यांत जो एक तऱ्हेचा आत्मिक आनंद मिळतो तो धनार्जन करून कधीं मिळणें शक्य नाहीं. तें ऐकून बाप जास्तच काळजींत पडला. म्हणाला—"आतां या घरांत एक क्षणभर देखील मी तुला राहूं देणार नाहीं!"

सावकारानें गोपाळचें घर व शेत विकून टाकून बापाच्या इच्छेप्रमाणें पेठेच्या गांवीं जाण्याचें ठरविलें. पण त्या प्रयत्नांत देखील त्याला यश मिळालें नाहीं. कारण त्या कुलक्षणी घरांत जो पाऊल ठेवील त्याच्या हातांत करवंटी येईल ही भीति प्रत्येकाला वाटत होती.

"हें घर तुम्हांला प्राप्त नाहीं. तुम्ही तें गोपाळरावांना देऊन टाका. कोणी तें विकत घ्यायला तयार होणार नाहीं—फुकट दिलेंत तरी घेणार नाहीं." पाटलानें सल्ला दिला. म्हातारा पाटलांच्याबरोबर गोपाळच्या सासुरवाडच्या गांवीं गेला व म्हणाला—"गोपाळराव! तुमचें घर तुम्हांलाच लखलाभो! आम्हांला नको तें!"

गोपाळ पुन्हां आपल्या गांवीं येऊन राहूं लागला.





# राजदरबारी मान

एका गांवीं गोविंद नांवाचा एक तरुण युवक रहात असे. तो अशक्त होता, परंतु फार हुशार होता. खेडेगांवांतल्या लोकांना काबाडकष्ट करावेच लागतात. पण गोविंदाला तें शक्य नव्हतें. म्हणून त्याचा मोठा भाऊ व भावजय त्याला एक निरुपयोगी मनुष्य समजून त्याच्याशीं बोलत व वागत. परंतु गांवकरी त्याचा फार आदर करीत. कारण त्यांच्यासमोर कांहीं प्रश्न उभा राहाला कीं ते गोविंदाकडे येत व तो कांहीं तरी सला देऊन मार्ग काढी. ते गोविंदाच्या भावाला म्हणत—"तूं आपल्या भावाला अगदीं निरुपयोगी समजून सोडून दिला आहेस. पण पहा, आम्हां सर्वांना त्याच्या सल्ल्याचा किती उपयोग होत आहे तो."

परंतु गांवकऱ्यांनीं आपल्या निरुपयोगी भावाचे गुणानुवाद केलेले गोविंदाच्या भावाला खपत नसत. तो म्हणे—"तो इतका हुशार आहे व गुणवान आहे तर मग राजदरबारीं जाऊन राजाच्या पदरीं नोकरी कां नाहीं करीत?

गोविंदानें तें सर्व ऐकलें व राजाच्या दरबारीं मान मिळवीन तरच नांवाचा गोविंद असा त्यानें मनाशीं निश्चय केला.

दरवर्षीं गुढीपाडव्याला दरबार भरे व राजा कर्तबगार नागरिकांचा सत्कार करी. राजा कांहीं प्रश्न करी व प्रश्नांचीं उत्तरें बरोबर देणाऱ्यांचा बक्षिसें देऊन मान करी. गुढी पाडवा जवळच आला होता. त्या दिवशीं गोविंद राजधानीच्या गांवीं गेला व दरबारांत हजर झाला.



राजाच्या प्रश्नांचीं उत्तरें देणाऱ्यांस बसण्यासाठीं एक निराळी जागा ठरलेली होती. राजानें कांहीं सोपे प्रश्न विचारले. "आपल्या राज्यांत खरें बोलणारे किती आहेत?" पहिला प्रश्न होता. कोणी त्याचें उत्तर दिलें, "एक लाख आहेत." एक जण म्हणाला—"शंभराहून जास्त नसतील."

"आपल्या पदरीं काम करणारे जास्त लोक खरें बोलणारे आहेत!" गोविंद म्हणाला.

"कशावरून?" राजानें विचारलें.

"कारण कोणी खोटें बोलणारा असता तर आपण त्याला नोकरीवरून काढून टाकलें असतें." गोविंद म्हणाला.

राजानें आणखी एक प्रश्न विचारला—"मला माझ्या आवडीचा पोशाख कसा काय मिळेल?"

"आपले नोकर आणून देतील!"

"लोक आपल्याला नजराणा म्हणून देतील."

असेंच कांहींतरी उत्तर प्रत्येकानें दिलें. परंतु गोविंद म्हणाला—"महाराजांना कोणता पोशाख आवडतो हें कळल्यास हुशार कोष्टी तो विणून देईल. चांगल्या शिंप्याकडून शिवून घेतले कीं झालें."

"कोणाचा विश्वास बसणार नाहीं असें एखादें खोटें सांगा!" राजा म्हणाला.

एक जण म्हणाला—"मी आकाशांत उडून आलों." दुसरा म्हणाला—"माझे पाय तुटून गळून पडले होते. पुन्हां जोडले आणि मी दरबारांत आलों."

"या दरबारांत बसलेला प्रत्येक मनुष्य म्हसोबा आहे." गोविंद म्हणाला.

त्यानंतर राजानें ज्यांना जें बक्षिस द्यावयाचें होतें तें दिलें व गोविंदालापण एक बक्षिस दिलें. पानसुपारीबरोबर एक पदक व धोतर उपरणें पण देण्यांत आलें. राजानें त्याला स्वतःच्या पंक्तीला जेवायला बोलाविलें. गोविंदानें दरबार संपल्यावर

राजाकडून मिळालेलें धोतर व उपरणें कोणाला तरी देऊन टाकलें व आपला नेहमीचा पोशाख करून तो मेजवानीला गेला. जेवतांना रोज घरीं तो जें खाई तेवढेच त्यानें मागून घेतलें व जेवला. एकाहि पक्वान्नाला त्यानें हात लावला नाहीं.

राजाला तें कळलें. त्यानें त्याला बोलावून कारण विचारलें—"मी तुला उत्तमोत्तम वस्त्रें दिलीं होतीं. तीं घालून तूं कां आला नाहींस? व पक्वान्नाला हात लावला नाहींस तें कां? राजाचा अपमान नव्हे का हा?"

"महाराज, मी गरीब आहें. आपण दिलेलीं वस्त्रें मी चार दिवस घालीन. पुढें मला स्वतःचे कपडे घालायला लाज वाटेल. म्हणून मी आपण दिलेला पोशाख दान करून टाकला. माझें रोजचें जेवण आहे, वरण भात व पोळी भाजी. मी हीं सर्व पक्वान्नें खाल्लीं असतीं तर मला त्यांची चटक लागली असती व तीं खायला मिळावी म्हणून खोटे कारभार करावे लागले असते. म्हणून आपल्या शक्ति बाहेर जें आहे तें न करण्याच्या हेतूनेंच मी पक्वान्नें खाल्लीं नाहींत." गोविंद म्हणाला.

"मी एक सोन्याचें पदक दिलें होतें तें?" राजानें विचारलें.

"महाराज! तें मी मला लहानाचा मोठा करून मला राजदरबारीं मान मिळण्यालायक ज्या भावानें बनविलें त्याला देण्यासाठीं तें मी राखून ठेवलें आहे." गोविंद म्हणाला.

राजा तें उत्तर ऐकून खूष झाला त्यानें त्याला आपल्या दरबारीं मोठी मानाची जागा दिली.





## अंगारवतीची कहाणी

वत्स देशाचा राजा उदयन याचा विवाह वासवदत्तेशीं कसा झाला ही गोष्ट चांदोबांत पूर्वीं तुम्ही वाचलीच असेल. तिच्या वडिलांचें नांव चंडमहासेन असें होतें. तो चंडिकेचा भक्त होता. त्यानें तपश्चर्या करून चंडिकेला प्रसन्न केलें. चंडिकेनें प्रत्यक्ष दर्शन देऊन वर मागण्यास सांगितलें. महासेनानें एक उत्कृष्ट खड्ग व सुंदर राणी मिळावी असे दोन वर मागितले. चंडिकेनें आपल्या हातांतलें खड्गच त्याला दिलें व म्हणाली कीं तुला गुणवती राणी पण मिळेल.

चंडमहासेन चांगली बायको मिळेल ही आशा धरून वाट पहात होता. परंतु दुर्दैवानें उज्जयिनीवर एकाएकीं एक संकट कोसळलें. नगर रक्षक म्हणून ज्याला ज्याला नेमावें त्याला कोणी तरी अजगर गिळून टाकी किंवा हिंस्र पशु खाऊन टाकी. म्हणून चंडमहासेन स्वतः आपलें दिव्य खड्ग घेऊन रात्रभर राजधानींत पहारा देऊं लागला. एकदां त्याला एका गल्लींत एक मनुष्य दिसला. चंडमहासेनानें तत्काळ त्याचा शिरच्छेद केला. इतक्यांत एक राक्षस आला व मेलेल्या माणसाचें डोकें उचलून घेऊन गेला. नगर रक्षकाचा वध करणारा हाच राक्षस असावा असा विचार करून चंडमहासेनानें एका हातानें त्याची शेंडी धरली व दुसऱ्या हातानें त्याचा शिरच्छेद करण्यासाठीं तलवार वर उचलली.

तो राक्षस जोरानें ओरडला—"महाराज! माझा वध कां करतां? तुमच्या नगर रक्षकाला मी नाहीं खात. त्याला खाणारा आणखी एक जण आहे."



"कोण आहे तो? कोठें राहतो तो?" राजानें विचारलें.

"त्याचें नांव अंगारक असें आहे. तो पाताळ लोकीं राहातो. रात्रीं येऊन तुमच्या नगर रक्षकाला तो खातो. एवढेंच नव्हे, तो कित्येक कुमारिकांना पळवून घेऊन गेला आहे. त्याला अंगारवती म्हणून एक मुलगी आहे. तिच्या सेवेला त्या हजर राहतात. त्याला ठार केलास तर देवीचा दुसरा वर पुरा होईल." राक्षस म्हणाला.

चंडमहासेनानें त्या राक्षसाला सोडून दिलें. नंतर तो शिकारीसाठीं म्हणून रानांत गेला. एक विलक्षण रानडुकर दिसलें. तें डुकर म्हणजे लहानशी टेकडीच म्हटलें तरी चालेल. त्याचे डोळे निखाऱ्यासारखे लालबुंद होते. हें सामान्य डुकर नसून अंगारकच असावा असें समजून त्यानें त्याला बाण मारला. त्या बाणाची त्यानें पर्वा केली नाहीं व चंडमहासेनाच्या रथाचा चक्काचूर करून टाकला. नंतर तो जमिनींत एक मोठें बिवर होतें त्यांत शिरला.

चंडमहासेन त्याच्या पाठोपाठ त्या बिवरांत शिरला व कांहीं वेळानें त्याला एक सुंदर नगर दिसलें. तेथें त्याला तें डुकर दिसलें नाहीं. एका जागीं एका मोठ्या विहिरीजवळ आपल्या शंभरवर दासीसह उभी असलेली एक सुंदर राजकुमारी दिसली.

त्याला पाहून ती त्याच्याजवळ आली आणि विचारूं लागली—"कोण तुम्ही? कोणत्या कामासाठीं आलां आहां?"

चंडमहासेन म्हणाला—"मी एका रान-डुकराचा पाठलाग करीत येथवर आलों. तें डुकर कोठें अदृश्य झालें, नाहीं कळलें मला."

तें ऐकून तिला त्याची दया आल्या-सारखें दिसलें. ती म्हणाली—"तें डुकर म्हणजे अंगारक. त्याचा वध करणें तुला शक्य नाहीं. त्याचें शरीर वज्राचें आहे. डुकराचें रूप सोडून तो आतां झोंपला आहे. तुला येथें पाहिलें तर तो तुला ठार करील. मी त्याची मुलगी. माझें नांव अंगार-वती. माझे बाबा जागे झाले तर तुमच्यावर जें संकट ओढवेल त्याचा विचार करूनच माझ्या अंगावर शहारे उभे राहतात."

चंडमहासेनानें विचार केला कीं देवी म्हणाली होती ती माझी होणारी गुणवती राणी हीच तर नसेल. अंगारवतीनें त्याला पाहिलें तेव्हांपासून त्यानें तिचें मन चोरलें होतें. म्हणाला—"राजकन्ये! तुझें माझ्यावर खरेंच प्रेम असेल तर तूं आपल्या बाबांना जाऊन सांग कीं त्यांच्यावर मोठें संकट ओढवणार आहे. त्यांचा काळ येऊन उभा राहाला आहे. त्यांना मरण आलें तर तुझें रक्षण करणारा कोणी उरणार नाहीं."

अंगारवतीनें आपल्या बाबांना उठवून चंडमहासेनानें सांगितल्याप्रमाणें सांगितलें. तो जागा झाल्याबरोबर ती रडूं लागली. म्हणाली—"बाबा! तुमच्या सारख्या प्रतापी राक्षसाला देखील यम सोडीत नाहीं. तो बाहेर दाराशीं उभा आहे."



अंगारक म्हणाला–"मुली! अशी भिऊं नकोस! मला ठार करण्याची शक्ति यमच काय ब्रह्मदेवाच्या अंगीं देखील नाहीं. माझा हा वज्रदेह आहे. कोणत्याहि शस्त्राचा प्रहार करून मला ठार करणें कोणाला शक्य नाहीं. आणखी एक गोष्ट तुला सांगून ठेवतों. माझा जीव माझ्या डाव्या हाताच्या तळ हातांत आहे. त्याच हातांत माझें धनुष्य असतें म्हणून कोणी मला कांहीं करूं शकणार नाहीं." अंगारक म्हणाला.

चंडमहासेन त्यावेळीं बाहेर उभा राहून सर्व ऐकत होता. त्याला अंगारकाचें तें मर्म सहजीं कळलें.

अंगारक स्नान करून शंकराच्या पुजेला बसला. त्याचवेळीं चंडमहासेन धनुष्य बाण घेऊन त्याच्यासमोर जाऊन उभा राहिला म्हणाला–"मी युद्धास आव्हान करीत आहें."

पुजेच्या वेळीं तो कोणाशीं बोलत नसे उजव्या हातांत अर्घ्य होता. म्हणून डाव्या हातानें खूण केली, थांब जरा." त्याच वेळीं चंडमहासेनानें त्याच्या डाव्या तळहाताला बाण मारून त्याचा वध केला.

अंगारक मरते वेळीं ओरडला– "पाण्याचा एक थेंबदेखील मी आज तोंडांत घातला नव्हता. मला ठार करणारा मला दरवर्षीं तर्पण करणार नाहीं तर त्याचे पांच मंत्री एकामागून एक मरतील."

अंगारकानें घरीं गेल्यावर अंगारवतीशीं विधिवत विवाह केला आणि अंगारकाच्या इच्छेप्रमाणें दरवर्षीं तर्पण करण्याची व्यवस्था करून दिली. तेव्हांपासून उज्जयिनीची प्रजा उदकदान उत्सव करूं लागली. चंडमहासेनानंतर त्याच्या वंशजांनीं तें व्रत चालू ठेवलें.





# गादीला योग्य वारस

मणिशील देशाचा राजा जगन्मित्र याला दोन राण्या होत्या. पण एकदेखील अपत्य नव्हतें." उतारवय होत आलें होतें. म्हणून राजानें कोणाला तरी मांडीवर घेऊन त्याला आपला वारस नेमायचें योजलें.

दोघां राण्यांना ही गोष्ट कळली तेव्हां प्रत्येकीनें आपापल्या नातेवाइकांकडे निरोप पाठवून एकेका तरुण युवकाला राजाच्यासमोर उभें केलें व प्रत्येकीनें हट्ट केला कीं तिच्या नातेवाइकालाच राजानें आपला वारस नेमावें. राजाला एक आवडती व दुसरी नावडती असें नव्हतें. म्हणून दोघांपैकीं एकीचें मन मोडणें त्याला शक्य नव्हतें. त्यानें आपल्या मंत्र्याचा सल्ला घेतला. मंत्र्यानें सल्ला दिला कीं दोघांना ठेवून घ्यावें. कांहीं दिवस त्यांची वागणूक पाहून मग ठरवावें कीं वारस होण्यालायक कोण आहे. नंतर मंत्री थोरल्या राणीचा नातेवाईक पद्ममित्र याला बोलावून म्हणाला–"राजा तुम्हांला दत्तक घेऊन वारस नेमण्याचा संभव आहे. म्हणून तुम्ही पंधरवडाभर सर्व राज्याची पहाणी करून यावें." मंत्र्यानें त्याला एक रथ व जरूर तेवढें धन खजिन्यांतून देवविलें.

पद्ममित्र पश्चिमेकडे निघाला. वाटेंत "काळ्या टेंकडीं नजीक चोरांनीं त्याला घेरलें. त्यांनीं त्याच्याजवळ होतें नव्हतें तें सर्व लुटून त्याला विचारलें–"बोल तूं कोण? कोठून आलास? खोटें बोललास तर तुला जिवंत परत जायला मिळायचें नाहीं."

पद्ममित्र घाबरून गेला. त्यांना स्वतःकडे वळवून घेण्याच्या उद्देश्यानें म्हणाला–"मी मणिशील देशाचा भावी राजा आहें. तुम्ही

सौ. शालिनीबाई घाटपांडे



मला सोडून दिलेंत तर मी राजा झाल्यावर तुम्हांला इनाम देईन."

तें ऐकून चोरांना वाटलें कीं त्याच्याकडून आपला पुष्कळ फायदा करून घेण्यासारखा आहे.

ते त्याला म्हणाले—"तर मग आम्हांला एक पत्र लिहून दे कीं तुला चोरांनीं पकडलें आहे व 'काळ्या टेंकडी' नजीक आमच्या टोळीच्या लोकांना दहा हजार रुपये आणून द्यावेत. चार दिवसांच्या आंत ही रक्कम पोंचती झाली नाहीं तर तुझ्या जिवाचें बरें-वाईट होण्याचा संभव आहे. रक्कम घेऊन येणाऱ्याला निशस्त्र यावें लागेल. आमच्या टोळीच्या माणसाला कोणी धरलें तर लगेच तुला ठार करण्यांत येईल." चोरांनीं सांगितल्याप्रमाणें पद्ममित्रानें पत्र लिहून दिलें. तें पत्र चोरांच्या सरदारानें पाठवून दिलें व पद्ममित्राच्या डोळ्यांवर एक पट्टी बांधून डोंगरांत एका गुप्तस्थानीं नेऊन ठेवून दिलें.

पद्ममित्राचें पत्र वाचून राजा घाबरून गेला. थोरल्या राणीनें हट्ट केला कीं चोरांनीं मागितलेले पैसे देऊन तिच्या नातेवाइकाला सोडवून आणावें. राजानें एका निशस्त्र सैनिकाच्या हातीं दहा हजार रुपये 'काळ्या टेंकडी' जवळ ठरल्या जागीं पोंचते केले. चोर त्या सैनिकाला त्याच जागीं थांबायला सांगून आपल्या गुहेंत गेला व पद्ममित्राला डोळ्यांवर पट्टी बांधून घेऊन आला

पद्ममित्र सर्वांवर रागावला—"मला चोरांच्या हातीं कैद करविण्यासाठींच मंत्र्यानें हा घाट घातला होता. सर्वांनीं मिळून माझी मान खालीं व्हावी म्हणून हा कट केला." धाकट्या राणीचा नातेवाईक पुष्पमित्र तें सर्व ऐकत उभा होता. त्यानें पद्ममित्राला एक गोष्ट विचारली.



म्हणाला—"चोरांच्या गुहेला वेढा देऊन सर्व चोरांना कैद करणें शक्य नाहीं का? किती आहेत चोर?"

"माझ्या डोळ्यांना पट्टी बांधून मला घेऊन गेले होते गुहेपर्यंत. गुहा कोठें आहे व गुहेंत किती चोर आहेत हें मला नाहीं ठाऊक!" पद्ममित्र रागावून म्हणाला.

"त्या चोरांना मी पकडतों. मला एक रथ व थोडे पैसे द्यावेत!" पुष्पमित्र मंत्र्याला म्हणाला. त्यानें योजलेला सर्व बेत मंत्र्याला गुप्तपणें सांगितला.

तो रथांत बसून सरळ 'काळ्या टेंकडी' जवळ गेला. तेथें रथ थांबला. लगेच चार पांच चोरांनीं पुढें येऊन गराडा घातला. ते दटावून म्हणाले—"तुझ्याजवळ जें कांहीं आहे तें काढून मुकाट्यानें समोर ठेव."

"हे पैसे मी तुमच्यासाठींच घेऊन आलों आहें. जो राजा होणार आहे त्याच्याकडून तुम्ही फक्त दहाच हजार मागून घ्यावेत याचें मला आश्चर्य वाटलें. मला दत्तक घ्यायचें सोडून तो म्हातारा राजा त्या भित्र्याला दत्तक घेणार आहे. चला, मी तुमच्या टोळींत सामील व्हायला आलों



आहे." असें सांगून तो रथांतून खालीं उतरला व सारथ्याला म्हणाला—"तूं येथेंच थांब. कोणी सैनिक किंवा राजाचें सैन्य येतांना दिसलें तर शंख वाजव."

चोरांना तें सर्व नाटक खरें वाटलें. ते त्याला त्यांच्या गुहेंत घेऊन गेले. सारथ्यानें केव्हां काम करायचें हें त्याला पूर्वींच नीट समजावून सांगण्यांत आलें होतें. म्हणून तो कोणाच्या नजरेस न पडतां चोरांच्या पाठोपाठ गेला. चोर व पुष्यमित्र गुहेंत शिरल्याबरोबर गुहेची जागा नीट पाहून घेऊन तो लगेच मागें फिरला व सरळ रथांत बसून राजधानींत गेला.

पुष्यमित्रानें चोरांना स्वतःकडे वळवून घेतलें. तो म्हणाला—"हें पहा, तुम्ही पुष्यमित्राचे डोळे बांधून त्याला येथवर आणलें होतें. तुम्ही किती पावलांवर कोठें वळलात, कोठें थांबलांत हें सर्व त्यानें ओळखून ठेवलें आहे. म्हणून माझ्या मतें तुम्ही ही गुहा सोडून तावडतोब निघून जावें. लपायला जागा माहीत नसेल तर मला एक जागा माहीत आहे. तेथें जाऊन आपण सर्व राहूं. चला माझ्याबरोबर!"

त्याच्या बोलण्यावर चोरांच्या विश्वास बसला. गुहेंत त्यांनीं ज्या मुल्यवान वस्तू चोरून आणून ठेवल्या होत्या त्या बांधून घेऊन चोर पुष्यमित्राबरोबर निघाले. ते कांहीं अंतर चालत गेले असतील, राजाच्या सैनिकांनीं येऊन त्यांना मुद्देमालासकट कैद केलें. चोराच्या हातांत शस्त्र नव्हतें. म्हणून त्यांना कैद करणें सोपें गेलें.

मंत्र्यानें पुष्यमित्राच्या चातुर्याची प्रशंसा केली व राजाला सल्ला दिला कीं त्यालाच दत्तक घेऊन आपला वारस नेमावें.





# युद्धकांड

राम विचार करीत बसला असतां विभीषणानें आणखी एक गोष्ट सांगितली, म्हणाला—"निकुंभ युद्ध करीत असतां कोणी तुझ्याशीं युद्धाला आला तर त्याच्या हातीं तुला नक्कीच मरण येईल. असें ब्रह्मदेवानें इंद्रजिताला सांगितलें होतें. तो होम भंग करण्याची हीच वेळ आहे."

रामाच्या आज्ञेनें लक्ष्मण, सुग्रीव, हनुमान व बिभीषण वानर सैन्य घेऊन इंद्रजिताचा होम भंग करण्यासाठीं निघाले.

राक्षस सैन्य मध्यें आडवें उभें होतें. बिभीषण लक्ष्मणाला म्हणाला—"इंद्रजिताचा होम पुरा होण्यापूर्वीं या सैन्याचा नाश झाला पाहिजे. तो होम अर्धवट सोडून इकडे येईल तेव्हां त्याला सहज ठार करतां येईल."

दोन्हीं सैन्यांनीं परस्परांच्या शक्तीची पराकाष्ठा करून दाखविली. परंतु शेवटीं राक्षसांचा धीर खचूं लागला व त्यांची पीछेहाट सुरू झाली.

तें ऐकून इंद्रजित आपला यज्ञ अर्धाच सोडून निघून आला. राक्षस सैन्य त्याच्या रथाच्या चारी बाजूला जमा झालें.

परंतु मारुतीनें मोठमोठे वृक्ष उपटून राक्षस सैन्याला झोडपून काढलें. सहस्रावधि राक्षस त्याला मारण्यास धांवले. परंतु मारुतीनें एकट्यानें त्या सर्वांची खोड मोडली.



राक्षसांचा धीर सुटत चाललेला पाहून इंद्रजितानें आपला रथ मारुतीकडे वळविला व त्याच्यावर बाणांचा वर्षाव सुरू केला. मारुती म्हणाला—" दुष्टा ! तूं खरोखरच वीर असशील तर सर्व शस्त्रें फेंकून देऊन ये माझ्याशीं मल्लयुद्धाला."

"मारुती एकटा आहे. तूं जाऊन इंद्रजितावर हल्ला कर व त्याला वाटेला लाव." बिभीषण लक्ष्मणाला म्हणाला.

लगेच दोघे निकुंभीकडे वळले. ती एका भयंकर काळ्या राक्षसिणी सारख्या झाडाखालीं उभी होती. याच जागीं इंद्रजित भुतांसाठीं बळी देऊन युद्धाला निघणार होता.

"लक्ष्मणा ! इंद्रजित त्या झाडाच्या पोकळींत शिरण्यापूर्वी त्याला ठार कर." बिभीषण म्हणाला.

लक्ष्मण लगेच त्या झाडाजवळ जाऊन उभा राहाला. त्यानें इंद्रजिताला युद्धासाठीं आव्हान केलें.

इंद्रजित लक्ष्मणाला कांहीं म्हणाला नाहीं. पण बिभीषणाकडे वळून मात्र म्हणाला—" काका ! तुम्हांला स्वतःच्या कुळाचा अभिमान दिसत नाहीं. ज्या कुळांत व ज्या जन्मभूमीवर जन्माला आलां त्याच्या असा विश्वासघात करीत आहां. भ्रातृप्रेम, बंधुबांधवांची माया किंवा धर्म यांपैकीं एकाची देखील तुम्हांला चाड नाहीं व तुम्हीं परक्यांचे दास झालां आहां. धिःकार असो तुमच्या बुद्धीला. मी यज्ञ करीत असतां विघ्न घालण्यासाठीं तुम्हींच लक्ष्मणाला या झाडाजवळ घेऊन आलांत असला विश्वासघात यापुढें कोणाच्याहि हातून न घडो !"

तें ऐकून बिभीषण म्हणाला—" मी काय म्हणतों तें प्रथम ऐक. तोंडाला येईल तें बोलण्यांत काय अर्थ ? मी राक्षसकुळांत जन्माला आलो हें खरें आहे. परंतु मला अधर्म होत असलेला पाहवेना. म्हणून धर्मरक्षणार्थ स्वतःच्या भावालादेखील सोडावें लागलें. सज्जनदेखील दुष्टांच्या संगतीनें दुर्जन होतात. परधन व परदारा यांचें अपहरण व बंधु मित्रांचा विश्वासघात हीं आत्मनाशाचीं कारणें होत. याच कारणास्तव तुझे वडील व तूं व तुमच्या बाजूनें लढणारे राक्षस सर्वांचा नाश होणार आहे. माया करून तूं एक प्रति सीता निर्मिलीस व तिचा वध करून तूं रामचंद्राचा अपमान केला आहेस. तुला या पृथ्वीवर जिवंत राहण्याचा अधिकार नाहीं. लक्ष्मणाच्या हातीं तुला मरण येईल व नरकवास भोगावा लागेल."

इंद्रजिताचा पारा चढलेलाच होता. त्याला आणखी जास्त राग आला. तो मारुतीच्या खांद्यावर बसलेल्या लक्ष्मणाला म्हणाला—" काल रात्रीं मी तुला व तुझ्या भावाला बेशुद्ध केलें होतें. विसरलास वाटतें ? अजून अवकाश आहे. स्वतःचा जीव वांचावा असें जर वाटत असेल तर मागें फिर !"



त्यावर लक्ष्मण म्हणाला—" राक्षसा ! तूं या वल्गना केल्यानें आम्ही मरून जाऊं असें वाटलें होय तुला ? या वल्गनांनीं आमचा वध करणें तुला शक्य नाहीं. आपल्या शौर्याच्या फुशारक्या कशाला सांगतोस ? चोरासारखा लपून तूं काल रात्रीं आमच्यावर हल्ला केलास आणि स्वतःला वीर म्हणतोस ? समोर येऊन कर युद्ध ! पाहातों तुझें शौर्य व पराक्रम ! सोड या वल्गना !"

इंद्रजित व लक्ष्मण दोघांनीं परस्परांवर बाणवृष्टि केली. दोघांनीं आपल्या उत्तमोत्तम



अस्त्रांच्या प्रयोग केला. घनघोर युद्ध सुरू झालें.

बिभीषणानें लक्ष्मणाजवळ येऊन त्याला हळूच सांगितलें, इंद्रजिताचा धीर खचत चालला आहे. हीच वेळ आहे त्याच्यावर शेवटचा वार करायला. त्याच वेळीं इंद्रजित बेशुद्ध होऊन पडला. कांहीं वेळानें पुन्हां उठून उभा राहिला व दोघांचें युद्ध सुरू झालें. दोघे शौर्यानें लढले. दोघे जखमी झाले होते.

बिभीषणदेखील युद्ध करीतच होता. त्यानें अनेक शूर राक्षसांना ठार केलें. तो वानरांना म्हणाला—“आतां रावणांच्या अनुयायी वीर राक्षसांत एकटा इंद्रजित उरला आहे. हा माझ्या भावाचा मुलगा आहे. म्हणून मी आपल्या हातानें त्याचा वध करणें बरोबर होणार नाहीं. तें काम लक्ष्मणाच्या हातून होईल. जे राक्षस इंद्रजिताच्या मदतीसाठीं युद्ध करीत आहेत त्यांना ठार करण्याची जबाबदारी तुमच्यावर!”

वानरवीर सिंहनाद करून राक्षस सैन्यावर तुटून पडले.

या अवधींत लक्ष्मणानें इंद्रजिताच्या सारथ्याला ठार केलें. इंद्रजित स्वतःच आपला रथ हांकीत युद्ध करूं लागला. त्याचवेळीं कांहीं वानरवीरांनीं मिळून घोड्यांनाच ठार केलें व रथ मोडून टाकला. तेव्हां इंद्रजित जमिनीवर उतरून लक्ष्मणाशीं युद्ध करूं लागला.

तो आपल्या राक्षस अनुयायांना म्हणाला—“मी कोणाच्या नकळत राजधानींत जाऊन दुसरा रथ घेऊन येतों. म्हणून तुम्ही माझ्यापुढें व्हा व वानरांना आणि लक्ष्मणाला अडवा. मी दृष्टीआड झाल्याबरोबर जाऊन रथ घेऊन येतों. कोणी वानर मला आडवा येऊं नये असा प्रयत्न करा.”

असें सांगून इंद्रजित राक्षसांना पुढें यायला सांगून स्वतः मागें मागें सरकूं लागला. कोणाच्या नकळत लंकेला जाऊन रथ घेऊन आला आणि लक्ष्मण व बिभीषण दोघांशीं समोर युद्ध करूं लागला. इंद्रजिताला पुन्हां रथांत बसून आलेला पाहून त्यानें दाखविलेल्या प्रसंगावधानाची व चातुर्याची लक्ष्मण व बिभीषण दोघांनीं स्तुति केली.

पुन्हां लक्ष्मणानें इंद्रजिताच्या सारथ्याला प्रथम ठार केलें. परंतु रथ मात्र इंद्रजिताला हवा होता तसाच चालू होता. इंद्रजित लक्ष्मण व बिभीषण दोघांवर एकदम बाणवृष्टि करीत होता. बिभीषणानें आपली गदा इंद्रजिताच्या घोड्यांवर फेंकली. त्या प्रहारानें रथाचे घोडे ठार झाले.

इंद्रजितानें जमिनीवर उडी मारली व एक अस्त्र बिभीषणावर सोडलें. परंतु बिभीषणानें दुसरें अस्त्र सोडून त्या अस्त्राचे तुकडे करून टाकले. पुन्हां इंद्रजित व लक्ष्मण दोघांनीं परस्परांवर अस्त्र प्रहार सुरू केला. अस्त्रांची टक्कर झाल्यामुळें अग्निवृष्टि होऊन तिच्याखालीं सहस्रावधि राक्षस व वानर प्राणास मुकले.



अशा तऱ्हेनें दोघांचें युद्ध बराच वेळ चालू होतें. इंद्रजित थकला होता. स्वतःच्या जीवाची आशा तुटल्यासारखी झाली होती. अशा प्रसंगीं लक्ष्मणानें एक दिव्य अस्त्र त्याच्यावर सोडलें. त्यामुळें इंद्रजिताचें डोकें धडापासून वेगळें होऊन जमिनीवर लोळूं लागलें. बिभीषण व वानर सैन्यानें जयघोष केला. राक्षस सैन्य घाबरून पळून गेलें.

इंद्रजिताचा वध झाल्यानंतर बिभीषणानें लक्ष्मणाचें अभिनंदन केलें व त्याला बरोबर घेऊन वानरवीरांसह रामाकडे आला.



लक्ष्मणानें इंद्रजित मेल्याचें रामाला सांगतांच रामानें लक्ष्मणाला भ्रातृस्नेहानें प्रेमालिंगन करून त्याला शाबासकी दिली व म्हणाला— “आतां रावणसुद्धां मेला असें समज !”

सुषेण नांवाच्या वानर वैद्यानें येऊन लक्ष्मण, बिभीषण आदिकांच्या जखमा धुवून मलमपट्टी केली.

लक्ष्मणाच्या हातीं आपला शूरवीर पुत्र मारला गेल्याची दु:खकारक वार्ता कळतांच रावण बेशुद्ध झाला. शुद्धीवर आल्यावर बराच वेळ पुत्रशोकानें तो रडत होता. त्याला स्वत:चें देहभान राहालें नाहीं व रागाच्या भरांत म्हणाला—“ज्या सीतेमुळें राक्षसकुळाचा संहार झाला व माझा लाडका मुलगा मेला त्या सीतेला अजून रामाचीच आठवण येतें आहे तर तिचा शिरच्छेद करून मी सूड उगवतों.” तो तलवार घेऊन अशोक वनांत गेला. त्याचे मंत्री व राण्यापण त्याच्याबरोबर निघाल्या. मंत्र्यांनीं निरनिराळ्या प्रकारें त्याविरुद्ध त्याचें मन वळविण्याचा प्रयत्न केला. पण रावण ऐकायला तयार नव्हता.

सीतेनें रावणाला येत असलेला पाहिला व तो आपल्याला रामविरहाच्या दु:खांतून मुक्त करण्यासाठीं येत आहे, हें ओळखलें. तिला भय किंवा भीति वाटण्याऐवजीं आनंदच झाला. परंतु रामाचें दर्शन होणार नाहीं म्हणून दु:ख देखील वाटलें.

सुपार्श्व नांवाचा मंत्री रावणाला म्हणाला— “स्त्री वध करणें तुझ्यासारख्या शूराला शोभत नाहीं. माझ्या मतें तूं रामाचा वध केलास तरच इंद्रजिताच्या वधाचा सूड उगवल्यासारखें होईल. आज चतुर्दशी आहे. उद्यां अमावास्या. तूं आज युद्धाची चांगली तयारी करून उद्यां युद्धाला जावें.” रावणाला सुपार्श्वाचा सला पसंत पडला.



तो आपल्या सर्व सेनापतींना बोलावून म्हणाला—“आज मी युद्धाला येत नाहीं. तुम्ही युद्ध चालू ठेवा. रामाला विश्रांति घ्यायला सवड मिळतां कामा नये. उद्यां तो दमून भागून गेल्यावर मी त्याच्याशीं युद्ध करून त्याला ठार करीन.”

रावणाच्या आज्ञेनें राक्षस युद्ध करण्यासाठीं गेले. त्यांनीं वानरांचा संहार सुरू केलेला पाहून रामानें बाणवृष्टि सुरू केली व लक्षावधि राक्षसांचा वध केला. लंकेंत विधवा झालेल्या राक्षसिणींचा हाहाकार ऐकून रावणाची छाती धडधडूं लागली.

तेव्हां रावण स्वत: रामलक्ष्मणांचा वध करण्यासाठीं निघाला. त्याच्या बरोबर महापार्श्व, महोदर, वीरूपाक्ष वगैरे राक्षस वीर निघाले. सर्व मिळून लंकेच्या उत्तर द्वाराजवळ पोंचले. रामलक्ष्मण तेथेंच होते. राक्षस सैन्य येत असलेलें पाहून वानरवीर पण आनंदानें उड्या मारीत युद्धाला तयार झाले. रावण वानरांची फळी फोडून राम उभा होता तिकडे येऊं लागला. तें पाहून सुग्रीवानें राक्षस सैन्यावर जोराचा हल्ला केला व असंख्य राक्षसांना ठार केलें. तेव्हां



विरूपाक्ष नावाचा राक्षस रथांतून उतरून हत्तीवर बसून निघाला. त्यानें सुग्रीवाशींच युद्ध सुरू केलें. सुग्रीव तरी कमी थोडाच होता. त्यानें प्रथम विरूपाक्षांचा हत्ती ठार केला व त्यानंतर विरूपाक्षाला लोळविलें.

आपलें सैन्य सुग्रीवाच्या हातीं ठार होत चाललेलें पाहून व विरूपाक्ष रणांगणावर मरून पडलेला पाहून रावणानें महोदराला पुढें व्हायला सांगितलें. सुग्रीवानें त्याचा देखील समाचार घेतला. पहिल्याच तडाख्यांत महोदर ठार झाला. वानरांनीं सुग्रीवाचें अभिनंदन केलें.

तिकडे रावणाच्या आज्ञेनें महापार्श्व अंगदाच्या सैन्याकडे आला. त्याचें अंगदाशीं द्वंद्व युद्ध झालें व त्यांत अंगदाच्या हातीं तो मारला गेला.

आपल्याबरोबर आलेले तिघे मंत्री एका मागून एक मेलेले पाहून रागानें रावण स्वत: रामाशीं युद्ध करण्यास निघाला. रामरावणांचें तें युद्ध काय वर्णावें, रामारावणांचें युद्ध खरोखर रामारावणांच्या युद्धासारखेंच होतें. दोघांनीं मोठमोठ्या अस्त्रांचा प्रयोग केला. परस्परांची अस्त्रें नष्ट केलीं आणि शेवटीं परस्परांचें मर्म ओळखून नेम धरून त्यावरच वार केला.

रावणाला जखमी स्थितींत बेशुद्ध पडलेला पाहून रामानें थोडा वेळ विश्राम घेण्याचें ठरविलें. लक्ष्मणानें त्या अवधींत रावणाचा झेंडा पाडला. विभीषणानें रावणाच्या घोड्यांचा वध केला. रावणाला तोंपर्यंत शुद्ध आली होती. विभीषणावर त्याचा राग होताच. त्यानें त्याच्यावरच एक अस्त्र सोडलें. परंतु लक्ष्मणानें दुसरें एक अस्त्र सोडून मध्येंच त्या अस्त्राचा नाश केला.

तें पाहून रावणानें आणखी एका अस्त्राचा प्रयोग करण्याचें ठरविलें. पण लक्ष्मणानें रावणावर दोन तीन मंत्रवलेले बाण सोडून विघ्न घातलें. त्यामुळें रावण आपल्या भावावर त्या अस्त्राचा प्रयोग करूं शकला नाहीं. तेव्हां रावणानें तें अस्त्र लक्ष्मणावरच सोडलें. लक्ष्मणाला तें अस्त्र छातीला लागलें व लक्ष्मण बेशुद्ध होऊन पडला.

रामाला तें पाहून राग आला. त्यानें एका मागून एक अनेक अस्त्र रावणावर सोडलीं. रावण रामासमोर उभा न राहूं शकल्यामुळें रणांगणावरून पळून गेला.





# रुक्मांगद चरित्र

[ ३ ]

मोहिनीनें जें कांहीं सांगितलें तें बरोबर आहे असें ब्राह्मणांनीं सांगितल्यावर रुक्मांगदाला राग आला. म्हणाला—"स्वत: हरिहरानें हें व्रत करण्याची गरज नाहीं असें सांगितलें तरी तें मला मान्य होणार नाहीं. एकादशी व्रत न करणाराला माझ्या राज्यांत राहण्याचा अधिकार नाहीं."

मोहिनीला तें ऐकून अर्थातच राग आला. म्हणाली—"लग्न केलेंस त्यावेळीं तूं मला वचन दिलें होतेंस तें आठव! आतां माझ्या इच्छेविरुद्ध काम करून तूं आपलें वचन मोडत आहेस. म्हणून मी तुला सोडून निघून जाईन." असें सांगून ती निघाली तिच्याबरोबर सर्व ब्राह्मणपण निघाले.

त्यावेळीं धर्मांगदानें मोहिनीचे पाय धरून माफी मागितली व म्हणाला—"माते! कोठें निघालीस? चल घरीं!"

"तुझ्या वडिलांनीं दिलेलें वचन मोडलें आहे. मी नाहीं येत." मोहिनी म्हणाली.

"मी जिवंत असेपर्यंत माझ्या बाबांनीं दिलेलें वचन मोडलें असें होणार नाहीं." धर्मांगद म्हणाला. तो तिला घरीं परत बोलावून घेऊन आला व रुक्मांगदाकडे गेला. धर्मांगदानें त्याला मोहिनीला दिलेलें वचन पाळा असा आग्रह केला.

"मी एकादशी व्रत करायचें सोडलें तर यमलोकाची संख्या वाढेल. जीव गेला तरी एकादशीव्रत सोडायला मी तयार नाहीं." रुक्मांगद म्हणाला.



धर्मांगद आई संध्यावली हिला बोलावून तिला सर्व हकीगत सांगून म्हणाला—" आई दोघांमधील मतभेद दूर व्हावा म्हणून तूं मोहिनीचें मन वळवून बाबांच्या इच्छेप्रमाणें तिला एकादशी व्रत करायला सांग!"

संध्यावली मोहिनीकडे गेली व म्हणाली—" तूं म्हणालीस तें बरोबर आहे. महाराजांनीं दिलेलें वचन मोडलें आहे. पण तूं त्यासाठीं हट्ट केला असल्यानें ते धर्मसंकटांत पडले आहेत. ती एक गोष्ट सोडून तूं काय वाटेल तें मागून घ्यावें. मी तुझ्याहून मोठी आहें. परंतु पतीसाठीं मी तुझ्या पायां पडतें!"

" तूं माझ्याहून मोठी आहेस, हें खरें आहे. त्यांना एकादशी व्रत सोडायचें नाहीं ना? हरकत नाहीं. त्यांनीं त्याबद्दल एक काम करावें. तें सर्वांना दुःख देणारें आहे. पण तें तूं त्यांच्याकडून करवून दाखविलेंस तर तुझी कीर्ति अजरामर होईल." मोहिनी म्हणाली.

" पतीसाठीं तूं सांगशील तें काम करायला मी तयार आहें!" संध्यावली म्हणाली.

" तूं आपल्या मुलाचें डोकें कापून मला दिलेंस तर माझें मन शांत होईल." निष्ठुरपणें मोहिनी म्हणाली. एक क्षणभरच संध्यावली कांहीं बोलली नाहीं. नंतर म्हणाली— " तुला धर्मांगदाचें डोकें मिळेल!"

संध्यावलीनें रुक्मांगदाला मोहिनीनें धर्मांगदाचें डोकें मागितलें असल्याची गोष्ट सांगितली व म्हणाली—" धर्मरक्षणार्थ एवढा त्याग केलाच पाहिजे. मी देखील हा त्याग करायला तयार झालें आहे. तेव्हां आपण एवढी गोष्ट मान्य करावी अशी माझी आपणांजवळ नम्र विनंति आहे."

" हें काय बोलतेस तूं? पुत्रहत्येचें पाप ब्रह्महत्येपेक्षां मोठें आहे हें नाहीं का माहीत तुला? ही मोहिनी कोठून आली आहे धर्मांगदाचा जीव घ्यायला, कळत नाहीं!" असें संध्यावलीला सांगून रुक्मांगद स्वतः मोहिनीजवळ जाऊन म्हणाला—" मोहिनी! एकादशीव्रताचा त्याग व पुत्रत्याग या दोन्ही गोष्टींशिवाय तूं आणखी काय वाटेल तें मागून घे! मी पुत्रभिक्षा मागीत आहें. त्याचा वध करून तुला काय मिळणार?"

" तुझ्यामुलाचा जीव घ्यायला मी नाहीं सांगितलें. तो माझा शत्रु नाहीं. एकादशीव्रत सोडून दे व सुखानें बापलेक रहा! मला काय!" ती म्हणाली.

इतक्यांत धर्मांगदानें एक तलवार आणून रुक्मांगदासमोर ठेवली व म्हणाला—" बाबा! तुम्हीं सत्यव्रती असून अशा लहानसहान गोष्टींसाठीं वचनभंग कां करतां? माझ्या आईची इच्छा पूरी करा!"

रुक्मांगदानें संध्यावलीकडे पाहिलें. तिच्या तोंडावर त्याला दृढ निश्चय दिसला. तिकडे मोहिनी म्हणाली—" एवढें मागें पुढें करण्याची गरजच काय? एकादशीव्रत सोडून मोकळे व्हा!" पण रुक्मांगदाचें तिच्या बोलण्याकडे लक्ष नव्हतें. त्यानें धर्मांगदाचा शिरच्छेद करण्यासाठीं तलवार



वर उचलली. मोतिनी बेशुद्ध होऊन पडली. रुक्मांगदाची तलवार धर्मांगदाच्या गळ्यावर पडली मात्र, विष्णूनें प्रत्यक्ष होऊन आपला वरदहस्त वर केला व म्हणाला—"रुक्मांगदा! तुझी भक्ति पाहून मी संतुष्ट झालों आहें. तूं पुत्र कलत्र समवेत सुखानें इहलोकाचें राज्य कर."

यम व ब्रह्मदेव दोघांचे सर्व प्रयत्न फुकट गेले. ब्रह्मदेव यमाला बरोबर घेऊन मोहिनी बेशुद्ध स्थितींत पडली होती तेथें आला. म्हणाला—"मोहिनी! तूं शक्य होता तेवढा यत्न केलास. विष्णूला आपल्या भक्ताचा पराभव मुळींच खपत नाहीं. तुला यश आलें नाहीं. त्यांत तुझा दोष नाहीं. तूं काय वाटेल तो वर मागून घे!"

ब्रह्मदेवाचें तें वाक्य रुक्मांगदाचे पुरोहित वसु यांनीं ऐकलें. ते म्हणाले—"धिःकार आहे अशा क्षुद्र बुद्धीच्या देवांना! या पापिणीला वर मागायला सांगतां? हिनें जें पाप केलें आहे त्याला प्रायःश्चित्तदेखील नाहीं. तिला नरकांतदेखील जागा मिळणें शक्य नाहीं. तिला मी आतां तुमच्या देखत भस्म करतों." असें सांगून वसूनें आपल्या कमंडलुंतलें थोडें पाणी घेऊन मोहिनीच्या डोक्यावर शिंपडलें. त्याबरोबर मोहिनीचा देह जळूं लागला व ती भस्म झाली.

तेव्हां ब्रह्मदेव वसूच्या पायां पडला व त्यानें त्याला मोहिनीचें वृत्त सांगितलें. म्हणाला—"भक्तीचा प्रभाव किती आहे हें पटवून देण्यासाठींच आम्हीं हें सर्व केलें. राजा, त्याची राणी व पुत्र सर्वांना सद्गति मिळणारच आहे. म्हणून शांत व्हावें."

तें ऐकून वसु प्रसन्न झाला व त्यानें मोहिनीला जिवंत केलें. (संपूर्ण)





# ४१. किंबर्लेची हिऱ्यांची खाण

ही प्रसिद्ध खाण खणण्याचें काम सन १८७१ मध्यें सुरू झालें. १८९० मध्यें ३४ एकर जमीन ४५० फूट खोल खणण्यांत आली. १९०९ मध्यें खणण्याचें काम बंद करण्यांत आलें तेव्हां ही खाण ३६०१ फूट खोल झाली होती. ही खाण आफ्रिका खंडाच्या केप प्रांतांत आहे.

















# भारताचा इतिहास



रजपुत राज्यें एका मागून एक अकबर बादशाहाचें वर्चस्व कबूल करूं लागलीं. फक्त मेवाडनें त्याच्यासमोर गुडघे टेकायचें नाकारलें. उदयसिंह आपलें राज्य घालवून बसला होता, परंतु आपलें स्वातंत्र्य गमावून बसला नव्हता. १५७२ मध्यें उदयपुरपासून १९ मैलावरच्या गोगुंदा नामक गांवीं तो मरण पावला. त्याच्या नंतर त्याचा मुलगा प्रतापसिंह यानें मेवाडच्या स्वातंत्र्यासाठीं पराक्रम दाखविला त्याचें दुसरें उदाहरण इतिहासांत नाहीं. त्यानें आपल्या वंशाला कलंक लागूं दिला नाहीं व मोगलांशीं शेवटपर्यंत युद्ध केलें. त्याला फार कष्ट सहन करावे लागले. त्याला स्वतःची राजधानी-देखील नव्हती. कोणी त्याला मदत केली नाहीं व त्याचा शत्रु होता जगांतला अद्वितीय वैभवशाली बादशाह अकबर.

१५७६ च्या एप्रिल महिन्यांत मानसिंह व आसफखान यांनीं प्रतापसिंहाच्या राज्यावर स्वारी केली. गोगुंदानजीक हल्दी घाटी येथें दोन्ही सैन्यांची मुठभेड झाली. या युद्धांत प्रतापसिंहाचा पराभव झाला. त्या युद्धांत तो रणांगणीं पडला असता. परंतु झूलच्या राजानें स्वतःच राणा असल्याचें जाहीर करून शत्रूचें ध्यान आपल्याकडे वळवून घेतलें आणि अशा तऱ्हेनें प्रतापसिंहाला पळून जाण्यास संधी मिळाली. तो आपल्या 'चेतक' नांवाच्या प्रसिद्ध घोड्यावर बसून डोंगराळ प्रदेशांत पळून गेला. त्याचे सर्व किल्ले एका मागूनएक अकबराच्या हातीं गेले व प्रतापसिंहाला रानोमाळ हिंडावें लागलें. इतकें झालें तरी प्रतापसिंहाचा धीर खचला नाहीं. एकाद्या रानटी श्वापदा-सारखा त्याचा पाठलाग होत होता.

परंतु तो स्वतःचा बचाव करीत एका डोंगरावरून दुसऱ्या डोंगरांत शिरत असे. कधीं कधीं झाडाचा पाला खाऊन त्याला व त्याच्या कुटुंबाला दिवस काढावे लागत. परंतु तो हिम्मत हारला नाहीं व नेटानें शत्रूला तोंड देऊन त्यानें आपल्या किल्ल्यांपैकीं बरेचसे किल्ले पुन्हां सर केले. त्याला आयुष्यभर युद्ध करावें लागलें. १९ जानेवारी १५९७ या दिवशीं वयाच्या सत्तावन्नाव्या वर्षीं तो मरण पावला. भारताच्या इतिहासांत राणा प्रतापचें नांव खरोखर सुवर्णाक्षरांनीं लिहून ठेवलें गेलें आहे. युद्ध विद्येंत व राज्यकारभारांत त्याच्याहून जास्त योग्य असे अनेक रजपूत होऊन गेले. परंतु त्याची देशभक्ति व पराक्रम एकाच्याहि अंगीं नव्हता.



अकबराची प्रकृती बरोबर नसल्यामुळें त्यानें मेवाडवर स्वारी केली नाहीं. परंतु त्यानें आपलें राज्य बरेंच वाढविलें. त्यांत गुजराथ राज्यावर त्याला मिळालेला जय मुख्य होय. दिल्लीच्या बादशाहांची नजर बरेच दिवसांपासून या राज्यावर होती. गुजराथवर मुजफ्फरशाह नांवाच्या एका नाममात्र सुलतानाचें राज्य होतें. अकबरानें स्वतः गुजराथवर स्वारी केली व गुजराथचें राज्य जिंकलें. सुलतानाला पोटगीसाठीं धन दिलें व त्याला गादी वरून काढून टाकलें. २० फेब्रुवरी १५७३ या दिवशीं दीड महिना सतत वेढा दिल्यानंतर सुरत शहर पडलें. त्याच वेळीं अकबर बादशाहाची पोर्तुगीजांशीं ओळख झाली. त्यांना अकबराच्या मैत्रीची गरज पण होती.

परंतु अकबर आपली राजधानी फतेह-पुर सिकरी पोंचल्याबरोबर गुजराथमध्यें बंड झाल्याचें त्याला कळलें. अकबर उलट पावलीं फिरला व फक्त ११ दिवसांत ६००








ऐट व संकुचित राष्ट्रीय दृष्टिकोण हे लक्षांत घेऊन त्यांना स्वतःची लाज वाटे. भारत-मातेच्या सुपुत्रांना अर्धपोटी व अर्धनग्न स्थितींत रहात असलेले पाहून नेहरूंच्या मनाला पीळ पडला. भारतांत दारिद्र्य व भूक यांचें तांडव नृत्य चालू असल्याचा प्रत्यय त्यांना झाला. त्या अबोध आणि भोळ्या दरिद्रनारायण रूपी लोकांचा आपल्यावर इतका विश्वास आहे हें पाहून आपली जबाबदारी त्यांच्या लक्षांत आली. ते शेतकऱ्यांच्या आग्रहानें त्यांची स्थिति पाहायला म्हणूनच तर गेले होते!

शेतकऱ्यांची कथा म्हणजे एक करुण कथाच होती. दररोज वाढते कर, बेकारी, उध्वस्त झालेलीं घरें व ओसाड पडीत शेतें, जमीनदार व सावकार यांचे अत्याचार आणि सर्वांपलीकडे पोलीसांची गृद्धदृष्टि यांमुळें शेतकरी वर्ग जर्जर झाला होता. रात्रंदिवस रक्ताचें पाणी करून पिकें उभीं करीत. पण त्यांवर त्यांचा अधिकार नाहीं. त्यांच्या वांट्याला कायमची भूक व वाढत्या कर्जाचें ओझें उरे. बहुतेकांजवळ स्वतःची म्हणून वीत भर जमीनदेखील नव्हती. रहायला झोंपडें देखील नव्हतें. जमिनींत सोनें उत्पन्न होई, पण त्याचा त्यांना काय उपयोग? जमीनदार व सावकार यांच्या घशांत तें सर्व जाई. या स्थितींतच शेतकरी वर्ग पिळून निघत होता. त्यांच्या कपाळावर दारिद्र्य जणुं कांहीं कायमचेंच लिहून ठेवलें होतें. परंतु १९२०-२१ मध्यें रामचंद्र नांवाच्या एका महाराष्ट्रीय शेतकऱ्याच्या नेतृत्वाखालीं प्रतापगड, रायबरेली व फैजाबाद जिल्ह्याच्या शेतकऱ्यांच्या अंगांत एक नवीन चैतन्य आलें.






[१२]

विमला निघून गेल्यावर तिलोत्तमा कांहीं वेळ आपल्या खोलींत विचार करीत बसली. जगतसिंह अजून जिवंत असल्याचें व त्याच किल्ल्यांत कोठें तरी असल्याचें तिला विमलेकडून कळलें होतें.

त्याच विचारांत अर्धी रात्र झाली. ती अंगठी घेऊन अंतःपुराच्या दाराजवळ येऊन उभी राहाली. तेथें सैनिक पोशाखांत एक जण उभा होता. त्यानें तिला विचारलें—"तुझ्याजवळ अंगठी आहे का?" तिनें त्याला अंगठी दाखविल्या तो तशीच एक अंगठी दाखवून म्हणाला—"चला!"

अंतःपुराबाहेर पाहाऱ्याला उभे असलेले सैनिक दारू पिऊन झिंगून पडले होते. सैनिकानें तिलोत्तमेला किल्ल्याबाहेर घेऊन आल्यावर विचारलें—"कोठें जाणार तुम्ही?"

विमलानें जें सांगितलें होतें तें सर्व ती विसरून गेली. ती म्हणाली—"जगतसिंह आहेत तेथें घेऊन चला." बोलत असतां तिचा कंठ गहिंवरून आला होता.

"जगतसिंह? ते तर कैदेंत आहेत. ठीक आहे, चला तिकडे!" तो म्हणाला. तो तिलोत्तमेला घेऊन पुन्हां किल्ल्यांत

श्री बंकिमचंद्र चट्टोपाध्याय



गेला. जगतसिंह कैदेंत होता तेथें पाहऱ्यावर असलेले सैनिक सावध होते.

तिलोत्तमेबरोबर आलेल्या सैनिकानें त्यांना अंगठी दाखवून विचारलें—"युवराज कोठें आहेत?" पाहारेदार दोघांना जगतसिंहाच्या कोठडीजवळ घेऊन गेला व म्हणाला—"येथें आहेत. जागे आहेत!"

"दार उघड. ह्यांना भेटायचें आहे युवराजांना!" तो सैनिक म्हणाला.

जगतसिंह एका पलंगावर पडून होता. दार उघडल्याचा आवाज ऐकून त्यानें तिकडे पाहिलें. तिलोत्तमा दार धरून उभी होती.

तिचें पाउल आंत पडत नव्हतें, दुःखातिरेकानें असेल किंवा अशक्त झाल्यामुळें असेल. सैनिकानें विचारलें—"आतां उभी कां? वेळ थोडा आहे आपल्याजवळ!"

"थोडा वेळ थांबून तो पुढें म्हणाला—"आंत जायचें नसेल तर चला परत! येथें उभें राहण्यांत धोका आहे."

परंतु तिलोत्तमेच्या मनाची स्थिति विचित्र होती. तिचें पाउल आंत पडत नव्हतें व बाहेर जाण्याची पण तिची तयारी नव्हती.

जगतसिंहानें प्रथम तिलोत्तमेला ओळखलें नाहीं. कैदेंत अंधार कोठडीच्या दारावर एका तरुण स्त्रीला पाहून त्याला आश्चर्य वाटत होतें. परंतु जवळ गेल्यावर त्यानें तिलोत्तमेला ओळखलें. दोघांनीं परस्परांकडे पाहिलें. तिलोत्तमेच्या पापण्या लवल्या.

"वीरेंद्रसिंहाची मुलगी?" जगसिंहानें तिला विचारलें.

पण तो प्रश्न तिलोत्तमेच्या हृदयाला बाणासारखा बोचला. आतां मी फक्त 'वीरेंद्रसिंहाची मुलगीच' राहिलें का?

कांहीं वेळानें त्यानें पुन्हां प्रश्न केला—"कशासाठीं आली आहेस?"

तो प्रश्न ऐकून धक्काच बसला तिच्या हृदयाला. तिला वैरी आल्यासारखें वाटूं लागलें. तो उत्तराची अपेक्षा करीत होता. पण त्या प्रश्नाचें उत्तर ती काय देणार?

"तूं चकित झाली असशील. पण सर्व विसरून जा." जगतसिंह म्हणाला.

आपल्या नशिबानें पाठ फिरविल्याचें कळायला तिलोत्तमेला वेळ लागला नाहीं. भोंवळ येऊन ती धाडदिशी जमिनीवर पडली.

ती बेशुद्ध झालेली पाहून जगतसिंह आपल्या उपरण्यानें वारा घालूं लागला. परंतु तिला शुद्ध येत नाहीं असें पाहून त्यानें पाहारेकऱ्याला बोलाविलें.

"या बेशुद्ध होऊन पडल्या आहेत. यांच्याबरोबर कोण आलें होतें? त्यांना म्हणावें आंत येऊन ताबडतोब काय तो औषधोपचार करा." जगतसिंह म्हणाला.

"मीच घेऊन आलों होतों." तो पाहारेकरी सैनिक म्हणाला.

"तूं? तर मग कोणत्या तरी दासीला बोलावून घेऊन ये." जगतसिंह म्हणाला.

पाहारेकरी निघून गेला. तो येईपर्यंत जगतसिंहानें त्याला शक्य झालें तेवढें केलें.



तोंडावर थोडें पाणी शिंपडलें व वारा घालूं लागला. थोड्यावेळानें तिला शुद्ध येऊं लागल्यासारखें वाटलें. इतक्यांत आयशा एका दासीला बरोबर घेऊन आली.

आयशानें जगतसिंहाला विचारलें—"ही कोण? काय भानगड आहे?" बेशुद्ध झालेल्या तिलोत्तमेकडे तिनें खूण केली.

"ही वीरेंद्रसिंहांची मुलगी आहे." जगतसिंह म्हणाला.

जरा देखील मागेंपुढें न करतां निःसंकोचपणें आयशानें पुढें होऊन तिलोत्तमेचें डोकें आपल्या मांडीवर ठेवून घेतलें. गुलाबपाणी

0%



सिंहाचा निरोप घेऊन निघण्याच्या विचारांत होती. परंतु त्याच्या तोंडावरून त्याला कांहीं बोलावयाचें आहे हें ओळखून ती दासीला म्हणाली—"तूं यांना घेऊन पुढें हो. यांना पोंचती करून पुन्हां परत इकडे ये. मी येथें आहें."

तिलोत्तमा दृष्टीआड होईपर्यंत जगतसिंह तिच्याकडे टक लावून पहात उभा राहिला. नंतर मनांतल्या मनांत तिलोत्तमेला म्हणाला—"तिलोत्तमे हीच आपली शेवटची भेट."

ज्या माणसानें तिलोत्तमेला अंगठी दाखवून येथवर आणलें होतें. त्यानें तिलोत्तमा निघाल्यावर तिच्याजवळ येऊन विचारलें—"तरमग मी येऊं?" तिलोत्तमेच्या तोंडांतून एक शब्ददेखील निघाला नाहीं. पण ती दासी म्हणाली—"ठीक!" तो तिच्याजवळची अंगठी घेऊन निघून गेला.

दासीबरोबर तिलोत्तमा निघून गेल्यावर आयशानें जगतसिंहाच्या पलंगावर बसून विचारलें—"आपल्या मनांत मला कांहीं विचारावयाचें दिसतें आहे. काय पाहिजे आपल्याला? मी आपल्याचसाठीं थोडा वेळ थांबलें आहें. माझ्या हातून कांहीं होण्यासारखें असेल तर निःसंकोच पणें सांगावें. माझ्या हातून आपली कांहीं सेवा घडली तर त्या गोष्टीचा मला आनंदच होईल."

"नबाबजादी! आतां मला कोणाच्याहि मदतीची गरज नाहीं. कदाचित आतां मी आपल्या घटकाच मोजत आहें. आपली ही भेट देखील कदाचित शेवटचीच. माझ्यावर आपण जे उपकार केलेंत त्याबद्दल कोणत्या शब्दांत मी आपले आभार मानूं? सुदैवानें माझे ग्रह पालटले व मला कैदेंतून सुटका मिळून मी पहिल्यासारखा स्वतंत्र झालों आणि त्यानंतर माझ्या सहाय्याची व सेवेची आपल्याला कधीं गरज भासली तर ती सेवा



मात्र अवश्य ध्यावी एवढीच विनंति आहे." जगतसिंह म्हणाला.

त्याचें तें निष्कपट बोलणें ऐकून आयशाचे डोळे भरून आले. कंठ दाटून आला. म्हणाली—"इतके हताश होण्याचें कारणच काय? आज जी स्थिति आहे, उद्यां तीच राहील असें समजून निराश होण्यांत काय अर्थ? सुखामागून दुःख व दुःखामागून सुख ही जगाची रीतच आहे."

"निराशा झाली म्हणून नव्हें. आशा लावून बसल्यानें तरी काय उपयोग होणार? या कैदेंतून सुटण्याची इच्छा मला नाहीं. या जन्मांत कधीं सुखाचे दिवस येतील असें नाहीं वाटत मला. माझ्या मनांत जें दुःख आहे तें तुम्हांला कळणार नाहीं व तें कसें सांगावें हें देखील मला कळत नाहीं." जगतसिंह म्हणाला.

त्याचें बोलणें ऐकून आयशाला आश्चर्य वाटलें. "मनाला इतकें लावून घ्यायला काय कारण झालें? वीरेंद्रसिंहाची मुलगी...." बोलत असतां मध्येंच ती थांबली.

जगतसिंह पण मध्येंच उद्गारला—"तिची गोष्ट आतां कशाला? तें एक स्वप्न होतें."

आयशा कांहीं वेळ खालीं मान करून बसून राहाली. कांहींच बोलली नाहीं. पण कांहीं वेळानें म्हणाली—"युवराज! आपण या कैदेंत इतके कष्ट सहन करीत आहां हें मला नाहीं पहावत. चला माझ्याबरोबर मी सुटका देववितें. आपल्या छावणींत निघून जावें."

"आयशा, तूं आपल्या वडिलांना कळविल्याशिवाय मला सुटका देवविणार आहेस?" जगतसिंहानें विचारलें.

"त्याची फिकीर करण्याचें कारण नाहीं. तूं आपल्या छावणींत पोंचलास म्हणजे मी त्यांना जाऊन सांगेन." आयशा म्हणाली. दोघांनीं परस्परांना अगदीं अनपेक्षितपणें 'तूं' या एकवचनी शब्दानें संबोधन केलें.

"त्यांना कळल्यावर तुझ्यावर संकट येईल त्याची काय वाट?"

"मला त्याची फिकीर नाहीं. मी पाहून घेईन."

"आयीशा माझी नाहीं तयारी!"

"कां?" आयशानें चकित होऊन विचारलें.

"तूं मला पुनर्जन्म दिला आहेस. तुझ्यावर संकट येईल असें एकहि काम करण्यास मी तयार नाहीं."

आयशा चुप होती. तिच्या डोळ्यांतून टपटप टिपें गळत होतीं. तिच्या नकळत एक जण दाराजवळ येऊन उभा राहिला होता. तो पुढें येऊन दोघांना म्हणाला—"शाबास नवाबजादी! खूप...."

दोघांनीं त्याच्याकडे पाहिलें. त्यांनीं त्याला ओळखलें. तो उस्मानखानच होता. उस्मानखानानें थट्टेच्या सुरांत जें कांहीं म्हटलें त्यावरून आयशावर संकट येणार ह्यांत जगतसिंहाला शंका उरली नाहीं. परंतु आयशानें तिकडे दुर्लक्षच केलें. उलट तिनें



उस्मानखानालाच विचारलें—"शाबासकी कशाबद्दल उस्मान?" मध्यरात्रीच्या वेळीं नबाबसाहेबांची पोरगी एकटी या कैदेच्या दारापर्यंत येते आणि एका कैद्याशीं गुल गुल गप्पा करते या बद्दल शाबासकी द्यावयाची नाहीं तर काय शिक्षा द्यावयाची? उस्माननें उपरोधक आवाजांत विचारलें.

आयशानें एकदां उस्मानकडे रागानें पाहिलें व म्हणाली—"कैदखान्यांत येऊन कैद्याशीं गुल गुल गप्पा करणें किंवा न करणें हा माझा प्रश्न आहे, त्याबद्दल शाबासकी देण्याची तुला गरज नाहीं."

तें ऐकून उस्मान चकित झाला. त्याला आश्चर्यापेक्षां रागच जास्त आला असें म्हटलें तरी चालेल. म्हणाला—"मला त्याची काय गरज याचें उत्तर नवाब साहेबांच्या तोंडूनच ऐक तर."

"अब्बाजान विचारतील तेव्हां मला जें उत्तर द्यावयाचें असेल तें मी देईन. तुला मध्यें चोमडेपणा कर याची मुळींच गरज नाहीं." आयशा थोडीशी रागानेंच म्हणाली.

"एक गोष्ट मी विचारतों...." उस्मानच्या तोंडून निघाल्यावरोबर आयशा उठून ताठ उभी राहून म्हणाली—"तरमग मी बोलतें आहे तें नीट कान उघडून ऐक. तूं प्रश्न केलास तर त्याचें हेंच उत्तर तुला मिळेल हा कैदी माझा प्रियकर प्राणेश्वर आहे."

तें ऐकून उस्मान व जगतसिंह दोघांना वाटलें कीं त्यांच्या अंगावर वीजच पडली. युवराजाच्या डोळ्यासमोर अंधेरी आल्यासारखें झालें. आयशाला इतकें वाईट वाटण्याचें कारण तेव्हां त्याच्या लक्षांत आलें.

आयशा त्याला म्हणाली—"युवराज! क्षमा कर मला. उस्मानानें अशा तऱ्हेनें मला प्रश्न केला नसता तर मी आपल्या मनांतली गोष्ट तोंडावाटे बाहेर येऊं दिली नसती व तुला ती कळलीदेखील नसती."

जगतसिंह किंकर्तव्य विमूढ स्तब्ध उभा होता. त्याला तो सर्व प्रसंग फार दुःखदायी वाटला. आयशा क्षणभरदेखील तेथें थांबली नाहीं. तिनें दासी येण्याची वाट पाहिली नाहीं. ती एकटीच निघाली. उस्मान थोडा वेळ चकित होऊन स्तब्ध उभा राहिला. थोड्या वेळानें आपल्या घरीं निघून गेला. [पुढील गोष्ट पुढील अंकीं]



# गर्विष्ठ बायको

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाहीं. तो पुन्हां झाडाजवळ गेला. प्रेत खांद्यावर काढून घेतलें व स्मशानाच्या दिशेनें चालू लागला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा! तूं इतक्या निष्ठेनें हें कंटाळवाणें काम करीत आहेस. खरें पाहिलें तर तुला आपल्या अधिकाराचा गर्व असायला पाहिजे होता, परंतु तो तुझ्यांत नाहीं. निरभिमान पणें तुला हें निकृष्ट काम करीत असलेला पाहून मला कन्याकुब्जच्या कौडिन्याची आठवण येत आहे. त्याची गोष्ट मी तुला सांगतों. ऐक." असें सांगून वेताळ गोष्ट सांगूं लागला.

कन्याकुब्ज राज्याच्या राजधानींत कौडिन्य नांवाचा एक तरुण ब्राह्मण रहात असे. तो घरचा श्रीमंत होता. त्याचा समंत नांवाच्या एका मुनीच्या कन्येशीं विवाह



झाला. माहेर मोठें व सासर श्रीमंताचें. त्यामुळें कौंडिन्याच्या बायकोला फार गर्व चढला.

पुढें कांहीं दिवसांनीं कौंडिन्याचा बाप वारला. त्याची आई बापाच्या बरोबर सती गेली. कौंडिन्य वाईट संगतींत पडून एका वेश्येच्या जाळ्यांत सांपडला व जवळ होतें नव्हतें तें सर्व घालवून बसला. त्याला पश्चात्ताप वाटला व त्यानें कामधंदा करून पुन्हां पैसे मिळविण्याचें ठरविलें. कौंडिन्याच्या बायकोला नवऱ्याचा राग आला. पण तो राग नवरा वाईट मार्गावर गेला यासाठीं नसून आपलें सर्वस्व घालवून बसला यासाठीं होता. त्यानें धंद्यासाठीं बायकोजवळ तिचे दागिने मागितले. पण तिनें दागिने तर दिलेच नाहींत, उलट त्याचा अपमान करून ती माहेरीं निघून गेली.

कौंडिन्य हताश होऊन परदेशाला निघाला. एका जहाजांत बसून तो जात असतां तें जहाज बुडालें. सुदैवानें तो त्या संकटांतून वांचला. एका फळीच्या आधारें तो किनाऱ्याला लागला. किनाऱ्यावर द्राक्षाचे वेल होते. त्यानें द्राक्षें खाऊन आपली भूक भागविली व एका झाडाखालीं पडून राहिला.

तो एक डोंगराळ प्रदेश होता. त्या दिवशीं रात्रीं तेथें एक विचित्र गोष्ट घडली.

काशीराजाला रत्नावली नांवाची एक रूपवती कन्या होती. तिनें दर रोज हात पाय धुवून दक्षिणेकडे डोकें करून निजत जावें असें ज्योतिष्यांनीं सांगितलें होतें. तसें न केल्यास तिच्यावर कांहीं संकट येईल असेंदेखील त्यांनीं सांगितलें होतें. तेंच झालें. त्या रात्रीं ती हात पाय धुतल्या शिवाय उत्तरेकडे डोकें करून झोपली. एक राक्षस तिला उचलून घेऊन निघून गेला. कौंडिन्य ज्या डोंगराळ प्रदेशांत झाडाखालीं झोपला होता त्याच प्रदेशांत एका गुहेंत तो रहात असे.

राक्षसानें रत्नावलीला आणलेलें पाहून त्याच्या बायकोला संताप आला. तिला शांत करण्यासाठीं राक्षस खोटें बोलला. म्हणाला— "खाण्यासाठीं मी हिला धरून घेऊन आलों आहें. तूं हिला खा." नंतर कौंडिन्य झोपला होता त्या झाडाची खूण सांगून म्हणाला—"त्या झाडाखालीं एक ब्राह्मण तरुण झोपला आहे. त्याला धरून तूं आण! मी त्याला खाईन."

पण रत्नावली राक्षसिणीला म्हणाली— "तें सर्व खोटें. तूं म्हातारी झाली आहेस म्हणून तो मला धरून घेऊन आला आहे."

राक्षसिणीला नवरा खोटें बोलल्याबद्दल जास्तच राग आला. पण तो लपवून ती म्हणाली—"बरें तर, तूं म्हणालास तसा ब्राह्मण आहे कीं नाहीं पाहून येतें." असें सांगून ती कौंडिन्य होता तेथें गेली व त्याला म्हणाली—"माझ्या नवऱ्यानें माझ्याशीं विश्वासघात करून मला सोडून दिलें आहे. त्याच्याजवळ एक मंत्रशक्ति आहे. ती मी तुला आणून देतें. तूं त्याचा वध कर. मी आयुष्यभर तुझी दासी म्हणून राहून तुझी सेवा करीन."



कौंडिन्याचा तिच्या बोलण्यावर विश्वास बसला नाहीं. तेव्हां राक्षसीण म्हणाली— "पूर्वजन्मीं केलेल्या पापाचें फळ म्हणून मला हा जन्म मिळाला. तुझें प्राणरक्षण केल्यानें मला पापमुक्ति मिळेल व पुढील जन्मीं पुन्हां मनुष्य जातींत मला जन्म प्राप्ती होईल."

"ठीक! मला ती मंत्रशक्ति आणून दे!" कौंडिन्य म्हणाला. राक्षसिणीनें ती शक्ति आणून त्याला दिली.

तिकडे राजकुमारी खरें व सरळ बोलून आपलें रक्षण करून घेणें सोपें नाहीं हें



बोलवून राक्षसाला म्हणाली—"मी तुझ्या-बरोबर रहावें असें तुला वाटत असेल तर तूं माझ्याशीं वेदोक्त पद्धतीनें लग्न करून घ्यावेंस. मग मला हरकत नाहीं. तूं आपल्या बायकोला म्हणाला होतास कीं एक ब्राह्मण तरुण झाडाखालीं झोपला आहे. त्याला बोलावून घेऊन ये. तो शास्त्रोक्त पद्धतीनें आपलें लग्न लावून देईल. नंतर पाहिजे तर तूं त्याला खा !"

मूर्ख राक्षसाला तें सर्व खरें वाटलें व तो कौडिन्य होता त्या झाडाकडे निघाला. तो येत असलेला पाहून राक्षसीण कौडिन्याला म्हणाली—"तो येतो आहे, तोच माझा नवरा. तो तुला खावला येत आहे. तूं मी दिलेल्या शक्तीचा प्रयोग केलास तर तो एका बारासरशीं ठार होईल."

राक्षसजवळ येईपर्यंत कौडिन्य थांबला व तो जवळ येतांच त्यानें शक्तीचा प्रयोग करून त्या राक्षसाला ठार केलें. तो राक्षस ठार झाला ती जागा शक्तिक्षेत्र या नांवानें पुढें प्रसिद्ध झाली.

ती राक्षसीण कौडिन्याला म्हणाली—"मी पूर्वजन्मीं कौर्वद्ध नांवाच्या मुनीची कन्या होतें. माझें नांव कंदली होतें. माझ्या वडिलांनीं दुर्वास ऋषींशीं माझा विवाह करून दिला. माझें माझ्या पतीशीं नेहमीं या ना त्या कारणानें भांडण होई. म्हणून माझ्या पतीनें मला एकदां शाप दिला व मी राख होऊन गेलें. परंतु माझें पाप उरलें होतें. म्हणून त्या पापाचीं फळें भोगण्यासाठीं मला हा जन्म मिळाला. मी राक्षसकुळांत जन्मलें असलें तरी राक्षसवृत्ति माझ्यांत आली नाहीं. आतां मी तुझें रक्षण करून जें थोडें पुण्य संपादन केलें आहे, त्याच्या बळानें माझा उद्धार होईल.



"आणखी एक गोष्ट, मी तुला तुझ्या हिताची सांगत आहें. रत्नावली नांवाच्या काशीराजाच्या कन्येला माझा नवरा दुष्ट-बुद्धीनें उचलून घेऊन आला होता. ती आमच्या गुहेंत आहे. तूं तिच्याशीं विवाह करून घे. मी तुम्हां दोघांना एका क्षणार्धांत काशीला नेऊन पोंचवीन व नेहमीं तुमच्या रक्षणार्थ तुमच्या बरोबर राहीन."

कौडिन्य त्या गोष्टीस कबूल झाला व रत्नावलीला जाऊन भेटला. ती देखील आपल्या उद्धारकर्त्याशीं लग्नाला तयार झाली. राक्षसिणीनें हस्तीरूप धारण केलें व तिच्या पाठीवर बसून रत्नावली व कौडिन्य काशीला पोंचले. हें सर्व एका क्षणार्धांत घडलें. राक्षसिणीच्या सल्ल्याप्रमाणें कौडिन्य रत्नावलीला राजाकडे घेऊन गेला. रत्नावलीनें झालेलें वृत्त थोडक्यांत सांगून कौडिन्यानें तिचें रक्षण कसें केलें हें देखील सांगितलें व म्हणाली—"यांच्याच बरोबर माझा विवाह झाला तर मला आनंद होईल."

बापानें मुलीच्या इच्छेप्रमाणें कौडिन्याशीं तिचा विवाह करून दिला व त्याला अनंत रत्नें भेट केलीं.



हा सर्व वृत्तांत कौडिन्याच्या पहिल्या बायकोला हळूंहळूं कळला. सर्व तिला नांवें ठेवूं लागले. म्हणाले—"तूं आपल्या पतीचा अनादर केलास. पण तुझा पति पहा, आतां राजाचा जांवई झाला आहे. आतां तूं गेलीस तरी तो तुझ्याकडे तोंड फिरवून पाहील तरी का ?"

कौडिन्याच्या बायकोला फार वाईट वाटलें व आपल्या मूर्खपणाबद्दल पश्चात्ताप वाटला. आपण नवऱ्याचा अपमान केला त्याचें फळ आपल्याला भोगावें लागत आहे. परंतु आश्चर्याची गोष्ट अशी कीं कौडिन्यानें

आपल्या पहिल्या बायकोला आदरपूर्वक घेऊन येण्यासाठीं पालखी पाठविली. सर्वांना आश्चर्य वाटलें. तिला पालखींत बसून जायला लाज वाटली. परंतु कौंडिण्याच्या नोकरांनीं तिची समजूत घातल्यावर ती पालखींत बसून आपल्या पतीकडे गेली. कौंडिण्यानें आपल्या पहिल्या बायकोचा अपमान केला नाहीं व तिला नीट वागविलें.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"राजा! मला एका गोष्टीची शंका आहे. ज्या बायकोनें त्याचा अपमान केला होता व संकटकाळीं त्याला मदत केली नाहीं तिला आपली स्थिति सुधारल्यावर त्यानें कां बोलवावें! तिच्यावर त्याचें प्रेम होतें म्हणून कीं समुद्रांत जहाज बुडल्यानंतर देखील आपण वांचलों हें सर्व ईश्वरकृपेनें असें समजून ईश्वरासमोर कृतज्ञता दाखविण्यासाठीं? या शंकांचें समाधान माहीत असून तूं केलें नाहींस तर त्याचा परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळूं लागतील."

हें ऐकून विक्रमार्क म्हणाला—"कौंडिण्याचें आपल्या पहिल्या बायकोवर जास्त प्रेम होतें असें मुळींच नाहीं. देवाचे आभार मानण्यासाठीं देखील नाहीं. जिला आपल्या ऐश्वर्याची इतकी घमेंड होती तिची मान आपल्या ऐश्वर्यासमोर वांकलेली पाहून आतां ती नीट वागेल याची खात्री पटल्यावरच त्यानें तिला बोलावून घेतलें असणार."

अशा तऱ्हेनें राजाचें मौनभंग होतांच वेताळ प्रेताबरोबर अदृश्य झाला व पुन्हां झाडाच्या फांदीला जाऊन लोंबकळूं लागला.

(कल्पित)





# सुरतमंजरीची कहाणी

उज्जैनचा राजा चंडमहासेन याच्यानंतर त्याचा मुलगा गोपालक हा गादीवर बसला. त्याच्या राणीचें नांव अवंतीमति व मुलाचें नांव अवंतीवर्धन असें होतें.

एकदां उज्जैनचे नागरिक जलोत्सव साजरा करण्यांत गुंग झाले असतां एक मदोन्मत्त हत्ती साखळदंड तोडून राजधानींत शिरला. हाहाकार उडून गेला. माहुतानें त्याला वठणीवर आणण्याची शिकस्त करून पाहिली पण निरुपयोग. वाटेंत जो कोणी आडवा येई त्याला तो पायाखालीं तुडवून ठार करी. शेवटीं तो गांवाबाहेरच्या महारवाड्यांत शिरला.

त्याच वेळीं एक रूपवती तरुण मुलगी एक झोंपडींतून बाहेर आली. तिला पाहून तो हत्ती जणुं कांहीं मंत्र टाकल्यासारखा जागच्याजागीं थबकला. त्या तरुण मुलीनें समोर येऊन हत्तीच्या सोंडेवर हात फिरवला. तिनें पदराचीं दोन्हीं टोकें हत्तीच्या सुळ्यांना बांधलीं व झोंपाळ्यासारखें त्याच्यावर बसली. त्या जागीं ऊन होतें म्हणून हत्ती तिला सांवलींत घेऊन गेला.

तें अद्भुत दृश्य पाहून नागरिक थक्क झाले. राजधानीभर तोच चर्चेचा विषय झाला. प्रत्येक जण म्हणे, एका हरिजनाच्या पोरीनें मस्त हत्तीला ताळ्यावर आणलें. तिच्या रूपासमोर मदोन्मत्त हत्तीनें देखील मान वांकविली.

लोकांच्या तोंडीं ही गोष्ट युवराज अवंतीवर्धन याच्या कानावर गेली. त्या रूपवती सुंदरीला पाहण्यासाठीं तो निघाला. तिला पाहून तो तिच्या रूपावर भाळून

गेला. त्याला पाहून ती हरिजन मुलगी स्वतःचें देहभान विसरली. ती झोंपाळ्यावरून उतरली व हत्तीच्या दांतांना बांधलेला पदर सोडून घेऊन तो अंगावर घेतला आणि घरीं निघून गेली. माहूत हत्तीला घेऊन राजधानींत निघून गेला.

परंतु अवंतीवर्धनाचे पाय जमिनीला खिळून होते. मोठ्या कष्टानें तो राजवाड्यांत परत आला.

जलदानोत्सवाला तो हजर राहाला नाहीं. त्यानें त्या मुलीच्या विषयीं चवकशी केली तेव्हां त्याला कळलें कीं महारवाड्यांत वीरबाहु नांवाचा एक हरिजन राहातो. त्याची ती मुलगी. तिचें नांव सुरतमंजरी असें आहे. तिच्याशीं लग्न करून घेणें अशक्य आहे.

परंतु अवंतीवर्धनाला तें मान्य नव्हतें. तो म्हणाला—"हें सर्व खोटें. ती हरिजन मुलगी असणें शक्यच नाहीं. कोणीतरी स्वर्गांतली देवी असली पाहिजे. हरिजनाच्या मुलीला एवढें सौंदर्य कोठून मिळणार? तिच्याशीं माझें लग्न होणें शक्य नसेल तर मी जगांत जिवंत राहण्यांत तरी काय अर्थ आहे."



त्याचा विचार बदलावा म्हणून त्याच्या मित्रमंडळींनी पुष्कळ यत्न करून पाहिला, पण फुकट. ती गोष्ट कळल्यावर चंडमहासेनाला फार वाईट वाटलें. कारण गादीला तोच एक वारस होता.

"माझ्या मुलाचें प्रेम एका खालच्या जातीच्या मुलीवर व्हावें याहून जास्त दुःखाची गोष्ट ती काय असणार?" अवंतीमती राणी म्हणाली.

"कदाचित ती मूळ हरिजन मुलगी नसेलहि. कांहीं तरी कारणानें ती त्या घरीं जन्माला आली असेल. पूर्वजन्माचा कांहीं संबंध असूं शकेल." मंत्री म्हणाला. कांहीं दरबारी लोकांनीं अशीदेखील सूचना केली कीं युवराजांचें मन राखण्यासाठीं सुरतमंजरीशीं त्यांचें लग्न करून देणें बरोबर होईल.

गोपालक महाराजांना तोच सल्ला पसंत पडला व त्यांनीं वीरबाहूकडे आपला एक दूत पाठविला. दूतानें गोपालक महाराजांचा निरोप सांगितला.

वीरबाहु म्हणाला—"मला माझ्या मुलीचा विवाह युवराजांशीं करून देण्यास हरकत नाहीं. परंतु एक गोष्ट महाराजांनीं कबूल



केली पाहिजे. हें लग्न माझ्या घरीं होईल. मुलीच्या घरींच लग्न होतें ही जुनी रीत आहे. अठरा हजार ब्राह्मणांना घेऊन महाराजांनीं यावें व सहभोजनास मान्यता द्यावी. ही अट महाराजांना मान्य असेल तर माझी मुलगी महाराजांची सून होईल."

दूतांनीं जाऊन वीरबाहूनें सांगितलेली अट भीतभीत महाराजांसमोर निवेदन केली.

ही अट लावण्यांत त्याचा काय हेतु होता हें मात्र कोणाला कळलें नाहीं. स्वत: गोपालक महाराजांना त्या गोष्टीचें आश्चर्य वाटलें. जरूर कांहीं तरी कारण असणार. असा विचार करून त्यांनीं अठरा हजार ब्राह्मणांना बोलावून त्यांना आज्ञा केली कीं सर्वांनीं लग्न समारंभास हजर राहून वीरबाहूच्या घरीं सहभोजनाला हजर रहावें. ही राजाज्ञा मोडणारास उचित दंड केला जाईल.

ब्राह्मण काळजींत पडले. राजाज्ञा मोडावी तर दंड होणार, न मोडावी तर हरिजनाच्या घरीं सहभोज करावें लागणार शेवटीं दंडभयानें ते लग्न समारंभास हजर राहण्यास तयार झाले. ते गोपालक महाराजांना म्हणाले—"महाराज! वीरबाहूनें पवित्र होऊन संतर्पण केल्यास आम्ही सर्व त्याच्याबरोबर जेवायला बसूं. परंतु तें महारवाड्यांत नाहीं."

राजानें वीरबाहूसाठीं एक स्वतंत्र वाडा बांधून दिला. त्या वाड्यांत अठरा हजार ब्राह्मणांच्या सहभोजनाची व्यवस्था केली. ब्राह्मण जेवायला बसले व वीरबाहू स्नान करून त्यांच्यासमोर जेवायला बसला.

नंतर वीरबाहूची मुलगी सुरतमंजरी व युवराज अवंतीवर्धन यांचा लग्न समारंभ मोठ्या थाटानें पार पडला.





# परोपकारी गोपाळ

गोपाळ ज्या गांवीं रहात असे त्या गांवीं दर वर्षी शिवरात्रीला रथोत्सव होत असे. रथोत्सवाला सर्व गांवकरी हजर रहात. जवळपासच्या खेडेगांवांतले लोकदेखील हजर रहात. उत्सवाच्या कार्याचा भार इतरांबरोबर गोपाळवर पण असे. परंतु ह्या वर्षी देवळाच्या अधिकाऱ्यांनीं गोपाळला न बोलावण्याचें ठरविलें.

त्या गांवीं भंडूमल नांवाचा एक दुष्ट मनुष्य रहात असे. तो कोणताहि विधिनिषेध पाळीत नसे. वाटेल तें खाणेंपिणें व मनाला येईल तें करणें ह्यांत त्याला भूषण वाटे. गांवकऱ्यांनीं त्याला वाळीतच टाकलें होतें असें म्हटलें तरी चालेल. लोक त्याला पापी भंडूमल म्हणत. समाजानें त्याला बाहेर काढल्यावर त्याला स्वतःच्या जीवितासाठीं सर्व तऱ्हेचीं कामें करावीं लागत. त्याचीं मुलें जगत नसत. लोक म्हणत पापकर्माचीं फळें चाखावीं लागणारच.

भंडूमलाच्या वयाला साठावें वर्ष लागलें होतें. तो अगदीं अशक्त झाला होता. केलेल्या पापकर्माबद्दल त्याला पश्चात्ताप वाटूं लागला होता. एकदां तो देवळांत गेला. देवासमोर डोकें टेंकून क्षमा मागत होता. गावकऱ्यांनीं त्याला पाहिलें व म्हणाले—"चोर कुठला. ह्याची हौस फिटलेली दिसत नाहीं. आतां देवळांतल्या मालावर याची नजर दिसते आहे!" असें सांगून त्यांनीं त्याला झोडपून काढलें.

भंडूमलनें एकदां पूर्वी देवळांतले कांहीं दागिने वगैरे चोरले होते. म्हणून देवासमोर डोकें टेंकून बसणें त्यांना साहजिकच ढोंग

रथोत्सव ]

[ श्री. मा. गो. मोरे



वाटलें. त्यांनीं त्याला बेशुद्ध स्थितींत रस्त्यावर टाकून दिलें. तो कण्हत पडला होता. त्याच वेळीं गोपाळ तेथें आला व त्याच्या तोंडावर पाणी शिंपडून तो शुद्धीवर आल्या वर त्याला त्याच्या घरीं पोंचतें केलें व म्हणाला—"कधीं तुला कोणत्याहि वस्तूची गरज लागली तर तूं माझ्याकडे ये."

गांवकऱ्यांना गोपाळनें भंडूमलवर दया दाखविलेली आवडली नाहीं. म्हणून रथोत्सवाचा कार्यक्रम ठरवितांना ग्रामप्रमुखांनीं गोपाळचा बहिष्कार केला.

गोपाळला त्या गोष्टीबद्दल फार वाईट वाटलें. त्यानें देवळाच्या मुख्य अधिकाऱ्याला विचारलें कीं माझी कांहीं चूक असेल तर सांगा व त्यासाठीं प्रायश्चित्त पण सांगा. देवाची सेवा करण्याचा माझा हक्क माझ्याकडून कां काढून घेतां?

तेव्हां ग्रामप्रमुखांनीं सल्ला करून गोपाळला प्रायश्चित्त सांगितलें. म्हणाले—"तूं आम्ही सांगूं ती रक्कम देवासमोर ठेवावी." गोपाळनें तें कबूल करून ती रक्कम देवासमोर ठेवली. त्यानंतर त्याला रथाचा दोर धरण्याचा अधिकार मिळाला.

शिवरात्रीच्या दिवशीं रथ निघाला. रस्त्यावर पाण्याचा शिडकाव करण्यांत आला होता. जागोजागीं तोरणें बांधण्यांत आलीं होतीं. रथ अगदीं चार पावलें गेला असेल "थांबा, थांबा!" असा आवाज ऐकूं आला. रथ थांबला.

रथ थांबविण्यास एक कारण झालें. रथ चालूं लागल्यावर एक म्हातारा रस्त्याच्या मधोमध येऊन उभा राहिला आणि देवाकडे पाहून त्यानें साष्टांग नमस्कार केला. रथ जोरानें पुढें चालला होता आणि तो त्याच्या अंगावरून गेला. सर्व लोक थांबा थांबा म्हणून ओरडले. परंतु जें व्हायचें तें झालेंच.

त्या म्हाताऱ्याच्या अंगाला हात लावायला कोणी पुढें झाला नाहीं. परंतु कोणी रथाखालीं सांपडल्याचें कळतांच गोपाळ रथाची दोरी सोडून धांवत गेला. त्यानें त्या म्हाताऱ्याला बाहेर काढलें. परंतु तो मेला होता. तो भंडूमल होता हें कळायला वेळ लागला नाहीं.

भंडूमल रथाच्या चाकाखालीं चिरडून मेल्याचें कळल्यावर देवळाचे अधिकारी म्हणाले—"हा पापी मरायला येथें कशाला आला? त्याला दुसरी जागा नव्हती? उचला त्याचें प्रेत आणि द्या टाकून गटारांत! तो पडला होता ती जागा धुवून साफ करा पाहूं."

"सर्व लोक ती जागा स्वच्छ धुवून काढण्याच्या कामांत गुंतले आहेत. मी भंडूमलचें प्रेत त्याच्या घरीं पोंचतें करून आंघोळ करून येतों!" गोपाळ गांवकऱ्यांना म्हणाला.

देवळाचा मुख्य अधिकारी म्हणाला—"गोपाळ! तूं आतांपर्यंत शहाणपणा केलास तेवढा पुरे झाला. तुला रथाचा दोर पक-














डायला परवानगी दिली म्हणून हें सर्व करायचें तुला सुचलें. या पुढें तूं काय वाटेल तें प्रायश्चित्त केलेंस तरी देवकार्यास तूं नालायक ठरला आहेस. तुला जायचें आहे तर चालूं लाग. आमचें आम्ही पाहून घेऊं."

गोपाळला तें उत्तर ऐकून फार वाईट वाटलें. दीर्घ श्वास सोडून त्यानें भंडूमलचें प्रेत खांद्यावर उचलून घेतलें आणि त्याच्या घरीं गेला. भंडूमलची बायको म्हणाली—"देवाच्या चरणीं त्यांनीं आपला देह समर्पण केला."

गोपाळला तिनें आणखी एक विचित्र गोष्ट सांगितली. म्हणाली—"त्यांनीं गेल्या वर्षी पुत्रप्राप्तीसाठीं एक नवस केला होता. मुलगा होऊन तो वर्षभर जिवंत राहाला तर सर्वस्व देवाच्या चरणीं अर्पण करीन आणि स्वतःचा देह रथाखालीं घालीन. आमच्या मुलाचा पहिला वाढदिवस कालच आम्ही साजरा केला. त्याच वेळीं त्यांनीं ती गोष्ट मला सांगितली होती."

तेव्हां तिनें त्याची किती समजूत घातली होती. "हा कसला नवस? रथाखालीं स्वतःचा देह ठेवून त्या पवित्र उत्सवांत विघ्न आणण्याचें पाप नाहीं का लागणार?" तेव्हां तिचा पति तिला म्हणाला होता—'ही गोष्ट नवस करतांना मला सुचली नाहीं. म्हणून तो नवस करण्यांत माझ्या हातून चूक घडली. ही गोष्ट तरी देवासमोर सांगितली पाहिजे व देवाजवळ क्षमायाचना केली पाहिजे!' असें सांगून ते रथोत्सवाला गेले होते आणि आतां त्यांचें प्रेत घरीं येत आहे. त्यांनीं पुत्र प्राप्तीसाठीं केलेला नवस पुरा केला. त्यांचा तो निश्चय अढळ होता."

"भंडूमलच्या विषयीं लोक कांहीं बोलले तरी चालेल. कोणालाहि वस्तुस्थिति माहीत नाहीं. खऱ्याला मरण नाहीं. देव वरून सर्व पहात आहे. मी भंडूमलची अंत्येष्टी करायला तयार आहें." असें सांगून त्यानें रथोत्सवाला जाण्याचा विचार सोडून दिला आणि अंत्येष्टी क्रियेच्या कामाला लागला.

तिकडे रथ थांबला होता त्या जागीं भटाभिक्षुकांनीं पुष्कळ घोळ घातला. भंडूमलचा देह पडला होता ती जागा मंत्र म्हणून शुद्ध करण्यांत आली. त्यानंतर रथ पुढें जाण्यास त्यांनी परवानगी दिली.

"हर हर शंकर महादेव!" म्हणत लोक रथ ओढूं लागले. पण काय आश्चर्य! रथ जागचा हालेना जणूं कांहीं त्याचीं चाकें जमिनीला खिळली होती. एक तास झाला, दोन तास झाले तरी रथ हालला नाहीं.

"देवाचा कोप झाला आहे! देव कां नाहीं रागावणार? आम्ही गोपाळला रथाच्या दोराला शिवण्याची परवानगी दिली आणि त्या पाप्यानें रथाखालीं जीव दिला. सर्व अपशकुन!"

इतक्यांत रथांत बसलेला पुजारी आरतीचें तबक हातांत घेऊन अंगांत आल्यासारखें कांहीं तरी बडबडूं लागला. आतां देव कांहीं तरी बोलणार असें समजून लोक



पुजाऱ्याच्या चारीबाजूला एकत्र जमा झाले. पुजाऱ्याच्या तोंडचे हे शब्द सर्वांच्या कानीं पडले—"गोपाळला बोलवा! त्याचा हात दोरीला लागल्याशिवाय एक पाऊल देखील पुढें सरकायला मी तयार नाहीं."

गांवकरी सर्व थोर मंडळी चकित होऊन परस्परांचीं तोंडें पाहूं लागली.

"बोलवा गोपाळला! बोलवा त्याला!" पुजारी मोठमोठ्यानें ओरडूं लागला.

त्याचा प्रतिध्वनीच जणूं सर्व ओरडूं लागले—"बोलवा गोपाळला! बोलवा त्याला!"

गोपाळला बोलावून आणायला कांहीं थोर मंडळी धांवली. घरीं जाऊन चवकशी करतां लक्ष्मी म्हणाली—"ते रथोत्सवाला जातों म्हणून गेले आहेत ते परत आले नाहींत." नंतर लोक मंडूमलच्या घरीं गेले. त्याची बायको रडत होती. म्हणाली—"त्यांची अंत्येष्टी क्रिया करण्यासाठीं गोपाळराव गेले आहेत!"

सर्व स्मशानांत पोंचले तेव्हां चितेसमोर गोपाळ ध्यानमग्न डोळे मिटून उभा होता.

"गोपाळ! आमची चूक झाली. तुझ्या हाताचा स्पर्श झाल्याशिवाय रथ पुढे हलणार नाहीं. चल, लवकर चल!" देवळाचा मुख्य अधिकारी म्हणाला.

रथ अडला असल्याची गोष्ट गोपाळला माहीत नव्हती. त्याला नकार देणारे लोक स्वतःच बोलवायला आलेले पाहून त्याला आश्चर्य वाटलें. म्हणाला—"अजून मी आंघोळ केली नाहीं. प्रायश्चित्त केलें नाहीं. मला माफ करा या वेळीं. पुढल्या वर्षी रथोत्सवाची जी सेवा माझ्या हातून घडावयाची असेल ती मी आनंदानें करीन."

सर्वांनीं त्याला रथोत्सवांत विघ्न येण्याचें कारण व वृत्त सांगितलें व तसाच निघण्यास आग्रह केला.

गोपाळला वस्तुस्थितीची कल्पना झाली व त्याला आश्चर्य वाटलें. मंडूमलच्या चितेला तीनदां प्रदक्षिणा घालून त्याला बोलवायला आलेल्या लोकांबरोबर तो निघाला.

मंडूमलचा देह पडला होता त्याच जागीं रथ अडला होता. गोपाळनें स्नान केलें नव्हतें तरी त्याचा हात दोरीला लागतांच रथ पुढें सरकला.





# वस्ताद सखुबाई

नरसापूर नांवाच्या गांवीं सखुबाई नांवाची एक बाई रहात होती. ती एक हुशार व चतुर बाई होती. म्हणून नवरा वारल्यानंतर आपल्या लहान मुलाचें व स्वतःचें कसें होईल ही काळजी तिला कधींच वाटली नाहीं. थोडें शेत होतें. ती स्वतः शेतांत काम करी आणि जी कांहीं प्राप्ति होई तेवढी दोघांच्या पोटापाण्याला पुरी पडे.

एकदां सखुबाईनें एक दुभती गाय विकत घेण्याचा विचार केला. सात आठ कोसावर गवळीवाडा नांवाचें गांव होतें. त्या गांवीं चांगल्या गाई स्वस्तांत मिळतात असें ऐकून ती मुलाबरोबर शंभर रुपये घेऊन त्या गांवीं निघाली.

निघतांना खायला प्यायला त्यांनीं कांहीं घेतलें नव्हतें. वाटेंतच गांव लागलें कीं कोणाकडेतरी उतरूं असें सखुबाईनें ठरविलें होतें. परंतु वाटेंत गांव असें लागलेंच नाहीं. मधून मधून कोठेंतरी चार सहा झोंपड्या मात्र दिसत. मायलेक अगदीं दमून गेलीं होतीं. पोटांत कावळे काव काव करूं लागले होते. एका जागीं प्यायला पाणी मिळालें, परंतु खायला कोठेंच कांहीं मिळालें नाहीं.

इतक्यांत त्यांना समोरून एक मनुष्य येत असलेला दिसला. त्याच्या डोक्यावर पिकलेल्या केळ्यांचा घड होता. "विकायला घेऊन चालला आहेस का रे केळी?" तिनें विचारलें. मायलेक भुकेनें कासावीस झालेलें ओळखून तो म्हणाला—"होय बाई, विकायलाच तर घेऊन चाललों आहे. चार आण्याला एक! किती देऊं?"



तिला तें ऐकून राग आला. म्हणाली—"आम्हांला नकोत तुझीं केळीं!" आणि दोघें पुढें निघालीं.

त्या वाटेनें येणारे जाणारे लोक केळीं विकत घेतील असा विचार करून केळीवाला झाडाखालीं सावलीची जागा पाहून बसला.

कांहीं अंतर चालून गेल्यावर सखुबाईनें आपल्या मुलाला कांहीं तरी कानांत सांगितलें आणि दोघं केळीवाला बसला होता तेथें परत आलीं. भुकेनें कासावीस झाला आहे हा. दे दोन केळीं."

केळीवाल्यानें दोन केळीं तोडून मुलाच्या हातांत दिलीं. मुलानें एक केळें खाल्लें आणि घेरी आल्यासारखा जमिनीवर पडून हातपाय झाडून तडफडूं लागला.

"माझ्या मुलाचा जीव घेतलास कीं रे मेल्या! तूं केळें दिलेंस त्यांत आणखी काय घालून दिलेंस, बोल!" असें मोठमोठ्यानें ओरडून ती मुलाला पोटाशीं धरून रडूं लागली.

तिचें ओरडणें ऐकून रस्त्यावरून जाणारे दोघे तिथे थांबले. त्यांना येत असलेले पाहून केळीवाला घाबरून गेला आणि केळ्याचा घड तसाच झाडाजवळ टाकून पळून गेला.

"झालें काय बाई?" म्हणून सखूबाईला त्या लोकांनीं विचारलें. तेव्हां ती म्हणाली—"आम्ही हा केळ्याचा घड घेऊन जात होतों. वाटेंत त्या भामट्यानें तो घड आमच्या हातांतून लुबाडून घेण्यासाठीं माझ्या मुलाला मारलें. तुम्ही वेळेवर थांबलांत म्हणून वांचलों आम्ही. नांहीं तर आम्हां दोघांचें काय झालें असतें देवच जाणें." असें म्हणत तिनें प्रत्येकाला दोन दोन केळीं तोडून दिलीं. मायलेकांनीं पोटभर केळीं खाऊन घेतलीं व केळ्याचा घड उचलून घेऊन पुढें निघालीं. संध्याकाळीं दोघं गवळीवाड्याला येऊन पोंचलीं.

गांवांत तिनें एका घरीं विकायला गायी आहेत का चवकशी केली तेव्हां लखू गवळ्याकडे चांगल्या गायीं विकायला आहेत हें तिला कळलें. म्हणून ती सरळ त्याच्या घरी चवकशी करीत गेली. गायी पाहिल्या. एक गाय तिला आवडली. नुकतीच व्याली होती. ७५ रुपये किंमत ठरली. पैसे दिले व दुसऱ्यादिवशीं सकाळीं गाय घेऊन जाण्याचा विचार केला. लखू गवळ्याच्या घरींच मायलेक उतरलीं.

बाहेर ओसरींत लखूनें दोघांना झोंपायला सांगितलें. अर्धरात्र उलटल्यावर लखू हळूच बाहेर आला आणि बायकोला म्हणाला—"झोंप लागलेली दिसते आहे!"

सखुबाईला झोंप लागली नव्हती. परंतु लखू गवळी काय करतो हें पाहाण्यासाठीं डोळे मिटून झोंप लागल्याचें सोंग करून पडून राहाली. लखूनें अंथरूणाजवळ येऊन चाचपून पाहालें. कांहीं हातीं लागलें नाहीं. तेव्हां परत आंत निघून गेला.

त्यानें दरवाजा आंतून बंद करून घेतल्यावर सखुबाई उठून दाराच्या फटीला












कान लावून ऐकूं लागली. लखूच्या बायकोनें विचारलें—"कांहीं नाहीं का सांपडलें?"

"उजाडूं दे, आणखी पंचवीस रुपये काढल्याशिवाय राहणार नाहीं." लखू बायकोला म्हणाला.

संध्याकाळीं सखूबाईनें पंचाहत्तर रुपये मोजून दिलें तेव्हां तिच्या पिशवींत आणखी रुपये उरलेले लखूनें पाहिले होते. त्यावर त्याचा डोळा होता. परंतु सखूबाईनें पिशवी कनवटीला खोचून ठेवली होती.

लखू गवळ्याला चांगला धडा देण्याच्या हेतूनें सखूबाईनें मुलाला जागें केलें व म्हणाली—"तूं गोठ्यांत जाऊन दोन गायींची दावीं सोडून ये!"

मुलानें त्या प्रमाणें दोन गाई सोडल्या आणि गाई हंबरल्यासारखा ओरडून पुन्हां येऊन पडून राहाला, जणुं कांहीं गोठ्यांत काय झालें हें त्याच्या गांवींच नाहीं.

गोठ्यांत खुडबुड झालेली ऐकून व गाईंचें हंबरणें ऐकून लखू गवळी कंदील घेऊन तिकडे गेला. दोन गाई गोठ्यांत नव्हत्या. त्यानें बायकोला जागें केलें. दोघं दोन दिशेला गाईच्या शोधार्थ निघालीं.

दोघं निघून गेल्यावर सखूबाई घरांत गेली. रात्रीं दिलेले पंचाहत्तर रुपये लखू गवळ्यानें पेटींत ठेवलेले तिनें पाहिले होते. तिनें पेटींतून रुपये काढून पेटी बंद करून ठेवून दिली व रुपये पिशवींत ठेवून देऊन ती कमरेला खोचली आणि पुन्हां झोपेचें सोंग करून पडून राहाली.

लखू व त्याची बायको दोघं गाईंना हुडकून घेऊन आलीं व गोठ्यांत बांधून ठेवून पुन्हां झोपलीं.

उजाडल्यावर सखूबाई लखूला म्हणाली—"येतो आम्ही. घेऊन जातो गाईला."

सखूबाई गाईबरोबर वासराला सोडूं लागल्यावर लखू म्हणाला—"मी गाय विकली होती. वासरूं नाहीं. वासरूं हवें असेल तर पंचवीस रुपये आणखी मोजा."

"पंचवीस रुपये आणखी! ते कां?" सखूबाईनें विचारलें.

"मी गाय विकली होती तुम्हांला, वासरूं नव्हतें विकलें. त्याशिवाय रात्रभर तुम्ही माझ्या पडवींत झोपलांत तें फुकटच वाटतें!" लखू गवळी म्हणाला.

"पंचाहत्तर रुपये घेऊन आणखी पंचवीस रुपये उकळण्यासाठीं नवराबायकोचा कावा दिसतो आहे. पंचात्तर रुपये देऊन स्वतःची मान अडकवून घेतली. पण लक्षांत ठेवा, हें फुकटाचे पैसे पचायचे नाहींत." असें सांगून सखूबाईनें पंचवीस रुपये दिले आणि गाय व वासरूं सोडून घेऊन गेली.

जातांना लखू गवळ्यानें कसें फसवलें, याविषयींची हकीगत गवळीवाड्याच्या गांव-कऱ्यांना सांगत सखूबाई आपल्या गांवीं जायला निघाली.

गवळीवाड्यांत शिरण्यापूर्वी तिनें एका घरीं कोणाकडे चांगल्या गाई मिळतात याची चवकशी केली होती. त्या घरच्या बाईला



भेटून तिनें लखू गवळ्यानें कसें फसविलें हें तिखट मीठ लावून सांगितलें. त्या बाईनें स्वत:चें एक काम तिच्याकडून करवून घेण्यासाठीं लखू गवळ्याची निंदा करण्याचें तोंडसुख करून घेतले. म्हणाली—“ तशी संवयच आहे त्याची. हें कारस्थान त्याचें नसून त्याच्या बायकोचें आहे. ती नाचवील तसा तो नाचतो.” नंतर हळूच म्हणाली—“ ताई! तुम्हांला थोडा त्रास होईल, पण नरसापूरच्या राहणाऱ्या आहां म्हणून म्हणतात. तेव्हां एक गोष्ट आठवली. माझी मुलगी नरसापूरलाच आहे. तिच्याकडे चार रीठे पाठवायला काढून ठेवले आहेत घेऊन जाल का? तुमच्या गांवीं मिळत नाहींत म्हणें.”

“हो घेऊन जाईन कीं.” सखुबाई म्हणाली व त्या बाईनें दिलेला एक डबा मुलाला घ्यायला सांगितला. दुपारीं विश्रांतीसाठीं दोघं एका झाडाखालीं थांबलीं. डबा जमिनीवर ठेवला होता. थोड्या वेळानें डब्यांत मुंग्या शिरलेल्या पाहून मुलगा म्हणाला—“ रीठ्यांना मुंग्या आल्या आहेत बघ!”

सखुबाईनें डबा उघडून पाहिला आंत शेव चिवडा व लाडू होते. दोघांनीं पोटभर लाडू व चिवडा खाल्ला व पुन्हां डबा बंद करून पुढें निघाले.

घरीं गेल्यावर सखुबाईनें डब्यांतले लाडू व चिवडा काढून घेतला व डब्यांत रीठे भरून त्या बाईच्या मुलीकडे पोंचता केला.

डब्यांत रीठे पाहून तिला देखील आश्चर्य वाटलें कीं आईनें रीठे कशाला पाठविले?





# खरा खुनी

एका गांवीं शुद्धांक नांवाचा एक ब्राह्मण रहात असे. त्याच्या घरीं कित्येक ब्रह्मचारी विद्याभ्यासासाठीं रहात असत. त्याचें घर म्हणजे एक लहानसें गुरुकुलच होतें.

एकदां रात्रीं घरच्या पडवींत कांहीं खुडबुड झालेली ऐकून शुद्धांक दार उघडून बाहेर आला तर त्याला एक मनुष्य कांहीं तरी ठेवून पळत जात असलेला दिसला. त्यानें जवळ पाहून पाहिलें तर एक रक्तबंबाळ प्रेत व मेलेल्या माणसाच्या पोटांत सुरा. शुद्धांकनें पोटांतून सुरा काढला व त्या माणसाच्या अंगांत जीव आहे का नाहीं हें नाका तोंडाजवळ हात नेऊन पाहूं लागला. नेमके त्याचवेळीं दोघे चौघे त्याच्या घरीं आले व मरून पडलेला मनुष्य शुद्धांकच्या हातांत सुरा पाहून निघून गेले. गांवभर बातमी पसरली कीं शुद्धांकनें भिकूशेट सावकाराचा खून केला.

राजाचे शिपाई शुद्धांकला खुनाच्या आरोपावरून धरून घेऊन निघून गेले. शुद्धांकच्या विरुद्ध साक्ष देणारे लोक तयार होतेच. त्याच्या बाजूनें तो निर्दोष असल्याची साक्ष द्यायला मात्र कोणी नव्हता. ज्याचा खून झाला होता तो अगदीं अनोळखी मनुष्य होता असें देखील नाहीं. कारण शुद्धांकनें एका आठवड्यापूर्वींच भिकूशेटकडून कांहीं पैसे कर्जाऊ घेतले होते. त्या विषयींच कांहींतरी भांडण झाले असावें व त्यानें रागाच्याभरांत खून केला असावा या संशयावरून शुद्धांकला अटक झाली होती.

आरोपीकडून तो निर्दोष असल्याबद्दल साक्षीपुरावा नाहीं हें पाहून राजानें शुद्धांकला










फांशीची शिक्षा सांगितली. फांशी देण्यापूर्वी तुझी शेवटची इच्छा कांहीं असेल तर सांग असें राजानें शुद्धांकला विचारलें.

"मी दोषी आहें कीं निर्दोषी हें त्या परमेश्वरालाच माहीत. पण महाराजांनीं एवढी दया करून मला शेवटची इच्छा काय आहे हें विचारलें आहे त्या बद्दल मी फार आभारी आहें. मेहरबानी करून महाराजांनीं मला दोन आठवड्याचा अवधि द्यावा. मी मागची व्यवस्था करून घरच्या लोकांचा निरोप घेऊन येतो." शुद्धांक राजाला म्हणाला.

राजा त्याला एका अटीवर एका पंधरवड्याचा अवधी द्यायला तयार झाला. त्यानें आपल्या ऐवजीं कोणाला तरी अटकेंत ठेवून जावें. पण शुद्धांक कोणाला ठेवणार? राजानें खुनाच खटला सुरवातीपासून स्वतःच पाहिला होता. शुद्धांकाच्या जबानीवरून त्याच्या सारख्या भोळ्या ब्राह्मणानें खून केला असेल या गोष्टीवर राजाचा विश्वास होत नव्हता. म्हणूनच कीं काय राजा म्हणाला—"तुझ्या ऐवजीं मी अटकेंत रहायला तयार आहें. पण हें बघ, तूं आला नाहींस तर आमच्या कायद्याप्रमाणें मला फांशी होईल."

शुद्धांकनें राजाचे परोपरीनें आभार मानले व आपल्या गांवीं निघून गेला. घरची सर्व व्यवस्था करून निघायला एक आठवडा लागला. विद्यार्थ्यांना त्यांच्या घरीं पाठवून दिलें नंतर रानांत एका देवीच्या देवळांत जाऊन देवीची पुजा केली व तिचें ध्यान धरून एका झाडाखालीं एक आठवडाभर बसून राहाला. पंधराव्या दिवशीं राजाला वचन दिल्याप्रमाणें निघण्यासाठीं तो घरच्या लोकांचा निरोप घेत होता. त्याच वेळीं चौघां चोरांनीं घरांत शिरून त्याला धरलें व त्याचें तोंड व डोळे बांधून ते त्याला कोठें



तरी घेऊन गेले. त्यांनीं त्याला एका खोलींत ठेवून बाहेरून खोलीला कुलुप लावलें.

चोर घरांत शिरून त्याला बांधूं लागले तेव्हां त्यानें विनवण्या केल्या—"मला कां धरतां? माझ्याजवळ काय आहे? मला उद्यां राजधानींत पोंचलें पाहिजे. मला फांशीवर चढायचें आहे. वेळेवर मी पोंचलों नाहीं तर माझ्याबद्दल राजा स्वतः फांसावर चढेल."

पण चोरांनीं त्याचें एक ऐकलें नाहीं व त्याला तेथेंच टाकून निघून गेले. जाण्यापूर्वी त्यांनीं शुद्धांकचे हात सोडले होते. शुद्धांकनें स्वतः डोळ्यावरची व तोंडावरची पट्टी सोडली.

दुसऱ्या दिवशीं शुद्धांकच्या गांवचा एक मनुष्य राजधानीला आला व राजाला भेटला. म्हणाला—"महाराज! शुद्धांकवर विश्वास करून आपण त्याला सोडून दिलेंत हें खरें आहे. पण तो काय येतो? एक आठवडा झाला तो गांवांत नाहीं व तो वचन दिल्याप्रमाणें राजधानीस पण आला नाहीं. मला ह्या सर्वामागें कांहीं तरी भानगड दिसते आहे."

राजा तें ऐकून म्हणाला—"तुम्ही शुद्धांकच्या हालचालीवर पाळत ठेवून सरकारला



मदतच केली आहे. त्याबद्दल मी आपला फार आभारी आहें. मी शुद्धांकच्या शोधार्थ शिपायांना पाठवीत आहें. तोंपर्यंत तुम्ही माझे स्वतःचे अतिथि म्हणून रहावें. आरोपी विषयीं तुम्ही पुरवलेल्या माहितीबद्दल तुम्हांला सरकारतर्फे कांहीं तरी बक्षिस दिलें जाईल."

राजानें त्याला अतिथि गृहांत ठेवून त्याच्यावर नजर ठेवण्यासाठीं शिपाई नेमले.

त्या दिवशीं संध्याकाळीं खुनी अपराध्याला फांशी देण्याची घोषणा झाली होती. वध्यस्थानीं लोक जमा झाले होते. शुद्धांक

पळून गेल्याची बातमी सांगणाऱ्या माणसाला बरोबर बोलावून घेऊन राजा वध्यस्थानीं आला. त्यानें राजाला विचारलें—"महाराज! शुद्धांक तर पळून गेला आहे. मग ही फांशी देण्याची तयारी कशासाठीं? त्याला धरून आणावा!"

"शुद्धांकाला शिक्षा झाली नाहीं म्हणून काय झालें? मी जबाबदारी घेतली होती. म्हणून मला फांशीवर चढावें लागणार! पण त्याला धरून आणावें, असा तुझा आग्रह दिसतो! कांबरें?" राजानें विचारलें.

तें ऐकून तो मनुष्य चपापला. राजानें प्रश्नांची झडी सुरू केली. त्यावरून तो शुद्धांकाचा कोणी नातेवाईक असल्याचें कळलें. राजाला असेंहि कळलें कीं शुद्धांकाशीं त्याचें कांहीं तरी कारणावरून वितुष्ट आलें होतें. त्यानें, ज्या सावकाराचा खून झाला होता, त्याच्या कडून शुद्धांकाप्रमाणेंच कर्ज घेतलें होतें. व्यापाऱ्याशीं कर्ज फेड करण्यासंबंधीं भांडण झालें व तें विकोपाला जाऊन त्यानेंच त्याचा खून केला व प्रेत शुद्धांकाच्या घरासमोर टाकलें.

खऱ्या खुन्याकडून वरील माहिती राजानें काढून घेतली त्याच वेळीं राजाच्या शिपाया-बरोबर शुद्धांक आला. राजाच्या हुकमानेंच शिपायांनीं चोराचा वेष करून शुद्धांकाला धरून एका खोलींत बांधून ठेवलें होतें.

राजा शुद्धांकाला म्हणाला—"खरा खुनी कोण हें मला कळलें आहे. त्यानें स्वतःच आपला अपराध स्वीकार केला आहे. त्याला फांशीची शिक्षा होईल."

शुद्धांकाला फांशी व्हावी म्हणून ज्यानें प्रयत्न केला होता त्यालाच फांशी झाली.





# कपटदान

एका गांवीं यशवंत नांवाचा एक श्रीमंत गृहस्थ रहात असे. तो लोभी होता. परंतु दानी म्हणून म्हणवून घेण्याची त्याला फार हाव. कोणी ओळखीचा माणूस असतांना पैपाहुणा किंवा भिक्षुक आला कीं आपल्या दानशूरपणाचें तो प्रदर्शन करी.

एकदां यशवंत गांवांतल्या एका प्रमुखाशीं बोलत असतां एक बैरागी त्याच्या घरीं आला. बैरागी म्हणाला—"यजमान, एक वेळचें जेवण वाढावें."

यशवंतनें एका नोकराला बोलावून त्याला कांहीं तरी सांगितलें.

नोकर बैराग्याला घेऊन भिकाऱ्यांना अन्नदान होत होतें तेथें घेऊन गेला. एका पानावर वरण भात व भाजी वाढून त्यानें बैराग्यासमोर ठेवलें. पानाकडे एकदां पाहून बैरागी म्हणाला—"जा, आपल्या मालकाला बोलावून घेऊन ये."

तोंपर्यंत तो गांवप्रमुख निघून गेला होता. यशवंत आंत आला व बैराग्याला म्हणाला—"काय रे जोगड्या? माज चढला आहे वाटतें फुकटचें अन्न खाऊन?"

पण बैरागी शांतपणें म्हणाला—"मला भिकारी समजून तूं हें अन्न देवविलेंस. मी तुझ्या पंक्तीला बसून जेवणार आहें."

"जें दिलें तेवढ्यावर मनाचें समाधान होत नसेल तर चालू लाग माझ्यासमोर नाहीं चालणार तुझ्या या मिजाशी. एवढी ऐट आहे तर भीक कां मागतो आहेस?" यशवंतनें विचारलें.

बैरागी स्मित करून म्हणाला—"ऐट! मी एक साधक व योगी आहें. मी चाललों

श्री का. ना. सोमण



आहे तपश्चर्या करण्यासाठीं. वाटेंत तुझें घर दिसलें. चांगलें जेवण मिळेल म्हणून आलों. मला पाहून माझ्या विषयीं तुझ्या मनांत आणखी कांहीं विचार आला असेल तर मात्र मला कांहीं बोलावयाचें नाहीं. मला तर एक वेळचें जेवण पाहिजे आहे व तें तुझ्या पंक्तीला. तुला एक वस्तु पण मिळाली आहे. तुझें कल्याणच होईल. मला एक वेळ जेवण वाढल्याबद्दल तुला वाईट वाटणार नाहीं. झाला तर तुझा कांहीं तरी फायदाच होईल." बैरागी म्हणाला. तें ऐकून यशवंतला आश्चर्य वाटलें. तो त्या बैराग्याकडे कांहीं वेळ न्याहाळून पहात उभा राहिला. नंतर त्यानें आपल्या नोकराला बोलावून बैराग्याला धक्के मारून बाहेर हाकलून द्यायला सांगितलें. नंतर तो स्नान करून घरांत गेला. बैरागी निघून गेला.

हें सर्व सैंपाकी पहात होता. एका ताटांत उत्तमोत्तम पक्वान्नें वाढून मागच्या दारानें धांवत गेला आणि बैराग्याला गाठून म्हणाला—"बैरागी बुवा जेवण वाढून घेऊन आलों आहें. जेवून घ्यावें."

"त्या लोभ्याच्या घरचें अन्न मी शिवणार नाहीं." बैरागी म्हणाला.

"हें माझ्या वांट्याचें अन्न समजून आपण जेवावें." सैंपाकी नम्रपणें म्हणाला.

"अरे, आपला वांटा मला खायला घालून तूं उपाशीं का मरणार आहेस? तूं माझ्याबरोबर जेवायला तयार असशील तर ये आपण दोघे जेवूं. नाहीं तर मी नाहीं खाणार!" बैरागी म्हणाला. सैंपाकी त्याला कबूल झाला. दोघे एका झाडाखालीं बसून जेवले.

"आज तूं माझा अंतरात्मा शांत केला आहेस. तुला मी एक गोष्ट सांगतों. ती तूं केलीस तर तुझें कल्याण होईल. तो पहा, पलीकडे तुला एक डोंगर दिसतो आहे ना? तो पार करून गेलास म्हणजे तुला एक रान लागेल. त्या रानांत देवाचा एक ओसाड जुना मांडव आहे. त्या मांडवांत बसून तूं लक्ष्मीचा मंत्रजप केलास तर तुला सकाळीं उजाडल्यावर एका अद्भुत वस्तूचा लाभ होईल व आयुष्यभर तूं सुखी होशील." असें सांगून बैरागी निघून गेला.

सैंपाकी रिकामें ताट घेऊन आला त्यावेळीं मालक समोरच उभा होता. त्यानें त्याला विचारलें, "कोठून आलास रे? आणि तो बैरागी कोठें आहे?"

"तो तिकडे निघून गेला." असें सांगून सैंपाक्यानें बैरागी निघून गेला त्या दिशेला बोट दाखविलें. तें ऐकून यशवंत त्या दिशेला धांवत निघाला.

मालकानें आपल्याला रिकामें ताट घेऊन परत येत असतांना पाहिलें आहे. आतां काढणार आपल्याला नोकरीवरून अशी भीति सैंपाक्याला वाटत होती. परंतु मालकाला बैराग्याच्या शोधार्थ धांवत निघालेला पाहून, त्याला भांड्यांत जीव पडल्यासारखें वाटलें.

यशवंत बैराग्याच्या पाठीमागें धांवला त्याला एक कारण होतें. बागेंत तो झाडें



लावण्यासाठीं खणूं लागला तेव्हां त्याला एक मोहारांनीं भरलेला हंडा दिसला. त्यानें तो हंडा एका कोपऱ्यांत लपवून ठेवला होता. बैरागी एका नवीन वस्तूचा लाभ होईल हें म्हणाला होता. तें त्याला आठवलें. आंघोळ करून आल्यावर त्यानें तो हंडा घेऊन पाहिला. तो रिकामा होता. त्या बैराग्यानें मंत्रशक्तीनें त्या मोहारा अदृश्य केल्या असाव्या असें वाटून तो त्याच्याकडे माफी मागून त्या मोहोरा परत देवविण्यासाठीं हात जोडून विनंती करायला गेला होता.

बैरागी भेटला. यशवंतनें हात जोडून माफी मागितली व म्हणाला—"मी आपणांला सामान्य जोगडा समजून आपला अपमान केला. क्षमा करावी. माझें आतिथ्य स्वीकार करून माझी अदृश्य झालेली मूल्यवान वस्तु मला पुन्हां देववावी."

"मी जेवलों, मला आतां भूक नाहीं. परंतु मी तुला एक उपाय सांगतों. तो डोंगर दिसतो आहे ना, त्याच्या पलीकडील रानांत देवाचा एक जुना पडका मांडव आहे. रात्रभर तेथें बसून व लक्ष्मीचें ध्यानकरून जो मंत्रजप करील त्याला ऐहिक सुखप्राप्ति होईल अशी एक मूल्यवान वस्तु मिळेल." असें सांगून बैरागी निघून गेला.

यशवंत काय करणार? यशवंत घरीं गेला. रात्रभर तोच विचार त्याच्या मनांत घोळत होता. दुसऱ्या दिवशीं बैराग्यानें सांगितल्याप्रमाणें डोंगरापलीकडे जाण्याचें ठरवून तो बरोबर खायला प्यायला बांधून घेऊन एक काठी व एक सुरी घेऊन निघाला.

दुपारीं एका जागीं बसून त्यानें खायला काढावें म्हणून गाठोडें सोडलें. इतक्यांत समोर एक म्हातारा येऊन उभा राहिला व म्हणाला—"फार भूक लागली आहे. खायला देतां का कांहीं तरी?"

यशवंतला त्याचा राग आला. म्हणाला—"गांवांत जाऊन भीक मागून खा!"

यशवंत खाऊन पिऊन पुढें जाण्यासाठीं उठूं लागला तेव्हांसमोर एक म्हातारी येऊन उभी राहाली. तिच्या डोक्यावर लाकडाची मोळी होती व एक लहान मुलगी बोट धरून उभी होती. म्हातारी म्हणाली—"मुलीला घेऊन व डोक्यावर ही मोळी घेऊन कशी जाऊं! माझ्या मुलीला कडेवर घेऊन घरापर्यंत येता कां!"





"मला हेंच काम आहे वाटतें?" असें सांगून यशवंत पुढें निघाला. डोंगर पार करून रानांत पाऊल ठेवल्याबरोबर एक आंधळा कोणी तरी येत असल्याची चाहूल लागतांच म्हणाला—"कोण रे बाबा तूं? कोणी पुण्याला दिसतोस. माझी काठी हरवली आहे. झाडाची एक डाळी तोडून एक काठी करून देतोस का?"

यशवंतनें तिकडे दुर्लक्ष केलें. पुढें निघून गेला. रानांत त्याला बैराग्यानें सांगितलेला मांडव दिसला. रानटीं श्वापदें जवळ येऊं नयेत म्हणून काटक्या गोळा करून त्यानें जाळ केला आणि काठी व सुरी बाजूला ठेवून मंत्रजप करूं लागला. उजाडलें तरी लक्ष्मी प्रसन्न झाली नाहीं. त्याला कोणतीहि वस्तू देखील मिळाली नाहीं. बैराग्याला मनांतल्या मनांत शिव्या देत तो घरीं गेला.

त्या जोगड्याला जेवूं घातल्याबद्दल त्यानें रागानें सैंपाक्याला नोकरीवरून काढलें.

सैंपाक्याला आई होती व बहीण भावंडें होती. त्यांच्या पोटापाण्याची जबाबदारी त्याच्यावरच होती. म्हणून तो बैराग्यानें सांगितल्याप्रमाणें करण्याचें ठरवून निघाला वाटेंत त्याला भिकारी भेटला. त्याला त्यानें एक भाकरी खायला दिली. मोळीवालीच्या मुलीला तिच्या घरीं पोंचतें केलें. आंधळ्याला काठी करून दिली. तो मांडवाजवळ पोंचला तोंपर्यंत काळोख पडूं लागला होता. मंत्रजप करीत असतांच केव्हां डोळा लागला हें त्याला कळलें नाहीं.

परंतु सकाळीं उठून पाहातो तों त्याच्या शेजारीं त्याला सोन्याच्या मोहरा बांधलेलें एक गाठोडें दिसलें. त्याचें दारिद्र्य नाहीसें झालें व आयुष्यभर तो सुखी झाला.





# युध्द कांड

लक्ष्मणाला शक्तिबाण लागून तो मूर्छित झालेला पाहिल्यावर रामाला रावणाचा अत्यंत संताप आला. त्यानें भात्यांतून एक भयंकर बाण काढला व रावणावर सोडला. त्याचा प्रहार असह्य झाल्यानें रावण पळून गेला.

नंतर राम लक्ष्मणाजवळ जाऊन विलाप करूं लागला. परंतु सुषेण त्याला म्हणाला—"भिण्याचें कारण नाहीं." नंतर तो मारुतीला म्हणाला—"जांबवंतानें ज्या औषधी पर्वताचें वर्णन केलें होतें त्याच्या दक्षिण शिखरावर चार औषधी वनस्पती आहेत त्या घेऊन ये."

मारुतीनें उड्डाण केलें तो थेट पर्वत शिखरावर गेला. परंतु त्याला तीं झाडें माहीत नसल्यानें त्यानें पर्वताचें शिखरच उचलून आणलें आणि सुषेणाला म्हणाला—"तुला ज्या वनस्पती पाहिजे असतील त्या घे. मी कांहीं ओळखूं शकत नाहीं."

सुषेणानें पाहिजे असलेल्या औषधी तोडल्या. त्याचा रस काढला व लक्ष्मणाच्या नाकांत सोडला. त्याच्या दर्पानें शुद्ध आली व तो उठून बसला. रामाला तें पाहून फार आनंद झाला. त्यानें त्याला कडकडून आलिंगन दिलें. आणि म्हणाला—"भाग्य बलवत्तर म्हणून तूं उठलास. तुझ्याशिवाय ह्या युद्धांतील



विजय काय कामाचा आणि सीतेला सोडवून आणून तरी मी काय करणार ?"

रामाच्या तोंडचें तें वाक्य ऐकून लक्ष्मण म्हणाला—"रावणाचा नाश करून बिभीषणाला राज्याभिषेक करण्याचें वचन तूं दिलें आहेस हें विसरूं नकोस. अजून तुला रावणाचा वध करावयाचा आहे."

राम लक्ष्मण पुन्हां युद्धाला सज्ज झाले. तेवढ्यांत रावणहि रथांत बसून आपल्या अनुयायांसह रणांगणांत आला.

एकाएकीं आकाशांत इंद्राचा रथ दिसला. तेवढ्यांत इंद्राचा सारथी मातली पुढें येऊन रामाला म्हणाला—"देवेंद्रानें आपणासाठीं हें कवच, धनुष्य-बाण आणि शक्ति देऊन हा रथ पाठविला आहे. आपण ह्यावर बसून युद्ध करावें." रामानें रथाची प्रदक्षिणा करून नमस्कार केला आणि मग त्यावर आरूढ झाला. मातली सारथ्य करूं लागला.

रामारावणाचें पुन्हां युद्ध सुरू झालें. परस्परांवर महास्त्र प्रहार करूं लागले. दोघेहि दुसऱ्याची अस्त्रें विफल करीत होते. रावणानें रामावर शक्तिशाली शूल सोडलें. तें विफल करणें रामाच्या शक्तिबाहेर होतें. शेवटीं इंद्रानें दिलेल्या शक्तीच्या साहाय्यानें त्यानें तें अडवलें. रामाला उग्ररूप धारण करून युद्ध करतांना पाहून रावण घाबरून गेला. हें पाहून रावणाचा सारथी त्याचा रथ दूर नेऊं लागला. जरा भानावर आल्यावर तो एकदम आपल्या सारथ्यावर खेकसला—"मूर्खा, मी काय बांगड्या भरल्या आहेत समजलास ? रणांतून माझा रथ इकडे कां आणलास ? नालायक ! चल, फिरव रथ रणांगणाकडे."

"महाराज, आज नव्यानें मी सारथ्य करीत नाहीं. युद्ध करतां करतां रामाला तोंड देणें तुम्हांला शक्य झालें नाहीं. तुम्ही थकून गेलां आहांत. घोडेदेखील थकून गेले आहेत. तेव्हां सर्वांना थोडी विश्रांति मिळावी म्हणून मी इकडे वळलों. आतां तुम्ही सांगाल तिकडे रथ घेऊन चलतों." रावणाचा सारथी म्हणाला.

"केलेंस तें ठीकच केलेंस पण आतां माझा रथ रामासमोर नेऊन उभा कर." रावणानें आज्ञा केली.

राम देखील दमलेला होता. रावणाला परत आलेला पाहून तो चिंतित झाला. एवढ्यांत युद्ध पाहण्यासाठीं आलेल्या अगस्त्य ऋषींनीं सांगितलें कीं मी तुला 'आदित्य हृदय' मंत्र देतों. त्याचा जप कैर म्हणजे तुला पुन्हां हुरूप येईल. त्यांनीं सांगितलेला मंत्र रामानें तीन वेळां म्हटला. त्या बरोबर त्याचा सर्व शीण दूर झाला व तो उत्साहानें रावणाशीं लढूं लागला.

"मातली, तूं तर इंद्राचा सारथी आहेस. तुला निराळें सांगण्याची जरूर नाहीं पण सांगून ठेवतों मागें फिरायचें नाहीं." रामानें मातलीला इशारा दिला.

मातली रथ चालवूं लागला. त्यानें इतक्या वेगानें घोडे सोडले कीं त्यांच्या खुरांच्या धुळीनें रावणाचा रथ झांकला





गेला. त्याला अस्पष्ट दिसूं लागलें म्हणून क्रोधानें व अंदाजानें तो जोरजोरानें बाण सोडूं लागला. पण रामानें इंद्राच्या धनुष्य बाणानें ते सर्व अडविले. रामारावणांचें द्वंद्व झालें. वाकींचे वीर आपापलें युद्ध सोडून हें द्वंद्वच पाहात बसले. बाणावर बाण आणि शस्त्रावर शस्त्रें सुटत होतीं. दोघे आवेशानें लढत होते. एवढ्यांत रामानें एका बाणानें रावणाचें एक डोकें उडवलें. तें जमीनीवर पडतें न पडतें तोंच रावणाच्या धडावर नवीन डोकें उगवलेलें दिसलें. त्याला रामानें बाणानें खालीं पाडलें तर तिसरें आणखी आलें. त्यालाहि रामानें उडवलें तरी पुन्हां धडावर डोकीं होतींच. राम आश्चर्य चकित झाला. असें बराच वेळ होत राहिलें. काय करावें रामाला कांहींच सुचेना. हें असेंच युद्ध सात दिवस आणि सात रात्रीपर्यंत होत राहिलें. तरी रावणाला कांहींच झालें नाहीं.

शेवटीं मातली रामाला म्हणाला—“ आतां कशाची वाट पाहात बसला आहेस. टाक मारून त्याला. पुरे झाला हा खेळ. आपलें ब्रह्मास्त्र कशासाठीं एवढें जपून ठेविलें आहेस? काढ बाहेर आणि संपव ही लढाई.”

हा ब्रह्मबाण सर्पाकृति व दैदीप्यमान होता. त्याला पंख असून तो बज्राप्रमाणें अतिशय जड होता. कोणत्याहि अस्त्राला भेदण्याची शक्ति त्याच्यांत होती. असा तो बाण रामानें बाहेर काढून धनुष्यावर चढविला आणि मंत्राचा जप करून रावणावर सोडला. तो रावणाच्या छातींत घुसून पाठींतून बाहेर निघून गेला. बाण लागतांच रावणाच्या हातांतील शस्त्रास्त्रें गळून पडलीं आणि पाठोपाठ त्याचा अवाढव्य देह निष्प्राण झाला आणि खालीं कोसळला.

रावण मेल्याचें कळल्याबरोबर सारी राक्षस सेना जीव घेऊन पळून जाऊं लागली. वानरसेना त्यांचा पाठलाग करूं लागली. इकडे आकाशांत युद्ध पाहण्यासाठीं सर्व देव एकत्र आलेच होते. त्यांनीं वरून पुष्पवृष्टि केली. जिकडे तिकडे रामाचा जयघोष होऊं लागला. सुग्रीव अंगदादिकांना कृतार्थ झाल्याचें समाधान झालें. सर्व वानरसेनानायक रामलक्ष्मणांच्या भोंवती गोळा होऊन उन्मुक्त कंठानें त्याची स्तुति करूं लागले.



रावणाच्या मृत्यूनें बिभीषणाला फार दुख झालें. कारण तो महा पंडित आणि बुद्धिमान होता. शूर पराक्रमी होता. शंकराचा अनन्य भक्त होता. परंतु त्यानें सीतेचें हरण केल्यामुळेंच त्याच्यावर मृत्यू ओढवला. त्याच्या प्रेताजवळ जाऊन तो शोक करूं लागला.

“ रावण मेला खरा पण त्याला वीरगति मिळाली. युद्धामध्यें जय-पराजय हा आहेच. कोणत्यातरी एका पक्षाचा पराजय होणारच. त्यांत वावगें काय झालें. तो भित्र्यासारखा मैदान सोडून तर पळून नाहीं गेला. त्याला सद्गति, वीरगति मिळाली. त्याच्यासाठीं दुःख करूं नकोस.” रामानें बिभीषणाचें सांत्वन केलें. रावण मारला गेल्याची वार्ता कळतांच त्याच्या सर्व राण्या उत्तर द्वारानें बाहेर पडून त्याच्याजवळ गेल्या आणि ऊर बडवून शोक करूं लागल्या.

“ हे नाथ, बिभीषणाच्या सांगण्याप्रमाणें तुम्हीं सीतेला तेव्हांच सोडून दिलें असतें तर आज तुमच्यावर मरणाची पाळी आली नसती. हे नाथ, तुम्हीं वीरगति मिळविलीत तरी पण आपल्या उज्वल चरित्राला कलंक लावून गेलांत. कसा जाईल हा कलंक!” त्या सर्वजणी रडूं लागल्या. “ एवढा



पराक्रमी तूं, तिन्ही लोकांचा विजेता. पण साध्या माणसाच्या हातून मृत्यू यावा ना!" मंदोदरी शोकाकुल होऊन म्हणाली. दुःख असह्य होऊन ती विलाप करूं लागली.

आपला शत्रु मानलेल्या भावाच्या अंत्य संस्काराची काय व्यवस्था करावी ह्या विचारांत बिभीषण असतां त्याला राम म्हणाला—"बिभीषणा! रावणाला अग्नि देण्यास त्याच्या कुळांत तुझ्याशिवाय कोणी उरला नाहीं. तेव्हां तूं त्याला यथाविधि अग्नि दे. जिवंतपणीं शत्रुमित्रत्व, मृत देहाशीं वैर कसलें!"

रामाच्या आज्ञे प्रमाणें बिभीषणानें स्मशानामध्यें योग्य स्थान निवडलें. तें प्रथम पवित्र करून तेथें चंदनाची चिता रचवली. त्यावर रावणाचा देह ठेविला. त्यावर पुरोहितांनीं मंत्रोच्चार करून अंत्यसंस्कार केला. त्याच्या सर्व स्त्रियांनीं चितेला प्रदक्षिणा केली. त्याला साष्टांग प्रणिपात केला. आणि मंत्र घोषांत बिभीषणानें रावणाच्या चितेली अग्नि दिला. क्षणार्धांत चितेच्या ज्वाळा आकाशास जाऊन भिडल्या जणूं कांहीं रावण त्या अग्नीच्या शिडीवरूनच स्वर्गांत जात होता. थोड्याच वेळांत रावणाचा प्रचंड देह भस्म होऊन गेला. बिभीषणानें समुद्रांत स्नान करून ओलेल्यानें त्याला अखेरचे पाणी दिलें. व पुन्हा स्नान केलें. रावणाच्या सर्व स्त्रियांनीं समुद्रस्नान केलें व राजवाड्यांत परत गेल्या. अशा तऱ्हेनें सर्व कार्य उरकून त्याच्या बायकांना घरीं परत पाठवून बिभीषण रामाच्या शिबिरांत आला.

इकडे राम रावण युद्ध पाहण्यासाठीं आलेले देव-देवी, यक्ष किन्नर-गंधर्व-विद्याधर सर्व रामा भोंवती जमून त्याची स्तुति करीत होते. त्या सर्वांनीं रामाला प्रदक्षिणा घालून

नमस्कार केला आणि विमानांत बसून आपापल्या घरीं निघून गेले. सर्व वानर सेनेला त्याच्या पराक्रमाची प्रशंसा करून रामानें निरोप दिला. इंद्राचा सारथी मातली ह्याचाहि सत्कार करून रामानें मोठ्या आदरानें त्याला निरोप दिला. तो इंद्राचा रथ घेऊन निघून गेला. शेवटीं रामानें सुग्रीवाला प्रेमानें विश्रांति घेण्यासाठीं त्याच्या शिबिरांत पाठविलें. नंतर तो लक्ष्मणाच्या बरोबर आपल्या शिबिरांत परत आला.

राम शिबिरांत पोहोंचल्यावर विभीषण रावणाचा सर्व अंत्य संस्कार संपवून तेथें गेला. त्याला पाहिल्यावर राम लक्ष्मणाला म्हणाला—"रावणाचें राज्य विभीषणाला देण्याचें आपण कबूल केलें आहे. तें काम आतां केलें पाहिजे. आणि ह्याची सर्व व्यवस्था तूं कर. विभीषणाचा राज्याभिषेक विधिपूर्वक व थाटामाटानें झाला पाहिजे."

लक्ष्मणानें वानरांना सुवर्ण कलश देऊन सात नद्यांचें पाणी आणविलें. एका मोठ्या कलशांत समुद्रजल आणविलें. नंतर त्यानें विभीषणाला मंगल स्नान घालून रेशमी वस्त्रें घालावयास देऊन सिंहासनावर बसविलें. नंतर सप्त नद्यांचें पाणी एकत्र करून त्याला मंगल घोषामध्यें अभिषेक केला. अभिषेकाचें मंत्राशीर्वाद संपल्यावर सरदार दरबाऱ्यांचे मुजरे घेऊन नजराणे स्वीकारले. त्या नंतर राज्यासंबंधीं चार उपदेशाच्या गोष्टी सांगून त्यांना त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें भेटी दिल्या. त्याच बरोबर विभीषणानें राम लक्ष्मणांनाहि दिव्य व अमूल्य अशा वस्तू दिल्या अशा तऱ्हेनें विभीषणाचा राज्याभिषेक समारंभ पूर्ण झाला.





# सुदर्शन राजाची गोष्ट

फार पूर्वी सूर्यवंशांतील ध्रुवसंधि नांवाचा राजा अयोध्या येथें राज्य करीत असे. त्याला दोन बायका होत्या. एक मनोरमा व दुसरी लीलावती. मनोरमेला सुदर्शन नांवाचा मुलगा होता आणि लीलावतीला शत्रुजित. सुदर्शन वयानें मोठा होता. तरी शत्रुजित जास्त गुणी होता. म्हणून बापाचें त्याच्यावरच जास्त प्रेम होतें.

एकदां ध्रुवसंधि शिकारीला गेला असतां वाघाच्या तोंडीं सांपडून मरण पावला. मंत्र्यांनीं शत्रुजितलाच राज्याभिषेक करण्याचें ठरविलें. मनोरमेच्या वडिलांना तें आवडलें नाहीं. वडील मुलालाच राज्याभिषेक झाला पाहिजे असें त्यांचें म्हणणें होतें.

झालें! शत्रुजितचे आजोबा यथाजित आणि सुदर्शनचे आजोबा वीरसेन यांचें युद्ध झालें व वीरसेन मारला गेला. मनोरमा आणि सुदर्शन निराधार झाले. मनोरमा मुलाला घेऊन देश सोडून निघून गेली. एक दासी आणि एक मंत्री हे दोघे तिच्या बरोबर होते. वाटेंत चोरांनीं त्यांना लुबाडलें आणि जें कांहींबरोबर होतें तेंहि ते घालवून बसले. ते चौघेहि गंगा पार करून चित्रकूट पर्वताजवळ भारद्वाज मुनींच्या आश्रमांत येऊन पोंचले. त्यांची हकीगत ऐकून भारद्वाज ऋषींनीं त्यांना आश्रमांतच राहण्याची विनंती केली आणि मोठ्या आदरानें त्यांना ठेवून घेतलें.

कांहीं दिवस गेले. एक दिवस मनोरमेला कळलें कीं शत्रुजितचे आजोबा यथाजित कांहीं जंगली लोकांनाबरोबर घेऊन येत आहेत. तिनें धांवत जाऊन भारद्वाज मुनींच्या

शेवटचें मलपृष्ठ

पाय धरले. म्हणाली—" आपणच आमचे मायबाप. ह्या संकटांतून आम्हांला वांचवा." तिची दीन अवस्था पाहून भारद्वाज मुनींनीं तिला अभयदान दिलें.

जो पर्यंत सुदर्शन जिवंत आहे तों पर्यंत शत्रुजितच्या राज्याला भय आहे असा विचार करूनच यधाजितनें सुदर्शनला मारून टाकण्याचा निश्चय केला होता. त्यानें मनोरमेचा ठावठिकाणा हेरून ठेवला होता. परंतु त्याच्या मंत्र्यांनीं वशिष्ठ ऋषींची कामधेनू पळवून नेली असतां विश्वामित्राची कशी गाळण उडाली त्याची आठवण करून दिली. ऋषींच्या कोपाची कल्पना आल्यावर यधाजितचे डोळे उघडले. त्यानें येऊन त्यांचे पाय धरले आणि क्षमा मागितली. सुदर्शनला त्रास न देण्याचें वचन घेऊन ऋषींनीं त्याला क्षमा केली तेव्हां तो आपल्या राज्यांत परत गेला.

सुदर्शन आश्रमांतच राहूं लागला. त्या-वेळीं तो अकरा वर्षांचा होता. तो तेथेंच राहून विद्याभ्यास करूं लागला. मुनींनीं त्याला एक महामंत्र दिला. त्याचें फळ त्याला पुढें पांच वर्षांनीं मिळालें. त्याचा विद्याभ्यास चालू असतां लाल वस्त्र धारण केलेली, लाल फुलांच्या माळा घातलेली, भालीं लाल टिळा असलेली अंबाबाई एक दिवस त्याला दिसली. तिला पाहतांच सुदर्शननें तिला साष्टांग नमस्कार केला. संतुष्ट होऊन तिनें त्याला दिव्य धनुष्य-बाण देऊन आशीर्वाद दिला आणि अंतर्धान पावली.

कांहीं दिवसांनीं काशीचा राजा सुबाहु याची मुलगी शशिकला हिला स्वप्नांत पार्वती दिसली. तो म्हणाला—" बाळे, सुदर्शन तुझा पति होईल " आणि आशीर्वाद देऊन तो अदृश्य झाली.

सुदर्शनच्या विषयीं तिला कांहीं माहिती नव्हती. तिनें विचारपूस केली. तेव्हां तिला कळलें कीं सुदर्शन अयोध्येचा युवराज होता. पण त्याच्या भावानें राज्य बळकावल्यामुळें तो भारद्वाज मुनींच्या आश्रमांत रहात आहे. पार्वतीचा दृष्टांत झाल्यापासून त्यालाच पति म्हणून वरण्याचा तिनें निश्चय केला.

एकदां शृंगवेरपुर राजाला सुदर्शनची वार्ता कळली. ती ऐकून त्याला कांहीं मदत करण्याच्या हेतूनें त्यानें त्याला एक रथ देऊं केला. परंतु ऋषी म्हणाले—" नुसता





रथ घेऊन तो काय करणार ? तूं आलाच आपल्या बरोबर घेऊन जा" ऋषींच्या आज्ञेप्रमाणें तो सुदर्शनला घेऊन गेला.

थोड्याच दिवसांत सुबाहु राजानें शशिकलेचें स्वयंवर मांडलें. इतर राजकुमारांबरोबर सुदर्शन तेथें गेला. शशिकला मनामध्यें सुदर्शनचा जप करीतच होती. स्वयंवराचे वेळीं जयमाळ हातांत घेऊन ती इकडे-तिकडे न पाहतां सरळ तपस्वी वेषांत असलेल्या सुदर्शनाजवळ गेली व हातांतील जयमाळ त्याच्या गळ्यांत घातली. पुढें मोठ्या थाटानें सुबाहूनें शशिकलेचें सुदर्शनशीं लग्न लावून दिलें.

लग्नसोहळा आटोपल्यावर सुदर्शन शशिकलेबरोबर रथांत बसून अयोध्येच्या दिशेनें निघाला. समोरून त्याचा भाऊ शत्रुजित मोठें सैन्य घेऊन त्याच्याशीं युद्ध करण्यास आला. युद्ध करण्यासाठीं शत्रुजितला आलेला पाहून सुदर्शनला आश्चर्य वाटलें. त्यानें डोळे मिटून अंबाबाईचें स्मरण केलें. फार मोठें युद्ध झालें. सुदर्शनच्या बाजूनें साक्षात अंबाबाईच लढत होती. सुदर्शन समोर शत्रुजितचा निभाव लागला नाहीं. शत्रुजितचा पराभव झाला.

सुदर्शन आपल्या पत्नीसह अयोध्येला आला. तेथें सावत्र मातेला सर्व वृत्त सांगून तिचें सांत्वन केलें आणि मोठ्या समारंभानें यथाविधि आपला राज्याभिषेक करविला.

अशा प्रकारें अंबेच्या कृपेनें त्याचें राज्य त्याला मिळालें. सुदर्शननें एक देऊळ बांधून त्यांत अंबेची स्थापना केली. तो तिची नित्य पूजा अर्चा करीत असे आणि नवरात्रींत मोठा उत्सवहि करीत असे. अंबेची त्याच्यावर कृपा होती.



# ४२. युनकांगची लेणीं

आपल्या देशांत अजिंठा वेरूळची लेणीं प्रसिद्ध आहेत. त्याच प्रमाणें चीनमध्यें 'युनकांग'ची लेणीं आहेत. येथें बुद्धाच्या हजारों मूर्ति कोरलेल्या आहेत. सुमारें १५०० वर्षांपूर्वी 'उत्तरवेय' राजांनीं हीं लेणीं कोरवून घेतलीं. शान्सी प्रांताच्या पूर्व भागांत ह्या गुहा एकंदर ३० आहेत.





# भारताचा इतिहास



सन १५९५ पर्यंत अकबराचें राज्य हिमालयापासून नर्मदेच्या काठापर्यंत व हिंदुकुश पर्वतापासून ब्रह्मपुत्रा नदीपर्यंत पसरलें. अकबरानें आपलें साम्राज्य दक्षिण हिंदुस्थानांत वाढविण्याचा विचार केला. अहमदनगर, विजापुर गोवळकुण्डा, खानदेश इत्यादि राज्यें आपल्या अमलाखालीं यावीं असें त्याला वाटलें. पोर्तुगिजांनीं समुद्र-किनाऱ्यापासून आंतल्या प्रदेशांत प्रवेश करूं नये असें देखील त्याला वाटत होतें.

दक्षिणेकडील राज्यें भाऊबंदकीमुळें कमकुवत झालीं होतीं. १५७१ मध्यें अकबरानें आपले दूत त्या राज्यांच्या सुलतानांकडे पाठवून दिल्लीच्या बादशाहाच्या छत्रछायेखालीं त्यांनीं यावें असा निरोप पाठविला. परंतु या गोष्टीस कोण कबूल होणार ? खानदेशाचा नवाब मिया बहादुर-शाह यानें देखील नकारात्मक उत्तर दिलें. तेव्हां अकबर बादशाहनें आपला दुसरा मुलगा मुराद व बैरमखानाचा मुलगा अब्दुर रहीम यांना सेनापति नेमून अहमदनगरवर स्वारी करण्यास पाठविलें. चांदबीबीनें मोगलांना मोठ्या शौर्यानें तोंड दिलें. १५७६ मध्यें मोगलांनीं तिच्याशीं संधी करून घेतली.

संधीच्या अटीप्रमाणें बरारप्रांत मोगलांना मिळाला व मोगलांनीं चांदबीबीच्या मुलाला अहमदनगर राज्याचा वारस म्हणून कबूल केलें. त्याबरोबर त्यानें अकबराचा मांडलिक म्हणून रहावें अशी अट लावली. चांद-बीबीला राज्यकारभार सोडून द्यावा लागला. परंतु ही संधी अहमदनगरच्या नागरिकांना मान्य नव्हती. त्यांनीं मोगलांना बरार प्रांताच्या बाहेर काढण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. सन् १५७८ च्या फेब्रुवारी महिन्यांत गोदावरी नदीच्या काठीं सूपा येथें मोगलांना जय मिळाला. चांदबीबी मरण पावली. १६७६ मध्यें मोगलांनीं अहमदनगरचें राज्य आपल्या साम्राज्याला जोडलें.

खानदेशावर स्वारी करण्यासाठीं स्वतः अकबर निघाला. या स्वारींत त्याला जय मिळाला. त्याच्या आयुष्यांतला शेवटचा जय होय. यापूर्वीच त्याच्या मुलानें त्याच्या विरुद्ध बंड केलें होतें. त्यानें अलाहाबाद येथें जाऊन स्वतःला स्वतंत्र बादशाह म्हणून जाहीर केलें. त्यानें १६०२ मध्यें आपल्या वडिलांचा एक विश्वासपात्र मंत्री अबुलफजल याचा खून करविला होता. १६०३ मध्यें सुलताना बेगमनें पितापुत्रांत संधी घडवून आणली. पण ती फार दिवस टिकली नाहीं. सलीमनें पुन्हां अलाहाबाद येथें जाऊन बंडाळी सुरू केली. मानसिंह इत्यादि वरिष्ठ दरबाऱ्यांनीं अकबराला सल्ला दिला कीं गादीला वारस म्हणून खुश्रूला नेमावें. अनेकांनीं त्या विरुद्ध मत दिलें. अकबराच्या मुलांत जिवंत असा एकटा सलीमच होता. अकबरानें त्याला एक 'खट्याळ' व 'द्वाड' मुलगा म्हणून क्षमा केली. त्यानंतर अकबर फार दिवस



जिवंत राहाला नाहीं. १७ ऑक्टोबर १६०५ या रोजीं तो मरण पावला.

अकबराच्या व्यक्तित्वाच्या विकासास अनेक कारणें झालीं. तैमूरलंगाच्या वंशांत कित्येक जगतजेते जन्मले. त्यांना ललित-कलांची आवड होती. सूफी तत्वज्ञानामुळें त्यांच्यावर तो परिणाम झाला. अकबराला आईकडून सहिष्णुतेचें बाळकडू मिळालें होतें. तो काबूल मध्यें रहात असतां कित्येक सूफी संतांचा सहवास त्याला लाभला होता. रजपूत स्त्रियांशीं लग्न केल्यामुळें हिंदुधर्मा-विषयीं त्याच्या मनांत आदरभाव वाढला

होता. त्याच्या धार्मिक विचारांत देखील फार बदल झाला होता. धर्म व मतमतांतर पाहून त्याला त्यांची इतकी चीड आली कीं धार्मिक ऐक्य स्थापन करण्याचें जणुंकांहीं एक वेडच त्याच्या डोक्यांत शिरलें. सर्वांना संमत असा एक धर्म स्थापन करण्याचें स्वप्न तो पाहूं लागला. त्यामागें साम्राज्यांत शांतता नांदेल असें त्याला वाटे.

त्यानें मुसलमान मौलवींच्याबरोबर हिंदू, जैन, पारसी व ख्रिस्ती पंडित व विद्वन्मंडळी यांची एक सभा बोलावून शास्त्रार्थ करविला. त्याला प्रत्येक धर्मांत चांगल्या गोष्टी आढळून आल्या. परंतु त्यानें एकहि धर्म स्वीकारला नाहीं. उलट त्यानेंच 'दीने इलाही' नांवाच्या नवीन धर्माची स्थापना केली. त्यांत हिंदू, मुसलमान, ख्रिस्ती धर्मांचीं कांहीं उत्तमोत्तम तत्वें होतीं. तरी त्यानें तो धर्म कबूल करण्यासाठीं कोणावर अत्याचार केला नाहीं. त्यानें मुसलमान मुल्लांना आपल्या मुठींत दाबून ठेवलें व अत्याचार करूं दिला नाहीं.

भारताच्या इतिहासांत अकबराला त्याच्या व्यक्तिगत गुणांमुळें एक प्रमुख स्थान मिळालें. युद्धकौशल्य, उदार स्वभाव, न्यायपालन व उत्तम संस्कार हे त्याचे मुख्य गुण होत.

"तो एक सामान्य मनुष्य नसून एक देवपुरुष होता" हे जहांगीर बादशहाचे त्याच्या वडिलांविषयींचे उद्गार आहेत. अकबराच्या अंगांत असामान्य असें साहस व शारीरिक शक्ति पण होती. युद्धप्रसंगीं किंवा शिकारीच्यावेळीं तो कधीं भ्याला नाहीं. त्याचें बोलणें व वागणें फार आकर्षक व प्रभावशाली होतें.



# नेहरू चरित्र

[ १२ ]

रामचंद्र हा महाराष्ट्राचा रहिवाशी होता. तो फिजी देशांत मजूर म्हणून कांहीं काळ काम करून शेवटीं अयोध्या येथें येऊन राहूं लागला होता तो खेडेगांवांत हिंडे, तुलसीदासांच्या रामायणांतील दोहे व चौपाया म्हणे आणि शेतकऱ्यांची करुण कथा आपुलकीनें ऐके. अयोध्या, फैजाबाद रायबरेली, प्रतापगड वगैरे जिल्ह्यांत सीता-रामाच्या फार गमतीदार गोष्टी ऐकायला मिळतात. तुलसीरामायण तर सर्वांनाच माहीत. त्यापैकीं कांहीं निवडक चौपाया व दोहे रामचंद्र उदाहरण म्हणून म्हणत असे. तसा तो जास्त शिकलेला नव्हता. तो शेतकऱ्यांची सभा करी व त्यांच्यांत परस्परांत मैत्रीभाव वाढविण्याचा यत्न करी. 'सीता राम' हा त्याचा जयघोष होता. त्यानें खेडे गांवांचें संगठन केलें.

शेतकरी वर्गांत त्यानें जागृति उत्पन्न केली व त्यांची संगठना केली हें खरें. परंतु त्यांना कांहीं कार्यक्रम तो देऊं शकला नाहीं.



शेतकरी वर्गांत उत्साह व त्वेष वाढल्यानंतर त्यांचें मार्गदर्शन कोणी दुसऱ्यानें केलें तर बरें या हेतूनें त्यानें अलाहाबादपर्यंत तो प्रवास घडवून आणला. तेथें देखील त्यानें आपल्या चळवळीचा प्रचार केला.

त्यानंतर आणखी एक वर्ष रामचंद्र शेतकऱ्यांच्या चळवळींत भाग घेत राहाला. दोनदां तीनदां तुरुंगांत गेला. परंतु त्यानंतर त्याच्या वागणुकींत बेफिकीरपणा व उर्मट-पणा दिसूं लागला. नंतर त्याच्यावरचा विश्वासपण उडूं लागला. त्याला चळवळ सोडून बाजूला सरावें लागलें.

त्यापूर्वी त्यांना हिंदुस्तानींत बोलतांदेखील येत नव्हतें. आतां त्यांना चांगलें बोलतां येऊं लागलें. आतां दहा लोकांसमोर व दहा हजारांसमोर कसें बोलावयाचें हे ते शिकले. त्यांनीं व्याख्यानें झोडलीं नाहींत. गरीब लोकांसमोर व्याख्यानें झोडून उपयोग तरी काय? त्यांना भेटायला जे लोक येत त्यांच्याच जवळ ते बोलायला शिकले. लक्षावधि लोकांना ते संबोधन करून बोलत तेव्हां ऐकणारांना त्यांच्याविषयीं एक आत्मीय भाव वाटे. त्यांचा आवाज दूरवर ऐकूं येत नसे. तेव्हां खेडेगांवांत लाऊड स्पीकर नव्हते. पुष्कळ शेतकऱ्यांना त्यांचा आवाज ऐकूंच येत नसे आणि ज्यांना ऐकूं येई त्यांना किती कळे हें सांगणें कठीण आहे. परंतु जे कोणी सभेला येत त्यांचें त्यांच्यावर अपार प्रेम व विश्वास होता.

शेतकऱ्यांची वाढती चळवळ नेहरूंनीं स्वतः पाहिली. ते नेहमीं खेडेगांवांत जात. शेतकरी आतां तेवढे मुळमुळीत राहाले नव्हते. जमीनदारांच्या नोकरांचा जुलूस कमी होऊं लागला होता. अन्याय व अत्याचाराला उतरती कळा लागली होती. गांधीजींच्या सत्याग्रहाचा परिणाम खेडोपाडीं वाढूं लागला होता. कांग्रेसच्या कार्यकर्त्यांनी 'शेतकऱ्यांचे कष्ट दूर करणें' ही गोष्ट आपल्या कार्यक्रमांत जोडली होती. स्वराज्य या एका नांवांत त्यांच्या सर्व आशा व आकांक्षा मूर्तरूप झाल्या होत्या.

राष्ट्रीय चळवळ व शेतकऱ्यांची चळवळ दोन्ही मिळून चालू लागल्या. दोन्हींत अविनाभाव संबंध होता. तरी दोन्ही निरनिराळ्या चळवळी होत्या. गांधीजींच्या प्रभावानें शेतकऱ्यांनीं अहिंसामार्ग स्वीकारला.






[ १३ ]

कतलूखानाच्या अंतःपुरांत अद्याप नृत्यगान चालूंच होतें. कतलूखान झिंगून जाऊन मधून मधून "साकी साकी" असें बोलत होता. विमला दारूचे पेले एकामागून एक भरून त्याला पाजीत होती व नशेच्या धुंदींत तो वरळत होता.

विमला नृत्य करूं लागली. तिच्या नृत्यावर मोहित होऊन नबाबानें तिला जवळ बोलाविलें. विमला जणुंकांहीं तयारच होती. त्यानें तिचा हात धरून तिला जवळ ओढलें मात्र विमलानें कट्यार त्याच्या छातींत भोसकली.

कतलूखान "मेलों! मेलों!" म्हणून ओरडला व सारा महाल त्याच्या आवाजानें दुमदुमला तेव्हां अंतःपुरांतल्या स्त्रियांना कळलें तो जमिनीवर उपडा पडला होता. अशा प्रकारें विमलानें पतीच्या वधाचा सूड घेतला.

कतलूखान ओरडला म्हणून धांवपळ सुरू झाली. परंतु त्याला कोणी मारलें हें कळण्यापूर्वींच विमला महालाबाहेर पडली होती. सर्व ओरडूं लागल्या—"धांवा, धांवा! नबाबांचा खून झाला." विमलापण त्यांच्या सुरांत सूर मिळवून मोठमोठ्यानें ओरडत

श्री बंकिमचंद्र चट्टोपाध्याय



बाहेर गेली. दारांत कांहीं पाहारेकरी उभे म्हणाली—"सर्वनाश ! मोंगल शिरले आहेत अंत:पुरांत. नवाबांचा जीव संकटांत आहे." त्या मूर्खांना आंत पाठवून ती बाहेर किल्ल्याच्या मुख्य फाटकाजवळ आली आणि पाहारेकऱ्यांना ओरडून सांगूं लागली—"बघतां काय ? धांवा ! मोंगल शिरले आहेत अंत:पुरांत ! पळा आंत ! नाहीं तर नवाबांचा जीव वांचणें अशक्य !"

किल्ल्याच्या फाटकावर पाहारा देणारा पाहारेकरी तें ऐकून व मागचा पुढचा विचार सोडून नवाबाच्या खास महालाकडे धांवले. विमलाचा मार्ग मोकळा झाला. ती पाहारेकऱ्यांच्या हातावर तुरी देऊन किल्ल्या-बाहेर निघून गेली. एका झाडाखालीं कोणीतरी बसलेला तिला दिसला. तिनें अभिरामस्वामींना छान ओळखलें.

तो म्हणाला—"मला भीति वाटत होती, आंत हा गोंधळ कसला ?"

"मला वैधव्य देणाऱ्याला मी नरकांत पाठविलें आहे !" विमला म्हणाली. "आतां आपण क्षणभर देखील या जागीं थांबतां कामा नये. चला आश्रमाकडे जाऊं या. तिलोत्तमा सुरक्षित पोंचली कीं नाहीं ?" विमलानें विचारलें.

"तिलोत्तमा आस्मानीबरोबर पुढें गेली आहे. चल, आपणदेखील जाऊं. वाटेंतच गांठ पडेल." अभिरामस्वामी म्हणाला.

दोघें थोड्याच वेळांत आश्रमांत जाऊन पोंचलीं. एका मिनिटापूर्वींच तिलोत्तमापण आश्रमांत पोंचली होती.

"ईश्वरकृपेनें तुम्ही दोघी सुखरूप येऊन पोंचलांत. पण येथें फार थांबणें धोक्याचें आहे. मुसलमानांची नजर जर का तुम-च्यावर पडली तर आपल्यापैकीं एकाला देखील ते जिवंत सोडणार नाहींत. रात्रीच्या



रात्रीं आपण येथून पसार झालें पाहिजे." अभिरामस्वामी म्हणाला.

विमलानें नवाबाच्या छातींत सुरी भोस-कल्यानंतर थोड्या वेळानें नवाबाचा एक अधिकारी घाईघाईनें तुरुंगाच्या दारांत आला. जगतसिंह तेथेंच कैदेंत होता. अधिकारी त्याला म्हणाला—"नवाब आतां कांहीं क्षणांचेच पाहुणे आहेत. तुम्हांला घेऊन यायला त्यांनीं मला पाठविलें आहे. लवकर चला !"

जगतसिंहानें चकित होऊन विचारलें—"होय, पण झालें तरी काय ?"

"कोणी तरी शत्रूनें अंत:पुरांत शिरून नवाब साहेबांना कट्यार भोसकली आहे ! गुन्हेगार पळून गेला आहे. नवाबसाहेब मरणाच्या वाटेवर आहेत. लवकर आलां नाहींत तर भेट होईल कीं नाहीं शंकाच !" तो अधिकारी घाईघाईनें म्हणाला.

जगतसिंहानें कतलुखानाला जाऊन पाहिलें तेव्हां आयशा, दासदासी, उस्मान, नवाबाची इतर मुलें व सलागार चारीबाजूला घोळका करून उभे होते. बहुतेक सर्व रडत होते. आयशा आपल्या वडिलांचें डोकें मांडीवर घेऊन अश्रू ढाळीत होती. जगतसिंह



येऊन पोंचला त्याच वेळीं ख्वाजा ईसा नांवाचा एक मंत्री हात धरून त्याला नवाबाजवळ घेऊन गेला आणि नवाबाला ऐकूं जाईल अशातऱ्हेनें जवळ तोंड नेऊन म्हणाला—"युवराज आले आहेत !"

कतलुखान खोल आवाजांत म्हणाला—मी एका घटकेचा पाहुणा आहें. आतां वैर कसलें ?"

"वैर माझ्या मनांतदेखील नाहीं." जगतसिंह म्हणाला.

"माझीं मुलें लहान आहेत. युद्ध बंद करा. संधी...." बोलतां बोलतां अशक्त-

पणामुळें तो थांबला. त्यानें पाणी मागि-तल्यावर आयशानें थोडें सरबत त्याच्या तोंडांत घातलें. नवाब पुन्हां जगतसिंहाकडे वळून कांहीं तरी म्हणाला. थोड्याच वेळानें त्यानें विचारलें—"मग कबूल आहे ना?"

"पठान बादशाहाचा अंमल कबूल करायला तयार असतील तर मी संधी करून देण्याची खटपट करून पाहीन." जगतसिंह म्हणाला.

नवाब अस्पष्ट आवाजांत पुन्हां म्हणाला—"ओरिसा!"

"माझा यत्न यशस्वी झाला तर आपल्या मुलांचा वांट्याला ओरिसा प्रांत राहील." जगतसिंह म्हणाला.

नवाबाच्या तोंडावर मृत्यकळा स्पष्ट दिसत होती तरी तें उत्तर ऐकून थोडा वेळ का होईना त्याच्या तोंडावर हास्य झलें.

"ठीक! तूं स्वतंत्र आहेस! खुदा तुझें कल्याण करो!" नवाब म्हणाला. जगतसिंह निघाला तेवढ्यांत आयशा नवाबाच्या कानांत कांहीं तरी पुटपुटली. नवाबानें खूण केल्या-वर ख्वाजा ईसा जगतसिंहाला पुन्हां नवाबा-जवळ बोलावून घेऊन आला. म्हणाला—



"नवाब साहेबांना आणखी कांहीं सांगा-यचें आहे."

जगतसिंहाला जवळ बसायला सांगून नवाब म्हणाला—"कानांत!" जगतसिंहानें आपला कान जगतसिंहाच्या तोंडाजवळ नेला. म्हणाला—"मी तिलोत्तमेला अनाथ केलें आहे. ती निष्कलंक आहे...." पुढें तो आयशाविषयीं कांहीं सांगणार तेवढ्यांत त्याचें प्राणोत्क्रमण झालें.

जगतसिंहाला कैदेंतून मुक्तता मिळाली. तो आपल्या वडिलांच्या छावणींत जाऊन पोंचला. त्यानें मोंगलांची पठानांशीं संधी करून दिली. ओरिसा प्रांतांत त्यांची स्वतंत्र सत्ता मान्य करण्यांत आली. परंतु एक अट लावण्यांत आली, त्यानीं मोगलांचें मांडलिक म्हणून रहावें. संधीच्या अटीप्रमाणें दोन्हीं पक्षांनीं परस्परांना नुकसान भरपाई दिली. परंतु हें सर्व पुरें होण्यास कांहीं काळ लोटला.

मोगलांचें सैन्य पाटण्याकडे निघालें. एकदां जगतसिंह नवाबाच्या महालांत सकुटुंब निरोप घेण्यासाठीं गेला. उस्मान व ख्वाजा ईसा याचा निरोप घेऊन तो आयशाचा निरोप घेण्यासाठीं तिच्या खोलीजवळ गेला.





नोकराच्या हातीं भेटायला आलों आहे असा निरोप आंत पाठविला.

"युवराज! आतां मी आपणांस कशी भेटूं? क्षमा करावी!" आयशानें त्याच नोकाराच्या हातीं उत्तर पाठविलें. जगतसिंह हताश होऊन आपल्या छावणीकडे निघाला. किल्ल्याच्या फाटकाजवळ त्याला उस्मान उभा असलेला दिसला. तो त्याच्या बरोबर चालूं लागला.

"सेनापति! आपल्याला कांहीं हवें असल्यास हुकुम करावा!" जगतसिंह त्याला म्हणाला.

"आपल्या लोकांना पुढें जायला सांगा! आपल्याशींच कांहीं काय आहे." उस्मान म्हणाला. जगतसिंहानें आपल्या लोकांना पुढें जायला सांगितलें आणि स्वत: मागें थांबला. उस्माननें देखील एक घोडा मागवला. दोघे घोड्यावर बसून बरोबर निघाले.

उस्माननें दाट झाडींतली वाट घेतली आणि पाडक्या किल्ल्याच्या दिशेनें घोडा वळवला. दोघे घोड्यावरून उतरून किल्ल्यांत गेले. त्या किल्ल्याच्या मध्यभागीं एक कबर खणून ठेवलेली होती. परंतु तिच्यांत पुरण्यासाठीं कोणाचें प्रेत नव्हतें. कबरीच्या जवळच एक चितापण रचलेली दिसली. तिच्याजवळ देखील प्रेत बीत कांहीं नव्हतें.

"हें सर्व काय बुवा? सर्वच बिलक्षण दिसतें आहे." जगतसिंह म्हणाला.

"ही सर्व व्यवस्था मींच करविली आहे. मी मेलों तर तूं मला या कबरींत पुरून टाक. तूं मेलास तर मी या चितेवर तुझा सुरू देह ठेवून तुझा दाहसंस्कार करीन." उस्मान म्हणाला.

"हेतू?"

"आपल्या दोघांपैकीं एकाला मरावें लागणार आहे. आयशाच्या दोन प्रेमिकांना या जगांत जगण्याचा अधिकार नाहीं." उस्मान म्हणाला.

असें सांगून उस्मान आपली तलवार उपसून जगतसिंहाच्या अंगावर तुटून पडला. जगतसिंहानें पण आपली तलवार उपसून उस्मानचा वार अडवला. दोघांचें द्वंद्व युद्ध झालें. दोघे उत्तम योद्धे होते. परंतु जगतसिंह अजून चांगला बरा झाला नव्हता. त्याच्या जखमा चांगल्या भरून आल्या नव्हत्या. मधून मधून त्यांतून रक्तदेखील वहात होतें. उस्मानावर मार करण्याचा विचारच त्याच्या मनांत आला नाहीं. तो आत्मरक्षणासाठींच द्वंद्वयुद्धास सिद्ध झाला होता. म्हणून उस्मानच्या अंगाला एक देखील जखम झाली नाहीं.

या स्थितींत स्वत:चें रक्षण करणें अशक्य आहे, हें समजून जगतसिंह उस्मानला म्हणाला—"पण हें द्वंद्व युद्ध कशाला? बंद कर युद्ध, मी हारलों, तूं जिंकलास."

उस्मान जोरानें हंसून म्हणाला—"थट्टा करूं नकोस. रजपूत असा भितरा नसतो. युद्ध केलेंच पाहिजे. मी तुला ठार करीनच. जर मीच मेलों तरी तुला आयशा मात्र मिळणार नाहीं."



"मला आयशा नको आहे. तिच्यावर माझें प्रेम नाहीं." जगतसिंह म्हणाला.

"तुझें नसेल तिच्यावर प्रेम. पण तिचें आहेना तुझ्यावर. तुझा कांटा दूर केल्याशिवाय माझ्या मनाचें समाधान होणार नाहीं." असें सांगून उस्मान तलवार घेऊन पुढें आला.

जगतसिंहानें आपली तलवार दूर फेंकून दिली व म्हणाला—"मी संकटांत पडलों असतां तूं माझा जीव वांचविलास. तुझ्यावर वार करण्याची माझी इच्छा नाहीं."

उस्मानला राग आला त्यानें त्याला लाथ मारून त्याचा अपमान केला व म्हणाला—

"भीतच्या ? शेपूट दाबून पळून जातोस होय ? तूं योद्धा आहेस ?"

आतां मात्र जगतसिंहानें गय करणें व्यर्थ समजून आपली तलवार उचलली व उस्मानवर हल्ला केला. त्यानें एका मागून एक भराभर वार केले. उस्मानचें धैर्य खचूं लागलें. तो खालीं पडला. जगतसिंह त्याच्या छातीवर चढून बसला. त्याची तलवार हिसकावून घेऊन दूर फेंकून दिली व दोन्ही हातांनीं त्याचा गळा दाबून विचारलें—"युद्धाची खुरखुरी जिरली कीं नाहीं ?"

"जिवांत जीव असेपर्यंत तुला जिवंत सोडणार नाहीं." उस्मान म्हणाला.

तुझा जीव घ्यायला मला एक क्षणदेखील लागणार नाहीं." जगतसिंह म्हणाला.

"तर मग ठार कर मला. मला जिवंत सोडलेंस तर तुझा जीव घेतल्याशिवाय राहणार नाहीं." उस्मान म्हणाला.

"ठीक ! मी आपल्या उपकारकर्त्यांचा जीव घ्यायला तयार नाहीं. मला तुझी भीति वाटत नाहीं." जगतसिंह म्हणाला. त्यानें उस्मानची तलवार दूर फेंकून दिलीच होती. त्यानें आपली तलवार घेतली व त्याला सोडून दिलें.

"तूं मला लाथ मारलीस तुला धडा मिळावा म्हणून मी हें सर्व केलें."

उस्मान घोड्यावर बसून निघून गेला. जगतसिंह विहिरीवर जाऊन आपल्या जखमा धुवूं लागला. परत येऊन पाहातों तों घोड्याच्या गळ्यांत एक चिठ्ठी बांधलेली त्याला दिसली. "दोन दिवस वाचूं नकोस" असें चिठ्ठींत लिहिलें होतें. जगतसिंहानें चिठ्ठी आपल्या खिशांत ठेवली व छावणीकडे निघून गेला. [पुढील गोष्ट पुढील अंकीं]



# नरकाची भीति

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाहीं व झाडाजवळ जाऊन प्रेत काढून खांद्यावर टाकलें आणि मौनपणें स्मशानाच्या दिशेनें निघाला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा, तूं इतकी मेहनत करीत आहेस. परंतु या सर्व मेहनतीचें फळ म्हणून तुला कदाचित नरकयातना भोगावी लागेल. मर्त्यलोकांत राहणाऱ्या माणसाला नरकयातनेचें जितकें भय वाटतें तितकें दुसरें कशाचेंहि वाटत नाहीं. तें किती खरें आहे हें तुला कळावें म्हणून मी एक गोष्ट सांगतों. ऐक." असें सांगून वेताळ गोष्ट सांगूं लागला.

फार पूर्वी सिंहल द्वीपांत सिंह विक्रम नांवाचा एक अट्टल चोर रहात असे. त्यानें चोरीचा धंदा करून आयुष्यांतलीं सर्व सुखें उपभोगलीं. पण उतारवय कोणाला सुटत नाहीं. त्याला एका गोष्टीची फार काळजी



वाटूं लागली. मेल्यावर नरकयातना भोगावी लागेल त्याचें काय? मी एकहि पुण्य केलें नाहीं मग कोण देव माझ्या मदतीला धांवणार व माझा उद्धार करणार? म्हणून यमाच्या दरबारांत पाप पुण्याचा हिशोब लिहिणारा जो चित्रगुप्त त्याचीच आराधना त्यानें श्रद्धाभक्तीपूर्वक सुरू केली. तो ब्राह्मणांना बोलावून त्यांना दानधर्म करूं लागला व चित्रगुप्ताची कृपा व्हावी असा त्यांच्याकडून आशीर्वाद घेऊं लागला.

एकदां स्वतः चित्रगुप्तच ब्राह्मण वेष धारण करून सिंहविक्रम याच्या घरीं आला व त्याचें आतिथ्य ग्रहण केलें. चोरानें पंचपक्वांनांचें भोजन करविलें व मोठी दक्षिणा देऊन हात जोडून विनंति केली— "चित्रगुप्त माझ्यावर प्रसन्न होईल असा आशीर्वाद द्यावा."

चित्रगुप्तानें आश्चर्यचकित होऊन विचारलें— "वेड्या, हा काय आशीर्वाद मागतोस? शंकर, विष्णु इत्यादिकांची कृपा व्हावी हा आशीर्वाद मागण्याऐवजीं चित्रगुप्ताला प्रसन्न करण्यासाठीं आशीर्वाद मागतो आहेस हें कां?"

"त्याचें तुम्हांला काय? चित्रगुप्ताशिवाय इतर देवांच्या कृपेची मला अपेक्षा नाहीं." चोर म्हणाला.

तें ऐकून चित्रगुप्त प्रत्यक्ष दर्शन देऊन म्हणाला— "मी तुझ्या भक्तीवर प्रसन्न झालों आहें. काय वाटेल तें मागून घे."

सिंहविक्रमाला परमानंद झाला. म्हणाला— "प्रभो! "मला चिरंजीव होण्याचा उपाय सांगावा."

"ती गोष्ट अशक्य! तरी मी तुला एक उपाय सांगतों. एकदां श्वेतमुनींचें प्राणहरण करण्यासाठीं यम आला असतां शंकराला राग आला व त्यानें यमाला भस्मकरून टाकलें. शंकरानें यमाला पुन्हां जिवंत केलें व त्याला बजावून सांगितलें कीं श्वेतमुनी रहात आहेत त्या जागीं एकाहि प्राण्याच्या अंगाला तूं स्पर्श करतां कामा नये. महासागरापलीकडे तरंगिणी नांवाची एक नदी आहे. तिच्यापलीकडच्या तीरावर श्वेतमुनींचा आश्रम आहे. .त्या आश्रमांत यम किंवा यमदूत कोणालाहि जाऊल टाकण्याची मनाई आहे. मी तुला तेथें नेऊन सोडतों. तूं चुकून सुद्धां इकडच्या तीरावर येतां कामा नये." असें सांगून चित्रगुप्तानें सिंहविक्रमाला तरंगिणी नदीच्या पैल तीरावरील श्वेतमुनींच्या आश्रमांत पोंचतें केलें व अदृश्य झाला.

पुढें कांहीं दिवसांनीं यम सिंहविक्रमाचें प्राणहरण करण्यासाठीं तरंगिणी नदीच्या काठीं आला. नदीच्या पैलतीरावर त्याला जाणें शक्य नव्हतें. म्हणून यमानें आपली माया रचली व एका सुंदर स्त्रीची सृष्टि करून तिला श्वेतमुनींच्या आश्रमांत पाठविलें.

सिंहविक्रम त्या स्त्रीच्या सौंदर्यावर भाळून गेला व तिच्या संगतींत कांहीं काळ सुखानें राहाला. नंतर ती स्त्री त्याला म्हणाली— "मी आपल्या माहेरीं जाऊन येतें.





"नदीपलीकडे आहे माझें माहेर." असें सांगून ती निघाली. सिंहविक्रम तिला पहात काठावर उभा राहाला.

नदीच्या मध्यभागीं पोंचल्यावर ती पाण्याच्या ओघाबरोबर वाहूं लागली व मोठ्यानें ओरडली—"अहो! बुडलें, मेलें, वांचवा! पाहतां काय? धांवा!"

तिचें ओरडणें ऐकून सिंहविक्रम पाण्यांत शिरला व ती वहात जात होती त्या बाजूला जोरानें पोहोत निघाला. तो जवळ पोंचेपर्यंत ती पलीकडच्या तीरावर पोंचलीच होती. सिंहविक्रमानें काठावर पाऊल ठेवतांच यमानें आपला पाश त्याच्या गळ्यांत टाकला व त्याला यमलोकीं घेऊन गेला.

अशा तऱ्हेनें सिंहविक्रम यमपाशापासून स्वतःचें रक्षण करूं शकला नाहीं. तरी चित्रगुप्तानें गुप्तपणें त्याला एक युक्ति सांगितली. म्हणाला—"यम तुला पहिला प्रश्न विचारील कीं प्रथम तूं स्वर्गसुख उपभोगणार कीं नरकयातना? मला प्रथम स्वर्गसुखाचा उपभोग करण्याची इच्छा आहे असें सांग. तुला स्वर्गांत पाठवितील. तूं तेथें सुखोपभोग घेण्याऐवजीं तुझें सर्व पाप नष्ट होईपर्यंत तपश्चर्या करीत रहा."

मी अगदीं तसेंच करीन असें सिंहविक्रम म्हणाला.

नंतर यमानें चित्रगुप्ताला बोलावून विचारलें—"या चोरानें कांहीं पुण्यसंपादन केलें आहे का?"

"केलें आहे, महाराज! त्यानें ब्रह्मभोज देऊन देवादिकांना प्रसन्न करून कांहीं काळ स्वर्गसुख उपभोगण्यासाठीं पुण्य संपादिलें आहे." चित्रगुप्त म्हणाला.

तें ऐकून यमानें चोराला विचारलें—"काय रे! तुला प्रथम स्वर्गसुख उपभोगायचें आहे कीं नरकयातना भोगायच्या आहेत?"

"प्रभो! मला प्रथम स्वर्गांतच पाठवावें." चोर म्हणाला.

त्याप्रमाणें सिंहविक्रमाला स्वर्गलोकीं पाठविण्यांत आलें. तेथें तो सुखोपभोगांत न गुरफटतां तपश्चर्या करूं लागला व त्याचीं सर्व पापें भस्म झालीं. त्याचें पुण्यफळ संपल्यावर त्याला नरकांत घेऊन जाण्यासाठीं यमदूत आले. परंतु त्याचीं सर्व पापें भस्म होऊन गेलीं असल्यामुळें त्यांना आल्या वाटेनें परत फिरावें लागलें.

वेताळ येथवर गोष्ट सांगून म्हणाला—"राजा! चित्रगुप्तानें सांगितल्याप्रमाणें सिंहविक्रम त्या स्त्रीच्या फंदांत न पडतां श्वेत मुनींच्या आश्रमांत राहाला असता तर त्याला मरण आलें नसतें आणि स्वर्गांत प्रवेश मिळाल्यानंतर स्वर्गसुख उपभोगायचें सोडून त्याला घोर तपश्चर्या करावी लागली नसती. क्षणिक सुखासाठीं तो स्वर्गसुख उपभोगूं शकला नाहीं. त्यानें असा खुळेपणा कां करावा?" या प्रश्नाचें उत्तर माहीत असून तूं दिलें नाहींस तर त्याचा परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळूं लागतील.

"सुखाचा मोह सुटत नाहीं. त्यामुळेंच नरकयातनेचें भय उत्पन्न होतें. सिंहविक्रम स्त्रीसुखाच्या मोहाला बळी पडून नरकाच्या दारापर्यंत जाऊन पोंचला होता. स्वर्गसुख उपभोगण्याचा मोह त्याला तसाच झाला असता तर त्याला नक्कीच नरकयातना भोगाव्या लागल्या असत्या. परंतु सुखाचा मोह सुटतांच त्याला नरकयातनेपासून सुटका मिळाली."

अशा तऱ्हेनें विक्रमार्कांचें मौन भंग होतांच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला व पुन्हां झाडाला जाऊन लोंबकळूं लागला.





# देवस्मितेचें चरित्र

ताम्रलिप्ति द्वीपांत धनदत्त नांवाचा एक श्रीमंत व्यापारी रहात असे. त्याला गुहसेन नांवाचा एकुलता एक मुलगा होता. विद्याभ्यास संपवून मुलगा मोठा झाल्यावर आईबापांना त्याच्या लग्नाची फिकीर वाटूं लागली. तेव्हां त्यानें मुलालाबरोबर घेऊन व्यापाराच्या निमित्तानें मुलीच्या शोधार्थ द्वीपांतर प्रवास करण्याचें ठरविलें.

द्वीपांमागून द्वीपें पहात पितापुत्र एका द्वीपांत आले. तेथें त्यांना एक मुलगी पसंत पडली. त्या मुलीचें नांव देवस्मिता असें होतें. तिच्या बापाचें नांव धर्मगुप्त होतें. धनदत्त धर्मगुप्ताला भेटला व आपला मुलगा गुहसेन याच्याशीं आपल्या मुलीचें लग्न करून द्यावें अशी त्यानें विनंति केली.

धर्मगुप्ताला मुलगा पसंत पडला. परंतु त्याला मुलगी प्राणापेक्षां जास्त वाटे. म्हणून त्यानें जांवयाला घरीं ठेवून घ्यायचें ठरविलें होतें. गुहसेन घरजांवई व्हायला तयार नव्हता. धर्मगुप्तानें नकार दिला.

परंतु देवस्मितेनें गुहसेनाला पाहिलें त्या क्षणापासून तिनें त्याला मनांतल्या मनांत वरलें होतें. त्यासाठीं आईवडिलांना सोडून परदेशीं वास करावा लागला तरी ती त्याला तयार होती.

धनदत्त गुहसेनाला बरोबर घेऊन स्वदेशीं जाण्यासाठीं जहाजांत बसला. तेव्हां देवस्मिता आपल्या कांहीं मैत्रिणींसह आपल्या आईवडिलांची नजर चुकवून आली व जहाजांत जाऊन बसली. ताम्रलिप्तीला पोंचल्यावर धनदत्तानें मोठ्या थाटामाटानें गुहसेन व देवस्मिता दोघांचें लग्न करून दिलें.

कांहीं काळ लोटल्यावर धनदत्त मरण पावला. व्यापाराची सर्व जबाबदारी गुहसेनाच्या शिरावर येऊन पडली. त्याची व्यापारी स्नेही मंडळी व्यापारासाठीं द्वीपांतरास निघाली व त्यांनीं गुहसेनालाबरोबर येण्यास आग्रह केला. परंतु देवस्मितेला गुहसेनानें परमुलखांत व्यापारासाठीं जाणें पसंत नव्हतें. तेथें एकाद्या परस्त्रीच्या फंदांत पडेल या काळजीनें तिनें त्याला साफ नकार दिला. गुहसेनाला काय करावें हें सुचेना. बायकोच्या सांगण्याप्रमाणें परदेशीं न जावें तर बंधुमित्र हंसणार. न जावें तर देवस्मितेचें मन मोडल्यासारखें होणार. शेवटीं त्यानें सर्व देवाच्या भरंवशावर सोडण्याचा निश्चय केला. शंकराच्या पिंडीजवळ बसून त्यानें उपवास व्रत सुरू केलें. देवस्मितेनें सुद्धां नवऱ्याबरोबर उपवास व्रत सुरू केलें. दोन दिवसांनीं रात्रीं दोघं झोपलीं असतां स्वप्नांत त्यांना साक्षात्कार झाला. शंकरानें दोघांच्या हातांत एकेक कमळ दिलें व म्हणाला—"तुम्ही हें जवळ ठेवून घ्या. दोघांपैकीं एकानें कांहीं नीतिविरुद्ध काम



केलें तर दुसऱ्याच्या हातांतलें कमळ कोमेजून जाईल."

त्यांची झोप मोडली. पाहतात तर खरोखरच त्यांच्या हातांत एकेक कमळ होतें. आतां नवऱ्याला प्रवास करूं देण्यास देवस्मिता तयार झाली.

गुहसेन आपल्या मित्रमंडळींबरोबर कटाह नांवाच्या द्वीपावर हिऱ्यामाणकांचा व्यापार करण्यासाठीं निघून गेला. हातांतल्या कमळावर देवस्मितेची दृष्टि खिळून होती.

कटाह द्वीपावर गुहसेनाची चार तरुण मित्रांशीं मैत्री जमली. गुहसेनाकडे एक

सौ. शारदाबाई नेमाडे



लाल कमळ पाहून त्याच्याविषयीं माहिती त्यांनीं निरनिराळ्या प्रकारें विचारून पाहिली. पण त्यांना कांहीं कळलें नाहीं. तेव्हां त्यांनीं गुहसेनाला जेवायला बोलावून त्याला धोतऱ्याचा रस टाकून सरबत प्यायला दिलें. त्यामुळें गुहसेन बरळूं लागला. कमळ कोमेजूं लागल्यास त्याच्या बायकोचें पाऊल वांकडें पडलें आहे, असा त्याचा अर्थ होतो.

गुहसेनाला इतकी पतिव्रता स्त्री मिळालेली पाहून त्यांना हेवा वाटूं लागला व तिचें पतिव्रत्य भंग करण्याचें मनाशीं ठरवून ते चौघे ताम्रलिप्तीला आले. तेथें एका बौद्ध भिक्षुणीला भेटून त्यांनीं तिला येण्याचा हेतू सांगितला. बौद्ध भिक्षुणीनें मदत देण्याचें वचन दिलें.

त्या दुष्ट भिक्षुणीनें देवस्मितेला भेटून इकडच्या तिकडच्या गप्पा सांगून नंतर खरें काम काय आहे तें सांगितलें. म्हणाली— "पति परदेशीं गेला असेल, वेडा झाला असेल किंवा रोगी असेल तर स्त्रीला परपुरुष संग शास्त्राप्रमाणें मान्य आहे. तूं तसें केलें नाहींस तर घोर पातक लागेल."

देवस्मितेला त्या भिक्षुणीचा व त्या तरुणांचा फार राग आला. त्या सर्वांची खोड मोडण्याचा मनाशीं निश्चय करून एकेकाला एकेक दिवस पाठवीत जायला तिनें त्या भिक्षुणीला सांगितलें.

भिक्षुणी निघून गेल्यावर तिनें कुत्र्याच्या पावलासारखा एक लोखंडी ठसा घडवून घेतला. नंतर आपल्या दासींपैकीं एका सुंदर दासीला उत्तम वस्त्रालंकार घालून नटवून आपल्या सारखेंच नटण्यास शिकवून ठेवलें व इतर दासींनीं काय करावयाचें हें देखील त्यांना सांगून ठेवलें.

त्या दिवशीं रात्रीं त्या चौघांपैकीं एक जण आला. देवस्मितेच्या त्या दासीनें



त्याचा खूप स्वागतसत्कार केला आणि त्याला मादक पेयें प्यायला दिलीं. तीं पिऊन तो झिंगून पडल्यावर त्याच्या कपाळावर तापवून ठेवलेल्या लोखंडी ठशानें डाग दिला. बेशुद्धावस्थेंत त्या मूर्खाला कांहींच कळलें नाहीं. सर्व दासींनीं मिळून त्याला उचलून कचऱ्याच्या ढिगावर नेऊन टाकलें.

दुसऱ्या दिवशीं शुद्ध आल्यावर त्याला आपल्या दुर्गतीची कल्पना आली. डोक्याला पट्टी बांधून तो पळून गेला. त्यानें आपल्या स्नेही तरुण मंडळींस झालेल्या अपमानाची गोष्ट सांगितली नाहीं. त्या सर्वांची दुर्गत पाळी पाळीनें तशीच झाली. सर्व कपाळाला पट्टी बांधून कोणाला कांहीं सांगितल्या शिवाय कटाह द्वीपास परत निघून गेले. बौद्ध भिक्षुणी आपल्याला कांहीं बक्षिस मिळेल या आशेनें देवस्मितेकडे गेली. तिची सुद्धां तीन गत झाली

देवस्मितेनें घडलेलें सर्व वृत्त आपल्या सासूस सांगितलें. सासूनें तिची पाठ थोपटली. पण म्हणाली—"त्या चौघां तरुणांनीं मिळून दुष्टपणानें अपमानाचा सूड उगवला तर काय करावयाचें?"



देवस्मिता आपल्या सासूला म्हणाली— "सासूबाई! तुम्हीं कांहीं एक काळजी करूं नका. मी स्वत: कटाह द्वीपावर जाऊन आपल्या पतीचें रक्षण करीन."

सासूनें तिला परवानगी दिली.

देवस्मिता व तिच्या दासी व्यापाऱ्यांचा वेष धारण करून कटाह द्वीपीं येऊन पोंचल्या. देवस्मिता त्या देशाच्या राजाकडे जाऊन म्हणाली—"महाराज! माझे चार गुलाम पळून आपल्या देशांत आले आहेत. तुम्ही आपल्या प्रजेला एकत्र केल्यास मी आपल्या गुलामांना ओळखूं शकेन."

राजानें त्याप्रमाणें आपल्या प्रजेला राजवाड्यासमोरच्या पटांगणांत एकत्र जमा केलें. ते चौघे तरुणपण डोक्याला पट्टी बांधून हजर होतेच. देवस्मिता त्या चौघांना ओळखून म्हणाली—"हेच ते चौघे!" तें ऐकून कांहीं प्रमुख व्यापाऱ्यांना राग आला. ते म्हणाले—"उच्चकुळांस जन्माला आलेले श्रीमंत व्यापारी आहेत. हे गुलाम कसे काय झाले बुवा!"

"हे माझे गुलाम नसल्यास यांच्या कपाळावर मी डागलेला ठसा कसा काय येईल? तुम्हांला माझें म्हणणें खरें वाटत नसेल तर यांच्या कपाळावरच्या पट्ट्या सोडून पहा." देवस्मिता म्हणाली.

त्याप्रमाणें चौघांच्या पट्ट्या सुटल्याबरोबर देवस्मितेनें सांगितल्याप्रमाणें कुत्र्याच्या पावलाचा ठसा. सर्वांना दिसला. वैश्य व्यापाऱ्यांच्या माना खालीं झाल्या.

या सर्वांच्या मुळाशीं कांहींतरी गुप्त रहस्य आहे हें ओळखून राजानें देवस्मितेलाच त्याचा उलगडा करायला सांगितलें. तिनें घडलेलें सर्व वृत्त जसेंच्या तसें सांगितलें. सर्वलोक पोट धरधरून हंसले व देवस्मितेच्या चातुर्याची प्रशंसा केली.

"हे खरोखरच तुझे दास व गुलाम झाले." राजा तिला म्हणाला.

राजानें ते चौघे देवस्मितेचे गुलाम असल्याचा निवाडा दिल्यावर त्या चौघांच्या आईबापांनीं मोठमोठ्या रकमा देवस्मितेला देऊन त्या चौघांना दास्यमुक्ति देण्यासाठीं परोपरीनें विनंति केली.

देवस्मिता तें सर्व धन घेऊन. सर्वांकडून मान मिळवून आपल्या पतीबरोबर स्वदेशीं परत आली. ताम्रलिप्तीच्या राजानें तिचा सत्कार केला.





# चार मित्र

कदंब देशाच्या राजाला गुणचंद्र नांवाचा एक मुलगा होता. त्याला तीन बालमित्र होते. तिघां मित्रांपैकीं एकाचें नांव धीमंत्र असें होतें. तो मंत्र्याचा मुलगा होता. दुसऱ्याचें नांव मणिगुप्त. तो एका श्रीमंत व्यापाऱ्याचा मुलगा होता. तिसऱ्याचें नांव जयंभर तो सेनापतीचा मुलगा होता. घेर बरोबरच चौघांचा विद्याभ्यास झाला. विद्याभ्यास संपल्यावर गुणचंद्र एक वर्षभर देशभर हिंडून जगाचा प्रत्यक्ष अनुभव मिळावा म्हणून निघाला तेव्हां त्याचे तिघे बालमित्र त्याच्या बरोबर निघाले.

चौघे मित्र प्रवास करीत मालव देशांत येऊन पोंचले. गुणचंद्रानें मालव देशाची राजकन्या शशिरेखा हिला पाहिलें व तिच्याशींच लग्न करण्याचा मनाशीं विचार करून तिला तशी मागणीपण घातली. शशिरेखेनें पण त्याला पाहिल्यापासून मनांतल्या मनांत त्याला वरलें. परंतु तिनें एक प्रतिज्ञा केली होती. गुणचंद्राच्या बालमित्राप्रमाणेंच शशिरेखेला पण तिघी बालमैत्रिणी होत्या. त्यांपैकीं एक मंत्र्याची मुलगी होती. दुसरी जव्हेऱ्याची व तिसरी सेनापतीची मुलगी होती. चौघींनीं एकाच वेळीं लग्न करण्याची व एकाच गांवीं सर्वांचें सासर राहील असें लग्न करण्याची प्रतिज्ञा केली होती.

दैवयोगानें गुणचंद्राला तिघे मित्र होते. ते त्याच्याबरोबर मालवदेशांत आले पण होते. म्हणून सर्व मैत्रिणींचीं लग्नं एकाचवेळीं होऊन चौघींना सासरपण एकाच जागीं मिळण्याचा योग सहजीं घडून आला. चौघांचीं लग्नें थाटामाटानें झालीं. चौघे मित्र



आपापल्या बायकांबरोबर कदंब देशांत आले. पुढें गुणचंद्र देशाच्या राजा झाला. त्यानें आपल्या तिघां मित्रांना अनुक्रमें मंत्री, कोशाध्यक्ष व सेनापति म्हणून नेमलें.

एकाच वेळीं चौघांच्या बायका गरोदर झाल्या. सर्वांना आनंद झाला.

एक दिवशीं संध्याकाळीं चौघे मित्र व मैत्रिणी राजवाड्याच्या गच्चीवर गप्पागोष्टी करीत बसले असतां एक पक्षी आला व मनुष्यांच्या भाषेंत बोलूं लागला—

"राजा! या चौघी मत्रिणी लवकरच मुलांच्या माता होणार आहेत. पण चौघींना पक्ष्यांनीं एक शाप दिला होता ही गोष्ट तुमच्या सर्वांच्या लक्षांत असू दे. चौघींनीं एकदां वनविहाराला गेल्या असता पक्ष्यांना दगड मार मारून जखमी केलें. त्यांचा तो निर्दयपणा पाहून पक्षी आपला राजा गरुड याच्याकडे आपलें गाऱ्हाणें घेऊन गेले. तेव्हां गरुडानें या चौघींना एक शाप दिला कीं त्यांना मुलें होतील. परंतु त्यांचीं मुलें आईबापांना पुत्रप्राप्तीचा क्षणिक आनंद देऊन तत्काळ मरण पावतील. बारा वर्षे सर्वांना हा मानसिक कष्ट सहन करावा लागेल."

तें ऐकून सर्वांच्या हृदयाला धक्काच बसला. त्यांनीं परस्परांशीं या प्रश्नावर पुष्कळ उहापोह केला व एक मतानें असें ठरलें कीं चौघींचा प्रसवकाळ जवळ आल्यावर दाईंना प्रथम पासून सर्व गोष्टी समजावून सांगून मुलांचीं तोंडें त्यांच्या त्यांच्या आईनें पाहण्यापूर्वींच मुलांना दूर एका जागीं राज्याच्या बाहेर पोंचतें करावें व तेथें त्यांचें नीट पालन पोषण होईल अशी व्यवस्था करावी. त्या लहान मुलांना संभाळण्याची जबाबदारी राज्याच्या सरहद्दीबाहेर विभांडक नांवाच्या एका ब्राम्हणावर टाकावी. बारा वर्षांनंतर मुहूर्त पाहून मुलांना घरीं आणावें.

चौघींच्या बाळंतपणासाठीं निरनिराळ्या खास खोल्या तयार करून ठेवण्यांत आल्या होत्या. चौघींना एकाच दिवशीं व एकाच वेळीं पुत्ररत्न झालें. दाईंनीं चौघां मुलांना त्यांच्या त्यांच्या आईची दृष्टि पडूं न देतां राजाच्या अधिकाऱ्यांकरवीं विभांडक याच्याकडे पाठवून दिलें. मुलें लहानाचीं मोठीं झालीं. विभांडकाच्या गुरुकुलांतच त्यांचा विद्याभ्यास होऊं लागला.

बारा वर्षें लोटलीं. शशिरेखा व तिच्या तिघी मैत्रिणींना बारा वर्षें मुलांचीं तोंडें पहावयास मिळालीं नाहींत. पुत्रविरह बारा वर्षें सहन केला. आतां मुलांना परत घेऊन यायला हरकत नाहीं असें त्यांना वाटलें.

परंतु एक प्रश्न समोर उभा राहला. आपापल्या मुलाला ओळखायचें कसें. खुणेसाठीं मुलांच्या गळ्यांत किंवा अंगावर कांहींच घातलें नव्हतें. विभांडकालादेखील ही गोष्ट सुचली नव्हती. कोणालाच कोणतें मूल कोणाचें हें सांगतां आलें नाहीं. आतां राजा कोण होणार, मंत्री कोण होणार आणि कोषाध्यक्ष व सेनापति कोण होणार?

वृद्ध मंत्र्यानें हा प्रश्न सोडविण्याचा एक उपाय योजला. त्यानें चौघां म्हाताऱ्यांना



बोलावून त्यांना जें सांगावयाचें तें सांगून विभांडकाकडे पाठविलें. चौघांनीं एकेकाला एकामागून एक घेऊन जाण्याचें कबूलकरून विभांडकाचा निरोप घेतला. विभांडकानें त्या चौघांचें नामकरण देखील केलें नव्हतें. तो त्यांना फक्त एकदल, द्विदल, त्रिदल व चतुर्दल या नांवानें बोलवी. त्यानें चौघांना निरनिराळें बोलवून समजावून सांगितलें कीं तुमचे आजोबा तुम्हांला घेऊन जायला आले आहेत. त्यांच्याबरोबर तुम्ही आपापल्या घरीं जा.

सतत बारा वर्षें राहल्यानंतर ताटातूट होणार म्हणून मुलांना फार वाईट वाटलें.



सर्व एकाच जागीं जाणार हें त्यांना माहीत नव्हतें. परस्परांचा निरोप घेऊन ते निर-निराळ्या मार्गानें निघाले.

एकदल ज्या वाटेनें जात होता त्या वाटेवर कांहीं अंतर चालून गेल्यानंतर त्यांना एका चोरानें अडविलें व दरडावून म्हणाला—"तुमच्याजवळ असेल नसेल तें ठेवा काढून! नाहींतर तुम्हांला ठार करीन!"

एकदलानें त्या चोराच्या हातांतलें दांडकें हिसकावून दूर फेंकून दिलें व त्यालाच खूप चोप दिला. चोर खालीं पडला. एकदलानें हाक मारून दूर उभ्या असलेल्या लोकांना बोलाविलें व म्हणाला—"या चोराला धरून बांधून ठेवा. मी राजाला सांगून तुम्हांला चांगलें बक्षिस मिळवून देतों." त्यांनीं त्याप्रमाणें चोराला धरून ठेवलें.

द्विदल जात होता त्यावाटेवर देखील चोरांनीं त्याला व त्याच्याबरोबर जाणाऱ्या म्हाताऱ्याला अडविलें व जवळ असेल तें मुकाट्यानें समोर काढून ठेवायला सांगितलें. तेव्हां द्विदल म्हणाला—"बाबा रे! आमच्या-जवळ काय आहे तुला द्यायला? अंगावरचे कपडे आहेत. पाहिजे तर ते घेऊन जा. आमची ना नाहीं." म्हाताऱ्यानें दूर उभ्या असलेल्या लोकांना हाक मारून जवळ बोलाविलें व म्हणाला—"चोर चोर! पकडा याला!"

चोरानें त्यांचे पाय धरले व म्हणाला—"मालक या खेपेस सोडा! पुन्हां चोरी केली तर धरा पाहिजे तर!"

"ठीक! जा, पण बजावून ठेवतों, पुन्हां असलीं कामें केलीस तर मात्र सोडणार नाहीं." द्विदलानें त्याला सोडून दिलें.

लोक जवळ आले व चोर कोठें आहे म्हणून विचारूं लागले. "चोर बीर नाहीं हो. आमचे आजोबा घाबरून 'चोर चोर' म्हणून ओरडले." द्विदल म्हणाला. लोक निघून गेले.

त्रिदल व त्याच्याबरोबर जाणाऱ्या म्हाताऱ्याला पण वाटेंत एका चोरानें अड-विलें. दुरूनच त्रिदल ओरडला—"आजोबा! धांवा! पळा!" असें सांगून तो स्वतः दूर पळून गेला व म्हातारापण त्याच्याबरोबर पळूं लागला. चोर दोघांना पळत असलेले पाहून खदखदां हंसूं लागला.

चतुर्दलाला देखील चोरानें अडविलें. चतुर्दलानें त्याला खूप चोप देऊन त्याचे हात पाय बांधले व त्याची तलवार हिसकावून घेऊन चोराचा गळा कापण्याच्या विचारांत होता. तितक्यांत दोघे तिघे वाटसरू कोठून तरी नेमके त्याच जागीं आले आणि म्हणाले—"बाबा! चोराचा खून केला तरी या देशाचा राजा मृत्युदंड देतो. म्हणून तूं त्याला ठार करूं नकोस."

"राजानें मला सुळावर चढविलें तरी चालेल. परंतु असल्या नराधमांना जिवंत सोडणें एक महापातक आहे!" चतुर्दल म्हणाला.



म्हाताऱ्यानें व इतर लोकांनीं मिळून चतुर्दलाच्या हातांतून तलवार हिसकावून घेतली व चोराला वांचविलें.

ते चार चोर खरे चोर नव्हतेच. मंत्र्यानें त्यांना, म्हाताऱ्यांना व लोकांना त्या कामावर मुलांची परीक्षा घेण्यासाठीं नेमलें होतें.

चौघे म्हातारे राजधानी जवळ पोंचेपर्यंत अंधःकार पडूं लागला होता. प्रत्येक म्हातारा त्याच्या बरोबर आलेल्या मुलांला घेऊन एका निर्जन घरांत येऊन उतरला.

एकदलाला बरोबर घेऊन येणारा म्हातारा त्याला एका खोलीजवळ घेऊन जाऊन

म्हणाला—" बाळ! पहा तर आंत जाऊन खोली कशी काय आहे ती!"

खूप काळोख आहे आंत! दिव्याशिवाय आंत काय आहे हें काय कळणार?" एकदल म्हणाला. त्या प्रश्नाचें उत्तर द्विदलानें दुसऱ्याच शब्दांत दिलें. म्हणाला—" आंत भीति आहे."

काळोखाच्या खोलींत जाऊन काय आहे हें पाहून ये म्हणून सांगणाऱ्या म्हाताऱ्याला त्रिदल म्हणाला—" यांत कांहीं तरी गुप्त धन असूं शकेल."

चतुर्दल खोलींत जाऊन सर्व खोली चाचपून पाहून बाहेर आला व म्हणाला—कांहीं नाहीं!"

दुसऱ्या दिवशीं चौघे म्हातारे चौघां मुलांना राजाच्या दरबारांत घेऊन गेले. चौघांनीं परस्परांना पाहून ओळखलें व आपण एकाच जागीं येऊन भेटलों तर! असें आश्चर्य चकित होऊन आनंदानें परस्परांना खुणेनें सुचविलें.

वृद्ध मंत्री गुणचंद्राला म्हणाला—" महाराज! चौघांची ओळख पटली. यांपैकीं एकदल आपले युवराज आहेत. त्याच्यांत क्षत्रियोचित सर्व गुण आहेत. राजपुरुषांत असणारीं सर्व लक्षणें याच्यांत आहेत. द्विदल तुझ्या मंत्र्याचा मुलगा व माझा नातू आहे. त्याच्या अंगांत ब्राह्मणोचित क्षमा, भावना व शक्ति तिन्ही गुण आहेत. त्रिदल नेहमीं पैशाची फिकीर करणारा वैश्यपुत्र आहे. चतुर्दल सेनापतीचा मुलगा आहे. त्याच्या अंगांत साहस, त्याग इत्यादि गुण आहेत."

वृद्ध मंत्र्यानें घेतलेली परीक्षा व प्रत्येकाची वर्णन केलेली ओळख मुलांच्या आई वडिलांना पटली. सर्वांना परमानंद झाला.





# स्वप्नांचा व्यापार

एका गांवीं एका गरीब बाईला तीन मुलें होतीं. दोन वेळचें जेवण मिळणें देखील अशक्य झालें तेव्हां पैसा मिळविण्याचें कारण सांगून नवरा घर गांव सोडून निघून गेला तो परत आला नाहीं. अर्थातच कुटुंबाची सर्व जबाबदारी मुलांच्या आईवर येऊन पडली. कांहीं काळ लोटल्यावर वडील दोन मुलें कामधंदा करूं लागलीं. मोठा मुलगा कावडीनें दहा घरीं पाणी भरून दहावीस रुपये मिळवूं लागला. दुसरा मेंढरें चरायला घेऊन जाई. तिसरा ब्रह्मन्ना मात्र एकदेखील काम करीत नसे. तीन वेळ खाणें व झोपा काढणें एवढेंच काम त्याला येत असे. एक दिवशीं त्याची आई त्याला रागावली. म्हणाली—" असा झोपून राहालास तर पुढें पोट कसें भरावयाचें? जाऊन कांहीं तरी कामधंदा कर. फुकटाचें खायला घालायला माझी तयारी नाहीं."

" आई! झोपल्यावर कीं नाहीं, किती छान छान स्वप्नें पडतात." असें सांगून ब्रह्मन्नानें त्याला कशीं गमतीदार स्वप्नें पडतात त्यांचें खूप वर्णन केलें. तें ऐकून त्याची आई जास्तच रागावली. म्हणाली—" स्वप्नें पाहून का तुझें पोट भरणार? पोट भरायला पैसा मिळवावा लागतो."

दुसऱ्या दिवशीं सकाळीं झोपून उठल्याबरोबर ब्रह्मन्ना म्हणाला—" आई, मी पैसे मिळवून आणायला जातों."

आईला आनंद झाला. तिनें विचारलें—" कोठें जाणार आहेस बाबा? आणि काम तरी काय करणार आहेस?"



“रात्रीं मला एक छान स्वप्न पडलें आई! माझ्या जवळून एक जमीनदार स्वप्नें विकत घ्यायला तयार झाला आहे. मी त्याला आपलीं स्वप्नें विकून पैसे मिळवून घेऊन येणार आहें.” ब्रह्मन्ना म्हणाला.

“पुरे कर कोणी ऐकलें तर वेड्यांत काढतील तुला!” आई म्हणाली.

परंतु त्यानें आईचें ऐकलें नाहीं. तो स्वप्नांत त्याला दिसला होता त्या जमीन-दाराच्या शोधा‍ निघाला.

वाटेंत त्याला एक गांव लागलें. त्या गांवीं एक जमीनदार रहात असे.

त्या जमीनदाराच्या घरीं जाऊन ब्रह्मन्ना जोर जोरानें हांक मारूं लागला—“जमीनदार साहेब! अहो जमीनदार साहेब!”

जमीनदार घराबाहेर येऊन रागारागानें विचारूं लागला—“कोणरे तूं? कशाला ओरडतो आहेस?”

“माझें नांव ब्रह्मन्न! मला एक स्वप्न आज पहाटेंच पडलें कीं तुम्ही माझ्याकडून स्वप्नें विकत घेत आहांत. म्हणून मी आपलीं स्वप्नें विकायला घेऊन आलों आहें.” ब्रह्मन्ना म्हणाला.

जमीनदारानें निरनिराळ्या प्रकारचे वेडे पीर पाहाले होते. पण स्वप्नें विकणारा वेडा प्रथम ब्रह्मन्नाच त्याला भेटला. तसा दिसायला ब्रह्मन्ना बरा होता. त्याच्या बोलण्यावरून जमीनदाराच्या मनांत कुतूहल उत्पन्न झालें कीं ऐकूंया तरी कशा तऱ्हेचीं स्वप्नें पडतात तीं. म्हणून तो ब्रह्मन्नाला म्हणाला—“बरें तर सांग बघूं कसें स्वप्न पडलें तुला.”

“सांगेन! झोंपल्याशिवाय स्वप्न पडणार नाहीं व जेवल्याशिवाय झोंप येणार नाहीं. मला जें स्वप्न पडेल तें माझ्याकडून तुम्ही विकत घ्या. प्रत्येक स्वप्नाबद्दल तुम्ही



मला काय देणार बोला!” ब्रह्मन्नानें विचारलें.

“दोन आणे!” जमीनदार म्हणाला.

“कमींत कमी एक रुपया मी कमावून दिला नाहीं तर आई मला जेवूं घालणार नाहीं.” ब्रह्मन्ना म्हणाला.

“बरें तर प्रत्येक स्वप्न मी चार आण्याला विकत घेईन. चार स्वप्नें तूं मला सांग. तुला एक रुपया मिळेल.” जमीनदार म्हणाला. ब्रह्मन्नानें तें कबूल केलें.



जमीनदाराला एक मुलगा होता व नोकर चाकर खूप होते. ब्रह्मन्ना पोटभर जेवून एका कोपऱ्यांत पडून राहाला. सकाळीं उठल्याबरोबर जमीनदाराकडे गेला व म्हणाला—“मालक, मला एक स्वप्न पडलें, आपल्या बागेंतल्या पेरूच्या झाडावर एक पंचरंगी पोपट बसला आहे व त्याला तुम्ही पकडून एका पिंजऱ्यांत ठेवून दिलें आहे.”

स्वप्नें खरें आहे कीं खोटें हें पाहाण्या-साठीं जमीनदार आपल्या बागेंत गेला. तेथें त्याला पेरूच्या झाडावर खरोखरच एक पंचरंगी पोपट बसलेला दिसला. जमीनदारानें नोकराकरवीं त्याला धरून एका पिंजऱ्यांत ठेवून दिलें. कोणी कांहीं बोले त्याची नकल तो करीत असे. घरच्या सर्व लोकांना तो पोपट फार आवडला. जमीनदार ब्रह्मन्नाला म्हणाला—“ब्रह्मन्ना! तूं आमच्या घरींच कामाला रहा. तूं काम करशील त्याबद्दल तुला दोन्ही वेळचें जेवण देईन व तुझ्या प्रत्येक स्वप्नाची किंमत त्याशिवाय देईन.”

“हो पण मला काम कोणतेंच येत नाहीं. खाल्याशिवाय झोंप येत नाहीं व झोंपल्याशिवाय स्वप्नें पडत नाहींत. म्हणून स्वप्नें विकत घ्यायचीं असतील तर मला पोटभर जेवायला मिळालें पाहिजे” ब्रह्मन्ना म्हणाला.



"बरें तर, हरकत नाहीं. पोटभर खा आणि झोंपून स्वप्नें पहात रहा." जमीनदार म्हणाला.

दुसऱ्या दिवशीं आणखी एक स्वप्न पडलें. जमीनदाराच्या अंगणांत कोठून तरी एक सुंदर कुत्रें आलें. जमीनदारानें त्याला आपल्या घरीं ठेवून घेतलें. तें कुत्रें जमीनदाराच्या घराची राखण करूं लागलें.

दुसऱ्या दिवशीं दुपारीं अंगणांत खरोखरच एक कुत्रें आलें. तें शिकारी कुत्रें होतें. तें जमीनदाराच्या घराची राखण करूं लागलें.

तिसऱ्या दिवशीं ब्रह्मन्नाला आणखी एक स्वप्न पडलें. जमीनदाराला म्हणाला—"मालक आपल्या शेताच्या दक्षिणेकडे उंबराच्या झाडाखालीं दोन हंडे पुरलेले आहेत."

"ब्रह्मन्ना ! हें स्वप्नतर फारच गमतीदार दिसतें कीं रे ! हें स्वप्न खरें ठरलें तर मी तुला एका ऐवजीं दोन पावल्या देईन." जमीनदार म्हणाला.

तें स्वप्नपण खरें निघालें. दोन्ही हंडे मोहरांनीं भरलेले होते.

ब्रह्मन्ना जमीनदाराला म्हणाला—"मालक एक रुपया तर पुरा झाला. आतां मी घरीं जातों. आईला भेटून किती दिवस झाले."

"अरे असे किती दिवस झाले आणखी चार दिवस रहा. चार स्वप्नें विकून आणखी एक रुपया मिळव आणि मग जा. दोन रुपये पाहून तुझ्या आईला जास्त आनंद होईल." जमीनदार म्हणाला. ब्रह्मन्ना त्याला कबूल झाला.

पुढल्या दिवशीं ब्रह्मन्नाला आणखी एक स्वप्न पडलें. ब्रह्मन्ना जमीनदाराकडे जाऊन म्हणाला—"पूर्वेकडे तुम्हांला एक देऊळ लागेल. त्याला लागून एक गेरू रंगाचें घर आहे. त्यांत एक म्हातारी व एक रूपवती मुलगी राहाते. मला पाहून ती मुलगी म्हातारीला कानांत कांहींतरी म्हणाली. म्हातारीनें तिला माझ्याशीं लग्नकरून घ्यायला सांगितलें. नंतर लगेच वाजत्री वाजूं लागलीं अन् माझी झोंप मोडली."

"अरे पण, मी तुझीं स्वप्नेंच विकत घेत असतां स्वप्नांत दिसलेल्या मुलीशीं तुझें लग्न कसें काय ?" जमीनदारानें विचारलें.

त्या मुलीशीं स्वतःच लग्न करून घेण्याचा जमीनदाराचा विचार होता. दोघे पूर्वेकडे निघाले. तेव्हां एक देऊळ व देवळाला लागून गेरू रंगाचें एक घर दिसलें. त्या घरांतल्य म्हातारीला जमीनदारानें विचारलें—"आजी बाई ! लग्नाची मुलगी आहे का तुमच्या घरीं."

"होय आहे. ती मुलगी एका जत्रेला मी गेलें असतां मला सांपडली. तिचे आई वडील कोण आहेत हें देखील माहीत नाहीं मला. दहा वर्षें मीं या मुलीला ल्हानाची मोठी केली. पण आईवडिलांची माहिती नाहीं म्हणून कोणी तिच्याशीं लग्नाला तयार नाहीं." म्हातारी म्हणाली.

जमीनदाराला आठवलें कीं त्याची मुलगीच दहा वर्षांपूर्वीं हरविली होती. म्हातारीजवळ जत्रेची जागा वगैरे विचारून त्यानें त्या-मुलीला पाहिलें. सर्व खुणा बरोबर निघाल्या. मुलीच्या विरहानेंच तिची आई वारली होती.

जमीनदार म्हातारीला व मुलीला घेऊन आपल्या घरीं गेला. ब्रह्मन्नाचें तें स्वप्न अगदीं अद्वितीय असेंच होतें. त्याची मुलगी परत मिळाली, ती ब्रह्मन्नाच्या कृपेनेंच. म्हणून त्यानें ब्रह्मन्नाशींच मुलीचें लग्न करून दिलें. अशा तऱ्हेनें ब्रह्मन्नाला स्वप्नांच्या व्यापारांत फार मोठी मिळकत मिळाली.





# वाईटाचें फळ वाईट

पुष्पदेशांत अग्निदत्त नांवाचा एक ब्राह्मण रहात असे. त्याला राजाकडून एक जहागीर मिळाली होती. त्याला दोन मुलगे होते. एकाचें नांव सोमदत्त व दुसऱ्याचें वैश्वानर. सोमदत्त दिसायला सुंदर होता. पण विद्येशीं त्याचें वांकडें होतें. वैश्वानर कुशाग्र-बुद्धि व पंडित होता. ते एका गुरूकडे विद्याभ्यासासाठीं गेले होते. वडील वारल्यावर दोघांनीं जहागीर अर्धी अर्धी वांटून घेतली. धाकट्या भावाला त्याच्या पांडित्यामुळें राजदरबारीं मान मिळाला. परंतु मोठा वाईट संगत लागल्यानें आपला काळ व धनदौलत व्यर्थ खर्च करूं लागला.

तें सर्व पाहून अग्निदत्ताच्या एका मित्रानें सोमदत्ताला बोलावून समजाऊन सांगितलें कीं त्याच्या तशा वागणुकीमुळें त्याच्या वडिलांच्या नांवलौकिकाला बट्टा लागत आहे. परंतु सोमदत्ताला तो उपदेश रूचला नाहीं. धाकट्या भावाची प्रशंसा करून माझा अपमान करतोस का असें सांगून त्यानें त्या गृहस्थाला खूप चोप दिला. तो ब्राह्मण आपलें गाऱ्हाणें घेऊन राजाकडे गेला. राजानें आपल्या एका दोघां सैनिकांना सोमदत्ताला कैद करून घेऊन येण्यासाठीं पाठविलें. परंतु सोनदत्तानें त्या दोघांचा खून केला.

तें ऐकून राजा जास्तच रागावला. राजानें सोमदत्ताला धरून आणण्यासाठीं दहावीस लोकांना पाठविलें व त्याला कैद करून फांशीची शिक्षा केली. वैश्वानरानें राजाजवळ विनंति केली तेव्हां राजानें सोमदत्ताची शिक्षा फांशी ऐवजीं दोन महिन्यांची सक्त मजुरीची करून त्याला तुरुंगांत पाठविलें व त्याची जहागीर जप्त केली. तुरुंगांतून सुटल्यावर त्यानें शेती करण्याचें ठरविलें. त्याला थोडी सपाट जमीन एका जागीं मिळाली. त्या जमिनीच्या मध्यभागीं एक पिंपळाचें झाड होतें. सोमदत्तानें त्या पिंपळाच्या झाडाला प्रदक्षिणा घालून नैवेद्य दाखवून नमस्कार केला.



तो कोठून तरी दोन बैल मागून घेऊन आला व त्यानें शेतकीचा धंदा सुरू केला. तो रात्रंदिवस मेहनत करूं लागला. बायको वाढील ती मीठभाकर खाऊन तो अंग मोडून काम करूं लागला.

त्याला त्याच्या मेहनतीचें चांगलें फळ मिळालें. पीक छान झालें. फक्त कापणी उरली होती. परंतु दुर्दैवानें एका शेजारच्या राजानें त्यांच्या राज्यावर स्वारी केली. त्या वेळीं सैनिकांनीं सोमदत्ताच्या शेताची फार नासधूस केली. ती पाहून सोमदत्ताची बायको रडूं लागली. परंतु सोमदत्ताचा धीर खचला नव्हता. त्यानें बायकोला धीर दिला व त्यानें तशीच कापणी करून जेवढें पदरीं पडलें तें घेऊन घरीं गेला. त्यानें पुन्हां पिंपळाच्या झाडाची पूजा केली. सबंध दिवस तो पिंपळाच्या पारावरच बसून होता. रात्रीं पारावरच झोंपला. मध्य रात्रीच्या सुमारास त्याला झाड बोलत असल्याचा भास झाला—"सोमदत्ता! तुझी श्रद्धा व भक्ति पाहून मी प्रसन्न झालों आहें. तूं आपलें नांव फलभूती असें ठेवून घेऊन श्रीकंठ देशांत जा. तेथें आदित्य-प्रभु नांवाचा राजा राज्य करीत आहे. तूं त्याच्या दरबारीं जाऊन संध्या कर व नंतर एवढें म्हण—"चांगल्यास चांगलें वाईटास वाईट. चांगल्या कर्माचें फळ चांगलें मिळतें व वाईटाचें वाईट. त्यांत तुझें कल्याणच होईल. तुला संध्या येत नसेल




तर मी तुला शिकवून देतों. मी एक यक्ष आहें."

सोमदत्ताला आपल्या सर्व कष्टाचा व दुःखाचा विसर पडला. त्यानें संध्येचा मंत्र शिकून घेतला आणि उजाडल्यावर आपल्या घरीं परत आला. बायकोला बरोबर घेऊन तो श्रीकंठ देशास जाण्यास निघाला.

राजधानींत पोंचल्यावर त्यानें आपलें नांव फलभूति आहे असेंच लोकांना सांगितलें. "बऱ्याचें फळ बरें, वाईटाचें वाईट!" असें म्हणत त्यानें राजधानींत प्रवेश केला. तें ऐकून सर्वांना आश्चर्य वाटलें. राजानें फल-भूतीच्या त्या उपदेश मंत्राचा आदर केला व त्याला पुष्कळ बक्षिसें देऊन त्याचा सत्कार केला. फलभूति यक्षाच्या कृपेनें श्रीमंत झाला व त्याला लोकप्रियता पण मिळाली.

आदित्य प्रभूची राणी कुवलमावलीनें बालपणीं एका यक्षिणीची सेवा करून यक्षिणी मंत्र शिकून घेतला होता. पतीला कळूं दिल्याशिवाय ती भैरवाची उपासना करी व भैरवाला ताडी, दारू व नरमांस यांचा नैवेद्य दाखवी. मंत्रबळानें तिला आकाशांत उडता येत असे. एकदां राजानें राणीची भैरवो-पासना स्वतःच्या डोळ्यांनीं पाहिली. त्याच्या अंगावर शहारे उभे राहाले. त्यानें राणीला विचारलें—"हें सर्व काय आहे?"

"महाराज! मी हें सर्व आपल्या कल्याणासाठींच करीत आहें. मी आपल्या बालपणींच काळरात्री नांवाच्या एका ब्राह्मण यक्षिणी कडून ही विद्या संपादन केली. नरमांस भक्षण करून आज मी यक्षिणींची राणीदेखील झालें आहें. आपण माझ्या-बरोबर ही उपासना करूं लागलात तर सर्व पृथ्वीवर आपलें एक छत्र साम्राज्य स्थापन होईल." कुवलमावलीनें आपल्या पतीचें मन वळविण्यासाठीं सर्व सांगितलें.



"पण नरमांस भक्षण आणि हा यक्षिणीचा हा मंत्र? हें सर्व कशाला? फक्त साम्राज्य मिळविण्यासाठीं? हें नाहीं माझ्या हातून होणार. तूं देखील हें सर्व बंद केलें पाहिजेस." राजा म्हणाला.

राजानें सांगितलेलें राणीला रुचलें नाहीं व ती आत्महत्येला तयार झाली. राजा त्या गोष्टीला तयार नव्हता. राणीच्या म्हणण्या-प्रमाणें तो भैरवाच्या उपासनेला तयार झाला. राजाच्या मनावर राणीचा पूर्ण पगडा बसला होता हें सांगण्याची गरज नाहीं.

राणी राजाला म्हणाली—"तुमच्या दरबारीं फलभूती नांवाचा जो नवीन मांत्रिक आला आहे त्याच्या मांसाचा भैरवाला नैवेद्य दाखवावा असें मला वाटत आहे. तो उच्च कुलीन घराण्यांत जन्मला आहे. त्याच्या मांसाचा नैवेद्य दाखविला तर जी सिद्धी मिळेल तिच्या मार्गें आपण दोघे अमर होऊं. आपला सैंपाकींच आजपर्यंत मला नैवेद्याला नरमांस पुरवीत आला आहे. त्याला सांगून ठेविलें कीं झालें. आपण फलभूतीला त्याच्याकडे पाठवावें. सैंपाक्याला त्यानें जाऊन सांगावें कीं "राजा व राणी प्रसाद ग्रहण करण्यास पानावर बसली आहेत." हें खुणेचें वाक्य ऐकल्यावर सैंपाकी जें करावयाचें तें करील."




अर्थातच तें भयंकर काम करण्याची राजाची तमारी नव्हती. परंतु राणीचा वचक इतका होता कीं तिच्या मनाविरुद्ध कांहीं करण्याची त्याची छातीच नव्हती. म्हणून राजानें राणीनें सांगितल्याप्रमाणें सैंपाक्याला सांगितलें आणि फलभूतीला राजाचा व राणीचा निरोप म्हणून सांगून सैंपाक्याकडे पाठविलें.

फलभूती सैंपाक्याला तो निरोप सांगण्या-साठीं पाकशाळेकडे निघाला. वाटेंत युवराज

चंद्रप्रभु याची व त्याची भेट झाली. युवराज फलभूतीला म्हणाला—"माझ्या वडिलांसाठीं सोनारानें जीं सुवर्णकुंडलें बनविलीं आहेत, हुबेहूब अगदीं तशींच मला हवीं आहेत. तरी तूं जाऊन तीं घडवून घेऊन ये." फलभूतीनें तें कबूल केलें. पण जाण्या-पूर्वीं राजा व राणी दोघांनीं सांगितलेला निरोप सैंपाक्याला जाऊन सांगण्याचें काम युवराजांना सांगितलें.

फलभूती कुंडल घडवून आणण्यासाठीं निघून गेला व युवराज निरोप सांगायला पाकशालेकडे गेले. निरोप कळतांच सैंपा-क्यानें युवराजांचा वध करून त्यांचें मांस शिजविलें व तें राजा व राणीला नेऊन वाढलें. दोघांनीं भैरवाचा तो प्रसाद मोठ्या आनंदानें ग्रहण केला. राजाला रात्रभर झोंप लागली नाहीं.

दुसऱ्यादिवशीं फलभूती नवीन कुंडलें घेऊन आला. त्याच्या तोंडीं सर्व वृत्त ऐकून राजा हाय खाऊन जमिनीवर बेशुद्ध होऊन पडला. वेड्यासारखा राजा स्वतःची व राणीची निंदा करूं लागला.

मंत्र्याला राजाचें हें वागणें फार विचित्र वाटलें. मंत्र्यानें विचारल्यावर राजानें आपल्या मूर्खपणाचें वर्णन केलें व राणीच्या नादीं लागून पुत्रहत्येचें पातक केल्याबद्दल शोक करूं लागला.

फलभूतीनें जें सांगितलें होतें तेंच खरें झालें. वाईटाचें फळ नेहमीं वाईटच असतें.

पुत्रशोक असह्य झाल्यानें राजानें आपलें राज्य फलभूतीला दिलें व अग्नि प्रवेश केला. राणीला आपल्या कुकर्माचा पश्चात्ताप वाटला व तिनेंदेखील पतीबरोबर अग्नि प्रवेश केला.





# परोपकारी गोपाळ

एका जमीनदाराच्या घरीं लग्नाची तयारी सुरू झाली. गांवचे कुळकर्णी आपल्या-बरोबर गोपाळला आग्रह करून बोलावून घेऊन गेले. लग्नाला शेजारच्या गांवचे एक भटजी आले. त्यांचें वेदाध्ययन अगदीं बेताचेंच होतें. जमीनदारानें या भटजींना पण बोलाविलें होतें. भटजींना मंत्र येतच नव्हते, परंतु मंत्रांचें सोंग मात्र त्यांनीं खूप केलें.

लग्नसमारंभ उरकल्यावर जमीनदारानें सर्वांना दक्षिणेबरोबर लोंकरीची एक एक शाल दिली. कांहीं प्रमुख गांवकऱ्यांना जमीनदारानें एक एक शाल दिली. गोपाळला पण एक शाल मिळाली. पण अशिक्षित भटजींना शाल मिळाली नाहीं. त्यांना त्या गोष्टीचें फार वाईट वाटलें. येन केन प्रकारेण एक शाल मिळवायचीच असा त्यांनीं मनाशीं निश्चय केला.

भटजींची नजर गोपाळच्या शालीवर होती. त्यांनीं कुळकर्णी अप्पांचें गोपाळशीं झालेलें बोलणें ऐकलें होतें. गोपाळ कुळकर्णी अप्पांना म्हणाला—"तुझ्याबरोबर आल्याचा मला फायदाच झाला. नाहीं तर ही शाल कोठून मिळाली असती?" या रिकाम टेकड्याला शाल मिळाली. मग आपल्याला! कां मिळूं नये? हें भटजींना कळलें नाहीं. खरें पाहिलें तर याला कोणी लग्नाला बोला-विलेंदेखील नव्हतें. हा उपट सुंभ्या आला नसता तर आपल्याला शाल मिळाली असती. खरोखरीं ही शाल आपल्याच वांटणीची आहे. म्हणून भटजींनीं गोपाळ कोण, कोणत्या गांवचा राहणारा वगैरे गोष्टींची माहिती काढून



घेतली. ती शाल गोपाळकडून उपटायची असें त्यांनीं ठरविलें. भटजींनीं गोपाळचें फार गुणवर्णन केलें व त्याला आपल्या गांवीं येण्यास विनंति केली.

गोपाळ म्हणाला—"आज कुळकर्ण्यांच्याबरोबर आलों आहें. त्यांच्याबरोबरच घरीं जावें लागणार. पुन्हां केव्हां तरी नक्की आपल्या गांवीं येईन."

पण भटजी सोडतात का? म्हणाले—"हरकत नाहीं! पुढल्या द्वादशीला या. एकादशीचें पारणें आहे. चार चौघे ब्राह्मण येतील जेवायला तुम्ही पण या."

गोपाळ त्याला कबूल झाल्यावर भटजींनीं आपलें नांव, गांव व पत्ता सांगून घराची खूणपण नीट समजावून सांगितली.

गांवांत पोंचल्यावर गांवकऱ्यांनीं त्याला विचारलें—"काय हो! जमीनदारानें आपल्याला काय काय दिलें?" भटजींनीं एक थाप मारली. म्हणाले—"अहो, काय सांगूं? जमीनदार फार उदार आहे, गुणपारखी आहे. त्यानें मला एक लोंकरीची शाल आणि वर मोठी दक्षिणा दिली. मी ती शाल एका मित्राला दिली आहे. तो पुढल्या द्वादशीच्या पारण्याला ती शाल बरोबर घेऊन येणार आहे."

एकादशीच्या दिवशीं संध्याकाळीं गोपाळ भटजींच्या गांवीं जाण्यासाठीं निघाला. थंडीचे दिवस होते म्हणून त्यानें बरोबर ती लोंकरीची शाल व फराळाचें सामान घेतलें होतें. रात्रीं फार थंडी वाजूं लागली म्हणून एका गांवीं धर्मशाळेंत उतरण्याचें गोपाळनें ठरविलें. उजाडतांच उठून गोपाळ निघाला. थोडें अंतर चालून गेला असेल, त्याला रस्त्याच्या कडेला कोणी तरी कण्हत असल्याचा भास झाला. त्याच वेळीं एक कुत्रा भुंकूं लागला.





गोपाळनें जवळ जाऊन पाहिलें. एका माणसाचें सर्व अंग रक्तबंबाळ झालेलें होतें. जवळ त्याचा कुत्रा भुंकत उभा होता. त्या माणसाच्या अंगावर एका फाटक्या चादरीशिवाय कांहीं एक नव्हतें. म्हणून तो थंडीमुळें कुडकुडत होता.

गोपाळनें जवळ जाऊन आपल्या अंगावरची शाल त्या माणसाच्या अंगावर पांघरायला म्हणून टाकली. थोड्या वेळानें त्या माणसाला शुद्ध आल्यासारखें वाटलें. शुद्ध आल्यावर त्याच्या तोंडांतून "भूक!" असा एकच एक शब्द निघाला.

गोपाळ बरोबर खायला घेऊन आला होता. त्यांतलें अर्धें अधिक त्यानें पूर्वींच खाल्लें होतें. म्हणून त्यानें जवळ उरलें होतें त्यांतलें थोडें त्या माणसाला खायला दिलें व बाकी कुत्र्याला घातलें. नंतर त्यानें त्या माणसाला विचारलें—"कायरे बुवा? तूं असा कां येथें पडून आहेस?"

"काय करूं? माझें फुटकें भाग्य!" तो म्हणाला. गोपाळला आश्चर्य वाटलें. पण तो कांहीं बोलला नाहीं. त्याला त्याच्या घरापर्यंत पोंचवायला गेला. बाहेरून दाराची कडी वाजवतांच त्या माणसाच्या बायकोनें दार उघडलें. लगेच तो मनुष्य आंत गेला व दार बंद करीत म्हणाला—"पुन्हां या वाटेनें आलांत तर पहा!" गोपाळला त्याचें तें वागणें विचित्र वाटलें.

आतां वाटेंत खायला कांहीं उरलें नव्हतें. थंडी पडूं लागली. परंतु पांघरायला कांहीं नव्हतें. काळोख पडूं लागला. कसाबसा त्या भटजींच्या घरचा पत्ता विचारीत गोपाळ त्यांच्या घरीं जाऊन पोंचला.

गोपाळच्या जवळ शाल नसलेली पाहून भटजींनीं त्याला विचारलें—"या एवढ्या थंडींत शाल पांघरल्याशिवाय आलांत?"



“शाल आणली होती. परंतु वाटेंत कुडकुडत असलेल्या एका माणसाला मी ती देऊन टाकली. उद्यां आहे नव्हे का द्वादशीचें पारणें? असलें कांहीं काम तर सांगा मला!” गोपाळ म्हणाला.

“अहो! आम्ही तें समारंभानें करावयाचें ठरविलें व पुढल्या द्वादशीला करण्याचें ठरलें आहे. कारण आमची मंडळी आजारी आहेत.” असें म्हणत भटजींनीं जरा आंत वांकून पाहिलें. गोपाळला कण्हण्याचा आवाज ऐकूं आला. भटजींचीं दोन्हीं मुलें उघडीं नागडीं समोर उभी होतीं.

“ओहो! असें होय? तर मग तुम्ही पहिल्यानें त्यांची काळजी घ्या. गोपाळ म्हणाला. भटजी आंत गेले व हळूच म्हणाले—“तो भट शाल नाहीं घेऊन आला.”

“तरमग हें फुकटाचें कण्हणें कशाला?” भटजींची बायको म्हणाली.

“तो जाईपर्यंत पडून रहा कीं जरा!” भटजी म्हणाले.

भटजींचें बायकोशीं झालेलें संभाषण गोपाळला ऐकूं आलें. त्याला बरोबर संदर्भ कळला नाहीं. परंतु त्याच्या विषयींच त्यांचें बोलणें चालू आहे एवढें मात्र त्याला कळलें. म्हणून तो म्हणाला—“हें पहा भटजी, माझ्याकरितां काळजी करूं नका. मी रात्रीं कोठें तरी जाऊन पडून राहीन व उजाडल्यावर घरीं निघून जाईन.”

भटजींनीं त्याला अडविलें नाहीं.

गोपाळ त्या गांवच्या धर्मशाळेंत रात्रभर झोंपून राहिला. उजाडल्यावर आपल्या गांवीं निघाला. संध्याकाळच्या सुमारास त्यानें शाल दिली होती त्या माणसाच्या गांवीं येऊन पोंचला. गोपाळला द्वादशीच्या दिवशीं एकादशीचा उपवास घडला होता. त्यांत कडक थंडी पडूं लागली होती. ताप आल्यासारखेंपण वाटत होतें. म्हणून तो त्या माणसाच्या घरीं रात्र काढून पुढें जाण्याच्या विचारानें गेला.

सुदैवानें गांवाच्या वेशीवरच त्याला तो कुत्रा शेपटी हलवीत पुढें येत असलेला दिसला. त्याला रात्रीं त्यानें थोडें खायला घातलें होतें तें कुत्रा विसरला नव्हता.

गोपाळ कुत्र्याबरोबर निघाला. त्या माणसाच्या घरीं पोंचल्यावर त्यानें कडी वाजविली. त्या माणसानें दार उघडून गोपाळला विचारलें—“कोण रे तूं?”

“मी! परवां नव्हती का आपली भेट झाली? मी परत गांवीं जात आहें. थोडा ताप आल्यासारखा वाटत आहे. म्हणून आलों होतों. उद्यां सकाळीं उठून जाईन पुढें.” गोपाळ म्हणाला.

“माझें घर म्हणजे धर्मशाळा वाटली होय तुला? चालू लाग. धर्मशाळेंत जाऊन झोंप पाहिजे तितका वेळ.” गोपाळ म्हणाला:

“मी तुम्हांला परवां शाल दिली होती ना?” गोपाळ आठवण करून देण्याच्या हेतूनें म्हणाला.

“शाल? कोणी? तुम्ही? वेडबीड तर नाहीं लागलें?” तो मनुष्य म्हणाला आणि



एक काठी घेऊन त्याला मारायला धांवला. तें पाहून कुत्रें मालकावरच भुंकूं लागलें. त्या माणसानें एक छडी आपल्या कुत्र्याला मारली व त्याला दूर पिटाळून आंतून दार बंद करून घेतलें.

समोरच्या घरचा मनुष्य आपल्या घरासमोर उभा राहून तें दृश्य पहात होता. त्यानें गोपाळला बोलावून सर्व विचारून घेतलें व गांवच्या पाटलाकडे गोपाळबरोबर गेला. पाटलांनीं गोपाळच्या औदार्याचें वर्णन ऐकलें होतें. म्हणून गोपाळ आल्याबरोबर पाटलांनीं नम्रपणानें गोपाळला

बसायला सांगून येण्याचें कारण विचारलें. तेथें गोपाळला त्या माणसाच्या विचित्र वागणुकीचें कारण समजलें. तो एक जुगारी व हलकट मनुष्य होता. बायकोचे सर्व दागिने विकून त्यानें दारूंत व जुगारींत सर्व पैसे उडविले. घरांतली भांडीं कुंडीं व कपडे लत्ते सर्व कांहीं विकून टाकल्यावर हातांत कांहीं उरलें नाहीं तेव्हां पासून दुसऱ्यांच्या घरीं चोऱ्या करणें व येणाऱ्या जाणाऱ्यांना लुबाडून खाणें एवढा एकच एक धंदा त्याला येत होता. परवां रात्रीं जुगार खेळत असतां मारामारी झाली. त्या वेळीं लोकांनीं त्याला इतकें बडविलें होतें कीं तो रक्तबंबाळ होऊन पडला होता. त्याच वेळीं गोपाळनें त्याच्या अंगावर आपली शाल टाकून त्याला खायला दिलें व वांचविलें होतें. कुत्रादेखील खाल्ल्या अन्नाला जागला. परंतु तो मनुष्य मात्र सवयीप्रमाणें आपल्या उपकारकर्त्याला पूर्णपणें विसरला होता.

दुसऱ्या दिवशीं पाटलांनीं त्याला बोलाविलें तेव्हां त्याला कोणी शाल दिली असल्याचें तो कबूलच करीना. गांवभर गोपाळच्या शालीची गोष्ट पसरली. एका श्रीमंत व्यापाऱ्यानें एक लोकरीची शाल आणून गोपाळला दाखवून विचारलें—"ही शाल आपलीच का? कालच एक जण येऊन ही वीस रुपयाला देऊन गेला."

शालीवर जमीनदाराचें नांव विणलेलें होतें. म्हणून ती गोपाळचीच होती या गोष्टीची शंका उरली नाहीं. पाटलांनीं त्या जुगाऱ्याला बोलावून त्याच्याकडून खरें वदवून घेतलें. त्या व्यापाऱ्याला वीस रुपये देववून ती शाल गोपाळला परत देवविली.

गोपाळ दुसऱ्यादिवशीं घरीं परत आला.





# युद्ध कांड

राम मारुतीला म्हणाला—"मारुती! तूं राक्षसांचा राजा विभीषण याची परवानगी मागून घेऊन सीतेकडे जा आणि तिला सांग कीं मी, लक्ष्मण, सुग्रीवादिक येथें सकुशल आहोत. माझ्या हातून रावणाचा वध झाला. एवढें सर्व सांगून तिच्यावर या सर्वांचा काय परिणाम होतो तो पहा."

हनुमान रावणाच्या महालांत शिरला. तेथें सीता राक्षस स्त्रियांच्या मध्यें मान खाली करून बसली होती. मारुती आपलें नांव सांगून थोडासा वांकून उभा राहला. सीतेनें त्याला पाहतांच ओळखलें. मारुती म्हणाला—"हे वैदेही! बिभीषणाच्या मदतीनें व वानर सैन्याच्या सहाय्यानें रामानें शत्रूचा नाश केला. रावणाचा वध झाला आहे. लंकेवर जय मिळाला आहे. आतां बिभीषणाचें राज्य झालें आहे. म्हणून भिण्याचें कारण नाहीं. बिभीषण आपल्याला भेटायला येत आहे. हें रामानें तुम्हांला कळविण्यास मला पाठविलें आहे.

तें ऐकून सीतेला आनंद झाला. पण ती कांहींच बोलं शकली नाहीं. "कोणत्या विचारांत आहां? मला कांहीं निरोप आहे का?" असें मारुतीनें विचारल्यावर सीता स्वतःला सावरून म्हणाली—"मारुती! तुझ्या तोंडून रावणाच्या वधाची आनंद वार्ता ऐकून



गळा भरून आला होता. कोणत्या शब्दांत आज मी तुझी स्तुति करूं! तुला बक्षिस देण्यालायक साऱ्या त्रिलोकांत तरी कांहीं मिळेल का शंकाच."

"या राक्षसिणींनीं अपशब्द बोलून फार त्रास दिला होता नाहीं का? त्या सर्वांना फाडून फेंकून द्यावें असें वाटतें आहे मला." मारुती म्हणाला.

"अरे मारुती! या सर्व रावणाच्या दासी आहेत. मालक सांगेल तसें केलें नाहीं तर मालक त्यांना शिक्षा करणार नाहीं का? त्यांच्यावर राग काढून काय उपयोग! यांची चूक मुळींच नाहीं. चूक असलीच तरी थोरपणा अशा लोकांना क्षमा करण्यांतच आहे." सीता म्हणाली.

"सीते! तूं खरोखरच रामाला योग्य अशीच पत्नी आहेस. रामाला जाऊन तुझा असा काय निरोप सांगूं?" मारुतीनें विचारलें.

"आपल्या पतीचें दर्शन व्हावें अशी इच्छा आहे." सीता म्हणाली.

"रामाचें दर्शन अवश्य होईल!" असें सांगून मारुती रामाकडे निघून गेला व म्हणाला—"रामा! सीता फार दुःख करीत बसली आहे. तिला जाऊन भेट. तूं रावणाचा वध करून लंका जिंकलीस हें ऐकून तिला फार आनंद झाला. म्हणूनच तुझ्या दर्शनाची इच्छा तिला होत आहे."

रामाचे डोळे ओले झाले. त्याला काय करावें सुचेना. एक तर सीता रावणाच्या घरीं इतके दिवस राहाली. तिचा स्वीकार केला तर लोक नांवें ठेवतील. निरपराध्याला धिःकारलें तर ती देखील चूकच.

राम बिभीषणाकडे वळून म्हणाला—"तूं सीतेला न्हायला घालून व उत्तम वस्त्रालंकार व सुगंधी फुलांनीं सजवून घेऊन यायला दासींना आज्ञा कर."





बिभीषणानें आपल्या अंतःपुरांतील स्त्रियांना सीतेकडे जाऊन सीतेला सजवून आणावयास पाठविलें. सीता म्हणाली—"प्रथम मी अशीच येऊन रामाला भेटणार आहे." पण बिभीषण म्हणाला—"रामानें सांगितल्याप्रमाणें करणें बरोबर होईल."

त्यानंतर राक्षस स्त्रियांनीं सीतेला सुगंधी द्रव्यें लावून न्हायला घातलें. तिला उत्तमोत्तम वस्त्रालंकार घालायला दिले. नंतर तिला पालखींत बसवून व अनेक राक्षसांना बरोबर घेऊन बिभीषण रामाकडे आला.

राम काय करावें या विचारांत विचार करीत बसला होता. परंतु बिभीषणानें सीतेला घेऊन आल्याचें सांगितल्यावर इतक्या दिवसांनंतर सीता भेटणार या गोष्टीचा रामाला आनंदच झाला. तो बिभीषणाला म्हणाला—"बिभीषणा! सीतेला घेऊन ये!"

बिभीषणाच्या आज्ञेनें सैनिकांनीं जमलेल्या माकडांना दूर पिटाळून लावलें. रामानें बिभीषणाला विचारलें—"कां रे त्या सर्वांना पिटाळून लावीत आहेस? हे सर्व मला परके नाहींत. स्वजन आहेत. संकट ओढवल्यास, स्वयंवर, विवाह, यज्ञ आदि कार्यें असतील तेव्हां प्रजेसमोर स्त्रियांनीं येण्यास हरकत नाहीं. ही तर युद्धभूमि आहे. सीता माझ्या विरहानें दुःखी आहे. म्हणून अशा वेळीं तिला सर्वांनीं पाहल्यास त्यांत दोष नाहीं."

बिभीषण सीतेला रामासमोर घेऊन आला. परंतु राम सीतेशीं जें कांहीं बोलला तें ऐकून त्यांत प्रेमाचा गोडपणा बिभीषण-सुग्रीवादिकांस दिसून आला नाहीं. म्हणून सर्वांना वाईट वाटलें. सीता लज्जावनत मुखानें रामासमोर येऊन उभी राहाली. इतक्या लोकांसमोर तोंडावरचा पदर बाजूला



करणें सीतेला बरें वाटलें नाहीं. ती पदरा-आड रामाकडे टक लावून पहात उभी राहाली.

रामसीतेला कांहींशा कठोर आवाजांतच म्हणाला—"सीते! पराक्रमी पुरुषाला साजेल तें मी केलें. शत्रूचा बध करून तुला मी परत मिळविली आहे. शत्रूनें माझा जो अपमान केला त्या अपमानाचा दुप्पट मोबदला मी शत्रूला दिला आहे. माझी प्रतिज्ञा पुरी झाली. सुग्रीव, विभीषण आदिकांना यश मिळालें. परंतु हें सर्व मी कां केलें? तुझ्यासाठीं नाहीं. माझ्या कुळाचा व वंशाचा कलंक धुवून टाकण्यासाठीं. मला तुझ्याशीं कांहीं काम नाहीं. तूं तुला वाटेल तिकडे जायला स्वतंत्र आहेस. मी सर्व विचार करूनच हें सर्व बोलत आहें. परक्याकडे राहून आलेल्या पत्नीला कोण-ताहि स्वाभिमानी पति ग्रहण करीत नाहीं. तुझें रक्षण व पोषण करण्यास जो कोणी तयार होईल त्याच्याकडे तूं जावेंस. लक्ष्मण, भरत, वानरांचा राजा सुग्रीव किंवा राक्ष-सांचा राजा बिभीषण यांपैकीं कोणीहि तुझें रक्षण करण्यास समर्थ आहे. ज्याच्याकडे राहल्यानें तूं सुखी होशील त्याच्याकडे जाऊन तूं रहा."

पतिविरहानें इतके दिवस दुःख सहन केल्यानंतर पहिल्याच भेटींत पतीच्या तोंडून प्रेमाचा एक गोड शब्द कानीं पडण्याऐवजीं जेव्हां तीं कठोर वचनें ऐकावयास मिळालीं तेव्हां सीतेला वाटलें कीं पृथ्वी पोटांत घेईल तर किती बरें होईल. ती उभ्या उभ्या आंसवें गाळूं लागली. तरी धीर करून म्हणाली—"प्रभो! आपण वीर पुरुष आहां. एकाद्या अज्ञानी पुरुषासारखें बोलणें आप-ल्याला शोभा देत नाहीं. आपल्या मनांत जी शंका आहे तसें कांहीं घडलें नाहीं. कांहीं निकृष्ट हलक्या व दुष्ट स्त्रियांनीं स्त्रीजातीलाच कलंकित केलें आहे. परंतु आपल्याला माझ्या स्वभावाची चांगली ओळख आहे. इतक्या दिवसांच्या सहवासा-नंतर आपल्याला माझ्या स्वभावाची साक्ष पटली नाहीं तर आतां पुढें काय पटणार? मारुतीला माझ्या शोधार्थ धाडलांत त्याच वेळीं कां नाहीं सांगून पाठविलेंत कीं आपण माझा परित्याग केला आहे. मी इहलोकाचा तेव्हांच निरोप घेतला असता. आपल्याला व आपल्या सर्व मित्रमंडळींना इतके कष्ट सहन करावे लागले नसते. आपण अग्नीला साक्षी करून माझ्याशीं विवाह केला होता व इतका काळ सह-वासांत घालविला होता."

सीता येथवर बोलून लक्ष्मणाकडे वळून म्हणाली—"भाऊजी! हें सर्व ऐकल्यावर जिवंत राहण्यांत तरी काय अर्थ आहे? चिता तयार करा. पतीनें सर्वांसमक्ष ज्या स्त्रीचा त्याग केला आहे तिला याशिवाय दुसरी जागा नाहीं."

लक्ष्मणानें रामाकडे पाहिलें. सीतेनें अग्निप्रवेश केलेला रामाला अमान्य नाहीं हें ओळखून लक्ष्मणानें चिता तयार केली.



सीतेनें मान खाली करून रामाला नमस्कार केला व चितेसमोर जाऊन उभी राहाली. देव व ब्राह्मण सर्वांना भक्तिपूर्वक नमस्कार केला. नंतर अग्नीला नमस्कार करून म्हणाली—"मी रामाशिवाय इतर कोणत्याहि परपुरुषाचा विचार मनांत आणला नसेल, रामाच्या मनांतली शंका चूक असेल, मी मनसा वाचा कर्मणा रामाच्या इच्छेविरुद्ध कांहीं केलें नसेल तर जगत् साक्षी अग्नि माझें रक्षण करील." सीतेनें अग्निला तीन वेळ प्रदक्षिणा घातली व अग्निप्रवेश केला.



तें पाहून वानर व राक्षस हाहाकार करूं लागले. तो हाहाकार ऐकून रामदेखील स्वतःला आवरूं शकला नाहीं. त्याच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. तेव्हां कुबेर, यम, देवेंद्र, वरुण, शंकर, ब्रह्मदेव इत्यादिक देव विमानांतून आले. त्यांनीं हात जोडून विनंति केली—"तूं त्रिलोकाचें पालन करणारा देवाधिदेव आहेस. ज्ञानी आहेस. सीता अग्निप्रवेश करीत असतां तूं असा स्वस्थ उभा कसा?"

"मी दशरथ महाराजांचा मुलगा आहें. हा एकच विचार माझ्या मनांत आहे. मी परोपकारार्थ कां जन्म घेतला याचें कारण ब्रह्मदेवालाच माहीत." राम म्हणाला.

"तूंच साक्षात नारायण आहेस. सीता लक्ष्मी आहे. रावणाचा संहार करण्यासाठीं तूं अवतार घेतला आहेस. रावणाचा वध झाला आहे. आतां तूं वैकुंठलोकीं परत ये." ब्रह्मदेव म्हणाला.

ब्रह्मदेवानें एवढें म्हटल्याबरोबर अग्नि सीतेला उचलून चितेबाहेर आला. अग्नीनें मानव रूप धारण केल्याबरोबर चिता अदृश्य झाली.

अग्नि सीतेला रामासमोर उभी करून म्हणाला—"ही पहा, तुझी सीता. ही निष्कलंक आहे. हिच्या हातून चुकूनदेखील पापकर्म घडलें नाहीं. सीतेचें मन कधींच परपुरुषाकडे वळलें नाहीं. रावणानें तिचें मन वळविण्यासाठीं किती प्रयत्न केले? परंतु ते सर्व व्यर्थ ठरले. म्हणून तूं सीतेचा स्वीकार कर. ही माझी आज्ञा आहे."

"सीतेनें एकहि पापकर्म केलें नाहीं, हें मला माहीत आहे. परंतु जगाला विश्वास व्हावा म्हणून तिला अग्निप्रवेश करीत असतांना पाहूनदेखील मला गप्प बसावें लागलें. नाहीं तर जगानें मला कामांध म्हणून नावें ठेवलीं असतीं. सीता अग्नीहून पवित्र आहे. रावण काय करूं शकणार तिला? मी तिला ग्रहण करीत आहें."

तेव्हां शंकर रामाला म्हणाला—"रामा! स्वर्गांतून तुझे वडील विमानांत बसून आले आहेत पहा. त्यांनीं दिलेले वचन पाळलें म्हणून त्यांना इंद्रलोक मिळाला."

विमानांतून येत असलेल्या आपल्या वडिलांना पाहून रामलक्ष्मणांनीं त्यांना नमस्कार केला. दशरथानें रामालक्ष्मणांना पोटाशीं धरून आशीर्वाद दिला व म्हणाला—"तुझ्या विरहामुळें मला स्वर्गलोकांत तरी कोठें सुख मिळालें? कैकेयीचें बोलणें आज-पावेतों माझ्या हृदयाला बोचत आहे. परंतु देवांनींच राज्याभिषेक उत्सवांत विघ्न आणलें होतें हें आज मला कळलें. तुझ्याकरवीं त्यांना रावणाचा वध करवावयाचा होता. आतां तूं अयोध्येला जाऊन राज्याभिषेक करून घे. तुला भेटून तुझ्या आईला पुनर्जन्म मिळाल्यासारखें वाटेल." दशरथानें सीतेला व लक्ष्मणाला पण आशीर्वाद दिला.

दशरथ स्वर्गलोकीं निघून गेल्यावर इंद्र रामाची स्तुति करून म्हणाला—"रामा!



वाटेल तो वर मागून घे!" राम म्हणाला— "या युद्धांत जे वानर मरण पावले आहेत त्यांना जिवंत करावें." इंद्र "तथास्तु" म्हणाला. त्या बरोबर मेलेले वानर जिवंत झाले. तें दृश्य पाहून सर्व वानर व राक्षस चकित झाले. नंतर सर्व देव निघून गेले.

राम त्या दिवशीं रात्रीं आनंदानें झोपीं गेला. दुसऱ्या दिवशीं बिभीषणानें रामाकडे निरोप पाठविला कीं रामाला मंगल स्नान घालून वस्त्रालंकार भेट करण्याची इच्छा आहे.

"तें सर्व सुग्रीव आदिकांस कळव. माझ्या भावानें प्रतिज्ञ केली होती कीं चवदा वर्षें संपल्यावर मी अयोध्येस परत गेलों नाहीं तर तो अग्निप्रवेश करील. तो त्या प्रमाणें केल्याशिवाय राहणार नाहीं. अशा स्थितींत स्नान, वस्त्रालंकार इत्यादिकांचा स्वीकार करणें मला शोभत नाहीं. मला अयोध्येला परत गेलें पाहिजे." राम म्हणाला.

"रामा! मी तुला पुष्पक विमानांत बसवून एका दिवसांत अयोध्येला पोंचता करीन. कुबेर आला होता. पण मी त्याचें विमान त्याला दिलें नाहीं. तुला पोंचविण्या-साठीं मी तें ठेवून घेतलें आहे. मी तुला, सीतेला व लक्ष्मणाला जें आतिथ्य देईन तें तूं स्वीकारावें ही माझी विनंति आहे." बिभीषण म्हणाला.

"तुझी भक्ति पुरे आहे. माझें मन भरताकडे व आपल्या मातांकडे लागलें आहे. माझा वनवास संपला आहे. भरतानें इतके दिवस प्रतीक्षा केली. आतां येथें राहणें अशक्य तूं पुष्पक विमान दिलें आहेस तेंच पुरे!" राम म्हणाला.





# स्वरोचि चरित्र

वरुणा नदीच्या काठीं अरुणास्पद नामक गांवीं प्रवर नांवाचा एक निष्ठावान ब्राह्मण तरुण रहात असे. तो सर्व जग हिंडून पाहून यावें असें त्याला फार वाटे.

एकदां त्याच्या घरीं एक पाहुणा आला. तो एक मंत्रवेत्ता होता. त्याला एक औषधी द्रव्य माहीत होतें. त्याच्या सहाय्यानें एका घटकेंत कित्येक योजन दूरचा प्रवास करणें-देखील शक्य होतें. तो पाहुणा म्हणाला— "तुला जग हिंडून फिरून पहावयाचें असेल तर मी तुझ्या पायांला एक लेप लावतों." तो लेप लावल्यावर प्रवर हिमालय पर्वतांत सहजीं जाऊन पोंचला. तेथील वनश्री पहात हिंडत असतां त्याच्या पायाचा लेप वितळून गेला व त्यामुळें तो परत जाऊं शकला नाहीं. त्याच वेळीं त्याला वरूथिनी नांवाच्या एका गंधर्व स्त्रीचें वीणावादन ऐकूं आलें. प्रवर ती होती तेथें गेला. वरूथिनी त्याला पाहाल्या-पासून त्याच्यावर मुग्ध झाली होती. ती त्याला तेथेंच राहण्यास आग्रह करूं लागली. पण प्रवर म्हणाला—"मी अग्निपूजक आहें. संध्याकाळ होण्यापूर्वीं मला अग्नीची पूजा करावयाची आहे."

वरूथिनीनें त्याला तेथेंच ठेवून घेण्याचा पुष्कळ यत्न करून पाहिला. शेवटीं प्रवर अग्निहोत्राचें ध्यान करून त्याच्या अनुग्रहानें आपल्या घरीं सुखरूप येऊन पोंचला.

प्रवर तिची इच्छा पूर्ण होण्यापूर्वींच निघून गेला. म्हणून विरूथिनी दुःखी कष्टी होऊन बसली होती. त्याच वेळीं तेथें कलि नांवाचा एक गंधर्व प्रवराचें रूप घेऊन तेथें

आला. वरूथिनीला तें कळलें नाहीं व त्यालाच प्रवर समजून ती त्याच्याबरोबर राहूं लागली. पुढें वरूथिनीला त्या गंधर्वापासून एक तेजस्वी मुलगा झाला. त्याला स्वरोचि म्हणूं लागले. त्यानें धनुर्वेदाबरोबर सर्व वेदांचा अभ्यास केला व षोडश कला अवगत करून घेतल्या.

तिकडे इंदीवर नांवाच्या विद्याधर गंधर्वाला मनोरमा नांवाची मुलगी झाली. तिच्या दोन मैत्रिणी होत्या. त्यांचीं नांवें अनुक्रमें विभावरी व कलावती अशी होतीं. विभावरी मंदर नांवाच्या विद्याधर गंधर्वाची मुलगी होती. कलावती एका मुनीची कन्या होती. तो मुनी ब्रह्मचार्याश्रमांत असतांनाच त्याला पुंजकीस्थल नांवाच्या अप्सरेपासून ती कन्या झाली होती. मुलगी जन्मल्या-बरोबर तिला सोडून पुंजकीस्थल स्वर्गलोकीं निघून गेली. त्या मुलीची वाढ चंद्रकिरणें पिऊन झाली म्हणून तिनें नांव कलावती असें पडलें.

एकदां मनोरमा आपल्या मैत्रिणी विभावरी व कलावती यांच्याबरोबर कैलास पर्वतावर हिंडत असतां एका अस्थिपंजरवत देहाच्या तपस्व्याला पाहून हंसली. तपस्व्यानें तिला रागानें शाप दिला—"तुझ्या पाठीस राक्षस लागेल."

तें ऐकून तिच्या मैत्रिणी त्याला म्हणाला—"तूं तपस्वी आणि तुला एवढा राग?" तें ऐकून त्या तपस्व्याला त्यांचापण राग आला. त्यानें त्यांना "रोगी व्हाल!" म्हणून शाप दिला. लगेच त्या रोगग्रस्त व कृश झाल्या.

त्यानंतर एका राक्षसानें मनोरमेचा पाठ-लाग केला. ती घाबरून पळूं लागली. तिला स्वरोचीनें त्या स्थितींत पाहिलें. त्याला तिनें तिला व तिच्या मैत्रिणींना शाप मिळाल्याची गोष्ट सांगितली व म्हणाली—"मला अस्त्र-हृदय नांवाची विद्या अवगत आहे. ती रुद्राकडून स्वयंभूला, स्वयंभूकडून वशिष्ठाला, नंतर माझे आजोबा चित्रायुध यांना व त्यांच्यापासून माझे वडील इंदीवर यांना लग्नाच्यावेळीं व वडिलांपासून मला मिळाली. ती विद्या मी तुला शिकवून देतें. तूं त्या विद्येच्या सहाय्यानें त्या राक्षसाचा वध करून माझें रक्षण कर." तिनें सांगितल्याप्रमाणें स्वरोचीनें केलें. तो राक्षस दुसरा कोणी नसून मनोरमेचा बापच होता. ब्रह्ममित्र मुनींच्या इच्छेविरुद्ध त्यानें आड लपून बसून





सर्व आयुर्वेद शास्त्र शिकून घेतलें. आयुर्वेद विद्या शिकून घेतल्यानंतर मुनीच्या खुळेपणाबद्दल त्याला हंसूं आलें. मुनीला कारण समजल्यावर त्यांनीं त्याला "राक्षस हो !" असा शाप दिला. इंदीवरानें मुनींचे पाय धरून क्षमा मागितली तेव्हां त्यांनीं दया करून शापमोचन कसें होईल हें सांगितलें. स्वरोचीच्या हातून तुला शापमुक्ति मिळेल, असें ते म्हणाले.

इंदीवराला शापमुक्ति मिळाल्यावर त्यानें स्वखुषीनें मनोरमेचें स्वरोचीशीं लग्न करून दिलें व त्याला स्वतः शिकून घेतलेली आयुर्वेद विद्यादेखील शिकवून दिली.

लग्न झाल्यावर मनोरमेनें आपल्या दोघी मैत्रिणींना मुनीनें दिलेल्या शापाची गोष्ट सांगून त्यांना रोगमुक्त करण्यास आग्रह केला. तेव्हां स्वरोचीनें आयुर्वेद शास्त्राप्रमाणें औषध पाणी करून विभावरी व कलावती यांना रोगमुक्त केलें. मनोरमेशीं त्याचा विवाह झालाच होता. त्यानें विभावरीशीं व कलावतीशींपण लग्न करून घेतलें व सर्व सुखानें राहूं लागले. मनोरमेला विजय, विभावरीला मेरुनंद व कलावतीला दुभास नांवाचे मुलगे झाले.

एकदां तो शिकारीस गेला असतां एक वनदेवी हरिणीचें रूप घेऊन समोर आली व म्हणाली—"मी तुला प्रेम केलें आहे. मला येऊन भेट. शिकार काय करतोस?" स्वरोचीनें चकित होऊन त्या हरिणीला पोटाशीं धरलें. हरिणीच्या जागीं एक वनदेवी पाहून स्वरोचीला आश्चर्य वाटलें. ती त्याची चवथी पत्नी. तिला एक देवतुल्य मुलगा झाला. त्याचें नांव स्वरोचिषमनु असें होतें.





# ४३. कोमेडो येथील राक्षसी पाली

मानवजातीच्या जन्मापूर्वी या जगावर सरपटणाऱ्या पालीच्या जातीचे मोठे प्राणी होते. परंतु त्या जातीचा फार पूर्वीच लोप झाला. तरी त्यांचे वंशज पूर्वेकडील द्वीपांत आढळतात. कोमेडो, फ्लोरिस, रिंटजा इत्यादि द्वीपांत ते आढळतात. त्यांची लांबी १४ फुटापर्यंत असते. हा मांसाहारी प्राणी आहे. डुकरांची व हरिणांचीं पिलें हाच त्याचा आहार आहे.













# भारताचा इतिहास




अकबराच्या मरणानंतर एका आठवड्यानें आग्रा येथें सलीम हा नूरुद्दीन महंमद जहांगीर बादशाह गाजी या नांवानें गादी-वर बसला. त्या वेळीं त्याचें वय ३६ वर्षांचें होतें तो गादीवर बसल्यानंतर कांहीं दिवसांनीं त्याचा मोठा मुलगा खुश्रू यानें बापाच्या-विरुद्ध बंड केलें. खुश्रूवर त्याचा आजा अकबर व मामा मानसिंह दोघांचें फार प्रेम होतें. अकबर जिवंत असतांनाच खुश्रूचें त्याच्या बापाशीं पटत नव्हतें.

बाप गादीवर बसल्यानंतर पांच महिन्यांनीं खुश्रू आग्र्याहून पंजाबांत पळून गेला व बंडाचें निशाण उभारलें. जहांगीर आपल्या मुलाच्या समाचारास निघाला. दोघांचें युद्ध झालें व त्यांत खुश्रूचा पराभव झाला. जहांगीरनें भरल्या दरबारांत त्याच्यावर आपला राग पाखडला व त्याला कैदेची शिक्षा दिली. त्याला ज्यांनीं ज्यांनीं मदत केली होती त्यांना हालहाल करून ठार केलें. सन् १६२२ मध्यें खुश्रू तुरुंगांतील हाल सहन न झाल्यामुळें मरण पावला.

सन् १६११ च्या मे महिन्यांत जहां-गीरनें नूरजहानशीं लग्न केलें. तिचें मूळ नांव मेहरुनीसा असें होतें. सतराव्या वर्षी तिचें लग्न अलीकुलीबेग इस्तझी नांवाच्या एका इराणदेशीय रहिवाश्याशीं झालें होतें. त्यानेंच 'शेर अफगान' नांवाची पदवी व बंगालमध्यें एक जहागीर मिळविली होती.

ह्या शेर अफगाणानें दिल्लीच्या बादशाहा-विरुद्ध बंडाळी सुरू केली. जहांगीरानें कुतुबुद्दीन नांवाच्या सरदाराला एक मोठें सैन्य देऊन पाठविलें. त्या युद्धांत कुतुबुद्दीन मारला गेला. परंतु त्याच्या अनुयायांनीं शेर अफगाणाचा वध केला. मेहरुनीसा आपल्या एकुलत्या एका मुलीबरोबर जहांगिराच्या अंत:पुरांत आली. चार वर्षांनंतर ती जहां-गीराशीं लग्नाला तयार झाली व त्याची पट्टराणी झाली. जहांगीरानें तिला 'नूरजहान' म्हणजे 'जगत्ज्योति' ही पदवी देऊन तिचा आदर केला. नूरजहान खरोखरच फार सुंदर होती. त्याच बरोबर ती फार हुशार व कला प्रिय पण होती. परंतु तिला राज्याधिकाराचा मोह सर्वांत जास्त होता. तिनें आपल्या पतीला पूर्णपणें आपल्या मुठींत करून घेतलें. आपल्या बापाला व भावाला मोठमोठे हुद्दे दिले व आपल्या पहिल्या लग्नाच्या मुलीचें लग्न जहांगिराच्या सर्वांत धाकट्या मुलाशीं करून देऊन व्यव-हारांतील आपलें चातुर्य दाखविलें.

जहांगिराच्या कारकीर्दींत मोगलांना कांहीं प्रदेश आपल्या अमलाखालीं आणण्यांत चांगलें यश मिळालें. बंगाल प्रांतांत अफगाण मोगलांच्या सत्तेविरुद्ध बंडाळी करीत होते. १६१२ मध्यें उस्मानखानाच्या नायकत्वाखालीं बंडाळी करणाऱ्या अफगा-णांचा बिमोड झाला. उस्मानखानाच्या डोक्यालाच जबर जखम झाली व त्यांत तो



मरण पावला. त्यानंतर अफगाणानीं बंगाल प्रांतांत डोकेंवर काढलें नाहीं. त्याचप्रमाणें मेवाड देखील मोगलांच्या अमलाखालीं आला तो प्रथम जहांगिराच्या काळांतच.

दक्षिणेकडे मोगल सैन्य अहंमदनगराच्या सैन्याशीं बरेच दिवस युद्ध करीत होतें. हें युद्ध चालू ठेवणारा मोगल योद्धा युवराज खुर्रम होता. १६१६ मध्यें त्यानें कांहीं काळ अहंमदनगराचा किल्ला स्वाधीन केला होता. तेव्हां त्याचा बाप जहांगीर यानें त्याला शाहजहां ही पदवी बहाल केली. कोट्यवधी रुपये या मोहिमेंत खर्च झाले





होते. सहस्रावधि वीर रणांगणावर हताहत झाले. परंतु मोगल साम्राज्याची दक्षिणेकडील सीमा एक इंचभर देखील वाढली नाहीं.

नूरजहां आपला जांवई शहरयार याला गादीचा वारस करणार आहे असें समजून शाहजहाननें बापाविरुद्ध बंड केलें. परंतु १६२३ मध्यें त्याचा पराभव झाला. १६२५ मध्यें त्यानें बापाशीं संधी केली. आपला मोठा मुलगा दाराशिकोह व औरंगजेब या दोघांना राजधानीस पाठवून स्वतः आपली बायको मुमताजमहल व सर्वांत धाकटा मुलगा मुराद याच्या सह तो नाशिक येथें राहूं लागला.

शाहजहानचा पराभव होण्यास मुख्य कारण महाबतखान हा महाप्रतापी सेनापति होता. तो शौर्य व बुद्धि यांच्या बळावर यशाची पायरी चढत चालला होता. तें नूरजहानला पाहवलें नाहीं व त्याची मानखालीं व्हावी म्हणून तिनें प्रयत्न सुरू केला. म्हणून महाबतखानानें बादशहाविरुद्ध बंड केलें. जहांगीर काबूलला जात असतां महाबतखानानें त्याला कैद केलें. नूरजहान आपला बचाव करून पळून गेली. तिनें आपल्या नवऱ्याला सोडविण्याची खूप खटपट केली. पण शेवटीं ती कैदेंतच पतीला जाऊन भेटली.

महाबतखानाच्या हातावर तुरी देऊन जहांगीर व नूरजहान स्वतःची सुटका करून घेऊन पळून गेले. महाबतखान शाहजहानला शरण गेला. परंतु त्यानंतर थोड्याचदिवसांनी म्हणजे २८ ऑक्टोबर १६२७ या रोजीं जहांगीर मरण पावला. रावी नदीच्या काठीं शाहदरा येथें त्याचा सुंदर मकबरा बांधण्यांत आला.



# नेहरू चरित्र

[१३]



शेतकऱ्यांना या चळवळीमुळें आपल्या शक्तीची कल्पना येऊं लागली. किसान महासभा स्थापन झाल्या. त्यांत अनेकदां साठसत्तर हजारपर्यंत शेतकरी हजर रहात. या सभांना हजर होण्यासाठीं ते तिकिटाशिवाय प्रवास करीत कोणी तिकिट कलेक्टरनें विचारलें तर ते उत्तर देत—"आतां युग पालटलें आहे."

१९२० सालाच्या शेवटीं एक गोष्ट घडली. त्यावेळीं जवाहरलाल नेहरू कलकत्ता कांग्रेसच्या अधिवेशनासाठीं गेले होते. कांहीं आरोप लावून पोलीसांनीं कांहीं शेतकऱ्यांच्या पुढाऱ्यांना कैद केलें होतें. प्रतापगढ येथें त्यांच्यावर खटला चालणार होता. ज्यादिवशीं तो खटला सुरू होणार होता त्या दिवशीं हजारों शेतकरी जमा झाले. तुरुंगापासून कोर्टापर्यंत रस्त्याच्या दुतर्फा शेतकरी उभे होते.

मॅजिस्ट्रेट घाबरून गेला. त्यानें खटला दुसऱ्यादिवशीं चालवण्याचें ठरविलें. दुसऱ्यादिवशीं गर्दी आणखी जास्त जमली. शेवटीं शेतकऱ्यांच्या पुढाऱ्यांना सोडून द्यावें लागलें. या घटनेमुळें शेतकऱ्यांचा आत्मविश्वास वाढला. परंतु सरकारला ही गोष्ट कशी काय खपणार ?

सन् १९२१ साली जवाहरलालजी नागपुर कांग्रेसचें अधिवेशन संपल्यावर अलाहाबादला आले तेव्हां रायबरेलीहून त्यांना तार मिळाली कीं स्थिती गंभीर आहे व जवाहरलालजींनीं लगेच निघून यावें.

कांहीं शेतकऱ्यांना रायबरेलीच्या तुरुंगांत टाकण्यांत आलें होतें. प्रतापगढ येथें पुढाऱ्यांना सोडविण्यांत त्यांना जें यश

सन् १९२१ मध्यें फैजाबाद जिल्ह्यांत अत्याचाराचें एक निराळेंच रूप नजरेस आलें. कांहीं खेडुतांनीं एका तालुकेदाराच्या घरांतच लुटालूट केली. नंतर असें कळलें कीं गांधीजींनीं तशी लुटालूट करायला सांगितली आहे अशी एका जमीनदारानें त्यांना चिथावणी दिली होती. लूट चालू असतां "महात्मा गांधींचा जयजयकार" चालू होता. तें ऐकून जवाहरलालजींना मनस्वी राग आला. त्यांनीं फैजाबाद जिल्ह्यांच्या अकबराबादच्या भागांत एक सभा केली. त्या सभेला जवळपासच्या खेडेगांवांतले पांच सहा हजार तरी शेतकरी हजर होते. नेहरूंनीं त्यांना स्पष्ट शब्दांत समजावून सांगितलें कीं अशा तऱ्हेचीं कामें देशाला अपमानकारक अशीं कामें आहेत. ज्यानें कोणी या लुटालुटींत भाग घेतला असेल त्यानें मर्दासारखे पुढें येऊन आपली चूक कबूल करावी. आणि आश्चर्याची गोष्ट म्हणजे २०-२५ लोकांनीं पोलीसांच्यासमोर आपला हात वर केला. त्यांना त्या अपराधाबद्दल चांगला दंड झाला.

जवाहरलालजींना जेव्हां कळलें कीं कोणाच्या चिथावणीला बळी पडून खेडुतांनीं ती चूक केली होती तेव्हां त्यांना फार वाईट वाटलें. सरकारला फावलें या एका चुकीचें उदाहरण देऊन सरकारनें शेतकऱ्यांची चळवळ दाबून टाकायला सुरवात केली. तुरुंग भरले. एका वर्षावर खटले चालू होते. खटला संपण्यापूर्वींच कित्येक लोक तुरुंगांतच मरण पावले. कांहीं जणांना लांब मुदतीच्या शिक्षा झाल्या. जवाहरलालजी स्वतः तुरुंगांत गेले तेव्हां त्यांची त्या गरीब शेतकऱ्यांशीं भेट झाली.






[१४]

दुसऱ्या दिवशीं आयशानें एका नोकराच्या हातीं एक पत्र जगतसिंहाकडे पाठविलें—

"युवराज ! तुझ्याजवळ बोलण्याची इच्छा असूनदेखील मी बोलूं शकले नाहीं. मी भेटलें नाहीं म्हणून तुला राग आला नसावा असें मी मानतें. परंतु मला जें दुःख वाटलें तें मी कसें तरी मनांतल्या मनांत सहन केलें. तुझ्यावर माझें प्रेम होतें ही गोष्ट तूं विसरावीस ही विनंती करण्यासाठींच मी हें पत्र लिहीत आहें. तुझ्यावर प्रेम करण्याची योग्यता माझ्यांत नाहीं. तुला देण्यालायक माझ्याजवळ जें कांहीं होतें तें मी पूर्वींच तुला देऊन चुकलें आहे. मला त्याबद्दल तुझ्याकडून कांहीं मिळावें याची अपेक्षा मी ठेवली नाहीं. आनंदाच्या वेळीं तूं माझी आठवण काढलीस तर मला पुरें तूं दुःखांत असशील निदान त्यावेळीं तरी आयशाला आठवायला विसरूं नकोस.

"तूं हा प्रदेश सोडून जात आहेस. पठाणांचा स्वभाव जात्या शांत नाहीं. म्हणून कदाचित तुला या प्रदेशांत कदाचित पुन्हां यावें लागेल. तेव्हां तुझी माझी भेट होणार नाहीं. तुझें लग्न ठरलें म्हणजे मला कळव. मी स्वतः लग्नाला हजर राहीन.



तुझ्या राणीसाठीं उत्तमोत्तम वस्त्राभूषणें तयार करून ठेवीन. संधी मिळाली तर तीं वस्त्रें व आभूषणें घालून मी स्वत: तिला सजवीन. मी या जगांत आतां नाहीं हें कळल्यावर तूं या प्रदेशांत यावें अशी माझी विनंती आहे. माझ्या पेटाऱ्यांत मी तुझ्यासाठीं म्हणून ज्या ज्या वस्तू एकत्र करून ठेवल्या आहेत त्या तूं स्वीकाराव्यास, एवढी माझी हात जोडून विनंती आहे. जास्त काय लिहूं ?"

—आयशा

त्या पत्राचें उत्तर जगतसिंहानें या शब्दांत दिलें—

"आयशा, तूं स्त्री जातीला खरोखरच एक भूषण आहेस. तुझ्या पत्राचें उत्तर मी आतांच कांहीं देत नाहीं—देऊं शकत नाहीं. याबद्दल मला वाईट पण वाटतें. मला तूं विसरूं नकोस. मी जिवंत असलों तर एका वर्षानें तुला अवश्य पत्र लिहीन."

जगतसिंहानें तें उत्तर लिहून त्याच नोकराच्या हातीं पाठवून दिलें.

मोंगल व पठाण यांची संधी झाल्या-नंतर विरेंद्रसिंहाची पत्नी विमला, मुलगी तिलोत्तमा आणि त्यांच्याबरोबर असलेल्या अभिरामस्वामी व अस्मानीविषयीं कोणालाच कांहीं कळलें नाहीं. त्यांचा शोध लावण्याचा प्रयत्न मानसिंहांनीं तर केलाच, उस्मान व ख्वाजा ईसानें देखील केला. परंतु कोणालाच यश आलें नाहीं. शेवटीं मानसिंहानें मंथारण किल्ल्याच्या संरक्षणार्थ एका विश्वास-पात्र सरदाराला नेमलें आणि त्याला सांगून ठेवलें कीं यदाकदाचित विमला व तिलोत्तमा दोघी किंवा दोघीं पैकीं कोणी एक आली तर त्यांना किल्ल्याच्या किल्ल्या देऊन त्यानें निघून यावें. त्यानंतर मानसिंहांनीं आपली छावणी हलवण्याची तयारी सुरू केली.



दुसऱ्यादिवशीं सैन्य दिल्लीकडे कूच करणार होतें. जगतसिंहानें घोड्याच्या गळ्यांला बांधलेलें तें पत्र काढून वाचलें.

"धर्माचें पालन करण्यासाठीं किंवा ब्राह्मणाचा शाप लागूं नये म्हणून तरी हें पत्र मिळतांच पुन्हां येथें यावें. मी एक ब्राह्मण आहें."

तें पत्र वाचून जगतसिंहाला कांहींच उलगडा होईना. ह्यांत शत्रूचाच कांहीं डाव तर नसेल ही शंकादेखील त्याच्या मनांत आल्याशिवाय राहाली नाहीं. तरी त्यानें त्या पडक्या किल्ल्याकडे जाण्याचें ठरविलें. तो आपल्या अनुयायांना म्हणाला—मी वेळेवर पोंचलों नाहीं तर तुम्ही वाट पाहूं नका, पुढें व्हा. मी वाटेंत कोठें तरी येऊन भेटेन."

तो त्या पडक्या किल्ल्यापर्यंत येऊन पोंचला तेव्हां त्याला तेथें ती चिता व कबर जशीच्या तशी पहावयास मिळाली. परंतु चितेवर एक दु:खी ब्राह्मण बसलेला दिसला. त्यानें त्याला विचारलें—

"तुम्हीच मला बोलाविलें होतें काय ?" जगतसिंहानें त्या ब्राह्मणाला विचारलें व जवळ जाऊन तो अभिरामस्वामी असल्याचें



ओळखून म्हणाला—"तुम्हीं ? येथें असे कां बसला आहां ? असें घडलें तरी काय ?"

"काय घडलें हें तुला कळावें म्हणून तर मी तुझी वाट पहात बसलों आहें. तिलोत्तमा आपल्या शेवटच्या घटका मोजीत आहे." अभिरामस्वामी म्हणाला.

जगतसिंहाच्या डोळ्यासमोर अनेक गोष्टी शैलेश्वराच्या देवळांत तिला अगदीं प्रथम पाहाल्यापासून ते कैदेंत तिच्याशीं केलेल्या कठोर व्यवहारापर्यंत,—एका मागून एक चित्रासारख्या उभ्या राहाल्या व त्याचें हृदय प्रेमानें उचंबळून आलें.













“ विमलानें नवाबाचा खून केल्यावर मी आपली मुलगी व नात यांना बरोबर घेऊन वेष पालटून स्वतःचा व त्यांचा बचाव करीत फिरत होतों. वाटेंत तिलोत्तमा आजारी पडली. तिच्या आजाराचें कारण तुला माहीतच असेल. या आजाराचें औषध कोणा जवळ नाहीं. पांच दिवस झाले, मी येथें बसून आहें. एकदां अचानक तूं इकडे आलेला पाहून तुझ्या घोड्याच्या गळ्यांत ती चिट्ठी बांधून ठेवली. कारण मला वाटलें कीं तिलोत्तमेच्या जिवाचें कांहीं बरें वाईट झालें तर निदान शेवटच्या घटकेला तरी तुमची दोघांची भेट होईल. तेव्हां तिची तब्येत इतकी बिघडलेली नव्हती, पण आतां तिच्या जगण्याची आशा मला नाहीं. दिवा विझायला वाऱ्याची एक झुळुक पुरेल.” असें सांगून अभिरामस्वामी रडूं लागला. जगतसिंहाला पण तें सर्व ऐकून फार वाईट वाटलें.”

अभिरामस्वामी हृदय आवरून पुढें म्हणाला—“ एकदम तिच्यासमोर तूं गेलास तर त्यांत देखील तिच्या जिवाला धोका आहे. तूं आल्याची बातमी प्रथम मी तिला कळवितों. मग तूं ये.” असें सांगून तो त्या पडक्या किल्ल्यांत गेला. थोड्या वेळानें त्यानें जगतसिंहाला बोलविलें.

आंत एका खोलींत पलंगावर तिलोत्तमा डोळे मिटून पडून होती. वैधव्यामुळें दुःखी विमला तिलोत्तमेला त्या स्थितींत पाहून स्वतःच्या जिवाची पर्वा न करून तिलोत्तमेजवळ बसून हळुवारपणानें तिच्या अंगावर हात फिरवीत होती. जगतसिंह पलंगाजवळ जाऊन उभा राहाला. अभिरामस्वामी जवळ जाऊन हळूच म्हणाला—“ जगतसिंह आले आहेत, तिलोत्तमा ! तिलोत्तमेनें एकदां डोळे उघडून त्याला पाहिलें व डोळे मिटून तोंड फिरवून पडून राहाली. तिच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहात होत्या. तें पाहून जगतसिंह तिच्या पायगती बसला. त्याच्या डोळ्यांतूनपण अश्रुधारा वहात होत्या.

कित्येक दिवस जगतसिंहानें तिची सेवा शुश्रूषा केली. सैन्य कोठंवर गेलें, छावणी काढून सर्व पाटण्यापर्यंत पोंचले कीं नाहीं, कोणी त्याची वाट तर पहात नसेल, या सर्व गोष्टींची फिकीर त्याला नव्हती. जवळजवळ वाळून गेलेल्या वेलीला आपल्या आंसवांचे पाणी घालून पुन्हां पालवी फुटते का हें पाहण्यासाठीं तो अहोरात्र जागत होता. तिच्या आजाराला एक प्रेमच काय तें औषध होतें. त्या औषधाचा फायदापण झाला व तिची तब्येत बरीच सुधारली. आतां ती पलंगावर उठून बसू लागली. विमला नसेल त्यावेळीं दोघें परस्परांशीं मोकळेपणांनीं बोलूं शकलीं. पाळीपाळीनें दोघांनीं चुकीची माफी मागितली.

एक दिवशीं संध्याकाळीं अभिरामस्वामी पुस्तक वाचीत बसला असतां जगतसिंह त्याच्याजवळ येऊन उभा राहाला. म्हणाला—“ मला वाटतें, आतां तिलोत्तमेला प्रवास करायला हरकत नाहीं. आतां या पडक्या





किल्ल्यांत पडून राहण्याचें काय कारण?" अभिरामस्वामी पुस्तक बंद करून उठून उभा राहाला व त्यानें जगतसिंहाला पितृवात्सल्यानें पोटाशीं धरलें. नंतर अभिरामस्वामीबरोबर जगतसिंह व इतर सर्व मंदारणाच्या किल्ल्यांत गेले. तेथें जगतसिंह व तिलोत्तमेचा विवाह समारंभ थाटामाटानें पार पडला. लग्नासाठीं जगतसिंहाचे नातेवाईक व मित्रमंडळी आली होती. तिलोत्तमेची सर्व नातेवाईक मंडळी-पण लग्नाला हजर होती.

आयशानें लग्नाला अवश्य बोलावणें पाठवावें असें कळविलेंच होतें. त्याप्रमाणें जगतसिंहानें तिला बोलावणें पाठविलें होतें व ती आपल्या भावाबरोबर आली पण होती. ती अंतःपुरांतच होती. मनांतल्या मनांत तिला काय होत असेल हें तिचें तिलाच ठाऊक. परंतु वरकरणीं फार आनंद झाल्याचें तिनें दर्शविलें. तें पाहून सर्वांना आनंद झाला.

विवाहानंतर आयशा विमलेचा निरोप घ्यायला गेली तेव्हां तिनें विचारलें—"नवाबनंदिनी! आपल्या लग्नाचें बोलावणें पाठवशील ना मला?" तिला जगत-सिंहावर आयशाचें प्रेम होतें ही गोष्ट माहीत नव्हती.

आयशानें कांहींच उत्तर दिलें नाहीं. ती तिलोत्तमेचा हात आपल्या हातांत घेऊन म्हणाली—"ताई! मी येतें बरें का! तूं खरी भाग्यवती आहेस. अल्ला तुला आयुष्यभर सुखी ठेवो."

"पुन्हां आपली भेट केव्हां?" तिलोत्तमेनें विचारलें.

"आपली भेट, पुन्हां? त्या परमेश्वरा-लाच ठाऊक. पण आपल्या या मोठ्या बहिणीला विसरूं नकोस हं!" आयशा हुंदका आवरून म्हणाली.



"काय म्हणतेस हें? अग तुला मी विसरलें तर युवराज माफ करतील का मला?" तिलोत्तमा स्मित करून म्हणाली.

"हें नाहीं आवडलें मला. युवराजांसमोर माझें नांव कधीं तूं काढलेंस तर माझ्या गळ्याची शपथ. दे वचन कीं कधीं नाहीं काढणार!" आयशा म्हणाली. कारण तिला माहीत होतें कीं तिची आठवण झाल्यास युवराजांचें मन खात्रीनें दुःखी होईल.

तिलोत्तमेनें मान हलवून तिला वचन दिलें.

परंतु तूं मला विसरतां कामा नये बरें का. मी माझी आठवण म्हणून जें कांहीं देईन तें जपून ठेव. असें सांगून आयशानें दासीला बोलावून एक हस्तीदंती करंडक मागविला. त्यांत कंठहार व आभूषणें होतीं. तिलोत्तमानें तीं सर्व तिलोत्तमेला घातलीं. तिलोत्तमा स्वतः श्रीमंतींत वाढलेली होती. परंतु इतकीं सुंदर रत्न भूषणें तिनेंदेखील पूर्वीं पाहिलीं नव्हतीं. तीं सर्व आभूषणें आयशाला तिच्या बापाकडून मिळालीं होतीं. परंतु तिनें तीं मोडून पुन्हां तिलोत्तमेसाठीं आपल्या आवडीप्रमाणें पुन्हां घडविलीं होतीं.

तिलोत्तमा सर्व रत्नांची प्रशंसा करूं लागलेली पाहून ती म्हणाली—"कशाला



एवढी स्तुती? तुझ्या हृदयांत एक रत्न आहे त्याच्यासमोर हीं सर्व फिकीं पडतील." हें बोलत असतां तिच्या नकळत तिच्या डोळ्यांतून दोन टिपें गळलीं. चटकन तिनें तीं पुसून टाकलीं. पण तिला कोणत्या गोष्टीबद्दल वाईट वाटलें, हें तिलोत्तमेला कळलें नाहीं.

आयशानें तिलोत्तमेचे दोन्ही हात आपल्या हातांत घेत डोळे भरून तिचें रूप पाहिलें व मनांतल्या मनांत म्हणाली—"हें रूप पाहाल्यावर माझ्या प्राणेश्वरांना कसलें दुःख होणार?" नंतर ती तिलोत्तमेला












म्हणाली—"बरें तर मी येतें. युवराजांना भेटायला जाऊन त्यांचा वेळ फुकट घालविण्याची माझी इच्छा नाहीं. तूं स्वतःला सुखी कर व आपल्या पतीला सुखी ठेव. मी दिलेले दागिने नेहमीं घाल, परंतु आपल्या हृदयांतला दागिना नेहमीं स्वच्छ व पवित्र राख."

हें बोलत असतां आयशानें हुंदका दाबल्याचें तिलोत्तमेच्या लक्षांत आल्याशिवाय राहालें नाहीं. तिनें विचारलें देखील—"पण अक्का! तूं अशी दुःखी कां?" तें ऐकून आयशाच्या डोळ्यांतून घळघळां अश्रुधारा वाहूं लागल्या. पण एक क्षणभर देखील जास्त न थांबतां ती पालखींत जाऊन बसली.

आयशा घरीं पोंचली तेव्हां जास्त रात्र उरली नव्हती. कपडे बदलून ती खिडकीसमोर येऊन उभी राहाली. आकाशांत तारे चमकत होते. खालीं खंदकाच्या पाण्यांत आकाशाची पडछाया छान दिसत होती. खिडकींत बसून ती काय विचार करीत होती हें सांगणें कठीण आहे. तिनें बोटांतून एक अंगठी काढली. त्यांत विष होतें, जालिम विष होतें. "हें विष प्याल्यानें माझी तहान कायमची भागेल." तिच्या मनांत एक विचार आला. लगेच दुसरा विचार आला—"एवढ्याचसाठीं का देवानें मला हा देह दिला. हा थोडासा कष्ट सहन करण्याची शक्ति माझ्या अंगांत नसेल तर हा स्त्रीजन्म फुकट. जगतसिंहाला ही गोष्ट कळली तर त्यांच्या हृदयाची दशा काय होईल?" आयशानें ती अंगठी खंदकांत फेंकून दिली. [संपूर्ण]

[पुढील अंकीं नवीन गोष्ट]





# निरर्थक त्याग

विक्रमार्कानें आपला हट्ट सोडला नाहीं व पुन्हां झाडाजवळ जाऊन प्रेत खांद्यावर काढून घेतलें व नेहमींप्रमाणें मौनपणें स्मशानाकडे निघाला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा! तुझा हा हट्ट अगदीं असामान्य असाच आहे. परंतु तूं विनीतमतीसारखा निरर्थक त्याग करून तूं त्याच्यासारखा कदाचित सर्वस्व घालवून बसशील असें मला वाटत आहे. तुला कंटाळा येऊं नये म्हणून मी त्याची गोष्ट सांगतों. लक्षपूर्वक ऐक." असें सांगून तो गोष्ट सांगूं लागला.

प्राचीन काळीं अहिच्छत्रपुर नांवाच्या गांवीं उदयतुंग नांवाच्या राजाकडे कमलमित्र नांवाचा एक प्रतिहारी रहात असे. त्याच्या सर्व गुणसंपन्न मुलाचें नांव विनीतमति असें होतें.



एके दिवशीं दुधासारखें स्वच्छ चांदणें पडलें होतें. गच्चीवर हिंडत असतां सहज त्याच्या मनांत आलें कीं इतकें स्वच्छ चांदणें पडलें आहे तेव्हां येथें पडून राहण्यापेक्षां वनश्री पहावयास जावें. म्हणून तो धनुष्यबाण घेऊन रानांत निघाला. थोडें अंतर चालून गेल्यावर त्याला एका झाडाखालीं रडत बसलेली एक मुलगी दिसली.

"कोण ग तूं? आणि अशी रडत कां आहेस?" त्यानें तिला विचारलें.

ती म्हणाली—"मी गंधमाली नांवाच्या नागराजाची कन्या आहें. माझें नांव विजयवती. कालजिह्व नांवाच्या यक्षानें माझ्या वडिलांचा युद्धांत पराभव करून त्यांना आपला दास करून घेतलें. तें असह्य झाल्यानें मी गौरीची पूजा करून तिला प्रसन्न करून घेतलें. देवीनें मला एक दिव्य खड्ग व एक पांढरा घोडा दिला व तुला द्यायला सांगून तुझ्याकरवीं कालजिह्वाला जिंकणें शक्य आहे व या दिव्य खड्गाच्या साहाय्यानें तुला राज्य संपादन करतां येईल असेंदेखील देवीनें सांगितलें आहे. या वेळीं तुला रानांत आलेला पाहून तुझें लक्ष आपल्याकडे आकर्षित करून घेण्यासाठींच मी रडत होतें. तूं मला एवढी मदत केलीस तर मी तुझे उपकार जन्मोजन्मीं विसरणार नाहीं."

विनीतमतीनें ती जबाबदारी स्वतःवर घेण्याचें कबूल केलें. विजयवती कोठें तरी गेली व एका क्षणार्धांत एक शुभ्र पांढरा घोडा व दिव्य खड्ग घेऊन आली. विनीतमतीनें तें दिव्य खड्ग घेतलें, घोड्यावर बसला व विजयवतीला पण त्याच घोड्यावर बसवून घेऊन तो यक्ष रहात असे त्या मानससरोवराकडे निघाला. तो घोडा पापणीदेखील लवली नसेल एवढ्या वेळांत मानससरोवरावर येऊन पोंचला.



यक्ष चक्रवाकाचें रूप घेऊन मानससरोवरावर विहार करीत होते. विजयवतीचा बाप गंधमाली त्यांची सेवा करीत होता. विनीतमतीनें तलवार घेऊन यक्षांवर हल्ला केला. तेव्हां कालजिह्वनें एक भयंकर रूप धारण केलें व विनीतमतीशीं युद्धाला सज्ज झाला. परंतु विनीतमती त्याचे केस धरून तलवारीनें त्याचा वध करूं लागला तेव्हां तो त्याच्याजवळ प्राणभिक्षा मागूं लागला. गंधमालीला दास्यमुक्ति मिळाली आणि तो विनीतमती व आपली मुलगी विजयवती यांच्या बरोबर स्वदेशीं परतला.

विनीतमतीला एक दिव्य खड्ग व अश्व यांच्याबरोबर एक कन्या पण मिळाली. हें पाहून त्याचे वडील कमलमित्र व राजा उदयतुंग यांना फार आनंद झाला.

उदयतुंग याला उदयवती नांवाची एक मुलगी होती. षड्शास्त्र व शोडष कला यांत तिनें प्रविण्य संपादन केलें होतें. राजानें जाहीर केलें होतें कीं ब्राह्मण किंवा क्षत्रिय कुळांत जन्मलेला जो कोणी राजकन्येला शास्त्रार्थ करून जिंकेल त्याच्याशीं तिचें लग्न करून देण्यांत येईल. विनीतमतीच्या वडिलांनीं आपल्या मुलाला





उदयवतीशीं शास्त्रार्थ करून तिला जिंकावें असें सुचविलें. परंतु एका स्त्रीशीं शास्त्रार्थ करून तिला जिंकणें त्याला थोडें विचित्र वाटलें.

कमलमित्र राजाकडे गेला व म्हणाला—"महाराज! माझा मुलगा राजकन्येशीं शास्त्रार्थ करण्यास तयार आहे. तरी त्या-साठीं जरूर ती तयारी करावी. राजा त्या गोष्टीस कबूल झाला. दुसऱ्या दिवशीं विद्वत्-सभा भरली. राजकन्येनें जें जें प्रमेय मांडलें त्या प्रत्येकाचें विनीतमतीनें खंडन केलें. शेवटीं तिनें आपला पराभव स्वीकार करून विनीतमतीला पती म्हणून स्वीकारलें. उदय-तुंगनें थाटामाटानें दोघांचें लग्न करून दिलें.

उदयतुंग वृद्धच होता. त्याला मुलगा नव्हता. म्हणून जांवयालाच राज्य देऊन त्यानें वानप्रस्थाश्रम घेतला व गंगेकाठीं आश्रम स्थापन करून त्यांत राहूं लागला. विनीतमती आपल्या दोघां राण्यांसह राज्य करूं लागला.

कांहीं दिवसांनीं इंद्रकलश नांवाचा एक राजकुमार उत्तरेकडून विनीतमतीच्या भेटीस आला. विनीतमतीनें त्याचें सर्व प्रकारें आतिथ्य करून येण्याचें कारण विचारलें.

तो म्हणाला—"आपण कल्पवृक्षासारखे कोणी कांहीं मागितलें तर तें देऊन त्याची इच्छापूर्ण करतां असें मी ऐकतों. माझ्या-वडिलांनीं दिलेल्या राज्यावर मी राज्य करीत असतां माझा धाकटा भाऊ कनककलश यानें माझ्या राज्यावर स्वारी केली व माझें सिंहासन बळकावून बसला आहे. आपण आपलें खड्ग व अश्व मला कृपा करून दिल्यास मी आपलें राज्य परत मिळवीन."

विनीतमतीनें लगेच तो दिव्य अश्व व तें खड्ग इंद्रकलशाला दिलें. इंद्रकलशनें त्यांच्या साहाय्यानें आपलें राज्य परत



मिळविलें. कनककलश आपल्या भावाकडून पराभव झाल्यावर रडत अहिच्छत्रपूरला आला. विनीतमतीच्या राजवाड्यासमोर चिता पेटवून त्यांत उडी मारून आत्महत्येस तयार झाला. तेव्हां विनीतमति त्याच्याजवळ येऊन त्याला म्हणाला—"अशी आत्महत्या कां करून घेतोस? तुला राज्यच पाहिजे ना? माझें राज्य घे! मला मूलबाळ नाहीं. मी तुलाच आपला मुलगा समजून तुला हें राज्य देतों." त्याप्रमाणें त्यानें आपलें राज्य कनक-कलश याला देऊन टाकलें आणि आपल्या दोघी राण्यांसह त्यानें वनवास ग्रहण केला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"राजा! मला एका गोष्टीची शंका आहे. विनीतमतीच्या या विचित्रपणाचा अर्थ काय? तो स्वतः राजा होता. त्यानें एक अपरिचित व्यक्तीला तें दिव्य खड्ग व अश्व कां दिलें व पुढें कनककलश आत्महत्येला तयार झाला तेव्हां त्याला स्वतःचें राज्य कां देऊन टाकलें? विनीतमतीच्या वाड्यासमोर चिता रचून आत्महत्येचा विचार कनककलश यानें कां केला? तूं या शंकांचें समाधानकारक उत्तर माहीत असून दिलें नाहींस तर त्याचा परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याचीं



शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळूं लागतील."

त्यावर विक्रमार्क म्हणाला—"विनीतमतीनें केलें त्यांत गैर असें कांहींच नव्हतें. त्याच्या मनांत राज्याचा मोह कधींच उत्पन्न झाला नाहीं. ज्या कामासाठीं विजयवतीनें त्याला तें खड्ग व अश्व दिले होते तें काम पुरें करण्यासाठींच त्यानें त्यांचा उपयोग केला. राजाला मूल नव्हतें व राजकन्येला शास्त्रार्थ करून जिंकणें त्याला कठीण नव्हतें. तरी स्वतः होऊन शास्त्रार्थ करण्याचा विचार त्याच्या मनांत आला नाहीं. बापाच्या आग्रहानेंच तो शास्त्रार्थ करण्यास कबूल झाला. राजा झाल्यावर आपलें राज्य वाढविण्याचा विचार-देखील त्याच्या मनांत कधीं आला नाहीं. या सर्व गोष्टींवरून त्याच्या मनांत राज्याचा मोह नव्हता हें स्पष्ट होतें. म्हणून त्यानें इंद्रकलश याला खड्ग व अश्व दोन्ही देऊन टाकले यांत नवल काय? विनीतमतीनें केलेल्या साहाय्यामुळेंच भावाच्या हातून आपला पराभव झाला असें कनककलश याला वाटलें तर त्यांत तरी नवल काय? विनीतमतीनें स्वतः स्वारी करून त्याला जिंकलें असतें तर कनककलशला एवढें वाईट वाटलें नसतें. तिऱ्हाइताची मदत घेऊन भावानें त्याचा पराभव केलेला कनककलशला खपला नाहीं. कनककलशच्या आत्महत्येला मूळ कारण आपण आहों हें विनीतमतीला माहीत होतें. म्हणून त्यानें स्वतःचें राज्य देऊन कनककलशची राज्य मिळविण्याची इच्छा पुरी केली."

अशा प्रकारें राजाचें मौन भंग होतांच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला व पुन्हां झाडाच्या फांदीला धरून लोंबकळूं लागला.

[ कल्पित ]






जगत्सेन नांवाच्या राजाला धनंजय नांवाचा मुलगा होता. त्यानें गुरुगृहीं सर्व विद्या शिकून घेतल्या. पण धनुर्विद्येंत त्यानें विशेष प्राविण्य संपादन केलें होतें. तो मोठा झाल्यावर त्याच्या वडिलांनीं त्याला युवराज-पद देण्याचें ठरवून त्यासाठीं एक समारंभ करण्याचें ठरविलें. परंतु धनंजयाला कांहीं काळ स्वतंत्रपणें राहून जगाचा प्रवास करण्याची इच्छा होती. आईवडिलांना ती गोष्ट आवडली नाहीं. कारण तो त्यांचा एकुलता एक मुलगा होता. म्हणून धनंजय कोणाला कळविल्याशिवाय परदेशीं निघून गेला. आईवडिलांनीं मुलाचा पुष्कळ शोध केला. परंतु त्यांना त्यांत यश आलें नाहीं. मुलाचा विरह असह्य झाल्यानें रात्रंदिवस रडून राणी आंधळी झाली. आतां धनंजय परत येणें अशक्य असें वाटून सर्व निराश झाले.

राजानें आपल्या आंधळ्या राणीला टाकलें व दुसरें लग्न करून घेतलें. त्यानें मोठ्या राणीसाठीं रानांत एक वाडा बांधून त्यांत तिला ठेवलें. पुढें कांहीं दिवसांनीं धाकट्या राणीला एक मुलगा झाला. राजाला अपत्यप्रेम पुन्हां लाभलें व तो त्या आनंदांत मोठ्या मुलाला पार विसरून गेला.

धाकट्या राणीच्या मुलाला पांचवें वर्ष लागलें. तेव्हां धनंजय स्वदेशीं परत आला. त्यानें भ्रमण करीत असतां अनेक देश जिंकले व कीर्ति संपादन केली. स्वदेशीं परत येण्यापूर्वीं त्यानें राजाला कळविलें नव्हतें. परंतु प्रजेच्या तोंडीं राजाला कळलें कीं कोणीतरी शूर सेनापति देश जिंकीत



त्याच्या राज्यावर स्वारी करण्यासाठीं आला आहे व त्यानें राजधानीबाहेर तळ दिला आहे.

ती बातमी ऐकून राजा घाबरून गेला. त्यानें आपल्या मंत्र्याला धनंजयाकडे पाठविलें. मंत्र्यानें युवराजाला ओळखलें नाहीं. तो त्याला म्हणाला—“महाराज! आपणांशीं युद्ध करण्याची आमच्या महाराजांची इच्छा नाहीं. दोन हजार सुवर्ण मुद्रा स्वीकार करून आपण आमच्या राजधानीवर स्वारी करण्याचा विचार सोडावा अशी आमच्या महाराजांची आपणांजवळ विनंती आहे.”

धनंजय स्मित करून म्हणाला—“मी किल्ल्यांत प्रवेश करणार आहें. मी या देशाचा युवराज आहें. मला कोण अडविणार? मंत्री!”

युवराजाला ओळखून मंत्री लज्जित झाला. त्यानें युवराज निघून गेल्यानंतर घडलेलें सर्व वृत्त वर्णन केलें व म्हणाला—“मोठ्या राणी सरकार रानांत एका वाड्यांत रहात आहेत. पुत्रविरहानें रडत राहल्यानें त्यांचे डोळे गेले.” तें ऐकून धनंजयाला फार वाईट वाटलें व तो राजधानीत न जातां आपल्या आईला भेटण्यासाठीं रानांत गेला. मुलाचा आवाज ओळखून मातेच्या डोळ्यांतून आनंदाश्रू वाहूं लागले व तिला पुन्हां छान दिसूं लागलें.

तिकडे मंत्र्यानें धनंजय परत आल्याची गोष्ट राजाला जाऊन सांगितली. धनंजय घरीं न येतां सरळ रानांत आपल्या आईला भेटण्यासाठीं गेल्याचें ऐकून राजाला काय करावें हें सुचेना. तरी राजानें आपल्या मुलाकडे निरोप पाठवून त्याला राजधानींत बोलावलें. पण धनंजयनें उलट उत्तर पाठविलें कीं आई रानांत असतां मी राजधानींत येणें अशक्य. तरमग आईबरोबर यावें असें राजानें कळविलें. परंतु राणीनें नकार दिला.

धनंजय आईची परवानगी घेऊन एकदां आपले वडील जगत्सेन यांच्या भेटीसाठीं राजधानीस आला. युवराज येत असल्याची बातमी ऐकून प्रजेला अपरंपार आनंद झाला. जागोजागीं तोरणें बांधण्यांत आलीं. रस्त्याच्या दोन्ही बाजूला युवराजांच्या दर्शनासाठीं प्रजेची गर्दी होती. युवराजानें दरबारांत प्रवेश करतांच दरबाऱ्यांनीं लवून मुजरा केला व राजा आपल्या डोक्यावरचा मुकुट काढून मुलाच्या डोक्यावर ठेवीत म्हणाला—“युवराज! आज पासून तूंच या देशाचा राजा!”

त्यानंतर धनंजय आपल्या सावत्र आईला भेटण्यासाठीं तिच्या महालांत गेला. ज्या महालांत पूर्वी त्याची आई रहात होती त्याच महालांत ती राहाते हें त्याला राजाकडून कळलें. धनंजय त्या महालाकडे जात असतां त्याला वाटेंत एक मुलगा धनुष्यबाण घेऊन खेळत असलेला दिसला. त्याच्या हातांत चार बाण होते.

धनंजय त्या मुलाच्या हातांतले बाण घेऊन त्याला म्हणाला—“बाळ! दे तुझें धनुष्य. तुला मी दाखवितों कसा बाण



मारतात तो.” असें सांगून धनंजयनें चार बाण चार दिशेला सोडले.

तें पाहून मुलगा आपले बाण परत मागूं लागला. परंतु धनंजयनें तर ते सोडले होते. मुलगा रडूं लागला. तेव्हां त्याची आई धांवत बाहेर आली व त्याला उगा करीत विचारूं लागली—“बाळा काय झालें रडायला?”

मुलगा धनंजयकडे बोट दाखवून म्हणाला—“हा पहा, कोण आला आहे तो. यानें माझे बाण सोडले आणि आतां मला ते परत पाहिजेत.”



तेव्हां छोटी राणी म्हणाली—" फुटक्या नशिबाचा तूं आणि मी. आतां कोण विचारणार आपल्याला ?"

धनंजयनें ज्या ज्या दिशेला बाण सोडले होते त्या दिशेला बाण शोधून आणण्या-साठीं नोकर धांवले. दूरवर शोध केला तरी ते बाण त्यांना सांपडले नाहींत.

धाकट्या राणीच्या महालांत चालू असलेली गडबड राजाच्या कानावर गेली व त्यानें येऊन कारण विचारलें. तेव्हां ती म्हणाली—" वडील मुलानें आपल्या धाकट्या भावाच्या हातांतले बाण घेऊन दूर फेंकून दिले. म्हणून मुलगा रडतो आहे."

" मोठा मुलगा तरी तुझाच असें नको का मानायला ? तोच युवराज आहे. ते चार बाण मूळ त्याचेच." राजा म्हणाला.

" कळलें मला सर्व, तुम्ही व तुमचा मुलगा दोघे एक होऊन आतां माझ्या मुलाचा जीव घ्यायला तयार झालेले दिसतां."

" मी तुला दुसरे बाण करून देतों." धनंजयनें आपल्या धाकट्या भावाची समजूत घालण्याचा यत्न करून पाहिला. त्याप्रमाणें त्यानें नवे बाण करून देण्यास नोकरांना सांगितलेंदेखील. नंतर तो वडिलांचा निरोप घेऊन आपल्या आईकडे परत आला.

धनंजय परत आल्यापासून धाकट्या राणीचा अधिकार कमी झाला व तिच्या मुलाचें कोडकौतुक पण कमी होऊं लागलें. धनंजय तिच्या डोळ्यांत सलूं लागला व तिनें त्याचा कांटा दूर करण्यासाठीं उपाय सुरू केले. तिनें राजवैद्यांना बोलावून त्यांना बक्षिसाचा लोभ दाखविला व औषधांत विष कालवून मोठ्या मुलाला द्यायला सांगितलें.

राजवैद्य म्हणाले—" जो आजारी नाहीं त्याला औषध देण्याचा काय अर्थ ? पण आपण स्वतः आजारी पडल्याचें सोंग केल्यास आपल्यासाठीं औषध आणण्याचें काम युवराजाला देऊन त्यांचा कांटा दूर होणें शक्य आहे." वैद्यांच्या सल्ल्याप्रमाणें धाकटी राणी आजारी पडली व डोकें-दुखीचें सोंग करून कण्हूं लागली व रडूं लागली. राजानें इलाज करण्यासाठीं राज-वैद्यांना बोलाविलें.

वैद्य राणीची नाडी पाहून म्हणाले— " महाराज ! हा एक तऱ्हेचा शिरोवायु आहे. वायूचा प्रकोप झाल्यानें डोकेदुखी होते. याला औषध म्हणजे खऱ्या हिऱ्यांचें भस्म ! खरे हिरे फक्त रत्नद्वीपांत मिळतात. कोणी जाऊन आणले तर त्यांचें भस्म काढून राणी सरकारांना देतां येईल."

राजा धनंजयला म्हणाला—" रत्नद्वीपांत जाऊन तुला तेथील हिरे आणतां आले तर पहा. नाहींतर मी जातों."

" तुम्ही कशाला ? मी जाऊन घेऊन येतों." धनंजय निघाला. रत्नद्वीप दक्षिणेकडे समुद्रांत एक द्वीप होतें. तेथें पोपटांच्या जातीच्या राजाचें राज्य होतें. धनंजय रत्न-द्वीपाच्या राजधानींत पोंचला तेव्हां त्याच्या ध्वजस्तंभांत एक बाण दिसला. धनंजयानें



" ये !" म्हणतांच बाण ध्वजस्तंभांतून निघून सरळ त्याच्या हातांत आला. तें पाहून ध्वजस्तंभाच्या रक्षणार्थ उभे असलेले सैनिक चकित झाले व धनंजयाला बोलावून आपल्या राजाकडे घेऊन गेले. राजानें धनंजयला त्याचें नांव गांव विचारलें.

" आमचा देश येथून सुमारें शंभर कोसावर उत्तरेकडे आहे. माझें नांव धनंजय."

बाणावर त्याचें नांव वाचून राजाला त्याच्या बोलण्यावर विश्वास बसला. शंभर कोसावरचें लक्ष वेधणारा आपल्याला जांवई मिळाला तर आपली मुलगी सुखी होईल असा विचार-



करून राजानें त्याच्याशीं आपल्या मुलीचें लग्न करून दिलें.

लग्न झाल्यावर धनंजयनें आपल्या बायकोला रत्नद्वीपांत येण्याचें खरें कारण सांगितलें. "हिरे या द्वीपाच्या एका डोंगरांत सांपडतात. आमचे पोपट नोकर ते घेऊन येतात. मी तुम्हांला पाहिजे तितके हिरे आणवून देतें." असें सांगून पोपटराजाच्या राजकन्येनें एक पोतें भरून हिरे आणवून दिले. धनंजय ते हिरे घेऊन सपत्नीक स्वदेशीं आला.

अशातऱ्हेनें धाकट्या राणीची ती युक्ति फुकट गेली. कांहीं दिवसांनंतर तिनें पुन्हां डोकेदुखीचें सोंग केलें. वैद्यांनीं येऊन नाडी पाहून वायूचा प्रकोप पुन्हां झाला असल्याचें सांगितलें व म्हणाले—"हिऱ्याच्या भस्मानें रोग कांहीं काळ बरा झाला. परंतु पुरा बरा झाला नाहीं. तेव्हां या रोगाला एकच एक औषध म्हणजे राक्षस रेशमाचें भस्म. तें रेशम पूर्वेकडील द्वीपांत मिळतें."

धनंजय राक्षस रेशम आणण्यासाठीं निघाला. त्या द्वीपाच्या ध्वजस्तंभांत देखील एक बाण रुतलेला होता. त्यानें बोलवतांच बाण त्याच्या हातांत आला. पाहाण्यासाठीं उभे असलेल्या सैनिकांनीं तें स्वतःच्या डोळ्यांनीं पाहून आपल्या राजाला त्याची वर्दी दिली. राजानें त्याला बोलावून त्याचें नांव गांव विचारलें. त्या बाणावर धनंजयाचें नांव होतें. राक्षस द्वीपाच्या राजानें धनंजयाचा तो पराक्रम पाहून त्याच्याशीं आपल्या मुलीचें लग्न करून दिलें. लग्न झाल्यावर धनंजयनें आपल्या बायकोला त्या द्वीपांत येण्याचें खरें कारण सांगितलें.

"माझ्याकडे कांहीं राक्षस नोकर आहेत. त्यांना मी जीवद्वीपांत पाठवीन. त्या द्वीपांतच तुम्हांला हवें असलेलें रेशम मिळतें. तुम्हांला किती हवें आहे तें सांगा. मी रेशम घेऊन यायला त्यांना पाठवितें." राजाची मुलगी म्हणाली.

धनंजयानें दहा पोतीं राक्षस रेशम मागवून घेतलें व सपत्नीक स्वदेशीं आला. त्याच्याबरोबर कांहीं राक्षस दास पण आले. त्या राक्षसांना पाहतांच धाकट्या राणीची डोकेंदुखी बंद झाली. वैद्यांनीं तें राक्षस रेशम जाळून त्याचें भस्म तयार केलें व राणीला दिलें.

आणखी कांहीं दिवसांनीं पुन्हां राणीचें डोकें दुखूं लागलें. वैद्यांनीं राणीची नाडी पाहून या खेपेस आणखी एक औषध सांगितलें. म्हणाले—"राक्षस रेशमानें रोग पुष्कळ बरा झाला असला तरी पुरा बरा झाला नाहीं. वाघिणीचें दूध मिळाल्यास डोकेदुखी कायमची बरी होईल."

वाघिणीचें दूध आणण्यासाठीं धनंजय उत्तरेकडे निघाला. तेथें व्याघ्रराजाचें राज्य होतें. त्या देशांत व्यालेल्या वाघिणी पुष्कळ होत्या. त्यांचें दूध काढणें म्हणजे थट्टा नव्हे. तरी धनंजय व्याघ्रराजाच्या राज्यांत गेला. तो व्याघ्रराजाच्या राजधानींत पोंचला तेव्हां ध्वजस्तंभाला रुतलेला एक बाण त्याला दिसला. त्यानें बोलवल्याबरोबर बाण त्याच्या हातांत आला.



व्याघ्रराजानें त्याला बोलावून चवकशी केली तेव्हां बाणावर त्याचेंच नांव पाहून त्यानें आपल्या मुलीचें त्याच्याशीं लग्न करून दिलें. लग्न झाल्यावर धनंजयनें व्याघ्रराजाच्या देशांत येण्याचें खरें कारण सांगितलें.

"माझ्याकडे कित्येक वाघ नोकरीला आहेत. त्यांत कांहीं वाघिणीपण आहेत. कांहीं नुकत्याच व्यालेल्या आहेत त्यांचें दूध काढवून मी तुम्हांला देईन. परंतु वाटेंत दूध नासेल म्हणून पन्नास वाघिणींना घेऊन आपण जाऊं या. वाटेल तितकें दूध मिळेल."



त्याप्रमाणें धनंजय सपत्नीक पन्नास वाघिणींना घेऊन स्वदेशीं परतला. त्या वाघिणींना पाहून लोक घाबरून गेले. धाकटी राणी इतकी घाबरून गेली कीं मरतां मरतां वाचली. वाघिणींचें दूध तिला देण्यांत आलें. वैद्यांनीं राणीचा रोग बरा झाला असल्याचें सांगितलें.

धाकट्या राणीनें वैद्यांना बोलावून विचारलें—"आतां काय करायचें? धनंजय मृत्यूच्या तोंडांतून तीनदां वांचून आला. त्याला अशक्य असें कांहीं तरी काम सांगाल कीं नाहीं? तें काम त्याला करतां आलें नाहीं तर राजा त्याच्यावर रागावेल."

वैद्य म्हणाले—"राणी सरकारांनीं पुन्हां डोकें दुखत असल्याचें सोंग करावें. महाराजांना जें सांगावयाचें तें आम्ही पाहून घेऊं." त्याप्रमाणें राणीनें पुन्हां डोकेदुखीचें सोंग केलें.

राजानें पुन्हां वैद्यांना बोलावून औषधोपचार करायला सांगितलें. "तुम्ही तीनदां तीन प्रकारचीं औषधें सांगितलीं. तीं औषधें दिलीं. पण राणीची डोकेदुखी बंद झाली नाहीं. या खेपेस तुम्ही औषध बरोबर सांगितलें नाहींत तर तुम्हांला कैदेंत टाकावें लागेल." राजा म्हणाला.

"महाराज! या डोकेदुखीला एक रामबाण औषध आहे. परंतु तें करणें अशक्य आहे असें समजून आजवर आम्ही बोललों नाहीं." वैद्य म्हणाले.

"अशक्य कीं शक्य तें मी पाहून घेईन. प्रथम औषध काय आहे तें सांगाल कीं नाहीं?" राजानें विचारलें.

"नवीन खणलेल्या तलावांत राणी सरकारांनीं स्नान केलें तर ही डोकेदुखी कायमची दूर होईल. तो तलाव आपल्या राजधानींतल्या मोठ्या पटांगणाएवढा असला पाहिजे व त्यांत मासे असले पाहिजेत. त्याच्या काठीं मोठमोठे वृक्षपण असले पाहिजेत." वैद्य म्हणाले.

"तलाव खणायलाच एक वर्ष लागणार. झाडें वाढायला कमींत कमी दहा वर्षे लागतील. म्हणजे हें सर्व अशक्य." राजा म्हणाला.

"महाराज! आणखी महत्वाची गोष्ट म्हणजे एका महिन्याच्या आंत औषधोपचार झाला नाहीं तर राणी सरकारांच्या जिवाला कांहीं बरें वाईट झालें नाहीं म्हणजे पुरे." वैद्य म्हणाले.

वैद्य निघून गेले व राजा काळजींत पडला. त्यानें धनंजयला बोलावून राणीच्या आजाराची गोष्ट सांगितली व म्हणाला—"तूंच विचार करून सांग, काय करावें व कसें करावें."

धनंजय म्हणाला—"महाराज, आपण काळजी करूं नये. एका महिन्याच्या आंत मी कांहीं तरी उपाय करतों." असें सांगून तो पश्चिमेकडे निघाला. वाटेंत कोठें तरी नुकताच खणलेला तलाव लागेल असा विचार करून आणि इतर तीन दिशेला तो



गेला होता व वाटेंत त्याला तसा तलाव लागला नव्हता. म्हणून तो पश्चिमेकडेच निघाला. त्याला वाटेंत कोठेंच तलाव लागला नाहीं. पण गजराजाचें राज्य लागलें. राजधानींत प्रवेश करतांच त्याला ध्वजस्तंभाला रुतलेला बाण दिसला. त्यानें बोलावतांच तो बाण त्याच्या हातांत आला.

गजराजानें त्याचें नांव गांव विचारून त्याच्याशीं आपल्या ऐकुलत्या एका मुलीचें लग्न करून दिलें. लग्न झाल्यावर धनंजयनें गजराजाच्या देशांत येण्याचें खरें कारण आपल्या बायकोला सांगितलें.

“ त्यांत काय ? माझ्याकडे कित्येक हत्ती नोकरीला आहेत. त्यांच्याकडून मी हें काम एका दिवसांत पुरें करून घेईन.” राजकन्या म्हणाली. तिची आज्ञा ऐकून हत्तिणींनीं धनंजयच्या गांवीं एक तलाव खणून त्यांत पाणी भरलें व मोठमोठीं झाडें मुळासकट उपटून त्या तलावाच्या काठीं आणून लावलीं. त्यांनीं पुष्कळसे मासे देखील पाण्यांत आणून सोडले.

अशा तऱ्हेनें तलाव तयार झाल्यावर धनंजय सपत्नीक स्वदेशीं आला तेव्हां त्याला तो तलाव दिसला. राजाला फार आनंद झाला. तो वैद्यांना म्हणाला— “ राणीला या तलावांत स्नान घालून तिचा औषधोपचार करावा. या खेपेस तिची डोकेदुखी थांबली नाहीं तर तुम्हांला जन्मठेप शिक्षा होईल.”

धाकटी राणी आंघोळ करण्यासाठीं तलावावर गेली. परंतु पाण्यांत पाय टाकतांच ती पाण्यांत बुडाली. पाणी खोल होतें. हे तिला माहीत नव्हतें. तिला वाटलें कीं आंत जाऊं तसें पाणी जास्त खोल होत जाईल. पण तिचा अंदाज चुकला. दुसऱ्या दिवशीं तिचें प्रेत पाण्यावर तरंगत असलेलें सर्वांना दिसलें.

राजा शोक करूं लागला तेव्हां दासींनीं वैद्यांच्या साहाय्यानें युवराजांचा वध व्हावा म्हणून राणीनें केलेल्या कारस्थानाची गोष्ट सांगितली. राजानें वैद्यांना जन्मठेप शिक्षा दिली आणि आपल्या पट्टराणीला परत राजवाड्यांत घेऊन आला. त्यानें धाकट्या मुलाला राज्याचा एक वांटा दिला व बाकी राज्य आपल्या मोठ्या मुलाला दिलें.





# ठिंठाकराळ

उज्जैन नगरीं ठिंठाकराळ नांवाचा एक विक्षिप्त मनुष्य रहात असे. तो दिवसभर जुगार खेळे. जिंकणारे लोक त्याला प्रत्येकी शंभर कवड्या देत. तेवढ्या कवड्या घेऊन तो बाजारांत जाऊन कणीक विकत घेई व जागा मिळेल तिथें बसून पोळ्या करून त्या स्मशानांत घेऊन जाई व चितेच्या विस्तवावर त्या पोळ्या शेकून घेऊन महाकालाच्या देवळांत घेऊन जाई. तेथें देवासमोर तेवत असलेल्या दिव्यांतलें तूप काढून घेऊन ते आपल्या पोळ्यांना लावून घेई व पोळ्या खाऊन तो देवळांतच पडून राही.

एकदां ठिंठाकराळ देवळांत लोळत असतां देवळाच्या भिंतीवर कोरलेल्या मूर्ती हाल लागल्याचा भास झाला. त्या यक्षाच्या मूर्ती होत्या. त्या मूर्तींना जुगार खेळायला बोलवावें, पुष्कळ फायदा होईल असें त्याला वाटलें. तो विचार मनांत येतांच तो त्या यक्षमूर्तींना म्हणाला—“ यक्ष हो ! या खेळायला माझ्याबरोबर जो जिंकेल त्याला लगेच नगद रुपये द्यावे लागतील.”

यक्षांनीं कांहींच उत्तर दिलें नाहीं. जुगार खेळणारांचा एक नियम असतो. खेळणारा पण लावून फासे फेकूं लागला कीं आम्ही खेळत नाहीं असें म्हटलें तर तें मान्य होतें. नाहीं तर पुढचा मनुष्य खेळत आहे असें मान्य करावें लागतें. ठिंठाकराळनें पण लावून फांसे फेंकले होते. देवांनीं त्याला अडविलें नाहीं. ठिंठाकराळ बराच वेळ जुगार खेळत राहिला. त्यानें देवांच्या हातचें बरेंच सोनें जिंकलें.












शेवटीं तो म्हणाला—“ मी जिंकलेलें सोनें मला देऊन टाका.” त्याचें उत्तर यक्षांच्या मूर्तींनीं दिलें नाहीं. जुगारींत हारल्यावर जुगाऱ्यानें हारलेली वस्तु दिली नाहीं म्हणजे त्याला करवतीनें कापून काढावें असा देखील जुगाऱ्यांचा एक नियम आहे. त्याप्रमाणें ठिंठाकराळनें यक्षमूर्ती चिरून काढण्यासाठीं करवत घेतली. ती पाहून यक्ष घाबरून गेले व ठिंठाकराळला त्यांच्याकडून जें सोनें मिळणार होतें तें त्यांनीं देऊन टाकलें.

त्यानंतर ठिंठाकराळ दर रोज रात्रीं जुगार खेळून यक्षमूर्तींकडून सोनें मिळवूं लागला. तें पाहून चामुंडी त्यांना म्हणाली—“ त्यानें तुम्हांला खेळायला बोलाविलें म्हणजे सांगा, आम्हांला नाहीं खेळायचें. म्हणजे तुमचा खेळाशीं कांहीं संबंध येणार नाहीं.”

रात्रीं ठिंठाकराळनें बोलावल्यावर सर्व यक्षमूर्ती म्हणाल्या—“ आम्हांला नाहीं खेळायचें !” ठिंठाकराळचा डाव फसला. तो सरळ महाकालाकडे गेला. त्यानें त्यालाच खेळायला बोलावलें.

“ मी नाहीं खेळत....” महाकाल म्हणाला. तेव्हां ठिंठाकराळनें देवांचे पाय धरले आणि म्हणाला—“ देवा ! माझें भाग्य माझ्या विरुद्ध फिरलेलें दिसतें आहे. तूं त्रिलोकाचा भार आपल्या शिरावर वाहतोस. माझा भार तुला जड वाटूं लागला का ?”

“ तुला भिण्याचें कांहीं कारण नाहीं. तूं येथेंच रहा.” महाकाल म्हणाला. त्या दिवसापासून ठिंठाकराळ तेथेंच राहूं लागला.

एके दिवशीं रात्रीं भैरव त्याला म्हणाला—“ हें बघ, कांहीं अप्सरा आल्या आहेत महाकाली तीर्थांत स्नानाला. त्यांनीं वस्त्रें काठावर ठेवली आहेत. तीं तूं उचलून घेऊन जा. त्यांच्यांत कलावती नांवाची एक अप्सरा आहे. ती तुझ्याशीं लग्न करायला तयार होईपर्यंत तूं त्यांचीं वस्त्रें देऊं नकोस.”

ठिंठाकराळनें त्याप्रमाणें केलें. कलावती लग्न करायला कबूल होईपर्यंत मी वस्त्रें परत द्यायला तयार नाहीं, असें ठिंठाकराळनें सांगितल्यावर इतर अप्सरांनीं होकार दिला. कलावतीला इंद्राचा शाप होता. एकदां ती म्हणाली होती—“ स्वर्गांत सुखाला तोटा नाहीं ? तरी मर्त्यलोकांत जें सुख आहे तें स्वर्गांत दुर्लभ.” त्यावर इंद्राला राग आला व त्यानें शाप दिला—“ तर मग मर्त्यलोकांतल्या मनुष्याशीं लग्न करून तूं त्या सुखाचा अनुभव घे.” त्या शापामुळें कलावती ठिंठाकराळशीं लग्नाला तयार झाली व त्याचीशी लग्न केलें. ती दिवसभर स्वर्गांत वास करी व रात्रीं मर्त्यलोकांत पतीकडे येई. एकदां कलावती आपल्या पतीला म्हणाली—“ उद्यां इंद्रासमोर रंभेचें नृत्य आहे. तें संपेपर्यंत आम्हां सर्वांना तेथें रहावें लागेल. म्हणून मी थोडीशी उशिरां येईन.”

“ तें नृत्य मलादेखील पहावेंसें वाटत आहे. तूं मला गुप्तपणें तेथें घेऊन चल.” ठिंठाकराळ बायकोला म्हणाला.





“नको बाई! इंद्राला तें कळलें तर दोघांना शिक्षा होईल.” कलावती म्हणाली. तरी त्यानें गोडगोड बोलून बरोबर घेऊन जायला तिचें मन वळवून घेतलें.

उजाडल्यावर ती स्वर्गलोकीं निघाली तेव्हां तिनें कानांतल्या फुलांत ठिंठाकराळला सूक्ष्मरूपानें लपवून बसविलें. ठिंठाकराळला बायकोच्या मदतीनें इंद्राच्या खास महालांत प्रवेश मिळाला. इंद्राच्या दरबारांत अप्सरा गाणें म्हणत होत्या व रंभा नाचत होती. नारद व तुंबरू पण तेथें होते. त्यांत एक बकरी नाचत असलेली दिसली. त्या बकरीला त्यानें उज्जैन नगरींत पुष्कळदां पाहिलें होतें. ती इंद्रपुरीला कशी आली हें त्याला कळलें नाहीं. त्याला वाटलें कीं ती सर्व माया असावी. परंतु ती बकरी देवलोकांतलीच एक देवी होती.

इंद्राची सभा संपल्यावर कलावती आपल्या नवऱ्याला घेऊन भूलोकीं परत आली. दुसऱ्या दिवशीं ठिंठाकराळ याला ती बकरी उज्जैन नगरीं दिसली. त्यानें तिला अडवून विचारलें—“काल इंद्राच्या दरबारांत तूंच नृत्य केलें होतेंस नाहीं का? तें नृत्य माझ्यासमोर करून दाखव.

मर्त्यलोकांतल्या या माणसाला आपलें हें गुपित कसें काय कळलें? बकरीला त्या गोष्टीचें आश्चर्य वाटलें. बकरी त्याच्या आज्ञेप्रमाणें नाचली नाहीं तेव्हां ठिंठाकराळनें तिच्या मुस्कुटांत जोरानें भडकावली. तिच्या तोंडांतून रक्त वाहूं लागलें. ती धांवत इंद्राकडे गेली व आपलें गाऱ्हाणें निवेदन केलें. इंद्र कलावतीला बोलावून म्हणाला—“तूं मर्त्यलोकांतून आपल्या नवऱ्याला स्वर्गलोकीं माझ्या परवानगी शिवाय घेऊन आलीस म्हणून तुला मी नागपुरांत नरसिंहाचें जें देऊळ बांधत आहेत



त्याच्या ध्वजस्तंभावर जाऊन रहा अशी शिक्षा देतो.”

कलावती व तिची आई अलंबशा दोघींनीं इंद्राचे पाय धरून माफी मागितली व तो शाप परत घेण्यास विनंति केली. तेव्हां इंद्र म्हणाला—“मी जो शाप दिला तो परत घेणें मला शक्य नाहीं. परंतु मी शापमुक्ति कशी होईल हें सांगून ठेवतों. तें देऊळ पडल्यावर तुला शापमुक्ति मिळेल.”

कलावती आपल्या नवऱ्याकडे गेली व इंद्रानें दिलेल्या शापाची गोष्ट सांगितली व तिच्या अंगावर जीं दिव्यवस्त्रें व आभूषणें होतीं तीं पतीला देऊन शापाचें फळ भोगण्यासाठीं नागपूरला जाऊन नरसिंहाच्या देवळांतल्या ध्वजस्तंभांत शिरून बसली.

ठिंठाकराळ पत्नीवियोगानें फार दुःखी झाला. तो सावधपणें न वागल्यामुळें त्याच्या पत्नीला कष्ट सहन करावे लागले. त्याला फार वाईट वाटलें. परंतु दुःख करीत बसण्यांत अर्थ नाहीं, होईल त्या तऱ्हेनें कलावतीला शापमुक्त केलें पाहिजे, असें मनाशीं ठरवून त्यानें त्यासाठीं मुनिवेष धारण केला आणि नागपुरास गेला. त्यानें गांवाच्या वेशीवर चार टोंकावर रानांत



कलावतीनें दिलेल्या रत्नाभूषणांचे चार कलश घडवून ते पुरले व पांचवा मध्यरात्रीच्या सुमारास देवळासमोर पुरला. त्या नंतर नदी-काठीं एक आश्रम बांधून तेथें एका झाडा-खालीं बसून तपश्चर्या करूं लागला. गांवां-तील लोक त्याची तपश्चर्या पाहून त्याला एक मोठा तपस्वी मानूं लागले. ती बातमी राजाच्या कानावर गेली. राजानें त्याला बोलाविलें. परंतु ठिंठाकराळ राजाच्या भेटीस गेला नाहीं. तेव्हां राजा स्वत: त्याच्या दर्शना-साठीं आला. संध्याकाळपर्यंत दोघे बोलत होते. राजा राजधानीकडे निघाला तेव्हां कोल्हेकुई सुरू झाली. ती ऐकून ठिंठाकराळ हंसला. राजानें हंसण्याचें कारण विचारलें तेव्हां तो म्हणाला—"त्याच्याशीं तुझा कांहीं संबंध नाहीं." परंतु राजानें हंसण्याचें कारण सांगावें असा आग्रह केला.

"कारण कांहीं नाहीं. पूर्वेकडे रानांत रत्नाभूषणांनीं भरलेला एक कलश आहे. या कोल्हेकुईचा अर्थ एवढाच कीं मी तो उचलून न्यावा. मला कोल्ह्यांची भाषा कळते." तपस्वी म्हणाला.

तपस्वी म्हणतो तें खरें आहे कीं नाहीं हें पाहण्यासाठीं राजानें त्याला बरोबर चलायला सांगितलें व त्यालाच ती जागा दाखवायला सांगितली. ठिंठाकराळनें जागा दाखविली. तेथें खणल्यावर कलश सांपडला. ठिंठाकराळनें त्यांतलीं रत्न राजाला देऊन टाकलीं. राजाचा तपस्वी वेषांतल्या ठिंठा-कराळवर विश्वास बसला. ठिंठाकराळच्या दर्शनास राजा रोज जाऊं लागला. ठिंठा-कराळनें एका मागून एक आणखी तीन दिशांना पुरलेले कलश दाखवून त्यांतलीं रत्नें काढून दिलीं. राजाच काय सर्व प्रजा या तोतया तपस्वी मुनीच्या सेवेला हजर राहूं लागली.

एकदां राजा त्याला देवळांत घेऊन गेला. देवळांत प्रवेश करीत असतां एक कावळा 'काव' 'काव' करूं लागला. तपस्वी राजाला म्हणाला—"या देवळासमोर देखील एक रत्नकलश आहे. तो जाऊन काढून घे! असें तो कावळा सांगत आहे."

राजानें खणून पाहिलें तेव्हां त्याला खरोखरच एक रत्नकलश मिळाला. राजा त्या तोतया तपस्याला आदरपूर्वक देवळांत बोलावून घेऊन गेला. ध्वजस्तंभांत बसून कलावती तपस्वीवेषांत येत असलेल्या आपल्या पतीला पाहून रडूं लागली. ध्वज-





स्तंभाची मूर्ती रडूं लागलेली पाहून राजानें तपस्याला विचारलें—"महाराज ! हें काय अदभुत पाहातों आहें ?"

ठिंठाकराळ तोंडावर दुःख वाटत असल्याचें सोंग करून म्हणाला—"तोंडानें उच्चार करूं नये तें घडलें आहे. आतां मी काय सांगूं ? तरी घरीं गेल्यावर काय तें सांगेन." असें सांगून तो राजाबरोबर राजधानींत गेला. तो राजाला म्हणाला—"राजा तूं देऊळ ज्या जागीं बांधलें आहेस ती जागा अशुभ व अपवित्र आहे. तूं ज्या मुहूर्तावर देऊळ बांधायला सुरुवात केलीस तो मुहूर्तदेखील बरोबर नव्हता. म्हणून ही मूर्त तुला पाहून रडत होती. तुझ्या आयुष्याची दोरी खुंटत आली आहे. परंतु तुला दीर्घायु व्हायचें असेल तर तूं हें देऊळ पाडून टाकलें पाहिजेस. दुसऱ्या जागीं चांगला मुहूर्त पाहून तूं देऊळ बांधावें. त्यांत तुझें हित व प्रजेचें कल्याण आहे.

राजा घाबरून गेला. त्यानें दुसऱ्याच दिवशीं देऊळ पाडण्याची आज्ञा केली. नंतर ठिंठाकराळनें दाखविलेल्या जागीं व सांगितलेल्या मुहूर्तावर राजानें दुसरें देऊळ बांधलें.

त्याचें काम भागलें. ठिंठाकराळ आपला कपटी वेष सोडून उज्जैनला परत आला. शापमुक्ति मिळाल्यावर कलावती आपल्या पतीबरोबर इंद्राला भेटायला गेली. तिला पाहून इंद्र चकित झाला. तिला शापमुक्त करण्यासाठीं ठिंठाकराळनें जी युक्ति केली त्याचें वर्णन ऐकून इंद्र पोट धरधरून हंसला. त्यानें कलावतीबरोबर त्याला स्वर्गलोकीं राहण्याची परवानगी दिली. नंतर स्वर्गलोकीं इंद्राच्या आज्ञेनें कलावतीचा विवाह ठिंठाकराळशीं झाला.





# परोपकारी गोपाळ

गोपाळ स्वभावानें उदार होता. त्यानें पात्र व अपात्र हा भेद कधीं केला नाहीं. दुःखी कष्टी, मग तो कोणी का असेना प्रत्युपकाराची अपेक्षा न ठेवतां तो त्याच्यावर उपकार करीत असे. परोपकार करण्यांत त्याला एक मानसिक आनंद मिळत झाला.

गोपाळच्या गांवाशेजारीं नाहरपुर नांवाचें एक गांव होतें. त्या गांवांत सर्वच गरीब होते. मोलमजुरी हा एकच एक धंदा त्यांच्या उदरनिर्वाहाचें साधन होतें. त्यांत लखू नांवाचा एक मजूर होता. गोपाळच्या औदार्याची कीर्ति त्यानें ऐकली होती. मजुरी केल्याशिवाय गोपाळच्या मदतीनें पोट भरतां येईल या आशेनें तो गोपाळकडे गेला. म्हणाला—"मालक ! मी गरीब आहें व मुलीचें लग्न डोक्यावर आहे. मुलीचें लग्न म्हणजे आईबापांचें दिवाळें हें आपणांस माहीतच आहें. तांदूळ विकत घ्यायलादेखील माझ्याकडे पैसे नाहींत. तुम्ही तांदूळ दिलेत तर आयुष्यभर मुलगी आपलें नांव काढील."

"बरें झालें, तूं पैसे नाहीं मागितलेस. कारण माझ्याकडे या घटकेस मुळीच पैसे नाहींत. भात आहे तें मी देतों. किती पाहिजे, सांग." गोपाळनें विचारलें.

"गांवभर जेवायला येणार. निदान एक पोतें तरी नको का ?" लखू म्हणाला.

गोपाळनें त्याला एक पोतें भात दिलें. नवऱ्यामुलीसाठीं म्हणून चोळीलुगडें पण दिलें. म्हणाला—"नवऱ्यामुलीला लक्ष्मीतर्फे म्हणून सांगून दे."

लखू एक पोतें भात गोपाळच्याच गाडींत घालून आपल्या गांवीं निघून गेला. गाडी त्यानें परत पोंचती केली.

लखूनें बायकोला ती गोष्ट सांगितली नव्हती. बायकोनें अर्थातच त्याला विचारलें— "हें पोतें भरून भात आणि ही चोळीसाडी कोठून आणलीत?"

"परोपकारी गोपाळ म्हणून आहे एक वेडापीर. त्याला मी सांगितलें कीं मुलीचें लग्न आहे. त्यानें एक पोतें भात व ही साडीचोळी दिली. आतां दोन महिने नको काळजी करायला." तो म्हणाला.

"परंतु खरी गोष्ट त्याला कळली तर बोभाटा होईल कीं?" बायकोनें त्याला विचारलें.

"पण तो येतो आहे कशाला विचारायला आणि आलाच आणि त्याला कळलेंच तरी तो कोणाजवळ हें बोलणार देखील नाहीं." लखू म्हणाला.

लखूच्या बायकोला पोतें भरून भातापेक्षां ती नवीन साडी जास्त आवडली. दुसऱ्याच दिवशीं ती तें लुगडें नेसून आपला मोठेपणा मिरवायला निघाली. तिला कोणी विचारलें कीं कोठून आणलीस ग ही साडी कीं [illegible]

आमच्या घरीं. पाणी पिऊन थोडा वेळ आराम केला माझें फाटकें लुगडें त्यांनीं पाहिलें असावें. एक साडी बायकोसाठीं विकत घेऊन चालले होते तीच साडी त्यांनीं मला देऊन टाकली. नंतर एक पोतें भरून भात पाठवून दिलें." परंतु ज्यांनीं ज्यांनीं तें ऐकलें त्यांना तें खरें वाटलें नाहीं. कारण गांवकऱ्यांनीं लखूला एक पोतें भात गाडींत घेऊन येतांना पाहिलें होतें. गोपाळला आलेला कोणी पाहिलें नव्हतें.

ज्या दिवशीं लखू गोपाळच्या घरीं गेला होता त्या दिवशीं त्यानें पाटलांच्या घरीं काम करण्यासाठीं एक दिवसाची मजुरी अगोदरच घेऊन ठेवली होती. परंतु तो कामावर गेला नाहीं. लखू कामावर कां आला नाहीं याची चवकशी करण्यासाठीं पाटील स्वतः लखू रहात होता त्या बाजूला आले. गांवकऱ्यांनीं पाटलांना बंदगी करून येणाचें कारण विचारलें.

"लखू कामावर येईन म्हणून सांगून गेला होता. पण तो आला नाहीं म्हणून स्वतःच







बक्षिसासाठीं आलों आहें." पाटील म्हणाले. "आतां तो काय येतो कामावर ? त्याला एक पोतें भरून भात मिळालें आहे ना" गांवकरी म्हणाले. त्यांनीं लखूकडून व त्याच्या बायकोकडून त्याला पोतें भरून भात कसें मिळालें हें देखील सांगितलें. पाटील स्वतः लखूच्या घरीं गेले व कामाला न येण्याचें कारण त्यांनीं विचारलें.

"मालक, तब्येत बरी नाहीं. मी तरी काय करूं ? तुम्ही जी मजुरी दिली आहे तिच्याबद्दल येऊन करीन केव्हांतरी काम." लखू म्हणाला.





"गोपाळकडून एक पोतें भात व बायकोसाठीं एक साडी मिळाली आहे नव्हे का तुला ? म्हणून प्रकृति बरी नसेल !" पाटलानीं खोंचक शब्दांत विचारलें.

"गोपाळरावांकडून एक पोतें भात मिळालें हें खरें आहे. माझी प्रकृति पण खरोखरच बरी नाही. आपल्याला खरें वाटत नसेल तर तुम्ही दिलेली मजुरी मी परत द्यायला तयार आहें." लखू म्हणाला.

"लखूनें खात्रीनें कांहीं तरी लुच्चेगिरी केली आहे असें मला वाटतें. गोपाळकडे जाऊन चवकशी करून पाहिले पाहिजे." एक गांवकरी पाटलाला म्हणाला.

देघे गोपाळ रहात होता त्या गांवीं गेले. ते गोपाळला भेटले व म्हणाले— "अहो गोपाळराव ! तुम्हांला दान करायचें तर करा आमची ना नाहीं. पण पात्र अपात्र कांहीं पहाल की नाहीं ? सत्पात्रीं दान करणें ठीक आहे. फक्त एकदां तुम्हांला पाणी प्यायला दिलें म्हणून तुम्ही त्याला पोतें भरून भात व त्याच्या बायकोला साडी चोळी दिलीत हें ऐकून आम्ही थक्क झालों बुवा ! अहो, तो आहे आळशी ! तुम्ही दिलेलें भात महिने दोन महिने त्याला पुरेल.










[illegible] आहे तो घरीं."

गोपाळला तें ऐकून आश्चर्य वाटलें. म्हणाला—"मुलीच्या लग्नासाठीं म्हणून त्यानें पोतें भरून भात मागितलें. तें मी दिलें व वर नवऱ्यामुलीसाठीं एक साडीचोळीपण दिली. हें काय मी वाईट केलें !"

"बरें तर चला आमच्याबरोबर. सपशेल खोटें बोलला आहे तो लबाड. म्हणून त्याच्याकडून तुम्ही दिलेलें भात परत मागून घ्या." पाटील म्हणाले. "दिलेलें दान परत घेऊं नये. परंतु तुम्ही म्हणतांच आहां तर मी येतों बरोबर व त्याला जाब विचारतों कीं तूं खोटें कां बोललास ? चला." असें सांगून गोपाळ त्यांच्या बरोबर निघाला.

गोपाळला येत असलेला पाहतांच लखू त्याचे पाय धरून माफी मागूं लागला.

गोपाळनें लखूच्या पोत्यांत उरलेलें भात गरीब गांवकऱ्यांना एकेक शेर वांटून दिलें.

लखूची बायको लाजत लाजत साडीची पुन्हा नीट घडी करून घेऊन आली व तिनें ती त्याच्यासमोर ठेवली. पण गोपाळ म्हणाला—"ती साडी राहूं द्या बाई तुमच्याच-कडे. तुमच्या नवऱ्यानें चूक केली. त्यांत तुमचा काय दोष ? पुन्हां त्यानें असें कधीं करूं नये अशी काळजी घ्या म्हणजे झालें. परंतु त्या माउलीनें ती साडी घेतली नाहीं. चांगल्या माणसाला फंसविल्याबद्दल गांवभर लोक नांवें ठेवीत होते. म्हणून तिनें ती साडी फाडून गरीब मजूरणींना वांटली व म्हणाली—"गोपाळरावांचें नांव काढून त्याची चोळी शिवून घ्या."

त्यानंतर गोपाळला फंसवून कोणाचें हित होणार नाहीं, ही गोष्ट प्रत्येकाला पटली.



       



# स्वयंसेवक

एका गांवीं जगन्नाथ नांवाचा एक गरीब मनुष्य रहात असे. परंतु त्याच्या मुलीच्या भाग्यानें त्याला जांवई चांगला श्रीमंत मिळाला.

मुलगी पहिल्या बाळंतपणासाठीं म्हणून माहेरीं आली. तिला मुलगा झाला. ती आनंदाची बातमी जगन्नाथानें जांवयाला कळविली. बारशाला येणें शक्य नाहीं पण दोन महिन्यांनीं मुलाला व त्याच्या आईला आणण्यासाठीं येतों असें जावयानें कळविलें. त्याप्रमाणें यरून निघण्यापूर्वीं जावयांनीं पत्रपण धाडलें.

जांवई येणार म्हणून सर्वांना आनंद झाला. पण जांवयाचा आदरसत्कार नीट झाला पाहिजे म्हणून जगन्नाथ काळजींत पडला. घरची गरीबी झांकून राहाली पाहिजे व सर्वेपण जास्त होतां कामा नये. जांवई बापूंच्या सेवेला एक नोकर ठेवला नाहीं तर बरें दिसणार नाहीं. म्हणून निदान एक दोन दिवस तरी एक नोकर ठेवलाच पाहिजे. नवराबायकोंचें परस्परांशीं या गोष्टीवर बराच वेळ खलबत चालू होतें. काय करावें हें त्यांना कळेना. घराबाहेरून एक भिकारी त्यांचें बोलणें ऐकत होता. त्याला पक्वानांचा खमंग वासपण आला. त्याचें नशीब उघडलें होतें त्या दिवशीं.

तो सरळ गांवांतल्या विहिरीवर गेला. तेथें हात पाय धुवून त्यानें तेथें कोणाचे तरी कपडे होते ते उचलून अंगांत घातले व जगन्नाथाच्या घराशेजारीं भिंतीला टेंकून कोणी पाहणार नाहीं अशा तऱ्हेनें उभा राहाला.

सौ. सरलाबाई वानखेडे

त्याच वेळीं दारांत एक गाडी येऊन उभी राहाली. जगन्नाथ व त्याची बायको बाहेर येण्यापूर्वींच भिकाऱ्यानें पुढें येऊन गाडींतलें सामान बाहेर काढून घरांत आणून ठेवलें आणि जांवई बापूंच्या मागें जाऊन वऱ्हांड्यांत उभा राहाला.

गाडीचा आवाज ऐकून जगन्नाथ बाहेर आला. जांवई बापूंना भेटण्याच्या गर्दींत त्याला एक मनुष्य त्यांचें सामान घेऊन घरांत जात असलेला दिसला. त्याला वाटलें कीं जांवई बापूंच्या बरोबर कोणी नोकर आला असावा. जांवई बापूंना वाटलें कीं सासुरवाडचाच तो नोकर असावा. कोणी त्याच्याविषयीं कांहीं बोललें नाहीं. सासू-सासऱ्यानें जांवई बापूंची बरदास्त ठेवण्यांत कोणतीहि उणीव राहूं दिली नाहीं. जांवई बापूंबरोबर त्यांच्या नोकराचा पण आदर सत्कार खूप झाला. जांवई बापू आंत जेवायला बसले तर नोकराला बाहेर पडवींत त्यांच्याच बरोबर जेवायला वाढलें. आग्रह कर करून सर्व पदार्थ व पंच पक्वान्नें वाढलीं.

जेवण झाल्यावर जगन्नाथानें जांवयाला धोतर जोडी दिली. सासूनें लाडू जिलब्या















भरून एक करंडीच दिली. नोकराला पण एक करंडी देत म्हणाली–"आपल्या मुलांना दे हो बाबा!"

जगन्नाथ बायकोला व मुलाला घेऊन दुसऱ्या दिवशीं निघाला. तो भिकारीच गाडी ठरवून घेऊन आला व त्यानें गाडींत सर्व सामान ठेवलें. जांवई बापू शेवटीं गाडींत बसले. बसतांना त्यांनीं सासुर-वाड्चा नोकर समजून बक्षिस म्हणून भिकाऱ्याच्या हातांत एक रुपया ठेवला. भिकाऱ्यानें नमस्कार करून रुपया खिशांत टाकला.

गाडी निघून गेली. पण नोकर कांहीं गाडींत बसला नाहीं. हें पाहून बायकोनें नवऱ्याला विचारलें–"हें काय! मग तो नोकर कां नाहीं आला? त्याला तुम्ही पैसे देऊन पाठविलांत तो कोठें?"

"तो तुझ्या माहेरचा नोकर आहे, असें मला वाटलें" नवरा म्हणाला.

बायको म्हणाली–"इश्श! तो नोकर आपला आहे असें आम्हां सर्वांना वाटलें." दोघे परस्परांच्या त्या गमतीदार चुकीबद्दल खूप हंसले.

गाडी निघून गेल्यावर जगन्नाथाच्या बायकोनें नवऱ्याला विचारलें–"तो नोकर त्यांच्याबरोबर गेला नाहीं वाटतें. आणखी कोठें निघाला आहे? हा त्यांचा नोकर नाहीं कीं काय?"

"तर मग हा कोण होता?" त्यानें नोकर ठेवला नव्हता व तो जांवईबापूंचा पण नोकर नव्हता. असाच कोणी उडाण-टप्पू होता तर! त्याला का आपण एवढा मान दिला? दोघे नवरा बायको अळफळत घरांत गेलीं.





# युध्दकांड

बिभीषणानें रामाला अयोध्येला पोहोंच-विण्यासाठीं रावणाचें पुष्पक विमान मागविलें. रावणाचें विमान आणि तें सुद्धां कुबेराकडून घेतलेलें. मग त्याची शोभा काय वर्णावी. सोन्याच्या कोंदणांत बसवि-लेल्या नवरत्नांनीं तळपत होतें नुसतें. त्यांत त्यावर सूर्य किरणें पडल्यावर विचारावयालाच नको. असे तें विमान आल्याचें रामाला सांगून बिभीषणानें हात जोडून विचारलें–"आणखी काय आज्ञा आहे?"

"अरे ह्या वानरांनीं एवढें कष्ट केले आहेत त्यांना संतुष्ट करून आपली कीर्ति वाढव." असें सांगून त्यानें सुग्रीव, अंगद, वगैरेंचा निरोप घेतला. सुग्रीवादि वानरांनीं अयोध्येला येण्याची इच्छा दर्शविल्यावरून रामानें सर्वांनाच अयोध्येस येण्याचें निमंत्रण दिलें. त्या सर्वांना आपल्याबरोबर विमानांत बसवून निघाला.

अशा तऱ्हेनें श्रीराम, लक्ष्मण, सीता आणि इतर वानर मंडळी अयोध्येस निघालीं.

आकाशांतून जात असतां वाटेंत कोठें युद्ध झालें, कोठें कोणता राक्षस मारला, कोठें सेतू बांधला, कोठें शिवपूजा केली वगैरे स्थानें रामानें सीतेला दाखविलीं. बिभीषणाची त्याच्याशीं भेट झाली ती जागा देखील तिला दाखविली.



किष्किंधेवरून विमान चाललें असतां रामानें सुग्रीवाची व त्याची भेट कशी झाली व त्याच्याशीं कशी मैत्री झाली, हें सांगून वानर सैन्यानें दाखविलेल्या शौर्याचें वर्णन केलें. त्यावर सीतेनें तारा व इतर वानर स्त्रियांना पण अयोध्येला न्यावें अशी विनंती केली. म्हणून रामाच्या आज्ञेनें तेथें विमान उतरविण्यांत आलें.

सुग्रीवानें आपल्या अंतःपुरांत जाऊन ताराला सीतेची इच्छा कळविली. थोड्याच वेळांत सर्व वानर स्त्रिया विमानांत चढल्या आणि विमान आकाशांत उडालें. सीतेच्या कृपनें त्यांना पुष्पक विमानांत बसण्याचें भाग्य लाभलें. त्यांनीं मनांतल्या मनांत सीतेचे फार आभार मानले.

विमान उत्तर दिशेच्या रोखानें जात होतें. रामानें सीतेला ऋष्यमूक पर्वत दाखविला आणि म्हणाला—“येथेंच सुग्रीवाची प्रथम भेट झाली. व येथेंच तुझे दागिने पाहायला मिळाले.” त्यानंतर शबरी भेटली ती जागा व जटायूचें रावणाबरोबर जेथें युद्ध झालें होतें ती जागा रामानें दाखविली. एवढ्यांत जेथें रामलक्ष्मण व सीता झोपडी बांधून राहात तें रम्य स्थान दिसलें होतें. तें पाहतांच त्यांना तेथल्या गोड आठवणी झाल्या व त्यांचीं मनें गहिंवरलीं.

थोड्याच वेळांत दूरवर अयोध्या दिसूं लागली. व सर्व वानरें व राक्षस कुतुहलानें तिकडे पाहूं लागले. परंतु रामानें विमान भरद्वाज मुनींच्या आश्रमाजवळ उतरविलें.

आश्रमांत जाऊन रामानें भरद्वाज मुनींस वंदन केलें आणि अयोध्येंतील कुशलवृत्त जाणून घेतलें. व मुनींच्या आग्रहावरून तो एक दिवस तेथें राहिला.

त्यानें मारुतीला बोलावून पुढें जाण्यास सांगितलें. म्हणाला—“तूं पुढें हो. जातांना वाटेंत शृंगवेरपुरांत गुह निषादाला भेटून आमची कुशलवार्ता सांग. तो माझा अगदीं जिवलग सखा आहे. तो तुला अयोध्येंतील सर्व वर्तमान सांगेल. नंतर अयोध्येला जा आणि आम्ही येत असल्याची बातमी भरताला दे. तो राजा आहे प्रथम त्याला कळव. सर्व वृत्त सांगतांना त्याच्या चेहेऱ्यावर उमटणारे भाव निरखून पाहा. कारण इतके दिवस राज्य केल्यावर एकाएकीं तें सुख गमावतांना त्याला दुःख होणें साहजिक आहे. बोलतांना त्याला राज्य करण्याची इच्छा आहे का? हें ओळखून आणि समजून घे. आणि जर तसें तुला वाटलें तर आम्ही अयोध्येंत पोहोंचण्या-पूर्वीं तूं येऊन आम्हांला भेट. हो, आम्ही चैत्र शुद्ध पंचमीला निघालों होतों. आज चैत्र शुद्ध चतुर्थी आहे आज चौदा वर्षें पूर्ण होतील.”

रामाची आज्ञा होतांच मारुतीनें आकाशांत उड्डाण केलें आणि गंगा-यमुना संगम ओलांडून शृंगवेरपुरास गेला. तेथें मनुष्य रूप धारण करून गुहाची भेट घेतली. रामाच्या आगमनाची शुभ वार्ता सांगितली आणि म्हणाला—“उद्यां पाहाटेस राम



भारद्वाज आश्रमांतून निघणार आहेत.” हें ऐकून निषादाला फार आनंद झाला.

मारुती निषादाचा निरोप घेऊन निघाला तो पुन्हां आकाशमार्गें नंदीग्रामाच्या वेशीवर येऊन उतरला. पुन्हां त्यानें मनुष्यरूप घेतलें व भरताच्या भेटीस निघाला.

भरत नंदीग्रामांत एका आश्रमांत तपस्व्याप्रमाणें राहात होता. एक एक दिवस मोजीत तो रामाच्या येण्याची वाट पाहात होता. कांहीं दिवसांपासून चौदा वर्षें पूर्ण होत आलीं तरी अजून रामाच्या येण्याची कांहींच कशी वार्ता नाहीं, म्हणून



तरी तो थोडा दुःखी आणि निराशसा होत चालला होता.

चौदावर्षें पूर्ण होण्याच्या दिवशीं भरत फारच चिंता करीत बसला असतां हनुमान मनुष्यरूपांत येऊन म्हणाला—" महाराज, एक शुभसंदेश आणला आहे. रामानें रावणाचा वध केला आणि आतां सीता, लक्ष्मण आणि दुसरे तिकडील पराक्रमी वीर यांना बरोबर घेऊन इकडे येत आहे."

तें ऐकून आनंतातिरेकानें भरत क्षणभर मूर्च्छित झाला. सावध होतांच त्यानें मारुतीला एकदम मिठी मारली आणि म्हणाला—" ह्याच शुभ घडीची मी इतके दिवस वाट पाहात होतों. ही बातमी आणणारा तूं खरोखर देव माणूसच आहेस. ह्यासाठीं मी तुला एक लाख गाई, शंभर गांवें आणि सोळा सुंदरकन्या बक्षीस देतों."

त्यानंतर दोघे बराच वेळ बोलत होते. मारुतीनें रामाविषयीं सर्व सुखदुःखाची माहिती भरताला सांगितली. अनेक प्रकारच्या संकटांना तोंड देऊन राम आतां निर्विघ्नपणें परत येत असल्याचें ऐकून भरताला फार बरें वाटलें. त्यानें शत्रुघ्नाला बोलावून आज्ञा केली. म्हणाला—" उद्यां श्रीराम येत आहे. त्याच्या स्वागतासाठीं सर्व नगरी सुशोभित कर. नंदीग्राम ते अयोध्या मार्ग स्वच्छ झाडून अन् सडा घालून फुलांची रांगोळी काढव."

भरताच्या आज्ञेप्रमाणें शत्रुघ्नानें सर्व तयारी केली. राम येणार ही बातमी कळतांच सर्व स्त्रीपुरुष मोठ्या थाटामाटानें त्याचें स्वागत करण्यासाठीं नन्दीग्रामाकडे जाऊं लागलीं. कौसल्या, कैकेयी वगैरे दशरथ राजाच्या सर्व बायका पालख्यांतून बसून नंदीग्रामाला गेल्या.



सर्वांच्या पुढें भरत रामाच्या स्वागतासाठीं वेशीवर जाऊन उभा होता. बराच वेळ झाला तरी राम येण्याचें कांहीं चिन्ह दिसेना तेव्हां भरताला वाटलें कीं त्या ब्राह्मणानें खोटें सांगून माझी फसवणूक केली आहे.

परंतु त्याचवेळीं पुष्पक विमान दिसलें. पाहतां पाहतां तें जमीनीवर उतरलें देखील. धांवतच जाऊन भरतानें रामाचे पाय धरले. त्याबरोबर रामानें त्याला उठवून मिठी मारली. नंतर त्यानें मनुष्य रूपांत असलेल्या त्या सर्व वानरांचें स्वागत केलें. तो सुग्रीवाला म्हणाला—" आजपर्यंत आम्ही चौघे भाऊ होतों. आजपासून आपण पांच जण झालों. तूं आम्हांला अगदीं भावा प्रमाणेंच आहेस."

रामानें मातांना, वसिष्ठ गुरूला व इतर सर्वांना नमस्कार केला. सीतेनें पण वसिष्ठादिक मुनींस व कौसल्यादिक सासवास नमस्कार केला.

सर्व मंडळी उतरल्यावर रामानें पुष्पक विमान कुबेराकडे पाठवून दिलें.

इतक्यांत भरत हातांत रामाच्या पादुका घेऊन आला. रामा, केवळ तुझी आज्ञा म्हणून मी हें तुझें राज्य संभाळलें. आईचा शब्द खरा करण्यासाठीं चौदा वर्षें वनांत राहून तुला फार कष्ट सोसावे लागले त्याबद्दल वाईट वाटतें. पण तूं आतां सुखरूप परत आलेला पाहून फार फार आनंद वाटला. इतके दिवस तुझी ठेव म्हणून संभाळलेलें हें राज्य तुझ्या स्वाधीन करतांना मला धन्यता वाटते." असें सांगून भरतानें त्या पादुका रामासमोर आणून ठेवल्या व रामाला पायांत घालून घ्यायला विनंती केली.

नंतर सर्वांनीं मंगलस्नानें केलीं गंध लेपचिलें. रामानें रेशमीवस्त्रें परिधान केलीं. सोन्यामोत्याचें अलंकार घातले व रथांत बसून अयोध्येस जाण्यास सिद्ध झाला.



शत्रुघ्न, लक्ष्मण, बिभीषण त्याच्यावर छत्र चामर धरून चालले होते. भरत सारथी झाला. सुग्रीव शत्रुंजय नांवाच्या हत्तीवर बसून रामाबरोबर चालला होता.

स्त्रियांनीं सीतेला मंगलस्नान घालून अलंकार चढवून तिला, देखील इतर स्त्रियांबरोबर अयोध्येस नेलें.

दशरथाचा मंत्री वसिष्ठ पुढें तयारी करण्यासाठीं गेला होता. त्यानें रामराज्याभिषेकाची सर्व तयारी केली.

एवढ्यांत रामाचा रथ दिसूं लागला. प्रजेनें आपापल्या घरावर गुढ्या उभारल्या. सैन्यानें शंख गर्जना करून रामाचें स्वागत केलें. लोकांचे थवेच्या थवे राम दर्शनासाठीं मार्गावर दुतर्फा एकत्र झाले आणि रामाचा रथ वाजत गाजत दशरथ राजाच्या महालांत शिरला. रामानें रथांतून खालीं उतरतांच प्रथम भरताला आज्ञा केली कीं सुग्रीवाच्या राहाण्याची उत्तम व्यवस्था कर.

सुग्रीवानें आपल्या महालांत शिरतांच जांबवंत, हनुमान, वागदर्शी आणि ऋषभ यांना बोलावून आज्ञा केली कीं त्या प्रत्येकानें एकेका दिशेला जाऊन चारी दिशांकडील समुद्राचें पाणी उजाडावयाच्या अगोदर घेऊन यावें. कारण दुसरे दिवशींच रामाचा राज्याभिषेक व्हावयाचा होता. त्यासाठीं तें पाणी पाहिजे होतें. सुग्रीवाच्या आज्ञेप्रमाणें चौघे सोन्याच्या कळशा घेऊन गेले आणि पाहाटेच्या आंत पाणी घेऊन आले.

दुसरा दिवस उजाडतांच रामाला व सीतेला मंगलस्नान घालून रेशमी वस्त्रें नेसावयास दिलीं. नंतर चंदन अगंजादि लेप लावून रत्नखचित अलंकार घालावयास दिले. नंतर त्यांना सुवर्ण सिंहासनावर बसविलें. तीं दोघें सिंहासनारूढ होतांच वसिष्ट, वामदेव,










जावाली, काश्यप, कात्यायन सुयज्ञ, गौतम, विजय आदि आठ महर्षींनीं मंत्र घोषांत रामाचा अभिषेक केला. त्यानंतर ब्राह्मण, मंत्रि, सेनापति वगैरे मुख्य लोकांनी त्यांच्यावर अभिषेक करून त्यांना वंदन केलें. अशा तऱ्हेनें रामाचा राज्याभिषेक उत्तम तऱ्हेनें पार पडला.

त्यावेळीं देवेन्द्रानें रामासाठीं उपहार म्हणून शतकमल सुवर्ण हार वायुदेवाच्या हातीं पाठविला.

रामानें ब्राह्मणांना सवत्स धेनु, घोडे, सुवर्ण मुद्रा वगैरे दान केलें. पौर जनांना वस्त्राभूषण देऊन भूषविलें. सुग्रीवाला एक दिव्य कांचनमाला देऊन आदर केला. वानरांनाहि कांहीं उपहार देण्यांत आले.

नंतर रामानें सीतेला एक मोत्याची माळ देऊन म्हटलें—“ज्यानें आपल्या सेवेनें तुला संतुष्ट केलें त्याला ही माळ दे.” अर्थातच सीतेनें ती मारुतीला दिली आणि त्यानेंहि ती माळ मोठ्या आदरानें गळ्यांत घातली.

बिभीषणालाहि यथोचित उपहार देऊन रामानें त्याला निरोप दिला.

राज्याभिषेकाचा सोहळा समाप्त होतांच सर्व वानर किष्किंधेला निघून गेले. बिभीषण लंकेला गेला.

रामानें आपल्या राज्याचा अर्धा भार लक्ष्मणावर टाकला व भरताला युवराज केलें. रामानें एकंदर शंभर अश्वमेध यज्ञ केले.

रामाच्या राज्यांत कोणालाहि दुःख नव्हतें, दुष्काळ नव्हता, अपमृत्यूहि नव्हता. त्याची कारकीर्द आदर्श होती म्हणूनच चांगल्या राज्यकारभारास ‘रामराज्य’ म्हणतात. [युद्धकाण्ड समाप्त]





# औत्तम म्हणजे तिसरा मनु

सूर्यवंशांतील उत्तानपाद राजाला दोन बायका होत्या. सुनीती आणि सुरुचि. उत्तानपाद राजाचें राज्य सुरुचीचा मुलगा उत्तम या लाच मिळालें. कारण सुनीतीचा मुलगा ध्रुव घरांतून निघून गेला होता आणि उत्तम लाडक्या बायकोचा मुलगा असल्यानें राजाचाहि लाडका होता. बहुला बभ्रयाची मुलगी. उत्तम तिच्यावर मुग्ध झाला व तिच्याशीं त्यानें लग्न केलें. पण बहुलाचें उत्तमावर प्रेम नव्हतें. ती त्याला थोड्या हीन दृष्टीनेंच पाहात असे.

एक दिवस राजा उत्तम आपल्या कांहीं राजकुमार मित्रांच्याबरोबर मद्यपान करीत बसला होता. बहुला तेथेंच होती. त्यानें मद्याचा प्याला तिच्यापुढें केला. परंतु तिनें त्याचा अव्हेर केला. आपल्या मित्रांच्या समोर झालेला हा अपमान राजाला असह्य झाल्यावरून त्यानें तिला वनवास दिला. ह्या गोष्टीचें बहुलेला काडीमात्र दुःख झालें नाहीं. राजाला मात्र फार वाईट वाटलें. कारण त्याचें तिच्यावर फार प्रेम होतें.

अशाच स्थितींत कांहीं दिवस गेले. एक दिवस सुशर्मा नांवाचा ब्राह्मण राजाच्या दरबारांत म्हणाला—“राजा, माझ्या बायकोला कोणी तरी पळवून नेलें आहे. तूं तिला शोधून आणून दे.”

“तुझ्या बायकोला मी ओळखत नाहीं आणि तिला नेणारालाहि मी ओळखत नाहीं.” राजा म्हणाला.

“नुसतें ओळखत नाहीं आणि माहीत नाहीं म्हणून भागणार नाहीं. आमच्या कष्ट निवारणाची सर्व जबाबदारी तुझ्यावरच आहे.” सुशर्मा म्हणाला.

“तुझी बायको कशी काय आहे? केवढी आहे? कांहीं सांगशील तरी?” राजानें विचारलें.

“ती होय? पिचक्या डोळ्यांची, गाल-फडें बसलेली, ठेंगणी, काळी सांवळी अशी आहे. आणि साधी भोळी नाहीं, मोठी वस्ताद पाताळयंत्री आहे.” सुशर्मानें आपल्या बायकोचें वर्णन केलें. राजा हंसून म्हणाला— “अरे, बरं झालं पीडा गेली म्हणून स्वस्थ बस झालें! फारच वाटलं तर दुसरं लग्न करा.”

“असें काय बोलतोस राजा? अरे! पति संततीच्या रूपानें पत्नीच्या गर्भांतून किती तरी वेळां जन्म घेत असतो. अशा पत्नीचें रक्षण न केलें तर फार संकटें उत्पन्न येतात. म्हणून पत्नी कशीहि असली तरी तिचें रक्षण करणें हा धर्म आहे. शिवाय देवा ब्राह्मणांसमोर अग्नीला साक्ष ठेवून जिच्याशीं लग्न केलें तिला सोडून दुसरें लग्न कर म्हणतोस, ‘शांतम् पापम्’, तो अधर्म आहे. तू माझ्या बायकोला शोधून आण. तिच्या विणा माझीं सर्व हव्यकर्में थांबली आहेत.”

सुशर्माच्या आग्रहावरून राजा निघाला. गांवोंगांव हिंडतां तो एका मुनीच्या आश्रमांत आला. मुनीनें राजाच्या स्वागतासाठीं शिष्यास अर्घ्य पाद्य आणण्यास सांगितलें. पण शिष्यानें गुरूला पुन्हां विचारलें. त्याबरोबर मुनीला आठवण होऊन तो राजाला म्हणाला—“राजा एक पक्षपर्यंत जरी ब्राह्मणाच्या कर्मांत खंड पडला तरी तो अस्पृश्य मानला जातो आणि तूं तर एका वर्षापासून बायकोला सोडून दिलें आहेस.”

तें ऐकून राजा थक्कच झाला. क्षणभर थांबून त्यानें सुशर्माच्या बायकोविषयीं विचारलें. अंतरदृष्टीनें पाहून मुनि म्हणाले— “बलाक नांवाचा राक्षस सुशर्माच्या बायकोला पळवून घेऊन गेला आहे आणि त्यानें तिला कुत्पलावता नांवाच्या वनांत ठेवून दिलें आहे. तूं तिला सुशर्माकडे नेऊन पोहोंचती कर.”

राजा बलाक राक्षसाकडे गेला आणि सुशर्माच्ची बायकोला पळवून आणण्याचें कारण त्यानें राक्षसाला विचारलें.

बलाक म्हणाला—“हा कर्मठ ब्राह्मण प्रत्येक यज्ञांत आमची निंदा करीतो. त्याचें हें व्रत भंग व्हावें म्हणून आम्ही तिला पळवून आणली आहे. तूं मागत असशील तर आम्हीं तिला तिच्या घरीं पोहोंचती करतों.”














तिला पोहोंचती करण्यास सांगून राजा मुनीकडे गेला व म्हणाला—"बायकोला सोडणें पाप आहे हें त्या बलाकानें निराळ्या तऱ्हेनें सांगितलें. माझी बायको कोठें आहे मला सांगा."

"तुझी बायको पाताळांत नागलोकांत आहे. कपोतराज नांवाच्या नागाचें तिच्या-वर प्रेम बसलें आणि तो तिला पळवून घेऊन गेला. परंतु त्या नागाची मुलगी नंदा हिला बहुलानें तिची सावत्र आई व्हावें हें पसंत नसल्यानें ती मुलगी तिचें ह्या अपवित्र कर्मापासून रक्षण करीत आहे."

मुनीचा निरोप घेऊन राजा आपल्या राजधानींत गेला. तेथें सुशर्मा दंपति आनंदानें राहात असलेली पाहून त्याला आपल्या बायकोची आठवण झाली. तो पुन्हां बलाकाकडे गेला व पाताळांतून आपल्या बायकोला घेऊन येण्यास त्याच्या-जवळ विनंती केली. बलाक राक्षस राजाच्या इच्छेला मान देऊन बहुलेला पाताळांतून सोडवून घेऊन आला.

सुशर्मानें 'मित्रविन्द' नांवाचा यज्ञ सात वेळां करून बहुलेच्या मनांतील पतिविषयींचें किल्मिष दूर केलें. तेव्हां पासून ती पतीवर पूर्वप्रमाणें प्रेम करूं लागली.

आपल्या मुलीमुळें कपोतराज बहुलेशीं लग्न करूं शकला नाहीं म्हणून रागानें त्यानें तिला मुकी करून टाकलें. परंतु राजानें सारस्वत यज्ञ करून तिला पुन्हां वाचा देवविली. नंदानें संतोषून राजाला उत्तमपुत्र प्राप्तीचा आशीर्वाद दिला. त्या प्रमाणें राजाला खरोखरच एक पुत्र झाला जो तिसरा मनु म्हणून प्रसिद्ध झाला. ह्याच पुत्राचें नांव औत्तम होतें.



# …ाव्या शतकांतील घड्याळ

हें घड्याळ स्विझरलंडची राजधानी बर्न ह्या शहरीं आहे. ह्याच्या दारावरची लहान 'डायल' महिना व दिवस दाखविते. त्याच्या उजवीकडील घरावर अस्वल व कोंबडें खेळतात. घड्याळाच्या वरच्या बुरुजावरून मनुष्याकृती बाहुल्या घंटा वाजवितात. तेच ठोके होते.



# भारताचा इतिहास



१६२७ मध्यें जहांगीर बादशाह मरण पावला तेव्हां त्याचा मुलगा शाहजहान दख्खनमध्यें होता. त्याचे दोघे मोठे भाऊ खुस्रो व परवेज तोंपर्यंत मरण पावले होते. धाकटा भाऊ शहरयार यानें आपली सासू नूरजहान हिच्या सांगण्यावरून लाहोरहून स्वतः बादशाह असल्याचें जाहीर केलें. त्यावेळीं शाहजहानची बायको मुमताजमहाल हिचे वडील आसफखान यानें आपल्या जांवयाला पुष्कळ मदत केली. त्यानें त्याला उत्तरेकडे येण्यास कळविलें व तो येईपर्यंत खुस्रोचा मुलगा दावरबख्श याला गादीवर बसविलें. नंतर त्यानें प्रमुख अमीर उपरावांना आपल्या बाजूला वळवून घेतलें. त्यांच्या मदतीनें त्यानें शहरयारच्या विरुद्ध लाहोरवर स्वारी केली. युद्धांत त्याचा पराभव करून त्यानें त्याचे डोळे काढून टाकवले.

शाहजहान लवकरच दिल्लीला पोंचला. फेब्रुवारी १६२८ मध्यें त्यानें स्वतःला बादशाह म्हणून जाहीर केलें. नंतर त्याच्या वाटेंत जो कोणी आडवा आला त्या सर्वांचा कांटा त्यानें दूर केला. परिस्थिती पण त्याला हवी अशीच होती. आसफखानानें त्याला मदत केली होती. म्हणून तो त्याचा मुख्य मंत्री झाला.

बादशाहाच्या विरुद्ध दोघांनीं बंड केलें. त्यांपैकी एक बुंदलखंडाचा राजा जुझारसिंह होता व दुसरा खान जहान लोदी नांवाचा अफगाणांचा एक पुढारी. हा दक्कनचा जुना सुबेदार होता. शाहजहान गादीवर बसल्यानंतर दोन वर्षांत हीं बंडें झालीं व दोन्हीं त्यानें मोडून टाकलीं. त्यांत दुसरें बंड थोडें मोठ्या प्रमाणावर झालें. निजाम उल्मुल्क, अहमद नगरचा सुलतान, मराठे, रजपूत सर्व. या बंडांत सामील झाले. शाहजहानला त्यांच्या शक्तीचा बरोबर अंदाज होता. म्हणून त्यानें तशीच तयारी केली होती व मोठ्या चातुर्यानें बंडाचा बिमोड केला.

बंगालमध्यें सात परगण्याजवळ पोर्तुगीजांचा अड्डा होता. ते आपल्या व्यापाराबरोबर, हुगळीनजीक एक पडाव टाकून बादशाहच्या विरुद्ध बंडाळी करूं लागले. ते तंबाकूच्या व्यापाऱ्यांकडून कर वसूल करून घेऊं लागले. एवढ्यावर ते थांबले नाहींत. ते गुलामांचा व्यापार पण करूं लागले. त्यांनीं मुमताजमहलच्या दोन तरुण गुलाम दासींना पकडलें. शाहजहानच्या हुकमावरून २४ जून १६६२ या रोजीं मोंगल सैन्यानें हुगळीला वेढा दिला. या युद्धांत कित्येक पोर्तुगीज हताहत झाले व कित्येकांना कैद करून आग्रा येथें आणण्यांत आलें. तेथें त्यांच्यावर पुष्कळ अत्याचार झाले.

आपल्या पूर्वजांप्रमाणें शाहजहान बादशाहाच्या मनांत दक्षिणेकडे आपलें साम्राज्य वाढविण्याची इच्छा होती. अहमदनगरच्या निजामशाही राज्याची हद्द मोगलांच्या हद्दीला भिडून होती. म्हणून सर्वांत ज्यास्त दडपण त्या राज्यावरच पडलें. १६२६ मध्यें मलिकंबरच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा फतहखान हा अयोग्य असल्या कारणानें अहमदनगरचें राज्य कमकुवत होत गेलें. अहमदनगरच्या सुलतानाविरुद्ध बंड करून त्यानें सुल्तानाचा वध केला व सुलतानाच्या मुलाला नांवापुरता, गादीवर बसवून त्यानें सर्व सत्ता आपल्या ताब्यांत करून घेतली. सन् १६३१ मध्यें त्यानें मोगलांकडून साडे दहा लाख रुपयांची लांच खाऊन दौलताबादचा किल्ला त्यांना देऊन टाकला. १६३३ मध्यें अहमदनगरचें राज्य खालसा झालें व मोंगल साम्राज्यांत कायमचें जोडलें गेलें.



गोवळकुंडा व विजापूर राज्यें स्वतंत्र व शिया मतावलंबी होतीं. १६२९ मध्यें गोवळकुंड्यावर आणि १६३१ मध्यें विजापुरावर मोंगल सैन्यानें स्वारी केली. १६३५ मध्यें या दोन्ही राज्यांनीं लपून छपून शहाजीराजे यांना मदत केली होती. तें कळल्यावर शाहजहाननें शहाजीला कर देऊं नये व आपलें आधिपत्य स्वीकार करावें असें दोन्ही राज्यांच्या सुलतानांना कळविलें. एवढेंच नव्हे तर शाहजहान स्वतः २१ फेब्रुवारी १६३६ मध्यें दौलदाबाद येथें आला. तें पाहून गोवळकुंड्याचा सुलतान अब्दुल्लाशाह यानें बादशाहसमोर आपली मान तुकविली व सर्व अटी कबूल केल्या.

परंतु विजापूरचा सुलतान आदिलशाह युद्धाला तयार झाला. मोंगल सैन्यानें तीन बाजूंनीं विजापूरच्या राज्यावर स्वारी केली. विजापूरच्या सैन्यानें मोठ्या शौर्यानें युद्ध करून आपल्या राजधानीचें रक्षण केलें. परंतु सन् १६३६ मध्यें सुलतानाला संधी करून घ्यावी लागली. विजापूरची सत्ता त्याच्या हातांत कायम राहाली. अहमदनगर राज्याचा कांहीं भाग त्याला देण्यांत आला.

अशा तऱ्हेनें दख्खनचीं राज्यें मोगलांच्या छत्रछायेखालीं आलीं. ११ जुलाई १६३६ मध्यें शाहजहान उत्तरेकडे परत गेला. त्यानें आपला मुलगा औरंगजेब याला सुबेदार म्हणून नेमलें. मोगल साम्राज्याच्या दख्खनच्या भागांत त्यावेळीं खानदेश वऱ्हाड, तेलंगाणा, दौलताबाद वगैरे राज्यें होतीं. तेथून मोगल साम्राज्याला दर वर्षीं पांच कोटींची प्राप्ती होत होती. दक्षिणेंतील ६४ डोंगरी किल्ल्यांपैकीं कांहीं अद्याप शाहजी वगैरे जहागीरदारांच्या हातांतच होते.



# नेहरू चरित्र

[ १४ ]

दहा ऑगस्ट १९२० या रोजीं मित्र राष्ट्रांनीं टर्की राष्ट्राच्या खलीफाचे अधिकार कमी केले. त्यामुळें भारतांतील मुसलमानांचीं मनें दुखावलीं. पंजाबच्या हत्या कांडामुळें भारतीय प्रथमच असंतुष्ट होते. त्या अन्यायाविरुद्ध गांधीजींनीं देशभर प्रवास करून अनत्याचारी विरोध करण्यासाठीं आपला संदेश दिला. अलीबंधूपण त्यांच्याबरोबर प्रवास करीत. हिंदू-मुसलमानांच्या जयजयकारानें सर्व भारतीय आकाश दुमदुमत होतें.

गांधीजींच्या असहकारितेच्या चळवळीविषयीं विचार करण्यासाठीं, १९२० च्या हिंवाळ्यांत कलकत्त्याला कांग्रेसचें एक विशेष अधिवेशन भरलें. या अधिवेशनाचे अध्यक्ष लाला लजपतराय होते.

कलकत्त्याला लाला लजपतराय यांनीं असहकारितेच्या चळवळीचा विरोध केला कीं ती चळवळ अव्यावहारिक आहे. कित्येक जुने कांग्रेसचे मेंबर देशबंधु चित्तरंजन दास,



ॲनीबेसंट महंमदअली जिन्ना त्याच मताचे होते. त्यानंतर डिसेंबर महिन्यांत झालेल्या कांग्रेसच्या अधिवेशनाच्यावेळीं जिन्नांनीं कांग्रेसशीं असलेला संबंध विच्छेद केला. चित्तरंजन दास यांनीं असहकार चळवळीचा विरोध केला नाहीं. परंतु त्यांनीं नवीन राजकीय सुधारणा जाहीर झाल्यानंतर स्थापन झालेल्या विधायक मंडळांच्या बहिष्काराचा विरोध केला.

कलकत्ता अधिवेशन व नागपूर अधिवेशन यांमधले तीन महिने गांधीजींनीं देशभर भ्रमण केलें आणि आपला संदेश देशांतल्या

ही चळवळ इतकी अनत्याचारी होऊं शकेल या गोष्टीवर इंग्रजांचा विश्वासच नव्हता. त्यांना वाटत होतें कीं अहिंसेच्या आड गुंडगिरी वाढेल. याचें एक सुंदर उदाहरण स्वतः जवाहरलालजींनीं दिलें आहे.

मे १९२१ मध्यें स्वरूप (विजयलक्ष्मी पंडित) यांचें लग्न ठरलें. लग्नाचा मुहूर्त १० मे रोजीं पडत होता. लग्नाला गांधीजी अलीबंधू इत्यादि कांग्रेसच्या पुढाऱ्यांना निमंत्रणें गेलीं होतीं. त्यांच्या सोयीसाठीं कॉंग्रेसच्या कार्यसमितीची बैठक अलाहाबाद येथेंच बोलावण्यांत आली होती. मोठमोठे पुढारी येणार होते म्हणून जिल्हा कांग्रेस कमिटीची बैठक पण बोलावण्यांत आली. शेतकरी वर्ग मोठ्या प्रमाणावर हजर राहील याची शक्यता पण दिसत होती.

या सर्व बैठकींच्या तयारीसाठीं अलाहाबाद येथें जोरानें धांवपळ सुरू होती. हें सर्व पाहून अलाहाबादच्या इंग्रजांना वाटलें कीं कांहींतरी भयंकर असें कांड होणार. त्यांचा स्वतःच्या नोकरांवरचा विश्वास पण उडाला. ते नेहमीं खिशांत रिव्हाल्व्हर ठेवूं लागले. अलाहाबादच्या किल्ल्यांत इंग्रजांच्या संरक्षणासाठीं जय्यत तयारी करून ठेवण्यांत आली. जवाहरलालजी चकित झाले, अहिंसा-मूर्ती गांधीजी स्वतः येत असतां अत्याचार व हिंसा होईल अशी भीति इंग्रजांना वाटण्याचें कारणच काय? परंतु नंतर कळलें कीं १० मे रोजीं मीरत येथें ५७ सालीं बंडाचें निशाण उभें केलें गेलें होतें. इंग्रजांना भीति वाटली कीं मोतीलाल नेहरूंच्या मुलीच्या लग्नाचें निमित्त सांगून सन् ५७ च्या बंडाचा वार्षिकोत्सव तर साजरा केला जात नसेल!





# नवाबकुमारी

मंथारणचा किल्ला पहिल्यासारखाच होता. त्याच्या बाजूची आमराई, किल्ल्याखालून वाहणारा दामोदर नद सर्व पहिल्यासारखेंच होतें. त्यादिवशीं रात्रीं विमलाच्या चुकीमुळें पठाण किल्ल्यांत शिरले आणि किती रक्त वाहालें? आणि त्याच रात्रीं नाहीं का वीरेंद्रसिंह पाठाणांच्या हातीं कैद झाला? आपल्या प्रेमिके भेटण्यासाठीं म्हणून जगतसिंह विमला बरोबर किल्ल्यांत आला. तिलोत्तमेला तो भेटला. तिच्या रक्षणासाठीं त्यानें युद्धपण केलें. पण शेवटीं जखमी होऊन कैद झाला. शत्रूनें अमानुषपणें वीरेंद्रसिंहाचा वध केला. त्याबद्दल विमलानें कतलूखानाचा वध करून त्याचा सूड उगवला.

परंतु आतां त्यांच्या खाणाखुणादेखील शिल्लक राहाल्या नव्हत्या. मंथारणचा किल्ला जसा पूर्वीं होता तसाच तो आतांपण होता. फरक एवढाच होता कीं तेथें वीरेंद्रसिंह नव्हता. त्याची मुलगी तिलोत्तमा व बायको विमला तेथें रहात होत्या. विमलाला आयुष्यांत खरें सुख कधींच मिळालें नाहीं. ज्याला तिनें पति म्हणून वरलें होतें त्याच्या बरोबर त्याची पत्नी म्हणून तिला राहतां आलें नाहीं. दासीसारखें रहावें लागलें होतें. तो पतीदेखील शत्रूच्या हातीं ठार झाला.



कांहीं गोष्टी तिच्या मनासारख्या पण घडल्या. कतलखानाचा खून करून तिनें आपल्या पतीसमोर केलेली प्रतिज्ञा पुरी केली होती. तिची लाडकी तिलोत्तमा आतां राजा मानसिंह यांची सून झाली होती. तिचा मुलगा अंबरनरेश होणार ही काय लहान गोष्ट होती?

तिलोत्तमेला वाईट वाटण्यासारख्या कांहीं गोष्टी घडल्या त्याच बरोबर तिला सुखी करणाऱ्या कांहीं गोष्टी पण घडल्या. तिच्या वडिलांशीं तिची कायमची ताटातूट पाणी कतलखानाच्या विलासगृहांत कित्येक दिवस कैदी म्हणून तिला रहावें लागलें होतें. त्या कैदेंत पडणारीला आपल्या अब्रूचें रक्षण करणें अशक्यच होतें. परंतु तिची सुटका त्या वाघाच्या दाढेंतून सुद्धां झाली होती. त्याच प्रमाणें जगतसिंह जवळ जवळ यमपाशांतूनच सुटला होता. आणि आतां तर तिचें त्याच्याशीं लग्नपण झालें होतें. सर्व गोष्टी मनासारख्या घडून आल्या.

पठाणांचा पराभव झाल्यानंतर मानसिंहानें आज्ञा केली होती कीं मंधारणचा किल्ला वीरेंद्रसिंहाची बायको विमला व त्याची मुलगी तिलोत्तमा दोघांना देऊन टाकावा.

जगतसिंह व तिलोत्तमा यांचा विवाह होऊन सुमारें एक महिना लोटला. जगतसिंह अंतःपुराच्या वरच्या मजल्यावर कांहीं तरी विचारांत गर्क होऊन येरझाऱ्या घालीत होता. दारुकेश्वर नदी काठीं मानसिंह छावणी टाकून रहात होता. तो छावणी काढून पाटण्याकडे निघून गेला. त्या पूर्वी जगतसिंह आपल्या वडिलांना जाऊन भेटला नव्हता. तो आपल्या बायको बरोबर मंधारणच्या किल्ल्यांत चार दिवस आनंदानें घालवीत होता.





थोड्या वेळानें तिलोत्तमा आली. दोघांचें या गोष्टीवर बोलणें चालू होतें कीं दोघांत जास्त भाग्यशाली कोण? प्रत्येक स्वतःला जास्त भाग्यशाली मानत होता. जगतसिंहानें स्वतःला भाग्यशाली एवढ्यासाठीं म्हटलें कीं तिलोत्तमेसारखी रूपवती स्त्री काळाच्या दाढेंतून सुटून शेवटीं त्याला लाभली. कित्येक राजकुमार स्वतःला तिच्यावर ओंवाळून टाकायला तयार झाले असते. परंतु त्याच्या भाग्यानेंच तिनें त्याच्या गळ्यांत वरमाळा घातली. उलट तिलोत्तमा म्हणाली—"स्वाभिमानी अंबरराजा मानसिंह यांच्या युवराजांशीं तिचें लग्न व्हावें हें तिचें केवढें भाग्य! शौर्य व पराक्रम दोन्ही मध्यें मोठ मोठ्या शूरांची मान खालीं करणाऱ्या एका वीरपुरुषाशीं तिचें लग्न झालें. तिची मानमर्यादा राखण्यासाठीं जगतसिंह स्वतःच्या जिवावर उदार होऊन लढला होता. ती स्वतः एका यःकश्चित जमीनदाराची मुलगी. अंबरराजाच्या अंतःपुरांत दासी म्हणून राहण्याचीदेखील लायकी नाहीं. तरी आपल्या वडिलांच्या इच्छेविरुद्ध त्यांच्या क्रोधाची पर्वा न करतां जगतसिंहनें तिच्याशींच हट्टानें लग्न केलें होतें. त्यानें लग्न केलें नसतें तर त्याला कोणी नांवें ठेवलीं नसतीं.

तिलोत्तमेनें मानसिंहाच्या क्रोधाची आठवण करून देतांच जगतसिंह पुन्हां चिंतामग्न झाला. म्हणाला—"तो प्रश्न तर आहेच. त्याविषयीं काय करावयाचें हा विचार करायला हवा. बाबा माझ्यावर रागावलेले आहेत ही गोष्ट मला माहीत आहे. ते आपला राग दाखवीत नाहींत. परंतु अनेक गोष्टींवरून ते रागावले असणार असा माझा अंदाज आहे." जगतसिंह म्हणाला.











"तर तुम्ही कां नाहीं त्यांच्या म्हणण्या-प्रमाणें वागत?" तिलोत्तमा म्हणाली.

"तूं तरी किती अबोध व अज्ञान आहेस! तुझ्या प्रेमपाशांत जो एकदां गुरफटला तो मरणाला हंसत हंसत मिठी मारणार नाहीं का? या बाबतींत स्वतःला सुधारण्याचा प्रश्नच उद्भवत नाहीं." जगत-सिंह म्हणाला.

"मग कोणत्या विचारांत मग्न आहां?"

"दोन गोष्टींचा विचार करतों आहें मीं. माझे वडील एक रजपूतवीर आहेत. जी गोष्ट एकदां मनानें घेतली ती प्राण गेला तरी ते सोडणार नाहींत. त्यांना आड येण्याची कोणाची छातीपण नाहीं. स्वतः अकबर बादशाहदेखील त्यांच्या इच्छेविरुद्ध करायला धजत नाहींत. त्यांनीं शिक्षा म्हणून माझें डोकें उडवायचें ठरविलें तरी कोणी मध्यें उभा राहणार नाहीं. तूं भिऊं नकोस, रजपूताला मरणाची भीति नसते. परंतु मरणामुळें जें विरहदुःख सहन करावें लागेल त्याचा विचारच मला जास्त कष्टकारक वाटत आहे." जगतसिंह म्हणाला.

"मला वियोगाची एवढी भीति वाटत नाहीं. कारण वीरपतीबरोबर वीरपत्नीनें प्राणाचा होम कसा करावयाचा असतो हें आम्हांला माहीत आहे." तिलोत्तमा म्हणाली.

"कबूल, परंतु त्याहून जास्त भय वाटण्यासारखी परिस्थिति उत्पन्न होऊं शकेल. माझ्या वडिलांनीं एकदम प्राणदंड न देतां जर मला हाल अपेष्टा सहन करायला लावलें तर?"

"तें कसें काय?" तिलोत्तमेनें विचारलें.

"त्यांना आपलें लग्न आवडलें नाहीं. म्हणून ते दोघांची ताटातूट करायला मागें पुढें पाहणार नाहींत."



तें ऐकून तिलोत्तमेच्या अश्रुधारा सुरू झाल्या. ती म्हणाली—"माझी सावत्र आई विमला आहे. तिनें नाहीं का बाबांशीं लग्न करून अंतःपुरांत एखाद्या दासीसारखें सव आयुष्य घालविलें? मला तुमच्या घरांत दासी म्हणून रहायलादेखील परवानगी मिळणार नाहीं का?"

"अशी घाबरूं नकोस तिलोत्तमा! अग तशी वेळ आलीच तर हें जग का लहान आहे. पृथ्वीच्या पाठीवर आपणां दोघांना खात्रीनें जागा मिळेल. झाडाच्या सावलींत काढूं सारें आयुष्य आनंदानें. तरी मी त्यांचें मन वळवून पाहण्याचा यत्न करणार आहें. पुढें देव ठेवील तसें रहावयाचेंच आहे." जगतसिंह म्हणाला.

"आणखी कांहीं मार्ग निघाला नाहीं तर मरण आपल्या हातीं आहेच." तिलोत्तमा म्हणाली.

त्या दिवशीं रात्रीं दोघांना झोंप आली नाहीं. पहाटे उजाडण्यापूर्वीं तिलोत्तमेला झोंप लागली. जगतसिंह तिची झोंप न मोडतां उठला व बाहेर मोकळ्या जागीं हिंडायला म्हणून घोड्यावर बसून निघाला. तो आपल्या पांढ्या घोड्यावर बसून किल्ल्याचें फाटक



पार करून बाहेर आला. नंतर त्यानें मागें वळून पाहिलें, तिलोत्तमा उठून खिडकी उघडून त्याच्याकडे पहात उभी होती. त्यानें हातानें खूण केली—"मी आलोंच, तूं आंत जा!" आणि पुढें निघून गेला. थोडें पुढें जाऊन परत येण्याचा त्याचा विचार होता.

ज्या आमराईंत त्यानें विमलानें आणून दिलेल्या भाल्यानें एका पठाणाला ठार केलें होतें त्या आमराईंतून जात असतां त्याला विद्यादिग्गज "रसिकराज" भेटला. त्याचें रूप अगदीं विचित्रच होतें. त्याचें रूप व कपडे धड हिंदूचे नव्हते कीं धड मुसलमानी



पण नव्हते. तो जगतसिंहाला पाहून म्हणाला—"खुदानारायण, आपलें कल्याण करो!"

"कोण, गजपति विद्यादिग्गज!" जगतसिंहानें चकित होऊन विचारलें.

"होय! पूर्वीं कधीं संस्कृत व्याकरण शिकलों होतों आतां उर्दू शिकतों आहें. आतां माझें नांव ऐकून कोणाला आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं." दिग्गज म्हणाला.

"पण हा वेष काय? आणि हें रूप काय?"

"ते पठाण इकडून जातांना माझा धर्म व माझा वेष दोन्ही पालटून गेले. मी आपल्या गुरूकडे जाऊन पुन्हां विद्याभ्यास सुरू करायला म्हणून गेलों तेव्हां ते म्हणाले, तीन दिवस गंगाकाठीं रहा, गंगास्नान कर, चम्मन गोटा करून शेंडी ठेवून ये तेव्हां, आंत पाऊल टाकायला मिळेल. म्हणून गुरू आज्ञेप्रमाणें हें रूप झालें आहे." तो म्हणाला.

"पण हा पोशाख?"

"काय करूं सांगा. माझे कपडे ते पठाण घेऊन गेले हो!"

जगत दिग्गजच्या हातांत एक रुपया ठेवून पुढें निघून गेला. थोड्याच अंतरावर शैलेश्वराचें देऊळ होतें. देवाचें दर्शन करून येण्याचें ठरवून तो देवळाकडे वळला.

इतक्यांत त्याला घोड्यांच्या टापांचा आवाज ऐकूं आला. दूर आकाशांत धूळ उडत होती. तें सैन्य असावें किंवा सैन्याची एखादि तुकडी असावी. पठाणांचें सैन्य खास नसणार. पठाण ओडिसा प्रांतांत निघून गेले होते. जें सैन्य उरलें होतें तें सर्व बादशाहांचें होतें. जगतसिंह याच विचारांत कांहीं वेळ जागच्या जागीं थबकला.

लवकरच सैनिक अगदीं जवळ येत असलेले दिसले. ते मानसिंहाचे सैनिक होते. सुमारें पन्नास असतील. नायकाच्या आज्ञेनें सर्व सैनिकांनीं घोडे उभे केले.

तलवारी उपसून त्यांनीं बादशाह अकबर व मानसिंहाचा जयजयकार केला.

जगतसिंहानें पण तलवार उपसून उत्तर म्हणून तसाच जयजयकार केला आणि सरदाराला विचारलें—"मथुरासिंह! हें सर्व काय? बादशाहांची व महाराजांची तब्येत वगैरे ठीक आहे ना?"

मथुरासिंहानें युवराजाजवळ येऊन रुमालांतून एक चिठ्ठी काढून जगतसिंहाला दिली.

"महाराजांची आज्ञा आहे?" जगतसिंहानें विचारलें.

"मी आपला दास आहे. मला क्षमा करावी, महाराजांची आज्ञा आहे कीं आपल्याला असाल तसे महाराजांसमोर हजर करावें." सरदार म्हणाला.

"कोठें जायचें आहे?"

"पाटणा, महाराज तेथेंच आहेत."

"मग प्रवासाची तयारी करूं?"

"युवराज माफ करा. अशी आज्ञा आहे कीं आपण यायला तयार नसल्यास आपल्याला कैद करून आणावें." सरदार म्हणाला.



"म्हणजे आपल्या घरच्या मंडळींचा निराप सुद्धां घेतां येणार नाहीं मला?" जगतसिंहानें विचारलें.

"क्षमा करावी. तशीच आज्ञा आहे!"

"महाराजांची आज्ञा बदलणें शक्य नाहीं हें मला माहीत आहे. पण समजा, मी तुमचा कैदी होणाचें नाकारलें व युद्धाला तयार झालों तर?"

"माझ्या तोंडून त्या सर्व गोष्टी कशाला काढवतां युवराज? महाराजांची आज्ञा आहे कीं युवराजांना जीवित किंवा मृतावस्थेंत आणून समोर हजर करण्यांत यावें."

जगतसिंहानें विचार करून पाहिला, आतां जास्त वादविवाद करण्यांत अर्थ नाहीं. महाराजांना आपल्यावर भयंकर राग आहे. आतां सुटका नाहीं. बाबा सांगतील ती शिक्षा किंवा दंड भोगलाच पाहिजे.

त्यानें मथुरासिंहाला विचारलें–"माझें सैन्य दारुकेश्वर नदीच्या काठीं जहानाबादनजीक पडाव देत आहे, त्याला काय आज्ञा आहे?"

"त्याची व्यवस्था मी करतों." असें सांगून मथुरासिंहनें एका सैनिकाला काय तें सांगून जहानाबादला पाठविलें. जगतसिंह त्या सैनिकाला बोलावून म्हणाला–"मंथारण किल्ल्यानजीक कोणी भेटला तर मी महाराजांना भेटण्यासाठीं निघून गेलों असें सांग."

नंतर जगतसिंह मथुरासिंह व त्याच्या बरोबर आलेल्या सैन्याबरोबर निघाला. त्याच्या इच्छेप्रमाणें मथुरासिंहानें आपल्या बरोबरच्या सैन्याच्या दोन तुकड्या केल्या. मागें एक तुकडी व पुढें एक तुकडी. मध्यें जगतसिंह व मथुरासिंह चालत होते.

[ पुढील गोष्ट पुढील अंकीं ]



# दैवाची माया

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाहीं व पुन्हां झाडाजवळ जाऊन प्रेत काढून खांद्यावर घेतलें आणि नेहमीं प्रमाणें गुपचुप स्मशानाकडे निघाला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! तूं या रात्रीच्या वेळीं इतका कष्ट सहन करीत आहेस. पण हा सर्व वृथा आहे. कांहीं तरी भ्रम तुला झाला असावा व त्याला बळी पडून तूं सर्व कष्ट सहन करीत असावास. तो भ्रम दूर झाला तर तुला व्यर्थ कष्ट सहन केल्याचें दुःख होईल. पुष्कराला तसाच अनुभव झाला होता. तुला मी त्याची गोष्ट सांगतों. ऐक." असें सांगून वेताळ गोष्ट सांगूं लागला.

विन्ध्य पर्वताच्या रानांत पुष्कर नांवाचें एक लहान राज्य होतें. राजाचें नांव पण पुष्करच होतें. तरुण वयांतच तो गादीवर बसला. त्यानंतर थोड्या दिवसांनीं त्याचें



वृद्ध आईवडील वारले. आईबापाची सेवा तो श्रद्धा भक्तीपूर्वक करी. त्याच्या मनांत तितकीच देवभक्तिपण होती. आईवडील वारल्यावर देवाशिवाय आपला कोणी पाठीराखा नाहीं, असें त्याला वाटलें. माझी देवावर इतकी भक्ति व विश्वास आहे. तर मग देवाचा अनुग्रह माझ्यावर कां होत नाहीं ?" असें नेहमीं त्याला वाटे.

बरोबर एक वर्ष लोटलें. आईवडिलांचें वर्ष श्राद्ध आलें. श्राद्धासाठीं आवश्यक ती सर्व तयारी करावी अशी आज्ञा त्यानें आपल्या मंत्र्यांना केली. तो पहाटे उठून नदीवर स्नानाला गेला. देवाचें स्मरण करून त्यानें पाण्यांत बुडी मारली आणि आश्चर्य म्हणजे त्याला अप्सरेसारखी सुंदर चांभाराची एक तरुण मुलगी दिसली. तो तिच्या रूपावर इतका भाळला कीं त्याला तिच्याशीं लग्न करून घेण्याची इच्छा झाली. देवाच्याच कृपेनें ती आपल्यासाठीं या मर्त्यलोकांत आली असेल असेंदेखील त्याला वाटलें. असा विचार करून ती जाऊं लागल्यावर तो तिच्या पाठोपाठ चालूं लागला.

तें पाहून ती म्हणाली—"राजा! मी अस्पृश्य चांभार जातीच्या कुळांत जन्मलेली मुलगी. माझ्या पाठोपाठ तुला येत असलेला पाहून आमच्या घरची वडील मंडळी रागावून मला ठार करतील. म्हणून तूं माझा नाद सोड."

तरी पुष्कर तिच्या पाठोपाठ गेला आणि चांभारांच्या वस्तींत पोंचल्यावर तिच्या बापाला म्हणाला—"मी तुमच्या मुलीशीं लग्न करण्याचें ठरविलें आहे. हिच्याशीं माझें लग्न करून द्या."

चांभार म्हणाले—"या लग्नाला आमची ना नाहीं. परंतु तूं राजा आहेस. तूं चांभाराच्या मुलीशीं लग्न केलेंस तर तुझी प्रजा काय म्हणेल ?" असें सांगून ते राजा काय उत्तर देतो याची वाट पाहूं लागले. राजानें त्यांच्या म्हणण्याकडे दुर्लक्ष केलें व तिच्याशींच लग्न करणार असा हट्ट धरला. तेव्हां त्या मुलीच्या बापानें तिच्याशीं राजाचें लग्न लावून दिलें. राजानें आपलें राज्य व राज्यकारभार सोडला आणि चांभारांच्या वस्तींतच राहूं लागला. त्याला त्या चांभार मुलीकडून दोन मुलगे व एक मुलगी झाली.

चांभारणीच्या भावांनीं बहिणीचा वाढता संसार संभाळणें अशक्य झालें म्हणून तिला दुसरें झोपडें बांधून दिलें व तिथें तिला रहायला सांगितलें. पुष्कराला संसाराचें ओझें जास्त वाटूं लागलें. बायकोनें शिवून दिलेल्या वहाणा व जोडे बाजारांत घेऊन विकण्याचें काम त्याला करावें लागे.

एकदां त्याला लाकडाची एक मोळी बाजारांत विकायला घेऊन जावी लागली. तेव्हां एक गोष्ट लोकांच्या तोंडी त्याला कळली. त्या गांवची राजकन्या अंगाला जें उटण लावी त्यांतलें उरलेलें अंगणांत एका कोपऱ्यांत फेंकून देई. तेथें एक रोपटें उगवलें. परंतु तें रोपटें कसलें हें कोणी सांगूं शकला नाहीं. त्या रोपट्याचें नांव सांगेल



त्याच्याशीं राजकन्येचें लग्न करून देईन अशी राजानें राजधानीभर दवंडी पिटविली.

पुष्करदेखील इतर लोकांबरोबर राजधानींत गेला. त्यानें रोपटें पाहालें व म्हणाला—"हें तर चंदनाचें रोपटें आहे. दासींनीं ती गोष्ट राजाला जाऊन सांगितली. राजाला खात्री पटली व त्यानें पुष्करशीं आपल्या मुलीचें लग्न करून दिलें.

नवरा बाजारांत लाकडाची मोळी विकायला घेऊन गेला तो परत कां आला नाहीं हें चांभारणीला कळेना. पण तिला कांहीं दिवसांनी कळलें कीं तिच्या नवऱ्याबरोबर













राजकन्येचें लग्न झालें आहे व तो राजवाड्यांत ऐश्वर्यांत लोळत आहे. चांभारीण आपल्या मुलांना बोलावून म्हणाली– "बाळांनो! तुमचे बाबा राजवाड्यांत राहतात. जाऊन सांगा कीं खायला कांहीं नाहीं. ते देतील तें घेऊन या."

पुष्कर राजकन्येबरोबर ज्या जागीं रहात होता त्या जागीं खालीं खिडकीजवळ रस्त्यावर उभी राहून मुलें ओरडूं लागलीं– "बाबा! भूक लागली आहे आम्हांला!" पुष्करानें खिडकींतून डोकावून पाहालें व आपल्या मुलांना ओळखून त्यानें आपली अंगठी काढून त्यांच्याकडे फेंकली. त्यांनीं ती आपल्या आईला नेऊन दिली.

राजकन्या त्यावेळीं आरशासमोर बसून वेणीफणी करीत होती. तिनें आरशांतून नवऱ्यानें अंगठी खालीं फेकलेली पाहाली. पण ती कांहीं बोलली नाहीं. ती गोष्ट मनांत ठेवून घेतली.

चांभारणीनें अंगठी विकून कांहीं दिवस संसाराचें गाडें चालू ठेवलें. पण तेवढ्यावर किती दिवस भागणार? तिनें आपल्या मुलांना पुन्हां त्यांच्या बापाकडे पाठविलें. मुलांनीं हांक मारतांच पुष्करनें खिडकींतून सोन्याच्या दोन तबकड्या खालीं टाकल्या. मुलांनीं त्या आईला नेऊन दिल्या.

राजकन्येनें या खेपेसदेखील सर्व पाहिलें. पण बोलली नाहीं. गुपचुप एका कागदावर "ज्या मडक्याला कुत्र्यानें तोंड लावलें आहे त्या मडक्याचें काय करावें?" असें लिहून तो कागद तिनें आपल्या बापाकडे पाठवून दिला.

राजानें "तें मडकें दूर फेंकून द्यावें!" असें लिहून मंत्र्याला तें उत्तर दाखविलें.

मंत्री म्हणाला–"फेंकण्याचें काय कारण? विस्तवांत घालून तापवून घेतलें कीं झालें."

त्या प्रमाणें उत्तर लिहून राजानें आपल्या मुलीकडे पाठवून दिलें.

त्या दिवशीं रात्रीं पुष्कर झोपला असतां राजकन्येनें तो झोपला होता त्या शयनगृहाला आग लावली. पुष्कराच्या अंगावर ठिणग्या व निखारे पडूं लागले तेव्हां तो दचकून जागा झाला, तो पाण्यांतून वर आला. तेव्हां त्याला वडिलांच्या वर्ष श्राद्धाची गोष्ट आठवली. बराच उशीर झाला असा विचार करून तो घाईनें घरीं गेला.

"झालें एवढ्यांत स्नान?" ब्राह्मणांनीं चकित होऊन त्याला विचारलें.

नदीवर तो आंघोळीला गेलों त्या वेळीं बुडी मारल्याबरोबर जें कांहीं घडलें तें सांगून हें सर्व काय असें त्यानें विचारलें. तें ऐकून ब्राह्मण म्हणले–"ही सर्व देवाची माया आहे!"

येथवर गोष्ट सांगून वेताळानें विचारलें– "राजा मला एका गोष्टीची शंका वाटते, देवानें आपली माया अशा तऱ्हेनें कां दाखवावी? याचें उत्तर माहीत असून तूं दिलें नाहींस तर तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्या पायांवर लोळूं लागतील.

राजा म्हणाला–"पुष्कर राज्य कारभारांत लक्ष घालायचें सोडून हरिभजनांत मग्न रहात असे. त्याला प्रजेचें दुःख कळावें आणि मनुष्य किती मोठा झाला तरी मनोविकारांचा कसा गुलाम असतो ही गोष्ट त्याला कळावी म्हणून स्वतः विष्णूनें आपली माया रचली होती."

अशा प्रकारें राजाचें मौन भंग होतांच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला व झाडाच्या फांदीला जाऊन लोंबकळूं लागला. [कल्पित]





# तारावलोक

कधीं काळीं शिबिदेशाच्या गादीवर चंद्रावलोक नांवाचा राजा राज्य करीत असे. त्याच्या राणीचें नांव चंद्रलेखा होतें. राजाकडे कुवलयापीड नांवाचा एक हत्ती होता. त्या हत्तीच्या भीतीनें कोणी चंद्रावलोकाच्या राज्यावर स्वारी करण्याची हिंमत करीत नसे.

चंद्रावलोकाच्या एकुलत्या एका मुलाचें नांव तारावलोक असें होतें. तो स्वभावानें अगदीं निष्कपट धर्मपरायण व पितृभक्त होता. तो विद्वान व दानी पण होता

तारावलोक मोठा झाल्यावर राजानें मद्रदेशाच्या माद्री नांवाच्या राजकन्येशीं त्याचा विवाह करून दिला. त्याला समजूं लागलें तेव्हां पासूनच तो दानधर्म करूं लागला होता. आतां तर त्याचें लग्न झालें होतें व राजानें त्याला आपला युवराज म्हणून नेमलें होतें. सकाळीं उठल्याबरोबर तो कुवलयापीडवर बसून निघे व जो कोणी दान करण्यास पात्र आढळे त्याला दान करी. त्याचा दानधर्म पाहून लोक त्याला कर्णाचा अवतार मानूं लागले.

कांहीं दिवसांनीं माद्रीला एक जुळें झालें. त्यांचीं नांवें राम व लक्ष्मण अशीं ठेवण्यांत आलीं. नातवंडें आजा व आजीचीं फार लाडकीं होतीं. सर्व लोक तारावलोकासारखा भाग्यवान कोण आहे असें म्हणत.

परंतु शिबी राज्याच्या शत्रूच्या डोळ्यांत तारावलोकाला मिळत असलेली लोकप्रियता सलूं लागली. त्यांपैकीं एकानें कांहीं ब्राह्मणांना बोलावून कुवलयापीड हत्तीलाच दान म्हणून मागून घ्यायला सांगून पाठविलें. तो हत्ती त्याच्याकडून गेला कीं त्याचें हें सर्व वैभव लयास जाईल व त्याची मान खालीं होईल व त्यानंतर आम्ही त्याच्या राज्यावर स्वारी करून त्याचें राज्य जिंकून घेऊं. समजा, त्यानें तो हत्ती दान केला नाहीं तर त्याच्या दानशूरत्वाच्या वल्गना फुकट जातील.

ब्राह्मणांनीं त्याप्रमाणें तारावलोकच्या जवळ जाऊन कुवलयापीड हत्ती मागितला. तारावलोकला हें कळायला वेळ लागला नाहीं कीं कोणाच्या तरी सांगण्यावरून त्यांनीं तो मागितला असावा. परंतु जिवांत जीव असेपर्यंत कोणी कांहीं मागितलें तर नकार द्यावयाचा नाहीं असें व्रतच जणुं कांहीं त्यानें घेतलें होतें. म्हणून त्यानें कुवलयापीड हत्ती ब्राह्मणांना दान केला.

ब्राह्मण हत्तीला घेऊन जात आहेत हें नागरिकांनीं पाहिलें. त्यांना राग आला. प्रजेचा सला घेतल्याशिवाय राजानें जरी तसें दान केलें असतें तरी तें प्रजेला पसंत पडलें नसतें. म्हणून प्रजेचे प्रतिनिधि चंद्रावलोक राजाकडे गेले व म्हणाले—"महाराज! राज्य करण्याची इच्छा युवराजांच्या मनांत असेलसें दिसत नाहीं. नाहीं तर ज्याचें नुसतें नांव



ऐकून शत्रूचा थरकांप उडून जातो अशा कुवलयापीडला युवराजांनीं असा दान करून राज्याबाहेर पाठवून दिला नसता. म्हणून कुवलयापीडला परत तरी घेऊन यावें किंवा युवराजांना या अपराधाबद्दल वनवासाची शिक्षा द्यावी. आपणांस ही गोष्ट पसंत नसेल तर आम्हांला दुसऱ्या राजाची निवड करावी लागेल."

चंद्रावलोकनें तारावलोकला तें कळविलें. तेव्हां तारावलोक म्हणाला—"ब्राह्मणांना दान म्हणून मी जो हत्ती दिला तो आतां परत कसा मागूं? प्रजेचें राज्य आहे त्यावर



माझा काय अधिकार ? मनाप्रमाणें दानधर्म करण्याचादेखील मला अधिकार नसेल तर हें सर्व ऐश्वर्य व वैभव तरी कशाला ? मी वनवास भोगण्यास तयार आहें."

तो वल्कलवस्त्र धारण करून बायकोला व मुलांना घेऊन वनवासास निघाला. बायकोला व मुलांना त्यानें गाडींत बसविलें व स्वतः पायीं चालूं लागला.

वाटेंत त्याला आणखी कांहीं ब्राह्मण भेटले. त्यांनीं त्याच्या जवळ गाडीचे घोडे मागितले. त्यानें नकार दिला नाहीं व गाडीचे घोडे सोडून त्यांना दिले. आतां नवराबायको गाडी ओढून घेऊन जाऊं लागलीं. वाटेंत एका जागीं विश्रांतीसाठीं तीं एका झाडाखालीं बसलीं. इतक्यांत एका ब्राह्मणानें येऊन ती गाडी सुद्धां मागून घेतली. आतां नवराबायको दोघां मुलांना उचलून घेऊन पायीं पुढ निघाले. ते एका तपोवनांत जाऊन तेथें निवाऱ्यासाठीं एका झाडाच्या सावलींत झोंपडी बांधून राहूं लागले.

माद्री पतीच्या पावलावर पाऊल ठेवून चालणारी एक पतिव्रता व साध्वी स्त्री होती. ती कंदमुळें व फळें घेऊन येण्यासाठीं रानांत गेली असतां त्यांच्या झोंपडीजवळ एक म्हातारा ब्राह्मण आला. त्यानें तारावलोकच्या सुंदर मुलांना पाहून त्याच्याकडून दोघांना मागून घेतलें. तारावलोकनें निस्संकोच दोघां मुलांना दान म्हणून देऊन टाकलें.

"देव कदाचित माझी सत्वपरीक्षाच पहात असावा. मुलांचा विरह एक वेळ मला सहन होईल परंतु मी नकार दिल्यानें मागणाऱ्याच्या मनाला जें दुःख होईल तें मला सहन होणार नाहीं." अशी स्वतःच्या मनाची समजूत घालूनच त्यानें दोन्ही मुलांचें दान केलें होतें.



राम व लक्ष्मण त्या ब्राह्मणाबरोबर जायला तयार झाले नाहींत. त्या ब्राह्मणानें दोघां मुलांना वेलाची एक दोरी करून बांधलें व त्यांना फरफटत ओढीत व मार हाण करीत घेऊन चालला. मुलें मोठमोठ्यानें 'आई !' 'आई !' म्हणून ओरडत मागें वळून आपल्या बापाकडे पहात त्या ब्राह्मणाबरोबर जाऊं लागली.

कांहीं वेळानें माद्री कंदमुळें व फळें घेऊन आपल्या झोंपडींत आली. पतीला मान खालीं घालून बसलेला पाहिलें. तेथें मुलें नव्हती. त्यांचीं खेळणीं, मातीचा रथ, घोडे वगैरे वेडेवांकडे पडलेले होते. तिच्या पोटांत धस्स झालें. तिनें विचारलें—"मुलें कोठें आहेत ?"

तिनें तेवढा प्रश्न केला मात्र, इंद्राचें आसन डोलूं लागलें. माद्री व तारावलोक यांच्या दानधर्माच्या प्रतापानें इंद्रलोक डोलूं लागलेला पाहून इंद्र ब्राह्मणरूप घेऊन तारावलोकाच्या आश्रमाजवळ येऊन उभा राहाला. त्यानें त्याच्याजवळ त्याची पत्नी माद्रीचें दान मागितलें. तारावलोक त्याला देखील कबूल झाला.



"अरे, आतां तर तुझ्याजवळ कांहींच उरलें नाहीं मग तूं पुढें काय करणार ?" इंद्रानें प्रश्न केला.

"मला कोणत्याहि वस्तूची गरज नाहीं. पुढें कोणी ब्राह्मणानें दान मागितलें तर देण्याची शक्ति आपल्यांत उरणार नाहीं याच गोष्टीचें दुःख होत आहे. दान म्हणून स्वतःचा प्राण समर्पण करावा लागला तरी मी त्याला तयार आहें."

इंद्र प्रकट होऊन म्हणाला—"तुझ्या पत्नीचें दान मी मागितलें होतें. पण तें तुझी परीक्षा घेण्यासाठीं होतें. तूं लवकरच










विद्याधरांचा चक्रवर्ति होशील" असें सांगून इंद्र अंतर्धान पावला.

तिकडे तो ब्राह्मण रामलक्ष्मणांना घेऊन जाऊन चंद्रावलोकाच्या राजधानींतल्या एका गल्लींत विकून टाकण्याचा यत्न करूं लागला. नागरिकांनीं मुलांना ओळखलें. त्यांनीं त्या ब्राह्मणाला पकडून राजासमोर हजर केलें. त्या ब्राह्मणाकडून राजाला घडलेलें सर्व वृत्त कळलें. आपल्या मुलाचा तो दानशूरपणा पाहून राजाला स्वतःच्या राज्यांचा व वैभवाचा वीट आला. त्यानें राज्यत्याग करून तपश्चर्या करण्याचें ठरविलें.

नागरिकांनीं अनेक प्रकारें समजूत घालण्याचा यत्न करून पाहिला. परंतु राजानें त्यांचें ऐकलें नाहीं. पैसे देऊन राजानें आपल्या नातवंडांना विकत घेतलें आणि राणीसह नातवंडांना बरोबर घेऊन तारावलोक रहात होता त्या आश्रमांत गेला. आईवडिलांना येत असलेले पाहून तारावलोकनें धांवत येऊन त्यांच्या पायाला मिठी मारली.

सर्व एकत्र बसून बोलत असतां लक्ष्मी एका हत्तीला घेऊन आकाशांतून उतरली. ती तारावलोकाला म्हणाली—"या हत्तीवर बसून तू विद्याधरांच्या देशांत जा. तूं केलेल्या दानाचें पुण्यफळ म्हणून तुला त्या देशाचें चक्रवर्तीपद मिळालें आहे."

तारावलोक बायको व मुलांसह आई वडिलांना व लक्ष्मीला नमस्कार करून हत्तीवर बसला. सर्वांसमक्ष तो हत्ती तारावलोक, माद्री, राम, लक्ष्मण व लक्ष्मीला घेऊन आकाशांत उडाला. तेथें विद्याधर देशाचे राजे महाराजे प्रकट झाले व आदर पूर्वक आपल्या चक्रवर्तीला आपल्या देशांत घेऊन गेले.





# राज्याचा लोभ

व्याघ्रपाद व सत्यशेखर नांवाचे दोघे राजकुमार एका गुरूजवळ विद्याध्ययन करीत असत. दोघांनीं परस्परांची मैत्री कायम रहावी व राजा झाल्यावर देखील परस्परांचें युद्ध होऊं नये यासाठीं एक संधी करून घेतली. संधीची मुख्य अट अशी होती कीं ज्याला पहिल्यानें मुलगा होईल त्याला दोन्ही राज्यें मिळतील.

दोघांचा विद्याभ्यास संपला. दोघांचीं लमें झालीं. पुढें कांहीं दिवसांनीं व्याघ्रपदची बायको गरोदर असल्याचें कळलें. व्याघ्रपदनें ज्योतिष्यांना बोलावून विचारलें कीं मुलगा होणार कीं मुलगी. राजा व राणी दोघांच्या भीतीनें ज्योतिष्यांनीं मुलगा होणार असे सांगितलें. राजधानीभर मुलगा होणार या गोष्टीची चर्चा झाली, परंतु झाली मुलगी. तें ऐकून व्याघ्रपदला व त्याच्या बायकोला फार वाईट वाटलें. त्यानें दास दासींना बजावून ठेवलें कीं कोणी विचारलें तर मुलगाच झाला आहे असें सर्वांनीं सांगितलें पाहिजे. त्यानें आपल्या मुलीचें नांव विजय ठेवलें. बारशाच्या दिवशीं त्यानें सत्यशेखरलापण बोलावणें पाठविलें.

सत्यशेखर बारशाला आला व वचनदिल्याप्रमाणें त्यानें आपल्या मित्राच्या मुलाला आपलें सर्व राज्य देऊन टाकलें व्याघ्रपादानें केलेला मित्रद्रोह त्याला कळला नाहीं.

त्याचवेळीं विदिशा नगरीचा राजा मृगोवद्दत्त याला पुरुषराशी, पुरुष ग्रह व पुरुष मुहूर्तावर एक मुलगी झाली.












तिचें नांव धीर ललिता असें ठेवण्यांत आलें. मृगोक दत्तीला दुसरें मूलबाळ नव्हतें. तिच्याशीं आपल्या मुलाचें (मुलीचें) लग्न करून दिल्यास मृगोकदत्ताचें राज्य पण आपल्याला मिळेल या आशेनें त्यानें मृगोकदत्ताकडे निरोप पाठविला कीं आपल्या मुलीशीं आमचे युवराज विजय यांचा विवाह व्हावा अशी आमची इच्छा आहे. मृगोकदत्तानें त्याला होकार दिला. धीर ललिता अजून लहानच होती. तरी तिच्याशीं विजयचा लग्न समारंभ उरकून घेण्यांत आला.

धीर ललिता मोठी होऊं लागली तस-तशीं तिच्या वाढीबरोबर स्त्री लक्षणांऐवजीं पुरुषलक्षणेंच जास्त वाढत असल्याचें आढळून आलें. तिला दागिन्यांचा तिटकारा होता. कोणाची पर्वा केल्याशिवाय ती नेहमीं पुरुषांबरोबरच हिंडे फिरे.

व्याघ्रपादानें त्याला मुलगा झाल्याचें जगजाहीर केलें असल्यामुळें, कोणाला खरी गोष्ट कळूं नये यासाठीं त्याला विशेष काळजी घ्यावी लागे. त्यानें सुनेला आणण्याचा आग्रह दाखविला नाहीं. मृगोक-दत्तानें पण आग्रह केला नाहीं कीं सुनेला घेऊन जा. कारण त्याला मूल म्हणून ती एकच मुलगी होती. सासरची मंडळी बोलावितील तेव्हां पाठवून देऊं मुलीला असा त्यानें विचार केला.

परंतु मुलींत स्त्रीलक्षणें लुप्त होऊं लागलेली पाहून व ती सासरचें नांव काढलें कीं चिडून जाते हें ओळखून मृगोकदत्तानें आपल्या मुलीला तिच्या सासरीं पाठवून द्यायचें ठरविलें व तसें तिला सांगितलें.

“माझा नवरा? आणि मी संसार करणार त्याच्या बरोबर? मी नाहीं जाणार कोणाच्या घरीं!” धीर ललिता म्हणाली.

“तरमग तूं आमची अब्रू चव्हाट्यावर आणण्याचा विचार केला आहेस कीं काय?” त्यानें रागावून मुलीला विचारलें.

“मला कोणाची अब्रू किंवा गौरव वगैरे कांहीं नाहीं कळत. जीव गेला तरी मी नवऱ्याच्या घरीं जाणार नाहीं.” धीर ललिता म्हणाली.

“तुझ्यासारखी पोरगी माझ्या पोटीं जन्माला आली अशीं नांवें लोकांनीं ठेवलेली मला नाहीं खपायची. त्यापेक्षां मी तुझा गळा दावून मोकळा होईन.” बाप म्हणाला. “तुम्ही निरपराध्याचा जीव घेतल्याबद्दल







लोक तुमची निंदा करतील. परंतु तुमची लोकनिंदा होऊं नये यासाठीं मी तुम्हांला हा बाण मारते. या अपराधाबद्दल तुम्ही माझा शिरच्छेद केलात तरी कोणी तुम्हांला दोष देणार नाहीं व तुमची इच्छा पण पुरी होईल." असें सांगून धीरललितानें आपल्या वडिलांना हळूच बाण मारला. परंतु तेवढ्यानें मृगोकदत्ताला जबर जखम झाली. मुलीच्या अंगांत इतके बाण कोठून आले हें पाहून त्याला आश्चर्य वाटलें. त्यानें तिच्या अंगावर एक जंबिया फेंकला. धीर ललिताला विशेष लागलें नाहीं. ती हंसत उठून उभी राहाली व म्हणाली—"बाबा ! मी स्त्री नसून पुरुष आहें. हें तुम्हांला कळावें म्हणून थोडा उर्मटपणानें बोललों. त्याबद्दल मला माफ करा."

त्या दिवसापासून धीर ललिता धीर ललित म्हणून प्रसिद्ध झाली. प्रजेला फार आनंद झाला. कारण ईश्वर कृपेनें त्यांना एक युवराज मिळाला आणि तो सुद्धां सामान्य नव्हे, एक वीर व पराक्रमी. राजानें त्याला आपला सेनापति नेमलें.

तें सर्व व्याघ्रदत्ताला कळलें त्यानें मृगोकदत्ताला ऐटींत पत्र लिहिलें. "इतके दिवस आपल्याला एकुलती एक मुलगी आहे म्हणून सुनेला आणण्याची घाई दाखविली नाहीं. तरी सुनवाईच्या पाठवणीची लवकर व्यवस्था करावी."

मृगोकदत्ताची मुलगी मुलगा झाली असल्याचें सर्वांना कळलेंच होतें एवढेंच नव्हें तर राज्याचा मुख्य सेनापति म्हणून त्याची नेमणूक झाली असल्याचें पण सर्वांना माहीत होतें. आपला अपमान करण्याच्या हेतूनेंच व्याघ्रदत्तनें असें पत्र लिहिलें आहे हें मृगोकदत्तानें ओळखलें तरीपण त्यानें खरें खरें वृत्त लिहून कळविलें.

व्याघ्रपादानें एका शब्दानेंदेखील कळविल्याशिवाय विदिशानगरीवर स्वारी केली. मृगोकदत्ताचें सैन्य नेहमीं जागरूक असे.

व्याघ्रपादानें दूत पाठवून मृगोकदत्ताला विचारलें—"तुला स्वाभिमान व लोकलाज आहे कीं नाहीं ? आपल्या मुलाला मुलगी म्हणून सांगून माझ्या मुलाशीं तूं लग्न करून दिलेंस. तुझ्या या अपराधाबद्दल तूं येऊन माफी मागीतलीस तर मी माफी करायला तयार आहें. पण तूं आपलें राज्य मुकाट्यानें माझ्या स्वाधीन केलें पाहिजेस. नाहीं तर मी तुझें राज्य स्वाधीन करून घेऊन तुझा शिरच्छेद करीन."



त्याचें उत्तर म्हणून मृगोकदत्तानें धीर ललितला व्याघ्रपादाच्या समाचारास पाठविलें. दोघांचें भयंकर युद्ध झालें व त्या युद्धांत धीर ललितचा बाण लागून व्याघ्रपाद हत्तीवरून खालीं पडला. धीर ललितनें त्याचा किरीट काढून दूर फेंकून दिला व त्याचे केस धरून त्यानें व्याघ्रपादाला विचारलें—"तूं पाठविलेला निरोप माझ्या वडिलांना मिळाला आहे. ते तुझ्या हातीं शिरच्छेद करून घ्यायला तयार आहेत." असें सांगून धीर ललितनें व्याघ्रपादाला कैद केलें आणि त्याला राजधानींत घेऊन जाऊन आपल्या वडिलांच्या पायांवर नेऊन टाकलें.

पण मृगोकदत्तानें व्याघ्रपादाला आदरपूर्वक उठवून त्याला एका राजाला उचित असें आसन बसायला दिलें व म्हणाला—"राजानें आपल्या शत्रूचें बळ ओळखल्याशिवाय त्याच्या राज्यावर स्वारी करूं नये. तुला आपल्या शक्तीची फार घमेंड होती. ती घमेंड मोडावी म्हणूनच मी तुझ्याशीं युद्ध करण्याचा विचार केला. बरें तर आतां बोल, तुला स्वतःचा जीव हवा आहे कीं सून ?"

जवळच धीर ललित उभा होता. म्हणाला—" बाबा ! तुम्ही म्हणालांत म्हणून मी याला जिवंत सोडलें आणि याला आपल्या समोर घेऊन आलों. यानें जो अपराध केला आहे त्याला एकच दंड आहे, तो म्हणजे याचा शिरच्छेद. अशा शत्रूवर दया दाखविणें ही राजनीति नव्हे. असें सांगून त्यानें आपली तलवार उपसली.

लगेच व्याघ्रपादानें मृगोकदत्ताचे पाय धरून माफी मागितली व म्हणाला—" मी तुमच्या राज्यावर स्वारी केली होती ती तुम्ही विसरून जा. आपला जो संबंध आहे तो कायम आहे. मला आपल्या घरून सुनबाई न्यायची नसून जांवई न्यावयाचा आहे. मला मुलगा नसून मुलगीच आहे व तिचें नांव विजय नसून विजया आहे. तिला आपण आपली सून करून घ्यावी. ती माझी मुलगी आहे ही गोष्ट तुम्ही थोडा वेळ विसरा व तिला आपली सून म्हणून आपल्या घरांत नांदायला परवानगी द्या. मी राज्यलोभानें आपल्या मित्राला फसवून त्याचें राज्य घेतलें. आपलें राज्यदेखील घेण्याचा मोह मला झाला होता. मी केलेल्या अपराधाबद्दल मला क्षमा करा."

मृगोकदत्तानें सत्यशेखरकडे व व्याघ्रपाद याच्या घरीं निरोप पाठवून सर्वांना बोलाविलें. सत्यशेखरला सर्व वृत्तांत कळला व त्याच्या बालमित्रानें त्यास फंसवून दिलेल्या कष्टाबद्दल त्याला फार वाईट वाटलें. त्याला त्याचें राज्य परत मिळालें. धीर ललितचें लग्न व्याघ्रपादच्या मुलीशीं झालें. तें लग्न पुन्हां शास्त्राप्रमाणें करावें लागलें. कारण पत्नी म्हणून जिला वरलें ती पति व पति म्हणून ज्याला वरलें तो पत्नी झाला होता.





# चोराला रत्नहार

एका राजाला रत्नवती नांवाची एक मुलगी होती. राजाला दुसरें अपत्य नव्हतें, त्यांत ती रूपवतीपण होती. म्हणून आई-वडिलांची ती फार लाडकी होती. आई-वडिलांनीं मोठ्या हौसेनें तिच्यासाठीं दागिने करविले.

एकदां कांहीं जव्हेरी त्या गांवीं आले. रत्नवतीनें एक हिरा निवडून घेतला. तो एक फार जुना व प्रसिद्ध हिरा होता. तो हिरा मिळविण्यासाठीं मोठमोठीं युद्धें झाली होतीं. परंतु पुढें सुमारें शंभर वर्षे तो हिरा मातीच्या ढिगावर पडून राहिला होता. तो हिरा रत्नवतीनें विकत घेतला. तो नेहमीं तिच्या भांगांतून कपाळावर लोंबत असे. वीरदास नामक एका चोराला ती गोष्ट कळली. तो राजधानींत वेष पालटून हिंडूं फिरूं लागला. कित्येक राजवाड्यांत त्यानें चोऱ्या केल्या होत्या. परंतु त्याचा चेहरा-मोहरा कसा आहे हें देखील कोणाला ठाऊक नव्हतें.

जो हिरा रत्नवतीच्या कपाळावर रात्रं-दिवस लोंबत असतो, तो चोरून नेणें कांहीं सोपें नव्हतें. तरी साहस करून चोर रत्नवतीच्या शयनगृहांत शिरला. त्यानें रत्न-वतीच्या नाकाजवळ कांहीं तरी औषध लावून भूल दिली व ती बेशुद्ध झाल्यावर तिला उचलून रानांतल्या आपल्या गुप्त निवास स्थानीं घेऊन गेला.

मुलगी अदृश्य झालेली पाहून राजा व राणी काळजींत पडलीं. राजाच्या शिपा-यांनीं पुष्कळ शोध केला. परंतु शोध लागला नाहीं. म्हणून राजानें जाहीर केलें

श्री का. रा. पाटील

कीं जो कोणी मुलीचा शोध लावून देईल त्याच्याशीं मुलीचें लग्न करून देण्यांत येईल.

शेजारच्या राज्यांत जयंत नांवाचा राजकुमार होता. त्याला ती गोष्ट कळली. त्यानें रत्नवतीचा शोध लावण्याचें मनाशीं ठरविलें. तो एक हुशार, शूर व सुंदर तरुण युवक होता. विवाहासाठीं सुंदर राजकन्येच्या शोधार्थ तो कित्येक देश हिंडला होता. परंतु त्याला एकदेखील राजकन्या पसंत पडली नव्हती. म्हणून त्यानें रत्नवतीचा शोध काढण्याचें मनाशीं ठरविलें.

त्यानें रत्नवतीच्या रंगारूपाची व स्वभावाची सर्व माहिती विचारून घेतली. प्रत्येकानें तिच्या अपूर्व सौन्दर्याचें वर्णन केलें. तिच्या चातुर्याचीदेखील प्रत्येकानें फार प्रशंसा केली. सर्वांना आश्चर्य वाटलें तें या गोष्टीचें कीं अशी हुशार राजकन्या नाहींशी कशी काय झाली? तिला कोणी व कसें उचलून नेलें हें कोणाला माहीत नव्हतें. काय वाटेल तें झालें तरी तिचा शोध लावण्याचा त्यानें चंग बांधला. तिला उचलून नेणारा कोणी तरी अट्टल चोर असला पाहिजे. त्याच्या हातांतून तिला सोडवावयाचें म्हणजे तो चोर कोण व कसा आहे हें कळलें पाहिजे. परंतु तें कळायला मार्ग नव्हता.

तिकडे रत्नवती त्या चोराच्या गुप्त स्थानीं राजकुमारीसारखीच रहात होती. तिचें रूप पाहून वीरदासला ती स्वतःच्या मुलीसारखी वाटूं लागली होती. तो तिच्या सुखासाठीं वाटेल तो त्याग करण्यास तयार झाला. तो तिला "माझे आई...." म्हणून हांक मारी व तिला कोणत्याहि प्रकारें कष्ट होऊं नये याची काळजी वाही.

कांहीं दिवसांनीं रत्नवतीला वीरदासाच्या वात्सल्यप्रेमामुळें तिच्या वडिलांची आठवणदेखील होईनाशी झाली. तिला त्या दाट अरण्यांत कोणत्याहि वस्तूची कमतरता भासली नाहीं. राजवाड्यापेक्षां तिला तें रानच जास्त आवडूं लागलें.

वीरदासनें आपल्या मानलेल्या मुलीचें लग्न करून द्यायचें ठरविलें. तिचें लग्न कोणत्या तरी राजकुमाराशीं करून द्यावें असें त्यानें ठरविलें. त्यानें अनेक देशांच्या राजकुमारांच्याविषयीं विचार करून पाहिला. त्यांपैकीं एकदेखील त्याला आपल्यामुलीला योग्य असा वर वाटला नाहीं. पण तो निराश होऊन स्वस्थ बसला नाहीं. मुलीसाठीं

















योग्य वर हुडकून काढलाच पाहिजे असा विचार करून तो घराबाहेर पडला.

वीरदास एका गांवी पोंचला तेव्हां त्या गांवांत एक विचित्र चोरी झाल्याचें त्यानें ऐकलें. मध्यरात्रीच्या सुमारास कोणी चोर राजाच्या अंतःपुरांत शिरला आणि राजाच्या खजिन्यांतून चोरलेलीं रत्नें व माणिक्यें एका गाठोड्यांत बांधून तें दासीच्या उशाशीं ठेवून निघून गेला. त्यानंतर दुसऱ्या दिवशीं राणीच्या गळ्यांतला रत्नहार चोरीला गेला व तो मंत्र्याच्या बायकोच्या गळ्यांत सांपडला. अशा तऱ्हेनें अनेक चोऱ्या झाल्या. परंतु चोरीस गेलेल्या वस्तू दुसऱ्या अनपेक्षित जागीं सांपडल्या.

अशी चोरी करणाऱ्याला चोर म्हणावें तर कसें ? पण त्यानें मनांत घेतलें तर कोठेंहि ठेवलेली कोणतीहि वस्तु चोरी करून न्यायची शक्ति त्याच्या अंगांत होती एवढें मात्र ठरलें. अशा चोराला सोडून देणें मूर्खपणाचें होईल असा विचार करून राजानें चोराला पकडून देणाराला मोठें बक्षिस देण्यांत येईल असें जाहीर केलें.

वीरदासनें त्या विचित्र चोराविषयीं ऐकलें तेव्हां त्यानें मनांतल्या मनांत त्या चोराची प्रशंसा केली. आपण चोराला पकडून दिलें तरच आपण त्याच्याहून मोठे चोर ठरूं नाहींतर आयुष्यभर केलेला चोरीचा धंदा काय कामाचा ? चोराला चोरानेंच पकडावें.

जयंतनेंच रत्नवतीच्या शोधार्थ ह्या विचित्र-चोऱ्या सुरू केल्या होत्या. आपण या तऱ्हेच्या चोऱ्या करूं लागलों कीं तो अट्टल चोर आपल्या शोधार्थ येईल व तो आला कीं रत्नवतीचा शोध लागेल, या विचारानें त्यानें त्या विचित्र प्रकारच्या चोऱ्या सुरू केल्या होत्या. त्याला लवकरच वीरदास त्याचा पाठलाग करीत असल्याचें आढळून आलें. त्यानें ज्या ज्या जागीं चोरी केली होती त्या त्या जागीं वीरदास पण नंतर गेला होता हें त्याला कळलें. आतां वीरदास कोण व कसा आहे तो कोठें राहातो वगैरे गोष्टींचा शोध लावण्याचें त्यानें ठरविलें.

दोन तीन दिवसांत वीरदास कोण हें त्याला कळलें. एक दिवस वीरदास आपल्या मुलीला भेटून येण्यासाठीं आपल्या गुप्त-स्थानीं जात असतां जयंत त्याच्या पाठोपाठ गेला. वीरदास तेथें होता तोंपर्यंत जयंत एका जागीं लपून राहाला. पण वीरदास निघून गेल्यावर तो त्याच्या गुप्त गृहांत शिरला. तेथें रत्नवती होती. तिचें रूप पाहून तो थक्क झाला. मर्त्यलोकांत इतकी सुंदर स्त्री असूं शकेल याची कल्पनादेखील त्याला नव्हती. जयंतला पाहून रत्नवतीला देखील आश्चर्य वाटलें. दोघांनीं परस्परांना मनांतल्या मनांत वरलें.

हळूहळू रत्नवती कडून जयंतला सर्व गोष्टी कळल्या. वीरदास तिला उचलून घेऊन आला तेव्हांपासून तिला तो स्वतःच्या मुलीसारखा वागवीत आहे व तीदेखील आपल्या आई वडिलांना विसरून त्यालाच आपला बाप मानीत आहे हें कळलें.





“तुझ्या रूपाचें वर्णन ऐकून मी तुझ्या शोधार्थ आलों. तर मग चल, तुझ्या आई-वडिलांकडे जाऊं.” जयंत तिला म्हणाला.

“आपण असे निघून गेलों तर त्या बिचाऱ्याच्या जिवाचें काय होईल? मला येथून पळून गेलेली पाहून तो आत्महत्याच करून घेईल. म्हणून तो आल्यावर आपण त्याच्याशीं बोलूं. तो माझ्या इच्छेविरुद्ध कांहीं करणार नाहीं. त्याला कळविल्याशिवाय मी तुझ्याशीं लग्न करायला तयार नाहीं.” रत्नवती म्हणाली.

जयंत वीरदास येईपर्यंत त्याची वाट पहात तेथेंच राहाला. दोन दिवसांनी तो निराश होऊन परत आला. कारण चोर राजधानीबाहेर कोठें तरी गेला आहे हें त्याला कळलें होतें. दोन तीन दिवसांत कोठेंच चोरी झाली नाहीं म्हणून त्यानें तसें अनुमान लावलें होतें.

वीरदास घरीं आला तेव्हां तें त्याला रिकामें दिसलें. रत्नवती घरांत नव्हती. ती कोठें गेली असेल हें कळायलादेखील कांहीं उपाय नव्हता. तो घरीं येईपर्यंत वाट पाहाणारी मुलगी एकटी कोठें तरी जाणें शक्य नव्हतें. तिला कोणीतरी पळवूनच नेली असावी असें त्याला वाटलें.

वीरदासनें “माझे आई!” अशा हाका मारीत सारें रान पालथें घातलें. पण रत्नवती त्याला दिसली नाहीं. तो परत आला तेव्हां रत्नवतीच्या पलंगावर त्याला एक चिठ्ठी दिसली. ती त्यानें वाचून पाहाली—“जें काम एक चोर करूं शकतो तें दुसरादेखील करूं शकतो.”

तो आला त्या वेळीं ती तेथें नव्हती. कोणीतरी वस्ताद चोर आपल्या घरांत शिरला होता तर, त्यानें विचार केला आणि मोठ्यानें ओरडून म्हणाला—“कोण आहेस तूं? समोर कां नाहीं येत?”



जयंत बाहेरून आंत आला. त्याच्या बरोबर रत्नवती पण आली. त्याला पाहून तो मनांत म्हणाला—“माझ्या लेकीला योग्य वर आहेस खरा!” परंतु करड्या स्वरांत म्हणाला—“कोण तूं?”

“मीच तो! तूं माझ्याहून मोठा आहेस व मला पकडण्यासाठीं इतके दिवस सटपट करीत आहेस. पण तुला निराश झालेला पाहून मी स्वतः समोर आलों आहें.” जयंत म्हणाला.

तें ऐकून वीरदासला आनंद झाला. ज्याचा शोध आपण काढीत आहों तो चोर म्हणजेच आपल्या मुलीवर प्रेम करणारा तरुण युवक आहे. तो आपल्या मुलीशीं त्याचें लग्न करून द्यायला तयार झाला.

जयंत म्हणाला—“मी लग्नाला तयार आहें. पण माझ्या लग्नाला वऱ्हाडकरी पुष्कळ आहेत. माझे वडील एका देशाचे राजे आहेत. ते राज्यपरिवारासह येणार व त्यांच्या बरोबर राज्याचे सर्व मानकरी पण येणार. रत्नवतीशीं माझें लग्न झाल्यानें आम्हांला आणखी एक राज्य मिळणार आहे. म्हणून तूं आमच्या दोघांच्या वतीनें मध्यस्थी करून दोघांच्या आई-वडिलांशीं लग्नासंबंधीं बोलणीं करावीं.” जयंत वीरदासला आपल्या बरोबर रत्नवतीच्या वडिलांकडे घेऊन गेला. मुलगी सुखरूप घरीं परत आलेली पाहून व तिचें एका राजकुमाराशींच लग्न ठरलेलें पाहून त्यांना आनंद झाला.

जयंत व रत्नवतीचें लग्न थाटामाटानें झालें. त्यावेळीं खरा आनंद झाला तो वीरदासाला कीं त्याला अगदीं त्याच्या मनाला आवडेल असाच जांवई मिळाला.





# अपराधी

एकदां एका राजाची लाडकी मुलगी आपल्या मैत्रिणींबरोबर एका सरोवराच्या काठीं हिंडायला गेली. तिनें आपले दागिने काढून कठावर ठेवले व त्यांच्यावर लक्ष ठेवायला एका दासीला सांगून जलविहार करण्यासाठीं पाण्यांत उतरली.

दासी बसल्या बसल्या डुलक्या घेऊं लागली व अचानक आवाज झाल्यानें तिनें डोळे उघडून पाहिले तर दागिन्यांतला चंद्रहार नाहींसा झालेला. राजानें मुलीला तिच्या वाढदिवसाची भेट म्हणून तो दिला होता. तिनें वळून पाहिलें तेव्हां तिला झाडाआड कोणी तरी पळत जात असलेला दिसला. ती मोठ्यानें—"चोर, चोर! चंद्रहार!" अशी ओरडली, राजकन्या आपल्या मैत्रिणींबरोबर पाण्यांतून बाहेर आली. त्यासुद्धां ओरडूं लागल्या—"चोर चोर! चंद्रहार घेऊन गेला!" उद्यानाचे नोकर चोराचा शोध करीत धांवले.

उद्यानाच्या बाहेर एका शेतकऱ्यानें "चोर चोर!" म्हणून ओरडा ऐकला. तेव्हां तो पळूं लागला. एक पाहारेकरी भिंतीवरून उडी मारून त्या शेतकऱ्याचा पाठलाग करूं लागला. परंतु कांहीं वेळानें तो शेतकरी वाटेंत एका लहानशा वस्तींत शिरला व नाहींसा झाला.

त्या पाहारेकऱ्यानें राजाला जाऊन सांगितलें कीं त्यानें चोराला पाहिलें आहे व तो त्याला ओळखूं शकेल. तें ऐकून राजाच्या मनाला थोडा धीर आला.

तो पाहारेकरी वस्ताद होता. त्यानें दुसऱ्याच दिवशीं त्या शेतकऱ्याला एका श्रीमंताच्या घरीं अंगणांत काम करीत असतां ओळखलें व विचारलें. "काय रे गुलामा! कोठें आहे तो चंद्रहार?"

त्या शेतकऱ्यानें चकित होऊन विचारलें—"कोठला चंद्रहार?"

"अस्सं! फांशीची शिक्षा ऐकलींत कीं दिसेल तो चंद्रहार!" असें सांगून त्या शिपायानें शेतकऱ्याला धरून राजासमोर हजर केलें.

राजाला पाहून शेतकरी जास्तच घाबरून गेला म्हणाला—"वांचवा महाराज! तो चंद्रहार तर आमच्या मालकानें आणायला सांगितला होता. मी तो त्यांना दिला महाराज!"

राजाच्या हुकुमाप्रमाणें शिपाई मालकाला धरून घेऊन आले.

राजाचा चेहरा लालबुंद झाला होता. तें पाहून व राजानें विचारलेला प्रश्न ऐकून मालक हात जोडून म्हणाला—"महाराज! क्षमा करा! राजपुरोहितानें तो मागितला म्हणून मी आपल्या नोकराकरवीं मागवून त्यांच्याकडे पोंचता केला.

राजानें पुरोहिताला बोलावून विचारलें—"कोठें आहे चंद्रहार?



"चंद्रहार? कोठला चंद्रहार?" पुरोहितानें घाबरून जाऊन विचारलें.

"या शेतकऱ्यानें तो उचलून नेला तेव्हां या शिपायानें त्याला पाहिलें. त्या शेतकऱ्यानें तो आपल्या धन्याला नेऊन दिला व त्यानीं तुम्हांला दिला. हो का नाहीं?" राजानें दरडावून विचारलें.

काय उत्तर द्यावें बिचाऱ्या पुरोहिताला सुचेना. तेवढ्यांत समोरून वृद्ध मंत्री येत असलेले दिसले. लगेच तो म्हणाला—"काल लक्ष्मीपूजनाच्यावेळीं यांनीं तो मला आणून दिला ही गोष्ट खरी. पण मी

सौ. कमलाबाई मानकर

कालच पूजा आटोपल्यावर सकाळीं आपल्या मंत्र्यांकडे तो नेऊन दिला.

इतक्यांत मंत्र्यानें दरबारांत प्रवेश केला. त्याला पाहून राजानें विचारलें–"मंत्री ! पुरोहितानें सकाळीं तुम्हांला आणून दिलेला चंद्रहार कोठें आहे ?"

मंत्री बुद्धिमान होता. त्यानें शेतकरी, त्याचा धनी व पुरोहित तिघांकडे एकदांच पाहिलें. त्याला त्या सार्‍या प्रसंगाची छान कल्पना आली. प्रत्येकानें आपला जीव वांचविण्यासाठीं स्वतःचा अपराध स्वीकार करून तो दुसर्‍यावर टाकला आहे. त्याच्या नजरेला नेमकें त्याचवेळीं एक माकड आलें. तें आबाराच्या भिंतीवर बसलें होतें. मंत्री राजाला म्हणाला–"महाराज ! मी तो चंद्रहार घेऊन येतच होतों आपणाकडे पण एक माकड हातांतून ओढून घेऊन गेलें."

राजाच्या मनाचें समाधान झालें. त्यानें नोकरांना आज्ञा केली कीं केळ्याचा लोभ दाखवून माकडांना गोळा करा. चंद्रहार नेणारें माकड पण येईलच. जेथून चंद्रहार उचलत नेण्यांत आला होता तेथें केळीं व खोबरें टाकण्यांत आलें. पुष्कळ माकडें जमा झालीं आणि आश्चर्य म्हणजे एका माकडाच्या गळ्यांत खरोखरच तो चंद्रहार होता. राजाच्या शिपायांनीं तो काढून घेऊन राजाला आणून दिला.

परंतु तो चंद्रहार त्या माकडानेंच उचलला होता कीं आणखी कोणी, कळलें नाहीं. शेतकरी, त्याचा धनी पुरोहित व मंत्री चौघांनीं वेळ मारून नेण्यासाठीं तर थापच मारली होती. परंतु दैवयोग असा कीं मंत्र्याचें म्हणणें खरें ठरलें. पण तो आणि बाकी सर्व निरपराधी ठरल्याबद्दल चकित होऊन परस्परांकडे पाहूं लागले.





# परोपकारी गोपाळ

एके दिवशीं रात्रीं एक थोटका गोपाळच्या घरीं आला. त्यानें गोपाळला नमस्कार केला व म्हणाला–"काका ! मी आपणांकडे एका मदतीच्या आशेनें आलों आहें. माझ्याकडे माझ्या आईनें माझ्यासाठीं म्हणून ठेवलेली एक ठेव आहे. फक्त तुमच्यावर माझा विश्वास आहे. म्हणून तेवढी वस्तू ठेवून घ्या."

गोपाळ म्हणाला–"कळूं दे तर कोण ती वस्तु आहे ती."

त्या थोटक्याचें नांव रामू होतें. त्याचें गांव गोपाळच्या गांवाला लागूनच होतें. रामूला गोपू नांवाचा मोठा भाऊ होता. तो गांवच्या श्रीमंतांपैकीं एक होता. ल्हानपणीं झाडावरून पडल्यामुळें रामूचा हात मोडला. तेव्हांपासून त्याला भावाच्या घरीं नोकरासारखें राबवूं लागले.

रामूच्या आईला आपल्या मोठ्या मुलाचा स्वभाव माहीत होता. तो आपल्या भावाला नीट वागवणार नाहीं हें ती ओळखून होती. म्हणून तिनें रामूसाठीं शंभर मोत्यांची माळ करून त्याला देऊन ठेवली होती."

परंतु ती माळ ठेवायची कोठें ? कोणावर त्याचा विश्वास नव्हता. त्याच्या भावाची पर्वा न करणारा किंवा त्याला भिऊन न वागणारा ओळखीचा कोणी गांवांत दिसला नाहीं. तेव्हां त्याला गोपाळची आठवण झाली. बरीच रात्र लोटल्यावर तो गोपाळच्या घरीं आला होता. रामूनें सर्व परिस्थिति सांगून ती माळ गोपाळच्या हातीं देत विनंती केली कीं ही माळ ठेवून घ्या व या कानाची गोष्ट त्या कानाला कळून देऊं नका. माझ्या भावाला जर का ही गोष्ट



[ श्री. मा. गो. मोरे



कळली तर तो माझ्याजवळून मागून घेईल व पुन्हां मला ती मिळणार नाहीं."

रामू जें कांहीं म्हणाला त्यावर गोपाळचा विश्वास बसला व त्यानें ती माळ ठेवून घेतली. म्हणाला—"तूं अगदीं बेफिकीर रहा. तुझ्या भावाला ही माळ माझ्याकडे आहे ही गोष्ट कळणार नाहीं. समज, तुझ्या भावानें येऊन विचारलेंच कीं तूं माझ्याकडे कांहीं आणून ठेवलें आहेस का तर मी चक नाहीं म्हणून सांगेन." गोपाळनें रामूला सांगून ती माळ मोडून मिळालले पैसे स्वतः-जवळ ठेवून घेतले आणि लागतील तेव्हां व लागतील तेवढे पैसे मागून घेऊन जायला रामूला सांगितलें.

रामूला भीति वाटत होती तेंच झालें. त्याच्या भावाला कळलें कीं रामूनें गोपाळ-कडे कांहीं तरी ठेवलें आहे व तो मधून मधून गोपाळकडे येऊन मागून घेऊन जातो. त्यानें एकदां येऊन गोपाळला विचारलेंच—"गोपाळराव, माझ्या धाकट्या भावानें कांहीं पैसे ठेवले आहेत म्हणे, तुमच्याकडे ? तुम्ही ते ठेवून घेणें बरोबर दिसतें का ? लोक मला हंसतील कीं भावाचा विश्वास नाहीं म्हणून त्यानें आपल्याकडे पैसे आणून ठेवले. माझ्याकडे राहाले म्हणून ते मी खाऊन टाकीन असें का वाटलें त्याला व तुम्हांला ?"

"अहो पण, हें सर्व तुम्ही काय बोलतां आहां, हें नाहीं कळलें मला. तुमचा भाऊ माझ्याकडे कधीं आला देखील नाहीं. त्यानें माझ्याकडे एक फुटकी कवडीदेखील ठेवलेली नाहीं." गोपाळ म्हणाला.

गोपाळ खोटें बोलेल, असें स्वप्नांत देखील गोपूला वाटलें नव्हतें. परंतु गोपाळ साफ खोटें बोलला यांत गोपूला शंका नव्हती. कारण गोपाळकडून पैसे मागून नेत असतां कित्येकांनीं रामूला पाहिलें होतें व त्यांनींच गोपूला ती गोष्ट सांगितली होती.

परंतु गोपू गोपाळच्या विरुद्ध काय बोलणार ? त्यानें गांवभर गोपाळची नालस्ती करायला मात्र सुरवात केली. परंतु गोपूच्या बोलण्यावर कोण विश्वास करणार ?

पुढें कांहीं दिवसांनीं गोपाळ खरें बोलतो कीं खोटें याची साक्ष सर्वांना व स्वतः गोपूला पटवून देणारा एक प्रसंग घडून आला. गोपू व रामू यांच्या गांवाजवळच्या रानांत एका ओढ्यांत एका साधूला देवाची मूर्त दिसली. तो साधू गांवांत येत नसे. म्हणून त्यानें ती मूर्त ओढ्यांतून काढून रानांतच एका सुरक्षित जागीं आणून ठेवली. नंतर गांवांतले गुराखी गुरांना रानांत चरायला घेऊन आले तेव्हां तो त्यांना म्हणाला—"मला ही देवाची मूर्त ओढ्यांत सांपडली आहे. ही घेऊन गांवकऱ्यांनीं देवळांत ठेवावी. त्या मूर्तीकडे गांवकऱ्यांनीं दुर्लक्ष केलें तर गांवावर ईश्वरी कोप होईल."

गुराख्यांनीं ती गोष्ट गांवांत जाऊन सांगितली. गांवांतल्या प्रमुखांनीं जाऊन डोळ्यानें ती मूर्त पाहाली व तिची स्थापना





करण्यासाठीं देऊळ बांधायचें ठरविलें. देवळाकरितां जागा पाहिली. घरामागें कांहीं वर्गणी वसूल केली. गोपू श्रीमंतांपैकीं एक होता. म्हणून त्यानें त्या कामांत पुढाकार घेतला. सर्वांत मोठी देणगी त्यानेंच दिली. देऊळ बांधण्याचें काम सुरू झालें. देवाचें पीठ तयार झालें. मूर्त आणण्यासाठीं गांवकरी रानांत गेले.

पुजाऱ्यांनीं आंघोळ करून मूर्त उचलण्यासाठीं मूर्तीला हात लावला. त्याबरोबर त्यांच्या हाताला चटका बसला. पुजारी ओरडून मागें सरकला. तेव्हां तो साधु म्हणाला—"ही मूर्त म्हणजे एक अत्यंत पवित्र अशी मूर्त आहे. वाटेल त्यानें याला हात लावल्यास देवाला तें आवडणार नाहीं. म्हणून सत्यव्रती व निष्पाप माणसानें मूर्तीला हात लावावा."

"आमच्यांत असा सत्यव्रती व निष्पाप माणूस कोण असणार ? बुवा आपणच एवढी कृपा करून मूर्तीची स्थापना करावी." गांवकरी साधूला म्हणाले.

"मी गांवांत पाऊल टाकीत नाहीं. तें माझें व्रत आहे. मी व्रतभंग करायला तयार नाहीं. तुमच्यांत अंतरात्म्याशीं दगा न करणारा कोणी तरी असेलच कीं नाहीं. त्यानें हें काम करावें." साधू म्हणाला.

गांवकरी दुसऱ्याची स्तुती करून स्वतःचा बचाव करूं लागले. कोणी मूर्तीला हात लावायला धजेना. शेवटीं सर्वांनीं मिळून गोपूलाच सर्वांत जास्त निष्पाप मनाचा व उदार असें ठरवून त्याला मूर्त उचलण्याचें काम करायला सांगितलें. गोपू पुढें आला व म्हणाला—"मी मनसा, वाचा, कर्मणा कोणाचें वाईट केलें नसेल तर देवानें मला स्पर्श करूं द्यावा." असें सांगून तो मूर्तीला हात लावायला पुढें सरसावला.

तेव्हां साधूनें विचारलें—"काहीं पुण्यकर्म केलें आहेस का ?"

"कां नाहीं ? या देवासाठीं देऊळ बांधण्यासाठीं सर्वांत जास्त वर्गणी तर मीच दिली आहे. दरवर्षीं जत्रेच्या वेळीं दरिद्र नारायणाला जेवण मीच घालतों. गंगेला संगमरमरी पायरी मी बांधली." गोपू म्हणाला.

"हें सर्व खोटें तर बोलत नाहींस ना ?" साधूनें विचारलें.

"मी जन्मांत कधीं खोटें बोललों नाहीं." गोपू म्हणाला.

"मग तुला कसली भीति ? लाव हात मूर्तीला !" साधू म्हणाला.

गोपू पुढें सरसावला. तो प्रथम मूर्तीकडे पाहून थोडा हंसला. पण हात लावतांच त्याचे हात पोळले. सर्वांसमक्ष त्याची मान खालीं झाली. गांवकऱ्यांसमोर प्रश्न उभा राहिला आतां ही मू. न्यायची कशी ?

त्यावेळीं गोपूला गोपाळची आठवण झाली. तो एक सत्यव्रती म्हणून त्या पंचक्रोशींत प्रसिद्ध होता. तो खोटें बोलतो असें कोणी सांगितलें असतें तरी कोणाला तें खरें वाटलें नसतें. गोपाळच्या सत्यवक्ते पणाची परीक्षा



घ्यायला चांगली संधी मिळाली आहे असा विचार करून त्यानें गोपाळलाच बोलविण्याचें ठरविलें.

गांवांतील प्रमुखांना म्हणाला—"साधीशी गोष्ट आपल्यापैकीं कोणाच्याच कशी काय लक्षांत आली नाहीं. अहो ! गोपाळ राव आहेत कीं. ही जबाबदारी पार पाडायला तोच समर्थ पुरुष आहे." सर्वांना तो सल्ला पसंत पडला.

गोपाळला बोलावून आणण्यासाठीं एकाला पाठविण्यांत आलें. गोपाळ निरोप कळतांच आलादेखील. त्यानें आंघोळ केली.









देवाला नमस्कार केला व त्या साधूला नमस्कार करून गांवकऱ्यांना नमस्कार केला व मूर्तीला उचलण्यास सर्वांजवळ परवानगी मागितली.

साधूनें गोपूला विचारला होता तोच प्रश्न गोपाळला केला—"तूं पुण्य कार्य केलें आहेस ना?"

"माझ्या अंतरात्म्याला जें रुचलें तें मी आजपर्यंत करीत आलों आहें. तें पुण्यकार्य आहे कीं पापकर्म, तें फक्त त्या परमेश्वरालाच माहीत." गोपाळ म्हणाला.

"तूं खोटें नाहीं बोलत ना?" साधूनें विचारलें.

"कधीं कधीं बोलावें लागतें." गोपाळ म्हणाला.

"तुला स्वतःवर आत्मविश्वास असेल तर तूं पुढें हो आणि मूर्त उचल." साधू म्हणाला.

गोपाळनें पुन्हां मूर्तीला नमस्कार केला व मूर्त उचलली. त्याचे हात पोळले नाहींत. गांवकऱ्यांनीं त्याचा जयजयकार केला आणि मूर्त घेऊन वाजतगाजत गांवाकडे निघाले. गांवांत मूर्तीची स्थापना झाली. त्यानंतर लोक मूर्तीला हात लावूनच देवाच्या पायां पडूं लागले. परंतु त्यानंतर मूर्तीला हात लावला तरी कोणाचे हात कधीं पोळले नाहींत. सर्वांच्या मनाचें समाधान झालें. परंतु गोपूची मान खालीं झाली. हळूहळू गोपाळच्या विषयीं त्याच्या मनांत श्रद्धा व आदर वाढूं लागले. आपली चूक त्याच्या लक्षांत आली. त्यानंतर त्यानें आपल्या आईजवळ प्रतिज्ञा केली कीं कधीं भावाला दूर लोटणार नाहीं. रामूनें गोपाळकडे ठेवलेले पैसे भावाला दिले. त्यानें ते पैसे धंद्यांत लावले व मिळणारा फायदा रामूला देऊं लागला.





# उत्तरकांड

रामानें राक्षसांचा संहार केला आणि राज्याभिषेकानंतर अयोध्येला येऊन राज्य करूं लागला.

एकेदिवशीं चारी दिशाहून ऋषी व मुनी रामाच्या दर्शनासाठीं आले. त्यांच्या बरोबर अगस्त्य ऋषीपण आले होते. त्यांनीं द्वारपालाला सांगून रामाकडे निरोप पाठविला कीं आम्ही दर्शनाला आलों आहों. लगेच रामानें सर्वांना आदरपूर्वक आंत बोलावून त्यांना उचित आसनावर बसायला विनंती केली आणि कुशल प्रश्न केले.

मुनींनीं रामाला पुन्हां राज्यपद मिळाल्याबद्दल रामाचें अभिनंदन केलें. रामानें रावणाचा वध केला होता ती गोष्ट मोठी नव्हती. रामानें ज्या राक्षसांचा वध केला ते एकाहून एक मोठे वीर होते. परंतु त्या सर्वांत इंद्रजितासारख्या पराक्रमी राक्षसाचा वध लक्ष्मणानें केला ही गोष्ट सर्वांना चकित करून सोडणारी होती.

अशा तऱ्हेनें निरनिराळ्या प्रकारें मुनींनीं रामलक्ष्मणांच्या शौर्यपराक्रमाची वाखाणणी केली. मुनींकडून रामाला एक गोष्ट ऐकून फारच आश्चर्य वाटलें. इंद्रजित हा सामान्य वीर नव्हता. स्वतः रावण, कुंभकर्ण, महोदर, प्रहस्त, देवांतक नरांतक इत्यादि शूरवीर राक्षसांहून तो जास्त मोठा वीर होता. ही



गोष्ट अगस्त्य मुनींच्या तोंडून रामानें ऐकली. अगस्त्य मुनींनीं इंद्रजिताच्या पराक्रमाचें सविस्तर वर्णन केलें.

सत्ययुगांत ब्रह्मदेवाचा मानसपुत्र, पुलस्त्य ज्याला अपर ब्रह्मदेव म्हणावयास हरकत नाहीं, हा तपश्चर्येसाठीं मेरुपर्वतावर तृणबिंदु यांच्या आश्रमांत गेला. तो तपश्चर्या करूं लागल्यावर रोज देवकन्या, नागकन्या व राजर्षीकन्या येत व तेथें नृत्यगान करीत. त्यांचा तो आरडाओरडा झाला म्हणजे पुलस्त्याची तपश्चर्या भंग होई. शेवटीं त्याला इतका राग आला कीं त्यानें शाप दिला कीं माझ्या समोर जी कोणी स्त्री येईल ती गर्भवती होईल.

तो शाप ऐकून सर्व इतक्या घाबरल्या कीं दुसऱ्यादिवशीं त्या बाजूला फिरकण्याचें नांवदेखील कोणी काढलें नाहीं.

परंतु ही गोष्ट तृणबिंदूच्या मुलीला माहीत नव्हती. ती आपल्या मैत्रिणींची वाट पहात होती व त्यांच्या शोधार्थ पुलस्त्य तपश्चर्या करीत होता त्या बाजूला गेली. तेथें तिला कोणी मैत्रीण दिसली नाहीं. म्हणून ती सरळ पुलस्त्य वेदाध्ययनांत मग्न होऊन बसला होता तेथें गेली. पुलस्त्यनें तिच्याकडे पाहाल्या बरोबर एकाएकीं गरोदर असल्याचा तिला भास झाला. खरोखरच तिला शरीरांत एकदम बदल झाल्याचें आढळून आलें. ती घाबरून गेली आणि आपल्या वडिलांना जाऊन म्हणाली— "बाबा ! हें पहा हें सर्व कसें झालें तें मला कळत नाहीं. मी आपल्या मैत्रिणींच्या शोधार्थ पुलस्त्य मुनींच्या आश्रमांत गेलें होतें."

तृणबिंदूला दिव्यज्ञानानें पुलस्त्याच्या शापामुळें मुलगी गर्भवती झाल्याचें कळलें. तो तिला घेऊन पुलस्त्याकडे गेला व म्हणाला—"महर्षि ! ही माझी मुलगी आहे. ही आपल्याच शोधार्थ इकडे आली होती. हिला आपण आपली पत्नी म्हणून स्वीकारून हिला आपल्या सेवेला ठेवून घ्यावें" तृणबिंदु म्हणाला. पुलस्त्यानें तें कबूल केलें.

पुलस्त्याला आपल्या बायकोचें रूप, गुण पाहून फार आनंद झाला. तो तिला म्हणाला—"मी वेदपठन करीत असतां तूं गर्भवती झालीस म्हणून तुझा मुलगा माझ्याच सारखा वेदशास्त्रांत विद्वान व पंडित होईल. तुझ्या मुलाला सर्व विश्रवसु म्हणून ओळख-तील. तो माझा मुलगा आहे म्हणून लोक त्याला पौलस्त्य म्हणून देखील ओळखतील.

पुढें कांहीं दिवसांनीं विश्रवसु जन्मला. तो सत्य, शील व शुचिता या तीन गुणांमुळें जगांत प्रसिद्ध झाला. त्याची कीर्ति ऐकून भारद्वाज मुनींनीं आपली कन्या देववर्णिनी हिचें त्याच्याशीं लग्न करून दिलें. विश्रवसूला तिच्या पासून एक मुलगा झाला. तो जन्मल्याबरोबर ब्रह्मदेव प्रत्यक्ष होऊन म्हणाला—"हा मुलगा फार श्रीमंत होईल." वैश्रवण असें त्याचें नांव ठेवून ब्रह्मदेव निघून गेला.



वैश्रवणाचें लक्ष लहानपणापासूनच तपश्चर्येकडे होतें. तो एका अरण्यांत निघून गेला. तेथें फक्त पाण्यावर राहून वायुभक्षण करून त्यानें तीन हजार वर्षें निराहार राहून तप केलें. त्याची तपश्चर्या पाहून ब्रह्मदेव, इंद्रादिदेव प्रत्यक्ष होऊन त्याला म्हणाले— "तुझी तपश्चर्या पाहून आम्ही प्रसन्न झालों आहों. माग तुला जो पाहिजे तो वर !"

"मला लोकपालन आणि धनाधिपत्य मिळेल असावर द्यावा." वैश्रवण म्हणाला.

"मीदेखील आणखी एका लोकाची सृष्टि करण्याचा विचार करीत होतों. इंद्र, यम व वरूण यांच्या बरोबर तूं एका नवीन लोकाचा चौथा लोकपालक होशील. तूं

     


नवनिधींचा अधिपति होशील. हें पहा सूर्याच्या प्रकाशांत तळपणारें हें पुष्पक विमान यावर बसून तूं विचरण कर आणि स्वर्गलोकांतील देवांसारखा तूं तुला वाटेल तिकडे भ्रमण कर." असा वर देऊन इंद्रादि देवांसह ब्रह्मदेव निघून गेला.

ब्रह्मदेवाकडून तो वर मिळाल्यावर वैश्रवण आपल्या वडिलांकडे परत आला व म्हणाला– "बाबा! ब्रह्मदेवानें मला वर दिला, परंतु मला राहाण्यासाठीं स्थान ठरवून दिलें नाहीं. कोणाला कष्ट होणार नाहीं अशा जागीं राहण्याची सोय करून द्या."

विश्रवसु मुलाचें बोलणें ऐकून म्हणाला– "बाळ! दक्षिण समुद्राच्या काठीं त्रिकूट पर्वताच्या शिखरावर विश्वकर्म्यानें देवेंद्राच्या अमरावती सारखीच लंका नांवाच्या एका नगरीची सृष्टि केली आहे. तें अत्यंत सुंदर नगर आहे. त्याचा कोट सोन्याचा आहे. वैडूर्यांचीं तोरणें आहेत. पहिल्यानें ती नगरी राक्षसांसाठीं निर्मिली होती. परंतु विष्णूच्या भीतीनें राक्षस पाताळ लोकांत जाऊन दडून बसले आहेत. ती नगरी आतां निर्जन व ओसाड पडली आहे. तेथें जाऊन राहालास तर कोणास त्रास होणार नाहीं."



वैश्रवण वडिलांच्या सल्ल्याप्रमाणें सहस्रावधि नैऋतींना बरोबर घेऊन लंका नगरीस गेला आणि तेथें जाऊन राहूं लागला. तो तेथें सुखानें राज्य करूं लागला. पुष्पक-विमानांत जाऊन तो मधून मधून आपल्या आई वडिलांना भेटून येई.

तें ऐकून रामानें चकित होऊन अगस्त्य मुनींना विचारलें–"मुनिश्रेष्ठ! राक्षस पुलस्त्याच्या कुळांतच जन्मले असें मी ऐकलें होतें. परंतु आपल्या म्हणण्यावरून त्यापूर्वीं देखील राक्षस होते. या राक्षसांचा मूळ पुरुष कोण?"

त्याचें उत्तर म्हणून अगस्त्य म्हणाले– "कमळांत ज्याचा जन्म झाला त्या ब्रह्मदेवानें प्रथम पाण्याची सृष्टि केली. पाण्याच्या रक्षणासाठीं कांहीं प्राणी मिर्मिले. त्या प्राण्यांना भूक, तहान आणि भय हे असह्य वाटल्यावर ते पुन्हां ब्रह्मदेवाकडे गेले व त्यांनीं त्याला विचारलें–"आतां आम्ही काय करायचें?" ब्रह्मदेव हंसून म्हणाला– "तुम्ही या पाण्याचें रक्षण करा!" तेव्हां कांहीं प्राणी म्हणाले–"तें काय आमच्याकडे लागलें." कोहीं म्हणाले–"जक्षण (म्हणजे 'भक्षण') करतों." रक्षण करणारे राक्षस





व 'जक्षण' करणारे यक्ष म्हणून ओळखले जाऊं लागले.

राक्षसांच्या जातींत हेती व प्रहेती नांवाचे दोघे भाऊ होते. प्रहेती तपश्चर्या करण्यासाठीं निघून गेला. हेतीनें लग्न करून घेण्याचें ठरविलें व पत्नीच्या शोधार्थ निघाला. त्यानें यमाची बहीण भया व भयंकरा यांच्याशीं लग्न करून घेतलें.

त्यांना विद्युतकेश नांवाचा एक मुलगा झाला. त्याचें तेज सूर्यासारखें होतें. मुलगा लहानाचा मोठा झाल्यावर हेतीनें त्याच्यासाठीं एक मुलगी पाहून लग्न ठरविलें. ती संध्याची मुलगी होती. तिचें नांव सालकटंकट असें होतें. सालकटंकट व विद्युत्केशयांचा विवाह झाला. कालक्रमानें सालकटंकट गरोदर होऊन मंदर पर्वतावर तिला एक मुलगा झाला. मुलापेक्षां पतीचा सहवास तिला जास्त प्रिय वाटला म्हणून ती आपल्या मुलाला तेथेंच सोडून पतीबरोबर विहार करायला निघून गेली.

मुलगा हातापायाचीं बोटें चोखत रडत होता. त्याला शंकर पार्वतीनें नंदीवर बसून आकाश मार्गें जात असतां पाहिलें. त्याला त्या असहाय स्थितींत रडत असलेला पाहून दोघांना त्याची दया आली. पार्वतीचें हृदय तर कळवळून आलें. तिला संतुष्ट करण्यासाठीं शंकरानें त्याला जन्मतांच त्याच्या आईचें वय चिरंजीवत्व आणि आकाशांत उडणारें एक नगर दिलें. पार्वतीनें राक्षसांना सद्योगर्भाचा व जन्मतांच मातेच्या वयाचा वर दिला.

शंकर पार्वतीचे वर सुकेशाला मिळाले होते. सुकेश राक्षस आकाशांत उडणाऱ्या आपल्या नगरांत ऐश्वर्यभोग करूं लागला. त्याचा प्रताप इंद्रासारखा वाढला.

सुकेशाला वरप्राप्ती झाली होती व तो एक धर्मपरायण तरुण आहे हें ऐकून ग्रामणी नांवाच्या गंधर्वानें आपली सुंदर मुलगी देववती हिच्याशीं त्याचें लग्न करून दिलें. आपल्याला इतका गुणवान व ऐश्वर्यशाली पति मिळाल्याबद्दल देववतीला पण फार आनंद झाला. सुकेशदेखील आपल्या पत्नीचें रूप व गुण पाहून खूष झाला.

त्यांना माल्यवंत, सुमाली व माली असे तीन मुलगे झाले. ते फार बलवान व पराक्रमी निघाले. ते कोणाला भीत नसत. तेच इतके भयंकर दिसत कीं इतर त्यांना पाहून भीत. आपल्या वडिलांना शंकराकडून वर प्राप्ती झाली असल्याचें त्यांना कळल्यावर त्यांनीं देखील मेरु पर्वतावर जाऊन तपश्चर्या सुरू केली. त्यांची तपश्चर्या पाहून त्रिलोकांत खळबळ उडून गेली. ब्रह्मदेव इंद्र आदिक देवांना घेऊन तेथें आला व म्हणाला—"मी तुमची तपश्चर्या पाहून प्रसन्न झालों आहें. पाहिजे तो वर मागून घ्या."

"ब्रह्मदेवा! आमच्यावर तूं अनुग्रह करून दर्शन दिलें आहेस तर युद्धांत आमचा कधीं पराभव होणार नाहीं असा वर दे. आमच्या हातून शत्रूचा संहार होईल व आम्ही चिरंजीवी राहूं." ब्रह्मदेव 'तथास्तु!' म्हणून ब्रह्मलोकीं निघून गेला.



तो वर मिळाल्यावर ते तिघे राक्षस त्रिलोकांतल्या रहिवाश्यांना त्रास देऊं लागले. देव, ऋषी: सिद्ध इत्यादिकांना त्यांची दहशत बसली. त्यांचा कोणी रक्षक उरला नाहीं.

त्या राक्षसांनीं विश्वकर्म्याला बोलाविलें व आज्ञा केली—"तूंच देवांच्यासाठीं उत्तमोत्तम इमारती बांधल्यास व अमरावती नगर सुंदर करून दिलेंस. त्याच्यासारखें एक सुंदर नगर निर्मून आम्हांला दे."

"दक्षिण समुद्रकाठीं त्रिकूट पर्वताच्या मधल्या शिखरावर मी इंद्राच्या इच्छेप्रमाणें





लंका नगरी बांधून ठेवली आहे. ती स्वर्गासारखीच सुंदर व वैभवशाली नगरी आहे. त्या नगराचा कोट सोन्याचा आहे. तुम्ही तेथें जाऊन राहाल्यास कोणी तुम्हांला त्रास देऊं शकणार नाहीं." विश्वकर्मा म्हणाला.

विश्वकर्म्याचें तें बोलणें ऐकून राक्षसांना फार आनंद झाला. कित्येक हजार राक्षस सपरिवार लंकेला येऊन राहूं लागले. त्याच वेळीं नर्मदा नांवाच्या एका सुंदर गंधर्व स्त्रीनें आपल्या तीन मुलींचीं लग्नें अनुक्रमें माल्यवंत सुमाली व माली तिघां भावांशीं करून दिलीं.

माल्यवंत मोठा. त्याच्या बायकोचें नांव सुंदरी. तिला वज्रमुष्टी, विरूपाक्ष, दुर्मुख, सुप्तघ्न, यज्ञकोय, मत्त व उन्मत्त अशीं सात मुलें व अनला नांवाची एक मुलगी झाली.

सुमालीच्या बायकोचें नांव केतुमति असें होतें. तिला प्रहस्त, अकंपन, विकट, कालकर्मक, धूम्राक्ष, दंड, सुपार्श्व, संह्लादि, प्रघस, भासकर्ण अशीं मुलें व पुष्पोत्कटा, कैकसी, शुचिस्मिता, कुंभीनसी नांवाच्या मुली झाल्या.

मालीच्या बायकोचें नांव वसुधा. तिला अनिल, अनल, हर, संपाती नांवाचीं मुलें झालीं. हे चौघे पुढें बिभीषणाचे मंत्री झाले.

अशा तऱ्हेनें तिघे राक्षस सपरिवार लंकेंत रहात होते. देव, ऋषी, नाग व मानव यांना त्रास देऊं लागले. त्यांना ब्रह्मदेवाचे वर मिळाले होते. म्हणून त्रिलोकांत त्यांनीं आपल्या कुकर्मांनीं सर्वांना सतावून सोडलें. त्यांना ब्रह्मदेवानें अजेय व शत्रुसंहाराचा वर दिला होता म्हणून त्यांना कोणाची भय किंवा भीति नव्हती. ते ऋषीमुनींचे यज्ञ भंग करीत.





# शुंभ व निशुंभ

फार प्राचीनकाळीं देव व राक्षस यांचें युद्ध झालें. त्यांत राक्षसांचा पराभव झाला व ते आत्मरक्षणासाठीं पाताळांत जाऊन राहूं लागले. एक राक्षस कुटुंब आपलीं दोन जुळीं मुलें शुंभ व निशुंभ यांना जाते वेळीं घेऊन जायला विसरलें. तीं मुलें रानांत हिंडत व रानांत जो कोणी प्राणी मिळे त्याला खाऊन आपलें पोट भरीत. पुढें राक्षस कुळाला साजतील असेच गुण त्यांच्या अंगांत दिसूं लागले.

त्यांना आपल्या शक्तीचा भयंकर गर्व चढला. जगांत अशक्य व असाध्य कांहींच वाटलें नाहीं. दोघे क्रूर कृत्यें करूं लागले. मोठा शुंभ तर फारच भयंकर होता. त्याला मोठमोठे पर्वतदेखील तो उचलून फेंकून देई. एकदां घमेंडींत त्यानें महेंद्र पर्वताला उजव्या हातानें मारलें. पण त्याचाच हात तुटून पडला. त्यामुळें तो थोटका झाला व त्याचें एक तृतीयांश बळ कमी झालें. आपल्या मूर्खपणानें आपला हात घालवून बसल्यामुळें त्याला त्याचा धाकटा भाऊ निशुंभ याच्या कृपेवर जगावें लागलें. निशुंभनें भावाच्या तुटलेल्या हाताची एक गदा करून त्याला दिली. शुंभनें ती आपल्या डाव्या हातांत घेतल्याबरोबर त्याच्या अंगांत पुन्हां पुरी शक्ति आली.

शुंभ व निशुंभ ज्या ज्या रानांत जात त्या त्या रानांतलीं जनावरें थोड्याच दिवसांत नाहींशीं होत. एका मागून एक जंगलें उध्वस्त करीत दोघे तपोबनांत येऊन पोंचले. तेथें यज्ञ पशु पाहून त्यांनीं त्यांनाच खायला सुरवात केली.

शेवटचें मलपृष्ठ

या दोघां राक्षसांच्या भीतीनें ऋषी व मुनी हिमालय पर्वताकडे धांवले. त्यांपैकीं कांहीं नृग महाराजांकडे गेले. त्यांनीं महाराजांसमोर आपलें गाऱ्हाणें निवेदन करून त्या दोघां राक्षसांच्या उपद्रवाला आळा घालण्याची विनंती केली. नृग महाराजांनीं शुंभ व निशुंभांना ठार करण्यासाठीं सैन्य पाठविलें. परंतु त्या दोघां राक्षसांनीं सर्व सैन्याचा पराभव केला.

तें पाहून नृग महाराज काळजींत पडले. तेव्हां ऋषींनीं त्याला धीर दिला व म्हणाले—"असे माजलेले बलिष्ठ फार दिवस जगत नाहींत. त्यांची वेळ भरली म्हणजे त्यांचा संहार करायला गवताची एक काडीदेखील पुरेल. आम्ही या राक्षसांची दृष्टि इंद्र लोकाकडे वळेल असा यत्न करतों. अशा तऱ्हेनें आम्हांला कांहीं काळ का होईना शांतिलाभ होईल."

ऋषी शुंभनिशुंभांकडे गेले व त्यांना म्हणाले—"तुमच्या सारख्या थोर पराक्रमी वीरांनीं आपल्या शक्तीचा प्रयोग मर्त्यलोकांतील सामान्य प्राण्यावर करणें शोभत नाहीं. त्या नृग महाराजाचें एवढें मोठें सैन्य होतें, पण तुम्ही एक क्षणांत त्याचा फडशा उडवून टाकलात. आमच्या सारख्या गरीब ऋषींना त्रास देऊन तरी तुम्हांला काय सुख मिळणार? सर्व सुखांचें माहेरघर म्हणजे तो इंद्रलोक आहे. तुम्ही इंद्राला वठणीवर आणून स्वर्गलोक जिंकावें. तर सर्व ऐश्वर्य व सुख तुम्हांला मिळेल."

ती गोष्ट निशुंभाला पटली. "या मर्त्यलोकांत आपली शक्ति व्यर्थ खर्च करण्यांत काय अर्थ? आमचा शत्रु यापुढें इंद्र! त्यानेंच आमच्या पूर्वजांचा पराभव करून त्यांना पाताळांत पिटाळून लावलें. त्याला त्याच्या गादीवरून काढून त्याचें राज्य बळकावल्याशिवाय आम्हांला चैन पडणार नाहीं."

धाकट्या भावाच्या त्या वल्गना ऐकून शुंभ थोडा भ्याला. तो म्हणाला—"इंद्राला जिंकणें म्हणजे गंमत वाटली होय तुला? तपश्चर्या करून मोठे वर मिळविल्याशिवाय इंद्राला जिंकणें अशक्य आहे. त्याच्याजवळ जें वज्र आहे, त्याच्यासमोर आपला टिकाव लागणें शक्य नाहीं. आज आपण या रानाचे मालक आहों. उगीच कशाला स्वतः होऊन मरणाला आमंत्रण देतोस?"













"अरे, तूं इतका भितरा, कापुरुष असशील असें नव्हतें वाटलें मला. तुला त्या इंद्राची इतकी भीति वाटत असेल तर आपली गदा दे मला. मी त्या इंद्राला ठार करून येतों." निशुंभ म्हणाला. मोठ्या भावानें अनेक प्रकारें त्याला समजावून सांगण्याचा यत्न केला. पण तो सर्व फुकट गेला. तो आपल्या भावाची गदा घेऊन इंद्रलोकावर स्वारी करण्यासाठीं निघाला.

तो सरळ स्वर्गापर्यंत गेला. त्यानें त्या गदेनें पाहारेकऱ्यांना पळवून लावलें. ते पाहारेकरी त्याला पाहतांच माशांसारखे भर्रकन उडून गेले. त्यांनीं इंद्राकडे जाऊन निशुंभ राक्षस आल्याची वर्दी दिली. इंद्रानें वज्रप्रहार केल्याबरोबर निशुंभाच्या गदेचा चकाचूर होऊन गेला व तो चुरा वाऱ्या-बरोबर आकाशांत उडून गेला. वज्रप्रहारानें जखमी होऊन निशुंभ खालीं पृथ्वीवर येऊन आदळला.

शुंभनें बजावलें असून दुर्लक्ष करून निशुंभ इंद्राशीं युद्ध करण्यास गेला होता. म्हणून शुंभला आपल्या धाकट्या भावाचा राग आला. म्हणाला—"तुझा जो अपमान झाला तो झालाच, तूं माझा जीवनाधार अशी जी गदा होती, तीदेखील घालवून बसला आहेस. त्या गदेशिवाय आतां माझें पोट कसें भरणार? यापुढें तुलाच शिकार करून माझ्या पोटापाण्याची व्यवस्था करावी लागेल." हें बोलत असतां तो हेंदेखील विसरला कीं तो स्वतः आपल्या मूर्खपणानेंच आपला हात घालवून बसला होता आणि निशुंभनेंच त्या हाताच्या हाडाची गदा करून त्याला दिली होती.

[ पुढल्या अंकांत संपूर्ण. ]





# ४९. दक्षिणी ध्रुवावरचा ज्वालामुखी

एरिबस नांवाचा हा ज्वालामुखी रास द्वीपांत आहे. याची उंची १३,२०० फुट आहे.

त्याच्या मुखाचा व्यास सुमारें अर्धा मैल आहे. तो ९०० फुट खोल आहे. अंटार्कटिक क्षेत्रांत याशिवाय दुसरा ज्वालामुखी आढळत नाहीं.














# भारताचा इतिहास

औरंगजेब दक्कनचा सुबेदार नेमला गेला तेव्हां त्याचें वय १८ वर्षांचें होतें. त्यानें सुरतपासून खानदेशापर्यंतचा चागलाना प्रदेश काबीज करून शाहजींचे कांहीं किल्ले पण सर केले.

दक्कनचा सुबेदार म्हणून काम करीत असतां त्याला पैशाची तूट भासत होती. त्याहून जास्त काळजी वाटण्यासारखी गोष्ट दिल्लीला घडली. दाराशिकोह यानें औरंगजेबाच्या विरुद्ध कागाळ्या शाहजहान बादशाहच्या कानावर पोंचविल्या. म्हणून १६४४ मध्यें औरंगजेबानें दक्कनच्या सुबेदारीचा राजीनामा दिला. १६४५ मध्यें त्याला गुजरातचा सुबेदार म्हणून नेमण्यांत आलें. आपल्या मोठ्या भावाशीं पटत नसल्यामुळें औरंगजेबाला दिल्लींत राहतां आलें नाहीं. १६५३ च्या सुरवातीला तो पुन्हां सुबेदार म्हणून दक्कन मध्यें आला. त्यावेळीं तेथील राज्यव्यवस्था विस्कळीत झाली होती. आर्थिक स्थिती पण काळजी करण्यासारखीच होती. त्याच्याबरोबर दिवाण म्हणून मुर्शीद कुलीखान आला होता. त्याच्या साहाय्यानें औरंगजेबानें शेतकरी व सरकार दोघांचें हित होईल अशी करवसूलीची नवीन व्यवस्था करून दिली. त्यामुळें असें सांगतात कीं १६५८ पर्यंत औरंगजेबाचा अधिकार ज्या टापूंत होता त्या भागांत पडीत अशी एक सेंट जमीन देखील उरली नाहीं.

१६३६ पासून गोवळकोंडा दिल्लीचें आधिपत्य मानीत होता. परंतु तें राज्य नियमितपणें कर देत नव्हतें. गोवळकोंड्याच्या सुलतानाचा मीरजुमला नांवाचा एक मंत्री होता. त्याचा सुलतानांशीं बेबनाव झाला तेव्हां तो मोंगलांना शरण गेला. अशा तऱ्हेनें गोवळकोंड्यावर स्वारी करण्यास औरंगजेबाला दोन कारणें मिळाली.

मीरजुमलाचें खरें नांव मोहंमद समद असें होतें. तो इराण देशाचा व्यापारी होता. त्यानें हिरे व इतर रत्नांचा व्यापार करून अलोट पैसा मिळविला होता. नंतर तो गोवळकोंड्याचा सुलतान अब्दुल्ला कुतुबशाह याच्या पदरीं काम करूं लागला. तो अत्यंत चतुर व व्यवहारकुशल होता. लवकरच तो प्रधान मंत्री पदावर पोंचला. त्याचा कारभार निरंकुश होता. त्यानें कर्नाटक प्रांतावर स्वाऱ्या करून बराच प्रदेश स्वतःच्या अमलाखालीं आणला. तो नांवानें राजा किंवा सुलतान नव्हता, परंतु त्याचा थाट बादशाहाला लाजवील असा होता. ३०० मैल लांब व ५० मैल रुंद अशा प्रदेशांतून त्याला दर साल ५० लाख रुपयांची प्राप्ती होती. त्यानें आपलें स्वतंत्र सैन्य उभें केलें. त्याच्या सैन्याचा एक स्वतंत्र तोफखाना पण होता. मीरजुमलाची ही वाढती शक्ती पाहून सुलतान घाबरला. सुलतानानें त्याचा मुलगा मुहंमद अमीनखान



व त्याच्या कुटुंबाला कैद करून मीरजुमलाचा पाणउतारा केला. त्या रागानें मीरजुमलानें दिल्लीचा बादशाह व त्याचा दक्कनचा सुबेदार औरंगजेब याच्याशीं सख्य करून फितुरी सुरू केली.

औरंगजेबाचा मुलगा मुहंमद सुलतान
यानें बापाच्या आज्ञे
वारी महिन्यांत हे
७ फेब्रुवारीला औ
कोंड्यावर हला च
लुटालूट व जाळपो
कोंड्याचें राज्य मोंग
















करण्याचा औरंगजेबाचा विचारास दारा शिकोह यानें नकार दिला आणि गोवळकोंड्याचा वेढा काढून टाकण्यांत यावा असा हुकूम काढविला. ३० मार्च १६५६ रोजीं वेढा काढून घेण्यांत आला.

गोवळकोंड्याच्या सुलतानानें नुकसान भरपाई म्हणून १० लाख रुपये रोख व रंगीर जिल्हा बादशाहाला दिला. सुलतानाच्या मुलीचें लग्न औरंगजेबाचा मुलगा मुहंमद सुलतान याच्याशीं करून देण्यांत आलें. सुलतानानें कबूल ही अट तोंडीं केली कीं सुलतानानंतर गोवळकोंड्याच्या गादीवर त्याचा जांवई बसेल. लवकरच मीरजुमला गोवळकोंड्याचा प्रधान मंत्री म्हणून पुन्हां नेमला गेला.

आतां फक्त विजापूरचें राज्य उरलें होतें. ४ नव्हेंबर १६५६ या रोजीं आदिलशाह वारला. त्याचा १८ वर्षे वयाचा मुलगा गादीवर बसला. औरंगजेबनें विजापूरचें राज्य खालसा करण्याची परवानगी मागितली. कारण गादीवर बसलेला सुलतान मयत बादशाहाचा औरस पुत्र नव्हता असें त्याचें म्हणणें होतें. परंतु तें बादशाहाला मान्य झालें नाहीं. तरी औरंगजेबानें मीरजुमलाची मदत घेऊन १६५७ मध्यें स्वारीला सुरवात केली. मार्चच्या अखेरीला बीदरचा किल्ला व १ ऑगष्टला कल्याणीचा किल्ला औरंगजेबानें हस्तगत केला.

१६५७ च्या सेप्टेंबर महिन्यांत शाहजहान आजारी पडला. तेव्हां त्याच्या मुलांत गादीसाठीं भांडणें सुरू झालीं. आपल्या आजारापेक्षां अपमान सहन न झाल्यामुळें व मुलांच्या भाऊबंदकीमुळें दुःखी होऊन शाहजहान मरण पावला.



# नेहरू चरित्र



[१५]

१९२१ सालीं देशभर असहकारितेची लाट उसळून आली. चळवळ वाढत चालली तशी सरकारी अत्याचाराला पण जोर आला. प्रमुख कांग्रेस पुढाऱ्यांच्या हालचालीवर बंदी घालण्यांत आली. 'सरहद्द प्रांताचे गांधी' अबदुल गफ्फार खान यांना कैद करण्यांत आलें व त्यांना तीन वर्षांची सक्त मजुरीची शिक्षा देण्यांत आली. कित्येकांनीं सरकारनें बहाल केलेल्या पदव्या सोडल्या. विद्यार्थ्यांनीं शाळा व कॉलेजें यांचा बहिष्कार केला. त्यांनीं राष्ट्रीय विद्यालयांत व महा विद्यालयांत प्रवेश मिळवून विद्याभ्यास सुरू केला.

कवींद्र रवींद्रनाथ टागोर यांनीं सत्याग्रह व शिक्षण संस्थांच्या बहिष्काराच्या चळवळीचा विरोध केला. तरी चळवळ वणव्यासारखी देशभर पसरली. १९२१च्या कांग्रेसच्या अधिवेशनांत विदेशी वस्त्र बहिष्कार व खादीची उत्पत्ति आणि वापर या विषयीं ठराव पास झाला. दारूच्या दुकानांवर पिकेटिंग सुरू झालें. जुलईच्या ३१ तारखेस गांधीजींच्या अध्यक्षतेखालीं विदेशी वस्त्रांची होळी जाळण्यांत आली.

इंग्रज अधिकारी कांग्रेसच्या एकेका पुढाऱ्याला पकडून तुरुंगांत टाकूं लागले. सेप्टेंबर महिन्याच्या सुरवातीला अली बंधूंना कैद करण्यांत आलें. त्यांना दोन वर्षांची शिक्षा झाली. सरकारनें जवाहरलालजींना त्यांच्या क्रांतिकारी भाषणांबद्दल कैद करण्यांत येईल अशा पुष्कळ धमक्या दिल्या. परंतु त्यांना लवकर पकडलें मात्र नाहीं.

कोणतें तरी पत्र कोर्टांत दाखल करण्यांत आलें व एका अशिक्षित माणसानें तें पत्र उलटें धरून वाचून त्यांतील सही मोतीलालजींचें आहे अशी साक्ष दिली. न्यायालयांचा बहिष्कार कांग्रेसच्या कार्यक्रमांतला एक मुख्य कार्यक्रम असल्या कारणानें जवाहरलालची किंवा मोतीलाल दोघांपैकीं कोणीच बचावाचा यत्न केला नाहीं." खटला चालू असतां मोतीलालजींची चार वर्षांची नात इंदिरा कोर्टांत त्यांच्या मांडीवर बसून होती. कोर्टाचा प्रथम अनुभव इंदिराला हाच.

शिक्षा ऐकल्यावर मोतीलालजींनीं आपल्या साथी कार्यकर्त्यांना या शब्दांत संदेश दिला—"मी व माझा एकुलता एक मुलगा देशासाठीं तुरुंगाची पायरी चढत आहों. सहस्रावधी स्वयंसेवक भर्ती करा. स्वराज्य मिळेपर्यंत अनत्याचारी असहकाराची चळवळ चालू राहाली पाहिजे. भारतांत स्वातंत्र्याच्या देवतेचें एकच देऊळ आहे आणि तें म्हणजे तुरुंग! सर्वांनीं तेथील तीर्थयात्रा करावी."

१९२१ च्या डिसेंबर व १९२२ च्या जानेवारी महिन्यांत ३० हजार लोक तुरुंगांत गेले. तुरुंगांत जाणारे लोक मुख्य करून संयुक्त प्रांत व बंगाल मधले होते. कांग्रेसचे कार्यकर्ते व पुढारी तुरुंगांत गेलेच. परंतु आश्चर्याची गोष्ट म्हणजे, कांग्रेसशीं ज्यांचा कांहीं एक संबंध नव्हता अशा अनेकांना पण तुरुंगांत टाकण्यांत आलें. तरुण युवक व मुलें आनंदानें पोलीसांच्या लॉरींत बसत आणि उतरायला तयार नसत. नांवाशिवाय जितक्या लोकांना वारंटें देण्यांत येत, त्याहून जास्त लोक लॉरींत बसून तुरुंगांत जात. तुरुंगाच्या अधिकाऱ्यांना पेच पडे कीं कोणाला ठेवायचें व कोणाला सोडायचें?






# नवाबकुमारी

[ २ ]

जगतसिंहानें एक दोन नव्हेत अनेक गोष्टी युवराजाला साजणार नाहींत अशा केल्या असें राजा मानसिंहांना वाटलें.

अनेक शूर सरदारांसमक्ष जगतसिंहानें आपल्या पित्यासमोर अशी प्रतिज्ञा केली होती कीं पांच हजारांचें सैन्य दिल्यास पठाणांना सुवर्णरेखा नदीच्या पलीकडे पिटाळून लावीन. इतकी जबाबदारी आपल्या शिरावर घेतल्यानंतर तें काम सोडून अर्धी रात्र उलटून गेल्यावर तो आपल्या प्रेमिकेला भेटण्यासाठीं परक्यांच्या किल्ल्यांत चोरासारखा शिरला होता आणि पठाणांचा कैदी झाला होता. आपल्या कर्त्तव्याची जाणीव नसणारा आपल्या कुळाची मान-मर्यादा राखण्याची पर्वा नसणारा मुलगा असून नसून सारखाच. त्या रागामुळेंच पठाणांचा निर्मूळ नाश करण्याचा व आपल्या मुलाला सोडवून आणण्याचा विचार देखील त्यांच्या मनाला शिवला नाहीं.

विमलाच्या हातचा खंजीर लागल्यानंतर मरणापूर्वीं कतलखानानें जगतसिंहाला मानसिंहाकडे संधी करून देण्यासाठीं धाडलें

श्री दामोदर मुखर्जी



होतें. मुलानें सुचविलेल्या संधीच्या अटी मानसिंहानें मान्य केल्या. कारण पावसाळा संपल्यानंतरच सैयदखानाला सैन्य घेऊन मानसिंहाच्या हाताखालीं युद्ध करण्यास येणें शक्य होतें. म्हणून नवीन युद्धाला तोंड फोडण्याऐवजीं संधी करून घेणेंच श्रेयस्कर होतें. संधी झाल्याबरोबर नवा नवाब सुलेमानखान यानें आपला मंत्री व सेनापती उस्मानखान याच्याबरोबर येऊन मानसिंहाला मोठमोठे नजराणे दिले. मानसिंह फार खूष झाला. पाटण्याला मोंगल सैन्य परत नेण्याचें ठरविल्यावर मानसिंहानें आपला एक स्वतःचा मुलगा जगतसिंह यांच्यावर कांहींच जबाबदारीचें काम टाकलें नाहीं, यावरून जगतसिंहाच्या गुन्ह्याची चवकशी करण्याचें त्यानें मनांत ठरविलें असल्याचें दिसत होतें.

त्यानंतर जगतसिंहानें बापाच्या मनाविरुद्ध अनेक कामें केलीं व त्यामुळें त्याच्या क्रोधाग्नींत तेल ओतलें गेलें. एकतर बापाला कळविल्याशिवाय तो मंथारणच्या किल्ल्यांत गेला. त्याच्या परवानगीशिवाय तिलोत्तमेशीं त्यानें लग्न करून घेतलें. लग्नाला तिलोत्तमेची नातेवाईक मंडळी व नवाबाची मुलगी आयशा आपल्या दासींबरोबर हजर होती. परंतु त्यानें वडिलांना बोलावणें पाठविलें नाहीं कीं त्यांचा आशीर्वाद पण मिळविला नाहीं.

त्यानें दोन चुका केल्या होत्या. वडिलांना कळविल्याशिवाय लग्न करणें ही पहिली चूक व तें तिलोत्तमेशीं करणें ही दुसरी चूक. त्याची आणखी एक चूक होती. त्यानें मोगलांचा एक मुख्य सरदार असून आपलें कर्तव्य व जबाबदारी ओळखून काम केलें नव्हतें. तो भोगविलासांत गुरफटून गेला होता. त्याचें सैन्य दारुकेश्वर येथें पडाव टाकून होतें. पण त्याला त्याची पण फिकीर नव्हती.



मुलाच्या या बेजबाबदारपणाचा मानसिंहाला मनस्वी राग आला. त्याला त्याबद्दल कडक शिक्षा द्यायाचें मनाशी ठरवून त्यानें सर्वांसमक्षच सैन्य पाठवून मथुरासिंहाला आज्ञा केली होती कीं "जगतसिंहाला मृत वा जिवंत जसा मिळेल तसा आणून हजर करावें." त्याप्रमाणें मथुरासिंहानें शैलेश्वराच्या देवळाजवळ त्याला कैद केलें. ज्या देवळांत जगतसिंहाची प्रणयकथा सुरू झाली होती तेथेंच ती संपणार कीं काय असें भासत होतें.

मुलाच्या अपराधाबद्दल चवकशी करण्यासाठीं मानसिंहानें आपला दरबार मुद्दाम बोलाविला. मानसिंह एका उच्च जागेवर बसला होता. त्याच्या दोन्ही बाजूला प्रमुख अधिकारी रांगेंत बसले होते. दरबारांत खचाखच गर्दी होती. पण टांचणी पडली तरी तिचा आवाज ऐकूं येईल इतके निस्तब्ध सर्व बसले होते.

"कैद्याला हजर करण्यांत यावें." मानसिंहानें करड्या आवाजांत आज्ञा केली.

अनेक सैनिकांच्या मध्यें मान खाली करून जगतसिंह हळूहळू येऊन बापासमोर उभा राहाला. मानसिंहानें त्याला "कैदी!"



म्हणून संबोधन करून प्रथम त्याच्या व्यक्तिगत व कौटुंबिक दुर्वर्तनाबद्दल चवकशी होईल व नंतर त्याच्या राजकीय गुन्ह्याची चवकशी होईल असें सांगितलें.

एक वृद्ध मोगल अधिकारी सभेंत उभा राहून व लवून मुजरा करून म्हणाला— "महाराज! एक निवेदन करूं इच्छितों. या तरुण मुलाला त्याच्या सर्व अपराधाबद्दल माफी करावी. त्याच्या व्यक्तिगत चुका मुख्य करून कौटुंबिक व घरगुती आहेत. तरी त्याची जाहीर चवकशी होऊं नये."

"त्याच्या व्यक्तिगत चुका कौटुंबिक व राजकीय स्वरूपाच्या आहेत व दोन्हींचा प्रत्यक्ष संबंध आहे. म्हणून कोणी येथून जाण्याची जरूर नाहीं. चवकशी येथेंच होणार व जाहीर सर्वांसमक्ष होणार!" मानसिंह म्हणाला. वृद्ध अधिकारी खालीं बसला. मानसिंह पुढें म्हणाला—"कैदी! मी विचारीन त्या प्रश्नाचें सरळ उत्तर दिलें नाहींस तर तो तुझा नवीन गुन्हा ठरेल."

तेव्हां जगतसिंह स्वाभिमानपूर्वक मान ताठ करून म्हणाला—"महाराज! हें सांगण्याची गरज नाहीं. जगतसिंह आपला जीव वांचविण्यासाठीं खोटें बोलणार नाहीं."

"तूं वीरेंद्रसिंहाच्या अंतःपुरांत एका खोलींत एक स्त्रीबरोबर असतांना तुला पठाणांनीं कैद केलें, ही गोष्ट खरी का?"

"होय खरी आहे!"

"तूं पठाणांच्या कैदेंत असतांना कतलूखानाची मुलगी आयशा तुझ्यावर प्रेम करूं लागली ही गोष्ट खरी आहे का?"

"या प्रश्नाचें उत्तर थोडें लांब द्यावें लागत आहे. नवाबकुमारी आयशानें, मी आजारी असतां माझी जगण्याची आशा



हकीमांनीं व वैद्यांनीं सोडली असतां मातेसारखी व बहिणीसारखी जिवाभावानें माझी सेवा शुश्रूषा केली. स्वार्थ बुद्धीनें तिनें माझी सेवा केली असेल असें मला वाटलें नाहीं. परंतु त्यानंतरच्या एका घटनेवरून तिचें माझ्यावर प्रेम होतें हें मला कळलें. पण तिचें प्रेम न स्वीकारूं शकल्याबद्दल मला फार वाईट वाटलें."

"त्याच मुळें तुझें उस्मानखानाशीं द्वंद्वयुद्ध झालें होतें?"

"उस्मानखानाचें आयशावर प्रेम होतें. तिच्यावर प्रेम असणाऱ्या दोघांनीं जिवंत राहातां कामा नये असें त्याला वाटलें व म्हणून त्यानें मला द्वंद्व युद्धास आह्वान केलें."

"तूं मधून मधून नवाबाच्या मुलीकडे पत्र पाठवीत नव्हतास?"

"एकदां पाठविलें होतें."

"कधीं तूं स्वतः तिला भेटायला गेला होतास?"

"गेलों होतों. एकदां शेवटची भेट घेऊन तिचा निरोप घेण्याच्या हेतूनें गेलों होतों."

"भेटल्या शिवायच तिनें तुला परतवलें होतें ना?"














“त्याचें एक कारण होतें.”

“इतकें सर्व घडलें तरी तूं म्हणतोस कीं तुझ्या मनांत तिच्या विषयीं प्रेमांकुर उपजला नव्हता; व फक्त तिनेंच तुझ्यावर प्रेम केलें होतें?”

“मी खरें तेंच सांगितलें आहे. विश्वास करणें किंवा न करणें महाराजांच्या इच्छेवर अवलंबून आहे.”

“विरेंद्रसिंहाची मुलगी तुझी ठेवलेली बाई आहे का?”

तो प्रश्न ऐकून जगतसिंहाच्या सर्व अंगाचा जणुंकांहीं भडका उडून गेला. म्हणाला—“महाराज! आपण एक शासक आहांत, एका राज्याचे अधिपती आहांत व माझे वडील आहांत म्हणून मी आपला आदर व गौरव करतों. कोण दुसऱ्याच्या तोंडून मी हे शब्द ऐकले असते तर मी तत्क्षण त्याचें डोकें उडविलें असतें. वीरेंद्रसिंहाच्या मुलीशीं मी देवाधर्माला साक्षी ठेवून धार्मिक रीतीनें लग्न केलें आहे. अग्निसमक्ष मी तिला सहधर्मिणी म्हणून स्वीकारलें आहे.”

मानसिंहाचें सर्व अंग रागानें थर थर कांपूं लागलें. तो जोरानें ओरडला—“राजपूत कुळांगार, पापी! तुझ्या तोंडांतून जे हे शब्द निघाले आहेत त्याबद्दल तुझी जीभ कापली तरी ती चूक होणार नाहीं. तुला लाजलज्जा कांहीं आहे कीं नाहीं? वीरेंद्रसिंहाची मुलगी तुझी बायको! जो वीरेंद्रसिंह माझ्या अंतःपुरांत एका दासीच्या मागें लागून चाकराचा वेश करून शिरला होता व पकडला गेल्यावर त्या दासीशीं त्याला लग्न करावें लागलें. तो नीच व पाजी तुझा सासरा? आणि ती नीच जातीची बाई विमला तुझी सावत्र सासू! तुझी लग्नाची बायको कोणाची मुलगी आहे? तिची आई कोणाची मुलगी आहे? ती कोणाची नात आहे? माहीत आहे का तुला? तो अभिरामस्वामी आहे तुझ्या बायकोचा आजा, म्हणजे आईचा बाप शशिशेखर. सर्व पापकर्में करून आतां संन्यास घेऊन व परमज्ञानी असल्याचें ढोंग करून जगभर उजळ माथ्यानें हिंडत आहे. हे सर्व तुझे नातेवाईक! तुझी बुद्धि इतकी भ्रष्ट कशी झाली? वीरेंद्रसिंहाच्या मुलीला तूं बाई म्हणून ठेवून घेतलें असतेस तर तो अपराध एकवेळ क्षम्य ठरला असता. मला आपला शत्रू समजून माझ्या परवानगीची पर्वा न करतां तूं हें लग्न केलेंस. तूं माझा मुलगाच नाहींस. तूं मानसिंहाचा मुलगा आहेस असें कोठें बोललास तर तुझा शिरच्छेद होईल!”

दरबारांत बसलेले सर्व लोक गप्प बसले होते. चकार शब्द बोलण्याची कोणाची छाती झाली नाहीं. त्यानंतर मानसिंहानें जगतसिंहाच्या राजकीय अपराधांची चवकशी सुरू केली. म्हणाला—

“तुझ्या राजकीय अपराधाबद्दल मी तुला कांहीं प्रश्न करीत आहें. तूं बादशहांचा एक सरदार असून व तुझ्या शिरावर एका विशिष्ट कामाची जबाबदारी असतां किल्लेदाराच्या आज्ञेशिवाय रात्रीच्या वेळीं चोरासारखा किल्ल्यांत कशासाठीं शिरला होतास?”



जगतसिंहाची मान खालीं होती. त्याच्या तोंडांतून कांहींच उत्तर आलें नाहीं.

“आपलें सैन्य कोठें तरी सोडून व पठाणांना पिटाळून लावण्याचें स्वतः घेतलेलें काम सोडून एका बाईच्या नादीं लागून तूं किल्ल्यांत गेला नव्हतास?”

जगतसिंहानें उत्तर दिलें नाहीं.

“पठाणांनीं तुला सोडलें तेव्हां तूं माझ्या मोगलांच्या मुख्य सेनापतीच्या हुकमाची वाट कां नाहीं पहात राहालास?”










त्या प्रश्नाला पण उत्तर आलें नाहीं.

"सर्व सरदार आपापलें सैन्य घेऊन निघाले तेव्हां तूं त्यांच्यावरोबर कां नाहीं गेलास ?

त्याचेंदेखील उत्तर आलें नाहीं.

"हुकमाबिगर, बादशाहाचें कांहीं काम नसतां तूं आपला वेळ व्यर्थ कोठें व कां घालवीत बसला होतास ? आतां तोंड कां नाहीं उघडीत ? खीळ बसली आहे का ? तुला एकच शिक्षा द्यावी लागेल आणि ती म्हणजे शिरच्छेद !"

तो वृद्ध मोगल सरदार पुन्हां उभा राहून म्हणाला—"महाराज ! माफी करावी ! युवराज आपले चिरंजीव...." तो बोलत असतां मध्येंच मानसिंह म्हणाला—"हा नीच ! माझा मुलगा ? माझा याच्याशीं कांहीं संबंध नाहीं."

"ठीक ! तरी धर्म आहे कीं नाहीं. युवराज अजून लहान आहेत !" असें म्हणत तो वृद्ध मोगल खालीं बसला.

मानसिंह कांहीं वेळ मान खालीं करून विचार करीत राहाला. नंतर म्हणाला—"अपराधी ! तुला एकच शिक्षा आहे, मृत्युदंड ! तुझ्या वयाकडे पाहून तुला जन्मठेप तुरुंगवासाची शिक्षा देत आहें." नंतर शिपायांना म्हणाला—"याच्या अंगावरचीं उंची वस्त्राभूषणें काढून याला कैद्याचा वेश द्या आणि याला माझ्यासमोर साखळदंडानें बांधून घेऊन जा !"

सैनिक मानसिंहाच्या आज्ञेचें पालन करीत असतां सर्व दरबारी मान खालीं घालून उभे होते. कित्येकांच्या डोळ्यांत आंसवें आलीं. जगतसिंह दृष्टीआड झाल्यावर दरबार बरखास्त झाला. (पुढें चालू)



# नुकसान भरपाई

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाहीं. तो झाडाजवळ गेला. प्रेत खांद्यावर काढून घेतलें व मौनपणें श्मशानाच्या दिशेनें निघाला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा, तुला पाहून मला त्या सालंकीबंधूंची आठवण येते. त्यांनीं यक्षदत्ताला नुकसानभरपाई देण्यासाठीं अनेक प्रकारचे कष्ट सहन केले होते. त्यांची गोष्ट मी तुला सांगतों, ऐक." असें सांगून त्यानें गोष्ट सांगायला सुरवात केली.

ब्रह्मदेशाच्या पश्चिमेकडील किनाऱ्यावर तारा नांवाचें एक बेट होतें. त्या बेटावर एक राजा राज्य करीत असे. दर वर्षी दक्षिणेकडील दस्यु नांवाच्या राजाचें सैन्य येऊन त्याच्या राज्यावर नानाप्रकारचे अत्याचार करीत. दर उखळी मार्गें, जात्या-

वेताळाच्या गोष्टी



मागें व जुलीमागें कर वसूल करून घेऊन जर कर दिला नाहीं तर ते दस्यू लूटमार करून जाळपोळ करतील अशी भीति राजाला वाटे. म्हणून तो निमूटपणें ते मागतील तो कर देई. त्या करांचा भार प्रजेला असह्य झाला.

दस्यू क्रूर व असभ्य होते. त्यांच्याशीं युद्ध करून त्यांचा पराभव करणें कोणाला शक्य नव्हतें. सर्वांत जास्त त्यांची भीती वाटे ती राजालाच. प्रजेंत शूर पराक्रमी लोक नव्हते असें मुळींच नाहीं. परंतु त्यांची संघटनाकरून शत्रूला तोंड देणारा कोणी पुढारी त्यांना मिळत नव्हता. म्हणून पराक्रम असून तो निरुपयोगी ठरत होता.

एकदां यक्षद्वीपांतून एक तरुणवीर ताराद्वीपांत आला. तसा तो मूळ रहिवाशी ताराद्वीपांतलाच होता. परंतु यक्षलोक त्याला लहानपणीं आपल्या देशांत घेऊन गेले होते. तेथेंच त्याचें शिक्षण झालें व त्यानें युद्धकलेचा अभ्यास केला. त्यानें यक्षविद्या देखील शिकून घेतली. बरोबर येतांना तो 'जलतारा' नांवाची युद्धनौका व 'शत्रुजिता' नांवाची तलवार घेऊन आला.

त्या तरुण वीराचें नांव यक्षदत्त असें होतें. त्याचे आईवडील ताराद्वीपांतच रहात असत. एकदां दस्यु येणार अशी बातमी ताराद्वीपांत पसरली. हाहाकार उडून गेला. यक्षदत्तानें आपल्या वडिलांना त्याचें कारण विचारलें तेव्हां त्याला दस्यु कर वसूल करण्यासाठीं येत असल्याचें कळलें.

तें ऐकून यक्षदत्ताला आश्चर्य वाटलें. तो राजाकडे गेला व म्हणाला—"महाराज! दस्यूंचा अत्याचार किती दिवस सहन करणार? त्यांच्याशीं युद्ध करून त्यांचा पराभव केल्याशिवाय भागणार नाहीं. आपण युद्धाची तयारी करावी. नाहीं तर ती कामगिरी करण्याची जबाबदारी माझ्यावर टाका! शत्रूची खोड मोडल्याशिवाय आपणांला किंवा प्रजेला सुख मिळणार नाहीं."

बराचवेळ मागेंपुढें करून शेवटीं राजानें यक्षदत्ताला परवानगी दिली. ताराद्वीपांतील शूर पराक्रमी लोकांना एकत्र करण्यासाठीं त्यानें आपल्या मित्रमंडळींच्या हातीं देशभर निरोप पाठविला. त्याचा बाप पण त्याच कामासाठीं गेला असतां सालंकी वंशाच्या तिघां भावंडांनीं अमानुषपणें त्याचा वध केला.

यक्षदत्ताला ती गोष्ट कळली नाहीं. तो युद्धाच्या तयारींत गर्क झाला होता. कांहीं दिवसांनीं दस्यु कर वसूल करण्यासाठीं आले. यक्षदत्तानें पुरी तयारी करून त्यांच्याशीं युद्ध केलें व त्यांना पिटाळून लावलें. तें ऐकून दस्यु राजा रागावला. त्यानें ताराद्वीपावर स्वारी केली. यक्षदत्तानें त्यांच्या युद्ध नौका बुडवून टाकल्या. दस्यु सैनिक व यक्षदत्ताचे अनुयायी यांचें युद्ध झालें. यक्षदत्तानें आपल्या 'शत्रुजिता' खड्गानें शत्रु सैन्याचा संहार केला. अशातऱ्हेनें त्या युद्धांत त्याला यश मिळालें. सालंकी कुळांतील वीरांनीं पण या युद्धांत पराक्रम गाजविला व यक्षदत्ताला जय मिळविण्यास सहाय्य केलें.



युद्ध संपल्यावर यक्षदत्त आपल्या वडिलांना ती आनंदाची बातमी कळविण्यासाठीं गेला तेव्हां त्याला त्याच्या वडिलांचा खून झाल्याची वार्ता कळली. त्याचें रक्त उसळून आलें. आपल्या वडिलांचा दाहसंस्कार संपवून तो परत आला त्या वेळीं राजधानींत विजयोत्सव होत होता व राजा त्या आनंदांत गर्क झाला होता.

तो सरळ दरबारांत गेला व म्हणाला—"महाराज! मला एक गोष्ट आपणांला विचारावीशी वाटते. समजा, कोणी आपल्या वडिलांचा वध केल्याची गोष्ट



आपल्याला कळली तर आपण त्याला काय शिक्षा कराल?"

"त्याचा शिरच्छेद करीन!"

"माझ्या वडिलांचा अमानुषपणें वध करणारे आपल्या दरबारांत हजर आहेत. त्यांना योग्य ती शिक्षा झाली पाहिजे. आपणांजवळ माझी अशी विनंती आहे." यक्षदत्त म्हणाला.

"सांग त्यांचें नांव! मी त्यांची चवकशी करून त्यांना शिरच्छेदाची शिक्षा देतो!" राजा म्हणाला.

"मला त्यांच्या शिरच्छेदाची गरज नाहीं. त्यांनीं त्याबद्दल नुकसान भरपाई करून दिली तरी पुरे आहे." यक्षदत्त म्हणाला. लगेच तिथे सालंकी बंधू उभे राहाले व त्यांनी विचारलें—"नुकसान भरपाई? काय पाहिजे तुला!"

"तीन वेलफळें, एक चामड्याची पिशवी, एक भाला, एक कुत्र्याचें पिलूं व एक तवा!" यक्षदत्त म्हणाला.

"यांत खात्रीनें कांहीं तरी गूढ हेतू दिसतो आहे. नाहीं तर तूं आपल्या बापाच्या वधाबद्दल ही सामान्यशी नुकसान भरपाई मागितली नसतीस." मोठा सालंकी बंधू म्हणाला.

यक्षदत्त म्हणाला—"तरमग ऐक! मी जीं वेलफळें मागत आहें तीं पूर्वेकडील बेटांतल्या एका बागेंत मिळतील. त्यांचा रंग सोनेरी आहे. तीं माणसाच्या डोक्याएवढीं आहेत. मधासारखीं गोड आहेत. तीं खाल्ल्यानें जखमा भरून येतात. रोग दूर होतात. चामड्याची पिशवी मागितली ती यवनद्वीपाच्या राजाकडे मिळेल. त्या पिशवीचा नुसता स्पर्श झाला तरी मोठमोठे आजार बरे होतात व जखमा भरून येतात. भाला मोगलद्वीपाच्या राजाकडे आहे. त्याच्या टोकाचा स्पर्श झाला तरी स्पर्श करणारा तत्काळ भस्म होऊन जातो. त्या भाल्यांतून सारख्या ठिणग्या उडत असतात. म्हणून तो भाला नेहमीं एका पाण्याच्या टपांत ठेवण्यांत येतो. कुत्र्याचें पिलूं राक्षसद्वीपांत आहे. त्याला पाहाल्याबरोबर वाघा-सिंहासारखीं क्रूर श्वापदें पण पळून जातात. तवा वारुणद्वीपांत आहे. तें द्वीप कोठें आहे हें कोणाला माहीत नाहीं. तें द्वीपच आहे. पण समुद्रांत आजवर कोणाला तें कोठें आहे हें कळलें नाहीं. एवढी नुकसान भरपाई करून दिलीत तर तुम्हांला दुसरी कोणतीहि शिक्षा करण्याची गरज नाहीं." यक्षदत्त म्हणाला.

सालंकी बंधूंनीं परस्पराशीं विचार करून कांहीं तरी ठरविलें आणि मोठा भाऊ म्हणाला—"आम्ही एवढी नुकसानभरपाई करून द्यायला तयार आहों. पण एका अटीवर तूं आपली 'जलतारा' नांवाची युद्धनौका द्यावीस." यक्षदत्त त्याला कबूल झाला.

सालंकीबंधू 'जलतारा' जहाजांत बसून निघाले. यक्षदत्तानें नुकसान भरपाई म्हणून जें कांहीं मागितलें होतें तें सहजीं साध्य नाहीं हें त्यांना माहीत होतें. परंतु त्यांचा



उत्साह दांडगा व शौर्य आणि साहस तर कांहीं विचारूंच नका असें होतें.

प्रथम ते पूर्वेकडील बेटांत गेले. तेथें त्यांनीं सोनेरी वेलफळें पाहिलीं. त्या झाडाखालीं तीन पाहारेकरी पाहारा देत सज्ज उभे होते. कोणी तिकडे पाऊल टाकलें कीं त्यांचा बाण सुटलाच असे ते तयार उभे होते. म्हणून सालंकींनीं एक युक्ती केली. त्यांनीं तीन ससाणे त्या बाजूला सोडले. त्यांना मारण्यासाठीं पाहारेकरी बाण सोडणार पण तेवढ्यांत ते ससाणें दुसऱ्या बाजूला वळले. त्यांना ठार करण्यासाठीं पाहरेकरी तिकडे



धांवले. इकडे सालंकींनीं तीन वेलफळें तोडून घेतलीं आणि पळाले. सालंकींनीं पाहारे-कऱ्यांच्या डोळ्यांत धूळ फेंकलेली त्यांच्या लक्षांत आली. पण उशिरां. कारण त्यांनीं सालंकीबंधूंवर बाण सोडले तोंपर्यंत तिघे 'जलतारा' जहाजावर पोंचून दूर निघून गेले होते. नंतर सालंकी यवनद्वीपावर पोंचले. तेथील राजाजवळ ते शाहीराचा वेश करून गेले व राजाची स्तुती करून कांहीं कविता म्हटल्या. राजानें खूष होऊन काय वाटेल तें मागून घ्यायला सांगितलें. त्यांनीं ती चामड्याची पिशवी मागितली.

राजा म्हणाला—"त्या व्यतिरिक्त तुम्ही काय वाटेल तें मागून घ्या. ती पिशवी भरून सोनें पाहिजे तर देतों, पण पिशवी मिळणार नाहीं." राजाच्या हुकमानें राजाचा शिपाई पिशवींत सोन्याची नाणीं भरूं लागला. तेव्हां सालंकी बंधूंपैकीं एकानें शिपायाला ठार केलें. दुसऱ्यानें ती पिशवी घेतली आणि तिघे पळून गेले.

'जलतारा' जहाजांत ते पुढें प्रवासास निघाले. मंगलद्वीपांत पोंचल्यावर त्यांनीं पंडित कवींचा वेश धारण केला आणि राजाच्या दरबारांत गेले. ते राजाला म्हणाले—"आम्ही ताराद्वीपाचे रहिवाशी व दरबारी कवी आहोंत. पर्यटन करीत आपल्या देशांत आलों आहों." राजानें खास दरबार भरवून त्यांचा सत्कार केला. राजानें आपल्या राज्यांतील आश्चर्य कारक सर्व वस्तू त्यांना दाखविण्याची व्यवस्था केली. त्यांत तो विचित्र भाला पण होता. एका सालंकी बंधूनें तो भाला पाण्याच्या टपांतून बाहेर काढल्याबरोबर त्यांतून ठिणग्या उडूं लागल्या. राजा ओरडला—"हात नका लावूं त्या भाल्याला." परंतु सालंकी बंधूंनीं राजाचें ऐकलें नाहीं व त्या भाल्यानेंच स्वतःचें



रक्षण करीत ते जहाजावर येऊन पोंचले. तो भाला परत मिळविण्याच्या खटपटींत स्वतः राजा ठार झाला.

आतां राक्षस द्वीपांत जाऊन कुत्र्याचें पिलूं आणावयाचें काम होतें. प्रत्येक वस्तु मिळविण्यासाठीं त्यांना जिवावर उदार होऊन यत्न करावा लागला होता. या खेपेस त्यांना जास्तच भीती वाटत होती. परंतु त्यांनीं यक्षदत्तानें मागितलेली महत्वाची वस्तु मिळवून देण्यासाठीं पुन्हां आपला जीव धोक्यांत घालायचें मनाशीं ठरविलें. परंतु त्यांना भीती वाटली होती त्याच्या विरुद्ध तें कुत्र्याचें पिलूं धरून आणणें त्यांना कठीण ठरलें नाहीं. राक्षस राजानें त्यांना विचारलें—"तुम्हांला काय पाहिजे? तुम्ही सालंकीच ना!"

सालंकी बंधूना तो प्रश्न ऐकून आश्चर्य वाटलें. म्हणाले—"तुमच्याकडे वाघा-सिंहांना देखील भीती वाटेल असें कुत्र्याचें पिलूं आहे. तें आम्हांला हवें आहे."

"घेऊन जा. तुम्ही आतांपर्यंत शौर्य व साहस दाखवून जीं जीं कामें केलीत, त्यांची आम्हांला कल्पना आहे. म्हणून गुप्या-गोविंदानें तें पिलूं देण्याचें आम्ही ठरविलें





आहे." राक्षस राजा म्हणाला. सालंकी बंधूंनीं राजाचे आभार मानले व म्हणाले—

"तुम्हांला कधीं आमच्या मदतीची गरज भासली तर आम्हांला बोलवून घ्यावें. तुम्ही दाखविलेल्या औदार्याचा मोबदला म्हणून आम्हांला आमचे प्राण वेचावे लागले तरी आम्ही त्याला तयार राहूं." असें सांगून राक्षसराजाचा निरोप घेऊन ते स्वदेशीं निघाले.

आतां वारुण द्वीपांतून तवा आणण्याचें काम उरलें होतें. परंतु वारुण द्वीप आहे कोठें हें त्यांना माहीत नव्हतें तें ज्याला माहीत आहे असा व्यक्तीदेखील त्यांना माहीत नव्हता. राक्षस राजानें त्यांना एवढें मात्र सांगून ठेवलें होतें कीं तें समुद्रांत कोठेंतरी शंभर फूट खोल पाण्यांत आहे. तेथें मोठमोठे व महाबलिष्ठ राक्षस राहतात.

सालंकी बंधूंनीं विचार करून परत तारा द्वीपाला जावयाचें ठरविलें. जें कांहीं आतांपर्यंत मिळालें आहे तेवढ्यावर यक्षदत्ताच्या मनाचें समाधान झालें तर पहावें असापण एक हेतु होता. त्यानें इतर वस्तूंत विशेष काय हें सांगितलें होतें परंतु तव्यांत विशेष काय हें सांगितलें नव्हतें. तसा त्यानें हट्ट केलाच तर तव्याच्या शोधार्थ जावयाचें.

सालंकी बंधू तारा द्वीपांत परत आले. त्यांनीं यक्षदत्ताला वेलफळें, चामड्याची पिशवी, भाला व कुत्र्याचें पिलूं देऊन विचारलें—"तुझी नुकसान भरपाई झाली ना?"

"वारुणद्वीपांतला तवा कोठें मिळाला आहे?" यक्षदत्तानें विचारलें.

अर्थातच सालंकी बंधूंना जलतारा जहाज मागून घेऊन पुन्हां प्रवासास निघावें लागलें. यक्षदत्तानें सालंकी बंधूंनीं आणून दिलेल्या वस्तू राजाला दिल्या व म्हणाला—"महाराज! शत्रूचा पराभव झाला. परंतु ते वस्तू स्वस्थ बसणार नाहींत. पुन्हां एक मोठें सैन्य उभें करून खात्रीनें स्वारी करतील. त्यांना जिंकण्यासाठीं या सर्व वस्तू उपयोगी पडतील. म्हणून ठेवून घ्याव्या."

सालंकी बंधू सुवर्णद्वीपांत जाऊन कांहीं काळ राहाले व तेथें त्यांनीं समुद्राच्या तळाशीं राहण्याची विद्या शिकून घेतली. समुद्रांत बुडी मारून समुद्राच्या तळाशीं वारुणद्वीपाचा शोध केला व शेवटीं त्यांना यश मिळालें. तें बेट समुद्राच्या पोटांत शंभर फूट खोल होतें पण आजूबाजूचा समुद्र मात्र सहस्रावधि फूट खोल होता व त्यांत भयंकर राक्षस रहात होते.

सालंकी बंधू रात्र पडल्यावर त्या बेटांत शिरले. एका घरांत शिरले व त्यांत जो तवा त्यांना सांपडला तो घेऊन ते आले. तो घेऊन जात असतां दोघां राक्षसांनीं त्यांना पाहालें व त्यांचा पाठलाग केला. दोघां सालंकी बंधूंना त्यांनीं धरलें व मारहाण सुरू केली. परंतु तिसऱ्या भावानें दोघां राक्षसांना ठार केलें. तिघे जलतारा जहाजांत येऊन पोंचले.

ती 'जलतारा' नौका होती तरी आपल्या धन्याच्या आज्ञेनें ती जमिनीवर



देखील चाले. म्हणून सालंकी बंधूंच्या आज्ञेनें ती पाण्यांतून बाहेर येऊन थेट राजावाड्यापर्यंत गेली.

सालंकी बंधूंतील मोठा भाऊ तवा यक्षदत्ताच्या हातांत देत असतांना म्हणाला—

"तुझ्या ऋणांतून आज आम्हांला मुक्ती मिळत आहे. या प्रयत्नांत आम्हांला यश मिळालें. पण कष्ट इतके सहन करावे लागले कीं तुझ्यासमोरच आम्ही इहलोकाची यात्रा पण संपवीत आहों." असें सांगून तो बेशुद्ध होऊन पडला. त्याचे दोघे भाऊपण बेशुद्ध होऊन पडले.

परंतु यक्षदत्तानें लोच त्या चामड्याच्या पिशवीनें त्यांच्या जखमा पुसल्याबरोबर जखमा भरून आल्या. त्यांना पुनर्जन्म मिळाला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला– "बापाचा वध करणारांना मरण यावें हाच हेतु यक्षदत्ताच्या मनांत होता. तरमग त्यानें त्यांना जीवदान कां दिलें?" याचें उत्तर माहीत असून तूं दिलें नाहींस तर त्याचा परिणाम तुला माहीत आहेच, तुझ्या डोक्याची शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळूं लागतील."

त्यावर विक्रमादित्य म्हणाला–"यक्षदत्ताच्या मनांत सालंकी बंधुंना मरण यावें असें होतें याला एकहि आधार नाहीं. तसें असतें तर यक्षदत्तानें म्हटल्याबरोबर तारा द्वीपाच्या राजानें त्यांचा शिरच्छेद केला असता. कारण यक्षदत्ताचें ताराद्वीपावर तसेच उपकार होते. त्यानें मागितलेली नुकसान भरपाई तारा द्वीपाच्या रक्षणार्थ उपयोगी पडणाऱ्या वस्तूंचीच होती. सालंकी बंधूंना वारुण द्वीपांत पाठविण्याचा हेतु त्यांना मरण यावें असाच होता हा भ्रम होण्यासारखा आहे. परंतु तारा द्वीपांत राहणारे कांहीं वीर वारुण द्वीपांतल्या राक्षसांचा पराभव करणारे आहेत हें कळल्यावर दस्यु तारा द्वीपाकडे वांकड्या नजरेनें पाहण्याची हिंमत करणार नाहींत हा हेतूच त्यांत मुख्य होता. म्हणून मुळापासून यक्षदत्ताचा हेतू तारा द्वीपाचें रक्षण करणें हा होता हेंच खरें."

अशा प्रकारें राजाचें मौन भंग होतांच वेताळ प्रेतासह पुन्हां अदृश्य झाला व झाडाला जाऊन लोंबकळूं लागला. (कल्पित)





# ब्रह्मगाठ

काशी येथें फारपूर्वी श्रीधर नांवाचा एक तरुण युवक रहात असे. लहानपणींच त्याचे आईबाप वारले. परंतु मेहनत करून त्यानें न्याय व नीतीचा अभ्यास करून दरबारांत मोठ्या हुद्द्यावर नोकरी मिळविली. नंतर त्यानें लग्नाचा विचार करून आपल्या एका दोघां मित्रमंडळीस ती गोष्ट सांगितली. त्याच्या एका मित्रानें चवकशी करून एका न्यायाधिशाची मुलगी सुचविली. म्हणाला– "मुलगी हुशार व देखणी आहे व सर्व तऱ्हेनें तुला योग्य ठरेल अशीच आहे. तूं होकार दिलास तर मी ही गोष्ट तिच्या बापाकडे काढतों. ते मानतील यांत मला तरी कोणतीच शंका नाहीं. आज रात्रीं मी त्यांना भेटतों व तुला उद्यां काय तें सांगतों तूं उद्यां पहाटे मला मणिकर्णिका घाटावर भेट. मी तुझी वाट पाहातों. तूं आधीं आलास तर तूं माझी वाट पहा."

श्रीधरला बराच वेळ झोंपच लागली नाहीं व केव्हां डोळा लागला तो त्याला कळला नाहीं. उठून पाहातो तों बाहेर छान उजेड. तो उठून उभा राहाला व किती वाजले आहेत हें पाहण्यापूर्वींच धांवत मणिकर्णिका घाटावर गेला. परंतु तेथें त्याचा मित्र नव्हता. स्वच्छ चांदणें पडलें होतें व त्याला वाटलें कीं उजाडलें. तीन वाजायचा सुमार होता. इतक्यांत मित्र येणार नाही घाटावर नुसतें बसून राहण्यांत तरी काय अर्थ असा विचार करून तो निघणार, इतक्यांत त्याला दूर एक वृद्ध गृहस्थ कांहीं तरी लिहीत असलेला दिसला. कांहीं वेळ त्याच्याजवळ गप्पा मारीत वेळ काढायला हरकत नाहीं असा

श्री. का. सोनार











विचार करून तो जवळ गेला. त्या वेळीं तो वृद्ध गृहस्थ चांदण्यांत भोजपत्रांवर कांहीं तरी लिहीत होता. त्यानें त्याच्या मागें उभें राहून वाचण्याचा यत्न केला, पण त्याला ती लिपीच कळेना. त्यानें निरनिराळ्या भाषांचा अभ्यास केला होता. परंतु ती लिपि व भाषा त्याला कळेना. शेवटीं त्यानें विचारलेंच—"आजोबा! मला अनेक भाषा व लिपी येतात, पण ही भाषा व लिपी नाहीं कळली मला."

"बाबा! तुला कशी येईल ही लिपी!" असें सांगून तो पुन्हां लिहूं लागला.

"काय लिहितां आहां तुम्ही?" त्यानें विचारलें.

"सूर्योदयापूर्वीं जन्माला येणाऱ्यांची कुंडली लिहीत आहें." वृद्ध म्हणाला.

सहज श्रीधरनें विचार केला कीं हा वृद्ध स्वतः ब्रह्मदेव तर नसेल? चकित होऊन तो त्याच्याकडे पहात उभा राहाला.

थोड्या वेळानें त्या वृद्ध गृहस्थानें लिहिण्याचें काम बंद केलें व तांबड्या व पांढऱ्या गुंजांच्या पुरचुंड्या सोडून एक पांढरी व तांबडी गुंज फडक्यांत ठेवून गांठ बांधून ठेवूं लागला. तें पाहून श्रीधरनें त्याला विचारलें—"आजोबा! या गांठी बांधून कां ठेवीत आहां?"

"हे बघ, ही ब्रह्मगांठ आहे. ज्या पुरुषानें लग्न ज्या स्त्रीशीं व्हायचें आहे त्यांच्या गांठी बांधून ठेवीत आहें." तो म्हणाला.

"तर मग माझी गांठ कोणत्या स्त्रीशीं बांधली गेली आहे, हें तुम्हांला माहीत असेल. थोड्या वेळानें कळेल नक्की कीं एका विशिष्ट मुलीशीं माझें लग्न होणार आहे कीं नाहीं." श्रीधर म्हणाला.

तो म्हातारा श्रीधरकडे पाहून म्हणाला— "इतक्यांत नाहीं तुझें लग्न होणार. तुझें ज्या मुलीशीं लग्न व्हायचें आहे ती फक्त तीन वर्षांची मुलगी आहे. ती सतरा वर्षांची होई तों तुझें लग्न होणार नाहीं."

"म्हणजे चवदा वर्षे माझें लग्नच होणार नाहीं?" श्रीधरनें शंका केली.

"ती पहा, एक डोळा गेलेली म्हातारी बाई दिसते आहे ना? तिच्याकडेवर आहे, तीच तुझी बायको होईल." वृद्ध म्हणाला.

श्रीधर घाईघाईनें ती बाई होती तिकडे गेला. त्या म्हातारीच्या अंगावरचें फाटकें व जुनाट लुगडें पाहून त्यानें तोंड फिरविलें. त्या बाईनें मुलीला काठावर बसविलें व स्वतः आंघोळीला गंगेंत उतरली. त्या मुलीचें वय तीन वर्षांचें होतें. ती त्या म्हातारीची मुलगी किंवा नात असावी असें त्याला वाटलें.

त्याला तें सर्व आवडलें नाहीं. परत येऊन पाहालें तेव्हां तो म्हातारा तेथें नव्हता. त्या म्हाताऱ्याच्या बोलण्यावर विश्वास करावा तर आपल्या सारखा दुर्दैवी आणखी कोण असूं शकेल? तिला ठार केल्याशिवाय त्याला चैन पडेना.

मित्राची भेट होई पर्यंत घाटावर बसून राहाणें पण त्याला बरें वाटलें नाहीं.





तो गांवांत निघाला. कांहीं अंतर चालून गेल्यावर त्याला एक ओळखीचा नोकर भेटला. त्यानें त्याला जवळ बोलावून त्याच्या मनांत जें होतें तें सर्व सांगितलें. म्हणाला– "एका मुलीचें रूप घेऊन एक ब्रह्म राक्षसीण माझा पिच्छा पुरवीत आहे. तूं तिचा कांटा दूर केलास तर मी तुला दहा बराह बक्षिस देईन."

"ब्रह्मराक्षसीण असेल तर तिला ठार केलीच पाहिजे. मी तिचा शेवट करून हा आलोंच, पहा." असें सांगून तो नोकर एक सुरा घेऊन निघाला. श्रीधरनें त्याच्या-बरोबर जाऊन मणिकर्णिका घाटावर त्याला ती मुलगी दाखविली व म्हणाला–"लवकर जा. ती म्हातारी उचलून घेऊन जाईल तिला. तूं काम आटोपून ये माझ्याकडे." असें सांगून श्रीधर निघून गेला. डोळ्या देखत एका लहान मुलीचा खून झालेला पाहाण्याची हिंमत नव्हती त्याच्या अंगांत.

नोकर त्या म्हातारीच्या पाठोपाठ निघाला. इकूच त्यानें सुरा काढला व त्या मुलीला मारण्यासाठीं त्यानें हात उचलला. तेवढ्यांत त्या मुलीचें लक्ष त्याच्याकडे गेलें व घाबरून ती ओरडली. तिची ती केविल वाणी मुद्रा व ओरडणें ऐकून नोकराचा हात कांपला व सुरा त्या मुलीच्या डोळ्याजवळ लागला. पण जखम अगदींच बेताची होती. नोकर घाबरून पळून गेला. तो श्रीधरकडे गेला व त्या ब्रह्मराक्षसिणीचा वध केल्याचें सांगून त्याच्याकडून बक्षिस उकळलें.

एका लहानशा मुलीचा निर्दयपणानें वध करविल्याबद्दल श्रीधरला पश्चात्ताप वाटूं लागला. परंतु त्याचबरोबर आतां त्या मुलीशीं आपलें लग्न होणार नाहीं व तिच्या हातांतून आपण सुटलों असा विचार करून त्याच्या मनाला समाधानपण वाटलें.



त्यानें लग्न व्हावें म्हणून पुष्कळ यत्न केला. परंतु त्याला त्यांत यश मिळालें नाहीं. बराच काळ लोटला. श्रीधरचा हुद्दा वाढत गेला. पण त्याचें लग्न झालें नाहीं. पुरी चवदा वर्षें लोटलीं.

वरच्या हुद्द्यावर एका नवीन अधिकाऱ्याची नुकतीच नेमणूक झाली होती. त्यानें श्रीधरची योग्यता, प्रामाणिक-पणा व कार्य कौशल्य पाहिलें. त्याच्या मनावर त्या गोष्टींचा फार चांगला परिणाम झाला. नंतर त्याला असें कळलें कीं श्रीधर अजून कुवारा आहे. त्याचें त्याला आश्चर्य वाटलें. त्यानें श्रीधरला कारणपण विचारलें.

श्रीधर म्हणाला–"नशिबांत असेल तर होईल लग्न. अजून पर्यंत तरी माझे सर्व प्रयत्न अयशस्वी ठरले आहेत."

अधिकारी म्हणाला–"काय म्हणतां राव? अहो तुमच्या सारख्या गुणवान व शीलवान माणसाशीं लग्न करायला शेकडों मुली उड्या मारतील. बरें तें जाऊं द्या! माझी मुलगी आहे लग्नाची. पहा पसंत पडली तर, नुकतेंच सतरावें वर्ष लागलें आहे. गोरी, देखणी सुशिक्षित आहे. पहा पसंत पडली तर."



श्रीधरनें मुलीला पाहिलें. मुलगी पसंत पडली व दोघांचें लग्न झालें. एकुलती एक मुलगी होती म्हणून मुलीच्या बापानें मुलीला पुष्कळ दागिने घातले व मुलाला हुंडा पण भरपूर दिला. श्रीधरचा संसार सुखाचा झाला. आतां त्याला आयुष्यांत कोणत्याहि गोष्टीची उणीव उरली नाहीं.

एकदां त्याचें लक्ष बायकोच्या उजव्या भुवईवर लोंबणाऱ्या एका दागिन्याखालीं एक व्रण होता तिकडे गेलें. त्याची बायको सर्व दागिने काढून ठेवी. फक्त तो एक दागिना घालीत असतां त्यानें तो व्रण पाहाला व कसला व्रण म्हणून विचारलें. ती म्हणाली—"मी तीन वर्षांची होतें. आमची आया नदीवर आंघोळीला जातांना मला बरोबर घेऊन गेली. आम्ही परत येत होतों तेव्हां कोणी तरी दुष्ट माणसानें सुरा मारला व या जागीं जखम झाली. तो व्रण आहे."

"म्हणजे तुला गंगेवर घेऊन गेली होती ती तुझी आई नव्हती!" श्रीधरनें विचारलें.

त्याच्या बायकोला तो प्रश्न ऐकून आश्चर्य वाटलें तुम्हांला कशी काय माहिती त्या बाईची! माझी आई लहानपणींच वारली. मी बाबांच्या धाकट्या भावाची मुलगी आहें. माझे बाबापण लवकरच वारले. त्यांच्या वडील बंधूंना मूलबाळ नव्हतें. म्हणून मलाच आपली मुलगी मानून मला लहानाचें मोठें केलें."

सर्व ऐकून श्रीधर चकित झाला व त्यानें तिला चवदा वर्षांपूर्वी घडलेली गोष्ट सांगितली. तिला राग आला नाहीं. पण ती म्हणाली—"म्हणजे प्रत्यक्ष ब्रह्मदेवच तुम्हांला भेटला होता!"



# महाबली

फार पूर्वी उज्जैनचा राजा आदित्यसेन राजधानी सुप्रसिद्ध वेश्या तेजस्वती हिच्या रूपवती मुलीच्या सौंदर्यावर इतका भाळला कीं त्यानें तिच्याशीं लग्न करून तिलाच आपली पट्टराणी करून घेतलें. त्यांना एक मुलगी झाली. तिचें नांव चंद्रकला असें होतें.

आदित्यसेनाला आपल्या राणीचा विरह क्षणभरदेखील सहन होत नसे. त्याला एकदां त्याच्या मांडलिक राजाचें बंड मोडण्यासाठीं जावें लागलें. तेव्हां त्यानें आपल्या राणीला हत्तीवर अंबारींत बसविलें व स्वत: घोड्यावर बसून निघाला. वाटेंत एका जागीं कां कोणास ठाऊक, एका एकीं घोडा बुजला आणि पळूं लागला. राजानें त्याला लगाम ओढून थांबविण्याचा पुष्कळ यत्न केला. पण घोडा इतका पुढें निघून गेला कीं राजाचे घोडेस्वार पाठोपाठ पोंचले नाहींत. हताश होऊन व राणीला घेऊन ते उज्जैनला परतले.

आदित्यसेनाचा घोडा दाट रानांत एका जागीं थांबला. घोडा स्थिरावल्यावर राजानें घोड्यावरून उतरून त्याच्या पाठीवर हात फिरवला व पुन्हां घोड्यावर बसून उज्जैनला परत आला. परंतु किल्ल्याचें फाटक बंद झालें होतें. त्यानें अवेळीं किल्ल्यांत जाण्यापेक्षां बाहेरच रात्र काढावयाचें मनाशीं ठरविलें आणि स्मशानाजवळच्या एका मठांत गेला. त्या मठांत राहणाऱ्या ब्राह्मणांनीं राजाला ओळखलें नाहीं व म्हणून त्याला मठांत येऊं दिलें नाहीं.

त्या मठांत सुदर्शन नांवाचा एक तरुण युवक रहात असे. त्यानें राजाला ओळखलें

सौ. शामला देसाई



असावें. तो इतर लोकांना रागावला रात्रीच्या वेळीं कोणी पांथस्थ आल्यास त्याचें आतिथ्य करणें आपलें कर्तव्य आहे. नंतर त्यानें राजाचें आतिथ्य सर्वप्रकारें केलें. राजानें निघते वेळीं सुदर्शनचे आभार मानले. उज्जैनला पोंचल्यावर त्यानें सुदर्शनला बोलावून घेतलें. त्याच्या बरोबर मठांतले इतर ब्राह्मण पण आले होते. राजानें मठाला दान म्हणून एक हजार गावें, धान्य व निरनिराळ्या प्रकारचीं वाहनें दिलीं आणि सुदर्शनला राजपुरोहित म्हणून नेमलें.

मठांतल्या ब्राह्मणांचीं आपसांत भांडणें व तंटे होत व त्यामुळें मठाला दान म्हणून मिळालेलीं गांवें उध्वस्त झालीं. सुदर्शन त्यांच्या भांडणांत कधीं पडला नाहीं. त्याला कोणत्याहि वस्तूची गरज नव्हती. त्यानें तपश्चर्या करून अग्नीला प्रसन्न करून घेतलें. अग्नीनें त्याला आग्नेय खड्ग दिलें. त्यामुळें तो एक अजेय असा महाबली झाला.

ब्राह्मणांचे आपसांतील तंटे वाढले तेव्हां त्यांच्या पैकीं चक्रधर नांवाच्या एका वयस्क ब्राह्मणानें त्यांना सुचविलें कीं आपण एकाला आपला नायक निवडूं या व तो सांगेल तसें वागूं या. पण नायक कोणाला मानावयाचें, या गोष्टीवरून भांडणें मिटण्याऐवजीं जास्त वाढलीं. तेव्हां चक्रधरनें त्यांना आणखी एक उपाय सांगितला. म्हणाला—" श्मशानांत तिघांना फांशी देण्यांत आली आहे. रात्रीं जाऊन त्यांचीं नाकें कापून जो आणून दाखवील तो खरा शूर. तुम्ही त्याला आपला नायक म्हणून नेमा."

कोणी तें काम करायला धजला नाहीं. एकटा सुदर्शन कबूल झाला तें साहसाचें काम करायला. आग्नेय खड्ग हातांत घेऊन तो श्मशानांत गेला. फांशी गेलेल्यांचीं नाकें कापून घेतलीं व तीं उपरण्यांत बांधून परतला. वाटेंत त्याला एक जण एका प्रेतावर बसून जप करीत असलेला दिसला. सुदर्शन तो काय करतो हें पहात जवळच एका जागीं लपून बसून राहाला. थोड्या वेळानें प्रेताच्या तोंडांतून ज्वाला येत असलेल्या व बेंबींतून नाचण्यासारखे दाणे येत असलेले दिसले. त्या तांत्रिकानें त्यांतले कांहीं दाणे प्रेताच्या तळहातावर टाकले. त्याबरोबर तें प्रेत उठून उभें राहालें. प्रेतांत शिरलेल्या वेताळाच्या साहाय्यानें तो तांत्रिक वाटेल तीं कामें करवून घेऊं लागला. तांत्रिक त्या प्रेताच्या वर बसला. प्रेत चालत शेजारच्या काली मातेच्या देवळांत शिरलें. तांत्रिक खालीं उतरल्याबरोबर तें प्रेत पुन्हां तेथेंच निश्चेष्ट पडून राहालें. तांत्रिकानें देवीची पूजा केली आणि म्हणाला—" देवीनें मागितलेला वर दिला नाहीं तर देवीच्या पायांवर स्वतःचा बळी देऊन मी मोकळा होईन."

तेव्हां एक आवाज ऐकूं आला—"आदित्यसेनाची मुलगी चंद्रकला हिचा बळी दिलास तर तुझी इच्छा पुरी होईल."



कोच तांत्रिकानें प्रेतावर हात फिरवला आणि प्रेत उभें राहालें. त्याच्या खांद्यावर बसून तो आकाशमार्गें निघून गेला.

सुदर्शनला त्या तांत्रिकाच्या घोर कृत्यांचा मनस्वी राग आला. मनाशीं म्हणाला—"मी जिवंत असेपर्यंत ह्या राजकन्येच्या केसाला-देखील धक्का पोंचवूं शकणार नाहीं." असें मनाशीं ठरवून तो तेथेंच लपून बसून राहाला.

थोड्या वेळानें तो तांत्रिक राजकन्येला आकाशमार्गें घेऊन आला. सुदर्शननें आमोघ खड्गाचा प्रयोग करून त्या राक्षसी तांत्रिकाचें डोकें उडविलें.

आतां राजकन्येला राजवाड्यांत सुखरूप कसें पोंचवावयाचें या विवंचनेंत तो पडला असतां त्याला आकाशवाणी ऐकूं आली "त्या तांत्रिकाला प्रेताच्या बेंबींतून जे दाणे मिळाले आहेत त्यांच्या साहाय्यानें तुला रात्रभर आकाश भ्रमण करतां येईल."

तें ऐकून सुदर्शनला फार आनंद झाला. तांत्रिकाची पुरचुंडी सोडून त्यानें त्यांतले दाणे काढून घेतले व राजकन्येला घेऊन तो बाहेर आला. पुन्हां आकाशवाणी झाली—"एका महिन्यानंतर पुन्हां याच जागीं ये!"





सुदर्शन उत्तरादाखल "ठीक!" म्हणाला व आकाशमार्गें सरळ राजवाड्यांत राज-कन्येच्या महालांत जाऊन उतरला. तो राजकुमारीचा निरोप घेऊं लागला. म्हणाला—"उजाडण्यापूर्वीं मला गेलें पाहिजे. या दाण्यांचा उपयोग त्यानंतर होणार नाहीं. त्याशिवाय मला येथें पाहून लोक निरनिराळ्या प्रकारें तर्ककुतर्क करूं लागतील."

परंतु चंद्रकलेनें त्याचें एक ऐकलें नाहीं. ती फार भिऊन गेली होती. तिला धीर देण्यासाठीं म्हणून सुदर्शनला तेथेंच रहावें लागलें. परंतु त्याला लवकरच झोंप लागली. राजकन्या मात्र बसून होती.

सकाळीं दासी आल्या. राजकन्येच्या खास महालांत सुदर्शनला पाहून त्यांनीं राजाला त्या गोष्टीची वर्दी दिली. राजानें सुदर्शनला हजर करायला सांगितलें. सुदर्शननें रात्रीं घडलेलें सर्व वृत्त थोडक्यांत वर्णन करून सांगितलें. नंतर त्यानें प्रेतांचीं कापून आणलेलीं नाकें व प्रेताच्या बेंबींतून तांत्रिकानें काढलेले दाणे दाखविले. चक्रधरनें पण याला स्मशानांत कां जावें लागलें याची साक्ष दिली. स्मशानांत फांशी गेलेल्यांचीं नाकें खरोखरच कापलेलीं होतीं. कालीच्या देवळांत त्या तांत्रिकाचें प्रेत होतें, तें देखील राजाला दिसलें. हा सर्व पुरावा पाहून व स्वतःच्या मनाची खात्री करून घेऊन, सुदर्शननें किती शौर्यानें व चातुर्यानें राज-कुमारीचें रक्षण केलें ही गोष्ट ओळखून राजानें सुदर्शनशीं आपल्या मुलीचें लग्न करून दिलें आणि राजघराण्याच्या रीति-प्रमाणें आपल्या जांवयाला राजवाड्यांतच ठेवून घेतलें.

सुदर्शन राजवाड्यांत आनंदानें रहात होता. एकदां राजकन्या सहज त्याला म्हणाली—"तुम्हांला आठवतें का त्यादिवशीं








कालीच्या देवळांतून आपण बाहेर निघालों तेव्हां आपल्याला एक आकाशवाणी ऐकूं आली होती कीं एका महिन्यांनीं पुन्हां येथेंच ये व आपण होकार दिला होता."

"बरोबर! तूं बरोबर आठवण केलीस! मी पार विसरून गेलों होतों." असें सांगून सुदर्शन रात्रीं त्याची बायको झोंपी गेल्यावर आग्नेय खड्ग हातांत घेऊन कालीच्या देवळा-कडे गेला. तेथें त्याला एक विचित्र दिव्य इमारत दिसली. त्यांत एक देवलोकांतली एक अप्सरा होती. तिनें त्याला आंत बोलाविलें व म्हणाली—"मी विद्याधर कन्या आहें. माझें नांव भद्रा. तुझें साहस व धैर्य पाहून मी तुझ्याकडे आकर्षिलें. मीच तुला त्या दिवशीं अदृश्य रूपें बोलाविलें होतें. मी तुझीच वाट पहात होतें. मला प्राप्त अस-लेल्या दैविक शक्तीमुळेंच तुझ्या बायकोला तूं दिलेल्या वचनाची आठवण झाली. तूं माझ्याशीं लग्न करून येथेंच रहा."

सुदर्शननें तिच्याशीं लग्न करून घेतलें व तिच्या बरोबर राहूं लागला. पुढें कांहीं दिवसांनीं भद्राला भेटायला विद्याधर जातीची तिची एक मैत्रीण आली. ती म्हणाली—



"तूं मर्त्य लोकांतील एक सामान्य माणसाशीं लग्न केलेलें पाहून विद्याधर रागावले आहेत. तूं स्वतःचे रक्षण करण्यासाठीं तावडतोब येथून निघून जा. समुद्रापलीकडे पूर्वेला कार्कोटक नगर आहे. त्याच्या पलीकडे शीतोदका नांवाची नदी आहे. तिच्यापली-कडील उदय पर्वतांत सिद्ध क्षेत्र नांवाचें एक स्थान आहे. तेथें विद्याधरांना प्रवेश वर्ज्य आहे. तुझा पती साहसी वीर आहे. तो तेथें स्वतः येऊन तुला भेटेल."

तें ऐकून भद्रा घाबरून गेली. तिनें सुदर्शनला सर्व परिस्थिति नीट समजावून

देईन व आपल्या मुलीचें त्याच्याशीं लग्न करून देईन."

तें ऐकून सुदर्शन म्हणाला—"माझ्या कमरेला दोरी बांधून मला समुद्रांत सोडा. समुद्राच्या तळाशीं ज्या वस्तूला लागून जहाज अडकलें असेल ती वस्तु मी बाजूला सारून जहाज मोकळें करतो."

त्याप्रमाणें त्याच्या कमरेला दोरी बांधून स्कंददासाला समुद्रांत सोडण्यांत आलें. सुदर्शननें समुद्राच्या तळाला जाऊन पाहिलें तेव्हां त्याला तेथें एक महाकाय राक्षस झोपला असलेला दिसला. त्याच्या पायाला लागून तें जहाज अडकून बसलें होतें. सुदर्शननें अज्ञेय खड्गाचा प्रयोग करून त्या राक्षसाचा पाय कापून टाकल्याबरोबर जहाज हललें. लोभी स्कंददासानें विचार केला की सुदर्शनला वर येऊं दिलें तर त्याला आपलें अर्धें धन द्यावें लागेल. म्हणून त्यानें दोरी कापून टाकली. सुदर्शनला तेथेंच पाण्यांत सोडून जहाज घेऊन तो निघून गेला.

सुदर्शननें राक्षसाचा जो पाय तोडला होता त्याचीच एक नाव करून घेतली व तिच्यांत बसून तो समुद्र पार गेला. सात दिवसानंतर तो कार्कोटक नगरीं पोंचला. तेथें परदेशी लोकांना रहाण्यासाठीं एक धर्मशाळा बांधलेली होती. तेथील राजा आर्यवर्मा यानें ती धर्मशाळा बांधली होती. धर्मशाळेंतील ब्राह्मणांनीं सुदर्शनच्या जेवणाखाण्याची उत्तम सोय केली. त्याला अंगांत घालायला चांगले कपडे दिले. धर्मशाळेंत रहात असतां रात्रीं त्याला दवंडी ऐकूं आली. "उद्यां सकाळीं राजकुमारीशीं विवाह करावयाची इच्छा असेल त्यानें तिच्या अंतःपुरांत आधीं जाऊन झोपलें पाहिजे."

त्यानें धर्मशाळेंतील लोकांना विचारलें—"अशी दवंडी पिटविण्याचें कारण काय ?"

तेव्हां ते म्हणाले—"राजकुमारीचें अंतःपुर म्हणजे तो काळाचा जबडाच म्हटला पाहिजे. त्यांत प्रवेश करणारा बाहेर जिवंत आलेला नाहीं."

तें ऐकून सुदर्शनला चेव चढला. तो राजवाड्याकडे निघाला. राजानें रात्रीं त्याला राजकुमारीच्या अंतःपुरांत पाठविलें. त्याच्या हातांत त्यावेळीं आज्ञेय खड्ग होतेंच. थोड्या वेळानें एक राक्षस दारांत उभा असलेला दिसला. त्याचा उजवा हात थोटका होता. त्यानें डावा हात पुढें केला. सुदर्शनला पौंड्रवर्धन येथें एका राक्षसाचा उजवा हात





कांपल्याची आठवण झाली. आग्नेय खड्गानें त्या राक्षसाचा डावा हात कापून टाकला तर तो राक्षस पळून जाईल असा विचार करून सुदर्शननें त्याचे केस धरले व त्याला तलवारीनें ठार करणार इतक्यांत तो राक्षस ओरडला—"माफ करा! जीवदान द्या!"

सुदर्शननें त्याला विचारलें—"कोण तूं?"

"माझें नांव यमदंष्ट्र. मला दोन मुली आहेत. एक येथें आहे व एक पौंड्रवर्धनला. त्यांच्याशीं मितऱ्यांचें लग्न झालेलें मला पसंत नाहीं. म्हणून शंकराच्या आज्ञेनें मी त्यांच्याशीं लग्न करण्याच्या इच्छेनें येणाऱ्यांस ठार करीत आलों. पौंड्रवर्धन येथें एकानें माझा हात कापला. तूं तर मलाच ठार करायच्या विचारांत आहेस. शंकराची आज्ञा संपली."

"पौंड्रवर्धन येथें मीच तुझा हात कापला होता!" सुदर्शन म्हणाला.

"तरमग तूं मनुष्य नसून देव आहेस. तुझ्यासाठीं म्हणून शंकरानें कदाचित तशी आज्ञा दिली होती. आजपासून आपण दोघे मित्र. तुला मदतीची गरज असेल तेव्हां तूं माझी आठवण कर. मी हजर होईन." असें सांगून यमदंष्ट्र सुदर्शनचा निरोप घेऊन निघून गेला. दुसऱ्या दिवशीं सुदर्शनचें राजकन्येशीं लग्न झालें.

सुदर्शन आपल्या नवीन पत्नीच्या सहवासांत कांहीं दिवस राहाला. नंतर एकदां रात्रीं ती झोंपल्यावर तो भद्राच्या शोधार्थ निघून गेला. गांवाबाहेर पोंचल्यावर त्यानें यमदंष्ट्राचें स्मरण केलें. तो हजर झाला व नमस्कार करून समोर उभा राहाला.

सुदर्शन म्हणाला—"उदयाद्रीवर सिद्ध क्षेत्रांत भद्रा नांवाची एक विद्याधरी राहाते. मला तेथें जावयाचें आहे. तूं मला घेऊन जाऊं शकशील का?"

राक्षसानें तें कबूल केलें आणि सुदर्शनला आपल्या खांद्यावर बसवून घेऊन समुद्रपार शीतोदका नदी पार करून उदयाद्री पर्वतावर पोंचला. सिद्ध क्षेत्रांत त्याला प्रवेश वर्ज्य आहे असें सांगून त्यानें सुदर्शनचा निरोप घेतला.

त्या पर्वतावर मनुष्यांनादेखील प्रवेश वर्ज्य होता म्हणून तो एका विहिरीच्या काठीं बसून राहाला. कारण त्या विहिरीवर त्याला बायकांचा पावलांच्या खुणा दिसल्या. थोड्या वेळानें देव जातीच्या अनेक स्त्रिया आपापल्या घागरी घेऊन पाणी घेऊन















आल्या. त्यानें त्यांना विचारलें—"हें पाणी कोणासाठीं घेऊन चालला आहां तुम्ही ?"

"भद्रा नांवाची विद्याधरी या सिद्ध क्षेत्रांत राहाते. तिच्या स्नानासाठीं आम्ही पाणी घेऊन जात आहों." त्या म्हणाल्या.

त्यांपैकीं एकीनें सुदर्शनला पाण्याचें भांडें डोक्यावर घ्यायला जरा हात धरायला सांगितलें. सुदर्शननें भांडें डोक्यावर ठेवते वेळीं भद्रानें दिलेली अंगठी हळूच त्या भांड्यांत टाकली.

आंघोळ करीत असतां एका घागरींतून पाण्याबरोबर अंगठी खाली पडली. भद्रानें ती लगेच ओळखली व चकित होऊन तिनें पाणी ओतणारीला विचारलें—"विहिरीवर कोणी नवीन मनुष्य भेटला होता का ?"

सर्व म्हणाल्या—"हो ! होता बाई एक नवीन मनुष्य. त्यानेंच हात लावला घागरी डोक्यावर घेतांना."

"तर मग जाऊन त्याला आदरपूर्वक बोलावून घेऊन या." भद्रा त्यांना म्हणाली. थोड्या वेळानें तिच्या मैत्रिणी सुदर्शनला बोलावून घेऊन आल्या. भद्राला अपरंपार आनंद झाला. पतिविरहानें ती अर्धी झाली होती. तिला भेटण्यासाठीं त्याला वाटेंत



किती कष्ट सहन करावे लागले तें वर्णन करून त्यानें सांगितलें. भद्रा त्याला म्हणाली—"आतां माझी कष्टदशा संपली. माझ्या प्राणेश्वराची भेट झाली. आतां माझ्यासारखी सुखी या जगतांत कोण असेल ?"

"मग तूं ह्या सर्व सुखाचा त्याग करून माझ्या बरोबर उज्जैनला यायला तयार आहेस का ?" सुदर्शननें तिला विचारलें. तेव्हां ती म्हणाली—"मी आपल्या सर्वस्वाचा त्याग करायला तयार आहें."

रात्रभर सुदर्शन तेथेंच रहाला. सकाळीं तो भद्राला बरोबर घेऊन सिद्ध क्षेत्राबाहेर

आला व त्यानें त्या राक्षसाचें स्मरण केलें. राक्षस प्रकट झाल्यावर दोघे त्याच्या खांद्या-वर बसून कार्कोटक नगरीं पोंचले. तेथील रहिवासी राक्षसाला पाहून घाबरले. सुदर्शन आर्यवर्माच्या मुलीला घेऊन भद्रेश्वरोवर स्कंददासाच्या गांवीं आला. राक्षसाला पाहून स्कंददास घाबरूनच गेला. त्यानें निमूटपणें त्याला आपली मुलगी व अर्धें धन देऊन टाकलें. सुदर्शन आपल्या तिघां बायकांना घेऊन पौंड्रवर्धन नांवाच्या गांवीं येऊन पोंचला. त्याची बायको व सासरा त्याची वाट पहात होते. पुष्कळ दिवसांनीं त्याला सुखरूप परत आलेला पाहून त्यांना फार आनंद झाला. त्यांना कांहीं दिवस राहायला पुष्कळ आग्रह केला. परंतु त्याला थांबायला वेळ नव्हता. म्हणून तो पौंड्रवर्धनच्या राजकन्येला, म्हणजे आपल्या चवथ्या बायकोला बरोबर घेऊन उज्जैनला आला. उज्जैनचे नागरिक प्रथम घाबरले. परंतु सर्व परिस्थिति समजल्यावर त्यांना आनंद झाला. आदित्यसेन आपल्या जांवयाला भेटायला सामोरा गेला. सुदर्शन राक्षसाच्या खांद्यावरून खालीं उतरला व आपल्या सास-ऱ्याला नमस्कार केला. नंतर त्यानें राक्षसाला निरोप दिला.

चंद्रकला पतिविरहानें आजारी पडली होती. परंतु पतीची भेट झाल्यावर ती आनंदानें उठून उभी राहाली. सुदर्शनला सासऱ्यानें विचारलें "तुला हा राक्षस कोठें भेटला व या सर्वांशीं तुझें लग्न कसें काय झालें?" सुदर्शननें थोडक्यांत सर्व वृत्त सांगितलें. आदित्यसेन राजानें सुदर्शनला आपलें अर्धें राज्य देऊन त्याचा राज्याभिषेक थाटामाटानें साजरा केला.





# गवती अंगडें

पूर्वीं कधीं जपान देशांतल्या एका गांवीं ओटोको नांवाचा एक उडाणटप्पू मुलगा रहात असे. तो गांवकऱ्यांना निरनिराळ्या प्रकारें त्रास देत असे. गांवकरी ओरडत, किंवा मारहाण करीत. परंतु त्याचा त्याच्या मनावर कांहीं एक परिणाम होत नसे.

एकदां तो रिकामटेंकडा एका जागीं बसला असतां त्याला समोर एक बांबू दिसला. त्यानें तो कापून त्याची फुंकणी करून घेतली आणि ती डोळ्याला लावून दुर्बिणीसारखी गंमत पाहूं लागला. योगा-योग असा कीं नेमकें त्याच वेळीं त्याला दुर्बिणींतून टेन्गु जातीचें एक पिशाच दिसलें.

टेन्गु जातीच्या भुताच्या वाटेला जाण्यांत धोका आहे हें प्रत्येकाला माहीत होतें. म्हणून ओटोकोसारख्या मूर्खांना सोडून कोणी त्याच्या वाटेला जाण्याचा विचार सुद्धां करीत नसे.

ओटोकोनें जें भूत पाहिलें त्याला लांब नाक होतें. त्याच्या दोन्ही खांद्याला दोन पंख होते. त्याच्या अंगांत एक गवताचें अंगडें होतें. तें भूत जवळ येत आहे हें पाहून ओटोकोनें तें गवती अंगडें लांब-वण्याचा विचार केला.

भूतजवळ आल्याबरोबर ओटोको आपली 'दुर्बीण' आकाशाकडे लावून मोठ्यानें ओरडला—"काय पण गंमत आहे!" भुतानें तें ऐकलें. त्यावेळीं तें आका-शांतच घिरट्या घालीत होतें. त्यानें त्याला विचारलें—"काय गंमत आहे? पाहूं दे मला!"

श्री वा. ना. सोनार



"म्हणजे माझी ही दुर्बीण देऊं म्हणतोस! किती डोकें लढवून व मेहनत करून मी ही बनविली आणि म्हणें, मला दे!" ओटोको म्हणाला. थोड्या वेळानें तो पुढें म्हणाला— "चंद्र काय सुंदर दिसतो आहे! ते पर्वत आणि ती वनश्री, अहाहा! एकाहून एक सुंदर!"

निसर्ग सौंदर्याचें वर्णन ऐकून भुताच्या मनांत तें पाहाण्यासाठीं औत्सुक्य वाढूं लागलें. तें इतकें अधीर झालें कीं तो मागेल तें देऊन 'दुर्बीण' मागूं लागलें. त्यानें आपले जोडे, टोपी देऊं केले. पण ओटोको त्याचें गवती अंगडें मागूं लागला. भुतानें गवती अंगडें दिल्यावर ओटोकोनें त्याला ती 'दुर्बीण' दिली आणि तेथून पाय काढला. भूत बराच वेळ दुर्बिणीतून पहात राहिलें. पण एक देखील दृश्य त्याला दिसलें नाहीं.

ओटोकोनें भुताच्या दृष्टीआड होतांच तें गवती अंगडें अंगांत घातलें. त्याला हें कळून आलें कीं तें घातल्याबरोबर तो इतर कोणाला दिसत नाहींसा झाला आहे. त्याला परमावधीचा आनंद झाला. तो गांवांत शिरला व गल्लींत समोर दिसणाऱ्या माणसांना धक्के मारून पुढें जाऊं लागला. कोणाच्या डोक्यावरची टोपली खालीं पडली तर कोणाच्या डोक्यावरची पगडीच पडली. दुकानांतल्या वस्तूपण इकडे तिकडे रस्त्यावर फेंकल्या गेल्या. कोणाकोणाचें नाकच ओढलें गेलें. ऐकूण गोंधळ उडून गेला.

गाडी मोकळी झाली. एक गलेलठ्ठ श्रीमंत मनुष्य डोलत गल्लीतून जात असतां कोणीतरी येऊन त्याला डावा कान पिळला. तो डावीकडे वळून वर पाहूं लागला तर त्याचा उजवा कान पिळला गेला. तो तिकडे पाहूं लागला व हातवारे करूं लागला. परंतु कोणी जवळ दिसला नाहीं. दारांत किंवा खिडकींत उभे राहून त्याची झालेली ही फजीती जे लोक पहात होते. ते सर्व हंसत होते. कारण एक श्रीमंत मनुष्य वेड्यासारखा रस्त्यावर हातवारे करीत होता.

त्याच वेळीं एक मनुष्य नवे कपडे विकत घेऊन आला. एकदम ते कपडे हवेंत उडूं लागले व गटारांत जाऊन पडले.

एका जागीं मासळी बाजारांत अगदीं ताजी मासळी आली. ती मासळी एकदम हलूं लागली. कांहीं वेळानें एक मोठा मासा गल्लींतून अधांत्री उडत असलेला दिसला. मासळी विकणारे त्याच्या पाठीमागें धांवले. ते अगदींजवळ येऊन पोंचले तेव्हां तो एकदम खालीं त्यांच्या पायावर आदळला. ही सर्व भुताटकीशी वाटली सर्वांना.

लोकांना अशाप्रकारें कांहीं वेळ त्रास दिल्यावर ओटोको घरीं गेला. तो समोरच्या दारानें आंत गेला. गवती अंगडें काढून ठेवून तो आईच्या समोर आला. मागचें दार बंद होतें. मुलगा घरांत कसा काय आला हें आईला कळेना. कारण तिनें त्याला आंत जातांना पाहिलें नव्हतें. पण





ती कांहीं बोलली नाहीं. मुलगा झोपीं गेल्यावर तिला तें गवती अंगडें दिसलें. ही काय घाण घेऊन आला आहे मुलगा, असा विचार करून तिनें तें अंगडें चुलीत घालून जाळून टाकलें. त्या अंगड्याची राख होऊन गेली.

ओटोको उठल्यावर आपलें गवती अंगडें हुडकूं लागला. त्यानें आईला विचारलें तेव्हां ती म्हणाली—"मी ती घाण चुलींत कोंबली. ओटोकोला वाईट वाटलें व आईचा राग पण आला. पण काय करणार! गवती अंगड्याची जादू कदाचित राखेंत असूं शकेल असा विचारकरून त्यानें चुलीं-तली सर्व राख काढून एका टोपल्यांत भरून ठेवली. नंतर टोपलें अंगणांत एका बाजूला ठेवून दिलें व राख अंगाला फासूं लागला. जेथें जेथें राख लागली होती अंगाचा तो भाग दिसत नाहींसा पाहून त्याला आनंद झाला. त्यानें सर्व अंगावर व तोंडालापण राख फासून घेतली.

तो गांवांतल्या मोठ्या बाजारांत भर रस्त्यावर चालूं लागला. संध्याकाळची वेळ होती. तो रस्त्यावरून चालला असतां त्याला एका जागीं दारूचा वास आला. दारूच्या दुकानांत लोकांची गर्दी होती. दुकानदार एका मोठ्या पिंपांतून दारू काढून प्यायला देत होता.

पिंपापासून दुकानदार कांहीं कामा-निमित्तें गेला व जवळ कोणी नाहीं हें पाहून ओटोको पिंपाजवळ जाऊन पिंपाला लावलेला नळ हलून सोडून दारू पिऊं लागला. दारू पीत असतां 'गटगट' आवाज ऐकूं येत होता. दुकानदार पाहूं लागला पण कोणीच दिसला नाहीं. त्यानें जास्त न्याहाळून पाहिलें तेव्हां त्याला एका माण-साचें नुसतें तोंड दिसलें. कारण ओटोकोच्या तोंडाला दारू लागल्यानें राख धुऊन निघाली होती. दुकानदार घाबरून गेला. कोणी मनुष्यतर नाहीं नुसतें तोंड कसें काय दिसतें आहे? पण थोड्यावेळानें दारूमुळें ओटोकोची हनुवटीपण धुवून निघाली. आतां त्याला कांहीं शंका उरली नाहीं. तो जोरानें ओरडला कोण पितो आहे दारू?" ओटोको घाबरून बाजूला सरकला. त्याच्या सर्व अंगाला घाम सुटला व जेथें जेथें राख धुवून निघाली होती तेथें तेथें त्याचें अंग पुसट दिसूं लागलें.

सोंग संपल्याची खात्री पटतांच ओटोको दुकानांतून बाहेर पळाला व रस्त्यावरून जोरानें पळूं लागला. दुकानांतले लोक बाहेर येऊन त्याचा पाठलाग करूं लागले. ओटोकोनें आपला बचाव करून घेण्यासाठीं एका कालव्यांत उडी मारली. त्याच्या अंगावरची राख साफ धुवून निघाली. त्यानें डोकें वर केलें. थंडीमुळें तो कुडकुडत होता. परंतु लोकांच्या भीतीमुळें त्याला गार पाण्यांत पोहात रहावें लागलें.

त्याचा पाठलाग करणारांनीं त्याला ओळखलें व धरून बाहेर काढून त्याच्या अंगावर एक जाड कापड टाकलें. "तुझ्या मूर्खपणामुळें तुझी काय गत झाली पाहा-लीस?" गांवच्या पाटलानें विचारलें.

ओटोकोनें मान खालीं करून त्यानें टेन्गु जातीच्या भुताला फसवून त्याचें गवती डगलें कसे लांबवलें होतें व त्यानंतर जें कांहीं घडलें तें सर्व सांगून टाकलें. तें ऐकून पाटील म्हणाला—"तूं टेन्गु भुताला फसवायला निघाला होतास? शहाणाच दिसतोस!" असें सांगून व त्याला एका मूर्खांत काढून सर्व निघून गेले.





# बेत फसला

एका गांवीं लखुजी नांवाचा एक शेतकरी रहात होता. त्याला सखू नांवाची एक बहीण होती. बहीणभावंडांचें परस्परांवर फार प्रेम होतें. परंतु सखू स्वभावानें थोडी मानी व घमेंडखोर होती. भावाला ती गोष्ट माहीत होती. तरी त्यानें कधीं तिकडे लक्ष दिलें नाहीं.

लखुजीनें आपल्या बहिणीसाठीं चांगलें श्रीमंताकडचें एक स्थळ पाहिलें व दोन एकर जमीन हुंडा म्हणून देऊन बहिणीचें लग्न थाटामाटानें करून दिलें. नंतर त्यानें स्वतःचें लग्न करून घेतलें. त्याचा बायको एका गरीब घराण्यांतलीच होती.

सखू आपल्या सासरीं निघून गेली व लखुजीची बायको घरीं आली आणि गरीबींतच पण आनंदांत आपल्या पतीला सुखी ठेवण्यासाठीं झटूं लागली. संसाराचें ओझें दिवसेंदिवस वाढत गेलें. दोघं शेतावर जाऊन काम करीत. परंतु उद्यांची फिकीर त्यांचा पिच्छा सोडीत नव्हती.

मुलें भूक लागली म्हणजे रडत. पण त्यांना उपाशींच मारून मुटकून झोपवीत असतां लखुजी व त्याची बायको अश्रू ढाळीत. खायचे व खेळायचे दिवस होते त्यांचे. परंतु त्या मुलांना एक वेळ पोटभर खायलादेखील मिळत नसे.

एकदां बायको लखुजीला म्हणाली— "एकदां वन्संच्या घरीं कां नाहीं जाऊन येत? होईल तेवढी त्या मदत करतील. आपली ही स्थिति पाहून त्यांना वाटलें तर देतील चार पैसे नाहींतर जन्माची ही गरीबी आहेच."

सौ. शांताबाई कासार





लखुजी नकार देऊं शकला नाहीं. दुसऱ्या दिवशीं सकाळीं उजाडतांच चार शिळ्या भाकऱ्या बांधून घेतल्या आणि निघाला. संध्याकाळीं सखू रहात होती तें गांव लागलें. सखूनें दुरून भावाला येत असलेला पाहून ओळखलें. भावाचे ते मळके व फाटके कपडे, खोल गेलेले डोळे पाहूनच सखू घाबरून गेली. भावाची ती स्थिति पाहून मनांत थोडी दया वाटायला हवी होती. पण तिला वाटलें कीं तिचा सुखाचा संसार पाहून चार दिवस स्वारी आली असावी.

लखुजीनें बहिणीला दारांत पाहिलें होतें. परंतु दाराजवळ तो आला तेव्हां ती तेथें नव्हती. त्याला वाटलें, पाणी बिणी आणायला आंत गेली असेल. पण आंतल्या गाडीची सखू आंत गेली होती दुसऱ्याच कामासाठीं. तिनें रेशमी साडी सोडून ठेवली व एक जुनी मळकी साडी नेसून बाहेर आली.

एका मिनिटांत बहिणींत झालेला तो फरक पाहून लखुजीला वाटलें कीं मर्घा दिली ती सखू नसावी.

दरवाज्यांत भावाला उभा पाहून खोटें सोंग करून रडत ती म्हणाली—"इतक्या दिवसांनीं आली वाटतें बहिणीची आठवण? तुला वाटलें असेल श्रीमंताच्या घरीं बहिणीला दिलें आहे, असेल मजेंत. पण येथें सुखाचा एक घास मिळायची मारामार."

लखुजीला फार वाईट वाटलें. तो आंत आला तर बिंग फुटेल या भीतीनें सखूनें एक जुनी खाट बाहेरच पडवींत टाकली. लखुजीनें आपलें उपरणें खाटेवर टाकलें व थोडा आडवा झाला.

संध्याकाळीं नवरा शेतावरून यायची वेळ झाली. सखू नवऱ्याची वाट पहात मागच्या दारीं उभी होती. तो आल्याबरोबर









म्हणाली—“मेहुणा आला आहे!” तें ऐकून तिच्या नवऱ्याला आनंद झाला की लग्न झाल्यानंतर प्रथमच तो आला आहे. पतीला तिचा सांगण्याचा हेतू न कळल्याचें समजल्यावर ती म्हणाली—“तसें नव्हे, त्याला कळलें कीं आपल्या घरची स्थिति चांगली आहे तर तो मागायला मागें पुढें करणार नाहीं. म्हणून आपण आपली श्रीमंती न दाखवितां गरीबीच दाखविली पाहिजे.”

नवऱ्याला तें विचित्र वाटलें, पण कबूल झाला. सखूनें नवऱ्यासाठीं पण एक मोडकी खाट बाहेर नेऊन टाकली. नवरा त्या खाटेवर जाऊन पडून राहाला मेहुण्याशीं काय व कसें बोलावें हेंच त्याला कळत नव्हतें. त्याला आपण जणुंकांहीं पाहिलेंच नाहीं असें दाखवून तो खाटेभर आडवा झाला.

त्या दिवशीं कांहींतरी सण होता. सखूनें मोठ्या आवडीनें कांहीं पक्वान्नें तयार केलीं होतीं. तिचा भाऊ आला नसता तर दोघां पति पत्नींनीं बसून आनंदानें पक्वान्नावर हात मारला असता. सखूच्या नवऱ्याला भूख लागली होती. पण सखूनें नवऱ्याला रात्रीं बोलावून खायला देईन म्हणून सांगून ठेवलें होतें. तो तळमळत अंथरुणावर पडून होता.

लखुजीला झोप येत नव्हती. आपण बहिणीच्या घरीं उगीच आलों. तिच्या गरीबींत तिला हातभार लावायचा सोडून आपणच तिच्याकडे मागायला आलों हें बरें केलें नाहीं. रात्र वाढत चालली तशी थंडी वाढूं लागली. बायकोनें एक शेगडी नवऱ्याच्या खाटेखालीं आणून ठेवली होती. ती उचलून तिच्यानवऱ्यानें मेहुण्याच्या खाटेखालीं ठेवली आणि तेवढ्यावरच मनाचें समाधान करून घेतलें.

अर्धी रात्र लोटली. सखूचा नवरा घोरूं लागला होता. लखुजी मात्र तळमळत अंथरुणावर पडून होता. इतक्यांत सखू खाटेजवळ आली. शेगडी ठेवली होती त्या खाटेवरच नवरा निजला असेल असें समजून “या जेवायला असें सांगून ती आंत गेली.”

लखुजीला तें नाहीं आवडलें. त्याला वाटलें कीं नवऱ्याच्या भीतीनें तिनें अपरात्रीं आपल्याला बोलावून जेवायला वाढायचें ठरविलें असावें. तरी तो उपरणें अंगावर टाकून घरांत गेला.

जेवण वाढून तयार होतें. दिव्याचा उजेड बेताचा होता. “घ्या जेवून आणखी कांहीं लागलें तर घ्या वाढून सर्व जवळच ठेवून दिलें आहे.” असें सांगून ती निघून गेली. तिनें भावाला ओळखलें नाहीं. तिला वाटलें नवराच येऊन जेवायला बसला आहे. कारण खुणेसाठीं म्हणून तिनें शेगडी नवऱ्याच्या खाटेखालीं ठेवली होती. परंतु ती गोष्ट तिनें नवऱ्याला कळविली नव्हती. बाहेर जाऊन दारांत जणुंकांहीं पाहाण्याला म्हणून बसून राहाली.

लखुजीला वाटलें, बहिणीनें नवऱ्याची नजर चुकवून इतक्या प्रेमानें वाढलें आहे तर तिच्या मनाचा हिरमोड करणें बरोबर होणार नाहीं. पोटभर जेवला व बहिणीनें



पोटभर जेवून घ्यायला सांगितलें आहे त्याचा अर्थ, आहे तेवढें सर्व घेऊन जा असा लावून त्यानें उपरण्यांत उरलेलीं पक्वान्नें काढून बांधून घेतलीं. वहिणीला जाऊन बोलाविलें तर मेहुणा उठून शांत येईल व सर्व शोभाडा होईल असा विचार करून मागच्या दारानें गांवी निघून गेला.

थोड्या वेळानें सखूचा नवरा जागा झाला. बायकोनें रात्रीं उठवून जेवायला वाढलें नाहीं म्हणून छान तापला होता. मेहुण्याची खाट पण रिकामी होती. ओरडून म्हणाला—"रात्रीं उठवून जेवायला वाढीन म्हणाली होतीस ? आणि मग उठविलें कां नाहीस ?"

"पोटभर खाऊन पुन्हां मलाच विचारतां होय कां नाहीं उठविलेंस म्हणून !" दरवाज्यांत बसल्याबसल्याच सखू म्हणाली.

नवऱ्याला आला राग व त्यानें रागाच्या भरांत बायकोला दोन लाथा मारल्या आणि विचारलें—"कोठें गेले तुझे बंधुराज ?"

तेव्हां तिच्या लक्षांत सर्व कांहीं आलें. तिनें विचारलें—"शेगडी बदलायला कोणी सांगितलें होतें ? मी खुणेसाठीं ठेवली होती."

"तूं आपल्या स्वतःच्या सख्ख्या भावाला उपाशी ठेवायला तयार झालीस, उद्यां माझा भाऊ आला तर त्याला घरांत पाऊल ठेवून देशील कीं नाहीं शंकाच." असें म्हणत त्यानें तिच्या झिंझोट्या धरून तिला घराबाहेर ढकललें.

रघुजी घरीं आला व बायकोजवळ वहिणीच्या औदार्याची प्रशंसा करून उपरण्यांत बांधून आणलेलीं पक्वान्नें समोर ठेवलीं.

पुन्हां त्यानें वहिणीच्या घरची पायरी चढायची नाहीं असें मनाशीं ठरविलें.





# परोपकारी गोपाळ

एके दिवशीं रात्रीं चांगला काळोख पडल्यावर कोणीतरी दोघे नवरा बायको आपल्या दोघां मुलांना घेऊन गोपाळच्या घरीं पोचली. मुलांच्या बापाचें नांव जगन्नाथ होतें. जगन्नाथ सासुरवाडहून आपल्या बायकामुलांना घेऊन आपल्या गांवीं चालला होता. वाटेंत गोपाळ रहात होता तें गांव पडत होतें. संध्याकाळपर्यंत गांवीं पोहचूं असें त्यांना वाटलें होतें परंतु अर्ध्यावाटेवरच रात्र झाली. म्हणून गोपाळच्या गांवीं मुकाम करावा लागला.

जगन्नाथानें गोपाळची कीर्ति ऐकली होती. त्याला वाटत होतें कीं गोपाळ हा एक महामूर्ख मनुष्य आहे. त्याला फसवून लुबाडून लोक आपला फायदा करून घेतात. संधी मिळाली कीं आपल्याला देखील गोपाळकडून कांहीं तरी उकळतां येईल. जगन्नाथ आपल्या बायकोला व मुलांना घेऊन गेला तेव्हां गोपाळची आई व लक्ष्मी घरांत होत्या. दोघींनीं पाहुण्यांच्या राहाण्या-जेवणाखाणाची उत्तम व्यवस्था केली. लहान मुलीला दूध लागत होतें तें मागवून दिलें व झोपण्यासाठीं एक खोली दाखवून अंथरूण पांघरूण दिलें.

जगन्नाथ अंथरुणावर आडवा झाला तेव्हां शेजारच्या खोलींत लक्ष्मी व तिची सासू बोलत होत्या तें त्याला ऐकूं आलें. तो जास्त कान देऊन तें ऐकूं लागला. सासू सुनेला सांगत होती—"अग लक्ष्मी ! काल लग्नासाठीं म्हणून घातलेली दागिने अजून येथेंच आहेत वाटतें. जागचे जागीं जाऊं देत पाहूं." जगन्नाथानें तें ऐकलें.

दागिन्यांची पेटी ]

[ श्री. मा. गो. मोरे

पोटभर जेवून घ्यायला सांगितलें आहे त्याचा अर्थ, आहे तेवढें सर्व घेऊन जा असा लावून त्यानें उपरण्यांत उरलेलीं पक्वान्नें काढून बांधून घेतलीं. बहिणीला जाऊन बोलाविलें तर मेहुणा उठून शांत येईल व सर्व बोभाटा होईल असा विचार करून मागच्या दारानें गांवी निघून गेला.

थोड्या वेळानें सखूचा नवरा जागा झाला. बायकोनें रात्रीं उठवून जेवायला वाढलें नाहीं म्हणून छान तापला होता. मेहुण्याची खाट पण रिकामी होती. ओरडून म्हणाला—"रात्री उठवून जेवायला वाढीन म्हणाली होतीस? आणि मग उठविलें कां नाहींस!"

"पोटभर खाऊन पुन्हां मलाच विचारतां होय कां नाहीं उठविलेंस म्हणून!" दरवाज्यांत बसल्याबसल्याच सखू म्हणाली.

नवऱ्याला आला राग व त्यानें रागाच्या भरांत बायकोला दोन लाथा मारल्या आणि विचारलें—"कोठें गेले तुझे बंधुराज!"

तेव्हां तिच्या लक्षांत सर्व कांहीं आलें. तिनें विचारलें—"शेगडी बदलायला कोणी सांगितलें होतें? मी खुणेसाठीं ठेवली होती."

"तूं आपल्या स्वतःच्या सख्ख्या भावाला उपाशी ठेवायला तयार झालीस, उद्यां माझा भाऊ आला तर त्याला घरांत पाऊल ठेवून देशील कीं नाहीं शंकाच." असें म्हणत त्यानें तिच्या झिंझोट्या धरून तिला घराबाहेर ढकललें.

लखुजी घरीं आला व बायकोजवळ बहिणीच्या औदार्याची प्रशंसा करून उपरण्यांत बांधून आणलेलीं पक्वान्नें समोर ठेवलीं.

पुन्हां त्यानें बहिणीच्या घरची पायरी चढायची नाहीं असें मनाशीं ठरविलें.



त्याचा मुलगा 'ए गाडीवाले'! 'ए गाडीवाले'! असा ओरडला.

गोपाळ त्या गाडींत होता. तो आपल्या गांवीं परत चालला होता. त्यानें गाडी थांबविली आणि विचारूं लागला—"गाडींत बसायचें आहे का?" गोपाळनें मुलाला विचारलें. पण मुलाच्या जागीं जगन्नाथानें आपल्या गांवाचें नांव सांगून त्या गांवीं जायचें आहे असें सांगितलें.

गोपाळ म्हणाला—"कांहीं हरकत नाहीं. फार दूर नाहीं, मी तुम्हांला पोंचवून मग जाईन आपल्या गांवीं. बसा गाडींत. उद्यां सकाळीं जाईन मी आपल्या गांवीं." असें सांगून गोपाळ गाडींतून उतरला आणि त्यांना गाडींत बसवूं लागला. त्यांचें सामान गाडींत ठेवतांना पेटी पाहून त्याला आश्चर्य वाटलें. त्यानें आणखी लक्षपूर्वक पाहिलें तेव्हां त्याला पेटीवर त्याच्या वडिलांचें नांव परशुराम असें लिहिलेलें दिसलें. त्याला जास्तच आश्चर्य वाटलें.

सर्व गाडींत बसल्यावर गोपाळनें गाडी चालविली. जगन्नाथाच्या गांवीं गाडी जाऊं लागली. म्हणाला—"या पेटीसारखीच पेटी आमच्या घरीं पण आहे. अगदीं हुबेहूब



अशीच. पेटीवर माझ्या वडिलांचें नांव परशुराम म्हणून असेंच लिहिलेलें आहे."

जगन्नाथ घाबरला. पण स्वतःला सावरून म्हणाला—"म्हणजे तुमच्या वडिलांचें नांव परशुरामच आहे म्हणतां! म्हणून तुमची व माझी अशी भेट झाली. याला म्हणतात योगा योग!"

"तुमचें नांव पण गोपाळ आहे का?" गोपाळनें विचारलें.

जगन्नाथ व त्याची बायको जरा घुटमळल्यासारखे झाले. जगन्नाथानें बायकोला गप्प बसायला खुणावलें आणि म्हणाला—












"म्हणतां काय! अहो माझें नांव पण गोपाळच! त्या परमेश्वराची लीला अगाध आहे म्हणतात तें उगीच नाहीं! जरूर कांहीं पूर्वजन्मीचा हा ऋणानुबंध आहे."

काळोख पडूं लागला होता. गाडी एका लहानशा वस्तींत पोंचली. जगन्नाथाच्या गांवाच्या वेशीवरच्या तीनचार रिकाम्या झोपड्या होत्या त्या. एका झोपडीसमोर गाडी उभी करायला सांगून जगन्नाथ म्हणाला—"हेंच आमचें घर!" तो खालीं उतरला व पेटी खालीं उतरवून नंतर बायको व मुलांना खालीं उतरविलें. गोपाळ म्हणाला—"या गांवांत माझा एक मित्र आहे त्याच्या घरीं जातों मी. उद्यां सकाळीं परत जाईन आपल्या गांवीं." तो निघून गेल्यावर जगन्नाथ दुसऱ्या झोपडींत शिरला आणि तेथेंच रात्रभर रहावयाचें ठरविलें.

ती पेटी फोडून दागिने काढून घ्यायचे व पेटी तेथें टाकून देऊन पळून जायचें असें त्यानें मनाशीं ठरविलें होतें. हतोडा वगैरे कांहीं तरी आणायला तो गेला. त्याची बायको मुलीला दूध मिळालें तर पहावें म्हणून निघून गेली. दोघं मुलेंच त्या झोपडींत एकटीं होतीं. दोघं त्या पेटीच्या कुलपाशीं खेळत होतीं. पेटीला एक आंगचें कुलूप होतें. तें लागलेलें होतें. वर एक चापाचें कुलूप होतें. तें चांगलें लागलें नव्हतें. मुलगा त्याच्याशींच खेळत होता. त्यानें तें कुलूप दाबलें. त्याबरोबर तें कुलूप लागलें पण त्याची करंगळी त्यांत अडकली. तो मोठ्यानें ओरडूं लागला. मुलाच्या रडण्याचा आवाज ऐकून जवळ पासचे लोक धांवले. "अरे, अरे, अरे! मुलाची करंगळी सांपडली आहे हो चापांत! कुलूप उघडायला हवं. पण किल्ली कोठें आहे?"

इतक्यांत जगन्नाथाची बायको दूध घेऊन आली. मुलाची करंगळी चापांत सांपडलेली पाहून ओरडली—"अहो मुलाचा जीव वांचवा!" गांवभर ओरडा झाला आणि तेथें लोकांची गर्दी जमली. त्यांत गोपाळ-पण होता. म्हणाला "कुलूप काढा बाई! नाहींतर मुलगा वांचणार नाही. मुलाचा बाप कोठें आहे?"

तेवढ्यांत जगन्नाथ पण आला. त्याच्या हातांत हतोडा आणि इतर हत्यारें होतीं. गोपाळला पाहून त्याच्या पाया-खालची जमीनच सरकली. गोपाळनें त्याच्या हातांतलीं हत्यारें बाजूला ठेवून विचारलें—"पेटी फोडणार आहांत कीं काय? इतकी चांगली पेटी! पेटी फोडली म्हणून मुलाची सुटका कशी होणार? कुलूप उघडावेंच लागणार! किल्ली काढा!"

"खरें काय तें सांगून टाका की!" जगन्नाथाची बायको म्हणाली.

"माझ्याजवळ किल्ली नाहीं!" जगन्नाथ म्हणाला.

"पाहतों माझी किल्ली लागते का? माझें नांवच तुमचें नांव आहे. माझ्या वडिलांचें नांवच तुमच्या वडिलाचें पण आहे.



माझ्या पेटी सारखीच ही पेटी पण आहे. मग माझी किल्ली तुमच्या किल्लीसारखी कां असणार नाहीं!" असें म्हणत गोपाळनें किल्ल्यांच्या जुडग्यांतली एक किल्ली काढली व कुलूप उघडलें. मुलाची करंगळी सुटली व मुलगा वांचला.

गोपाळच्या किल्लीनें पेटीचे कुलूप उघडलेलें पाहून व जगन्नाथाजवळ कुलपाची किल्ली नसलेली पाहून लोकांनीं गोपाळला विचारलें—"कोण तुम्हीं? कोणत्या गांवचे?"

"अहो माझें नांव गोपाळ! आणि याचें नांव पण गोपाळ!" गोपाळ म्हणाला.

















लोक ओरडले—"अहो याचें नांव जगन्नाथ आहे. आम्ही सर्व ओळखतों या लबाडाला. अंगच्या कुलपाची किल्ली आहे का पहा तुमच्या जुडम्यांत?"

गोपाळनें अंगच्या कुलपाची किल्ली काढून तें कुलपदेखील उघडलें आणि म्हणाला—"अहो! आश्चर्याची आणखी एक गोष्ट माझ्या लक्षांत आली आहे. यांतले सर्व दागिने हुबेहूब माझ्या बायकोच्या दागिन्यांसारखेच आहेत."

जगन्नाथाची कीर्ती गांवभर चोर म्हणून प्रसिद्ध होती. त्यानें गोपाळच्या घरून दागिन्यांची पेटी चोरून आणली होती या गोष्टीची साक्ष पटायला त्यांना मुळींच वेळ लागला नाहीं. सर्व त्याला बडवून काढण्यासाठीं धांवले. पण गोपाळनें त्यांना अडवलें व म्हणाला—"अशी घाई करूं नका. त्याला विचारून तर पहा कीं हा माल त्याचाच आहे कीं चोरीचा?"

जगन्नाथाची बायको इतका वेळ कांहींच बोलली नव्हती. ती गोपाळच्या पायां पडून म्हणाली—"मी पदर पसरतें. या मुलांच्या तोंडाकडे पहा व आम्हांला माफ करा. ही सर्व चूक आमचीच. तुमच्या घरीं खाऊन आम्ही तुमच्याच घरीं चोरी केली."

"ही माझी पेटी आहे असें आहे का तुमचें म्हणणें? तर मग मी घेऊन जातों ती, त्यांत काय! मुलाचें बोट वांचलें. आतां कांहीं भीति नाहीं." गोपाळ म्हणाला.

सकाळीं गोपाळ आपली पेटी घेऊन गांवीं निघून गेला. त्याची बायको दागिन्यांची पेटी नाहींशी झाली म्हणून घाबरून गेली होती. गोपाळला पेटी घेऊन येत असलेला पाहून त्यांना आश्चर्यच वाटलें.





# उत्तरकांड

अगस्त्य ऋषींनीं सुकेशाच्या माल्यवंत, माली व सुमाली या तिघां मुलांनीं आपल्या बायका व मुलांबाळांसह लंकेंत रहात असतां त्यांना मिळालेल्या वरप्राप्तीच्या गर्वानें फुलून जाऊन त्रिलोकाला कसें भंडावून सोडलें हें सांगितलें. नंतर त्यांनीं पुढची कथा सांगितली.

देव व ऋषी सर्वांनीं शंकराकडे येऊन राक्षसांनीं त्यांना कसें बेजार करून सोडलें होतें तें वर्णन करून सांगितलें व विनंती केली—"देवाधिदेवा, महादेवा! सुकेशाच्या मुलांनीं ब्रह्मदेवाचा वर मिळाल्यापासून त्याच घमेंडींत देवांना स्वर्गांतून हुसकावून लावलें आहे व स्वर्गांत शिरून त्यावर आपला अधिकार गाजवीत आहेत. मुनींचे आश्रम ध्वस्त होऊन पडले आहेत. ते स्वतःलाच ब्रह्मदेव, रुद्र, विष्णु, इंद्र, यम, वरुण, चंद्र, सूर्य, इत्यादि देव असल्याचें जाहीर करून नेहमीं युद्धाची धमकी देत आला आहेत. त्या राक्षसांच्या हातून आमचें आपण रक्षण करावें."

परंतु शंकराला सुकेशाविरुद्ध किंवा त्याच्या मुलांविरुद्ध कांहीं करणें रुचलें नाहीं. म्हणून तो त्यांना म्हणाला—"त्या



राक्षसांच्या विरुद्ध शस्त्र हातीं घेणें मला शक्य नाहीं. त्यांचें मरण माझ्या हातीं नाहीं. पण मी एक सूचना करतों, तुम्ही विष्णूकडे जा, तो त्यांचा संहार करूं शकेल." देव शंकराचा जयजयकार करून विष्णूकडे गेले. त्यांनीं विष्णूकडे जाऊन तसेंच रडगाणें गाऊन विनंती केली कीं लंकेंत राहणाऱ्या राक्षसांचा वध करावा.

विष्णू त्यांना अभयदान देत म्हणाला– "मी सुकेश व त्याच्या तिघां मुलांना ओळखतों. त्यांचे अत्याचार पाहून मला देखील मनस्वी राग आला आहे. मी आजपर्यंत त्यांची गय केली. पण यापुढें तें शक्य होणार नाहीं. मी त्यांचा संहार करीन तुम्ही कांहीं ही काळजी करूं नका." तें ऐकून ऋषींना आणि देवांना फार आनंद झाला. विष्णूची प्रशंसा करून सर्व आपल्या घरीं निघून गेले.

ही वार्ता लंकेला पोंचली. माल्यवंत आपल्या दोघां भावंडांना म्हणाला–"देव आणि ऋषी यांनीं आपल्याविरुद्ध कारस्थान केलें आहे. त्यांनीं शंकराकडे जाऊन त्यासाठीं विनंती केली होती. परंतु शंकरानें त्यांना नकार देऊन विष्णूकडे पाठविलें आहे व त्याची मदत घ्यायला सांगितलें आहे. विष्णूनें त्यांना वचन दिलें आहे व तो आपला सर्वांचा वध करण्याच्या तयारींत आहे. विष्णूनें वचन दिलें आहे म्हणून आपण तिकडे लक्ष दिलें पाहिजे आणि विचार करून पुढें काय तें केलें पाहिजे. कारण त्यानें हिरण्यकश्यपु सारख्या महा-पराक्रमी राक्षसांचा वध केला होता. अनेक यज्ञ करून ज्यांनीं मोठमोठे वर मिळविले आहेत अशा राक्षसांचादेखील त्यानें या पूर्वीं वध केला आहे. म्हणून दुर्लक्ष करून स्वस्थ बसणें बरोबर होणार नाहीं. उलट







निश्चय करण्यापूर्वीं या सर्व गोष्टी लक्षांत ठेवल्या पाहिजेत."

त्यावर माली व सुमाली म्हणाले– "आम्ही अनेक यज्ञ केले आहेत व दान धर्म केला आहे. अनंत ऐश्वर्य संपादन केलें आहे. मोठमोठ्या बलिष्ठ शत्रूंना आपल्या-समोर मान वांकवावी लागली आहे. इंद्र असो कीं विष्णू किंवा स्वतः रुद्र जरी समोर युद्ध करण्यासाठीं आला तरी त्याचा पराभव करण्याची शक्ति आपल्या अंगांत आहे. आपल्या नांवाचा नुसता उल्लेख झाला तरी त्रिलोक कांपतो. मग आपणाला कोणाला भिण्याचें काय कारण? विष्णूला आपल्यावर कोणत्या गोष्टीचा राग आहे हें नाहीं कळलें आम्हांला. तो येण्या-पूर्वींच आपण लढाईला तोंड फोडलें पाहिजे. म्हणून चला आपण देवलोकावर स्वारी करूं या."

असा विचार करून राक्षसांनीं स्वर्ग-लोकावर स्वारी केली. लंकेहून रथ, घोडे, हत्ती, उंट वगैरे वाहनांवर बसून राक्षस निघाले. राक्षसांच्या या प्रचंड सैन्याचा सेनापती माली होता. अशा तऱ्हेनें राक्षस लंकेहून निघाले तेव्हां सर्व



लंका नगरी ओसाड झाल्यासारखी दिसूं लागली.

विष्णूकडे राक्षसांनीं स्वर्गावर स्वारी केल्याची बातमी पोंचली. विष्णु आपलें कवच धारण करून शंख, चक्र, गदा, खड्ग इत्यादि अस्त्रें घेऊन व गरुडावर बसून युद्धाला निघाला. देव व दानव यांचें घनघोर युद्ध झालें.

विष्णूनें अनेक राक्षसांचा वध केला. माली स्वतः विष्णूशीं युद्ध करण्यासाठीं समोर येऊन उभा राहिला. त्यानें गरुडाच्या डोक्यावर अस्त्रप्रहार केला. तेव्हां गरुडाला









देखील एक पाऊल मागें घ्यावें लागलें. परंतु त्याच क्षणाला विष्णूनें आपलें सुदर्शन चक्र सोडून मालीचा वध केला. मालीचा वध झालेला पाहून सुमाली व माल्यवंत आपलें राक्षस सैन्य घेऊन लंकेला पळाले. विष्णूनें त्या राक्षसांचा पाठलाग करून त्यांचा संहार सुरू केला.

तें माल्यवंत पाहून विष्णूला म्हणाला—"तूं क्षत्रिय धर्माचें उल्लंघन करून आमचा पाठलाग करीत आहेस. तुला स्वर्गांत जागा मिळणार नाहीं. तुला युद्धच करावयाचें असेल तर ये माझ्याबरोबर युद्धाला."

तें ऐकून विष्णु म्हणाला—"मला क्षत्रिय धर्माची आठवण करून देण्याची गोष्ट तुला बरी आठवली. म्हणूनच सांगून ठेवतों तें पण ऐक. शत्रुऋण रंचमात्रदेखील उरलेलें क्षत्रियाला खपतां कामा नये अशी नीती आहे. म्हणून तूं रणांगणावरून पळून गेलास व पाताळ लोकांत जरी जाऊन लपून बसलास तरी तुला मी सोडणार नाहीं. मी आपलें कर्त्तव्य पुरें केल्याशिवाय मागें फिरणार नाहीं."

दोघांचें युद्ध सुरू झालें. माल्यवंतानें व सुमालीनें विष्णूला व गरुडाला थोपवून ठेवण्याचा पुष्कळ प्रकारें यत्न केला. परंतु गरुडानें आपले पंख फडफडवले. त्याबरोबर सोसाट्याचा वारा सुटला व एक वावटळ आली. सुमालीची त्रेधा उडून गेली. कागदाच्या चिटोऱ्यासारखा तो आकाशांत उडाला.

एकूण सुमालीनें पाय काढला व लंकेला येऊन पोंचला. त्यानंतर लंकावासी राक्षसांवर विष्णूनें हल्ला चढविला व सहस्रावधि राक्षसांना ठार केलें. म्हणून राक्षस आपल्या बायकापोरांना घेऊन पाताळलोकांत पळून गेले. त्यांनीं सुमालीला आपला नायक नेमलें. त्या युद्धांत माल्यवंत वगैरे जे





राक्षस ठार झाले ते कुंभकर्णाहून पराक्रमी राक्षस होते.

राक्षस लंका सोडून निघून गेल्यावर वैश्रवण लंकेला येऊन राहूं लागले.

कांहीं काळ लोटला. एकदां सुमाली आपली मुलगी कैकसी हिला बरोबर घेऊन पाताळलोकांतून भूलोकांत आला. त्यावेळीं तिनें कुबेराला पुष्पक विमानांत बसून विहार करीत असतां पाहिलें.

कुबेराचें ऐश्वर्य पाहून व स्वतःची दुरवस्था पाहून सुमालीला फार वाईट वाटलें. आपलें गत वैभव मिळविण्यासाठीं कांहीं तरी मार्ग शोधून काढलाच पाहिजे. पण तो कोणता? लक्ष्मीसारख्या आपल्या सुंदर व रूपवती मुलीला तो म्हणाला—"बाळ! आतां तूं मोठी झालीस. तुझ्या लग्नाची जबाबदारी माझ्यावर आहे. तुझ्याशीं लग्न करण्याची इच्छा कित्येकांच्या मनांत आहे. पण त्यांच्यापैकीं तुला एकदेखील पसंत पडणार नाहीं. तूं कुबेराचें हें वैभव पाहिलें आहेसच. तो विश्रवसु पुलस्त्याचा मुलगा आहे. तूं देखील त्या महर्षींची सेवा केलीस तर तुला देखील कुबेरासारखींच वैभवशाली मुलें होतील."



कैकसी आपल्या पित्याच्या आज्ञेनें विश्रवसु तपश्चर्या करीत होता तेथें जाऊन त्याच्यासमोर उभी राहाली. त्या वेळीं विश्रवसु अग्निपूजा करीत होता. कैकसीचें पूर्णचंद्रासारखें सौंदर्य पाहून विश्रवसु म्हणाला—"हे सुंदरी! तूं कोणाची मुलगी? कोठून आलीस? काय पाहिजे तुला? निस्संकोच बोल."

कैकसी हात जोडून नमस्कार करून म्हणाली—"मुनीश्वर! आपण त्रिकालज्ञानी आहां. दिव्यदृष्टीनें आपणांला या प्रश्नांचीं उत्तरें मिळूं शकतील. तरी आपण विचारलेंच
















आहे तेव्हां मी उत्तर देतें. माझें नांव कैकसी. वडिलांच्या आज्ञेनें मी आपणांकडे आलें आहें."

विश्रवसु 'तथास्तु' म्हणाला. नंतर दोघांचें लग्न झालें. विश्रवसु म्हणाला—"कैकसी! तूं राक्षस लग्नावर मला दिसलीस. म्हणून तुझ्या पोटीं राक्षस जन्माला येतील."

"आपल्यासारख्या तपस्वी मुनींचीं मुलें राक्षस होतील का? मला गुणवान व शील-वान पुत्र प्राप्ति व्हावी अशी आपणांजवळ विनंती आहे." कैकसी म्हणाली. तिनें फारच आग्रह केल्यावर मुनी म्हणाले—"ठीक! तुझ्या इच्छेप्रमाणेंच तुझा तिसरा मुलगा शीलवान व गुणवान निघेल."

कांहीं दिवसांनीं कैकसीला एक मुलगा झाला. तो दिसायला भयंकर होता. त्याला दहा डोकीं होतीं व वीस हात होते. रंग काळा, मोठे व लांबलांब दांत होते. विश्रवसूनें त्याचें नांव दशग्रीव असें ठेवलें. तोच पुढें रावण म्हणून प्रसिद्ध झाला. रावणानंतर कुंभकर्ण जन्मला. त्याचें रूपच भयंकर होतें. त्याच्या पाठीवर शूर्पणखा जन्मली. अगदीं शेवटीं विभीषण जन्मला. तो गुणवान व शीलवान निघाला.

रावण व कुंभकर्ण रानांतच लहानाचे मोठे झाले. त्यांचीं भयंकर कृत्यें पाहून त्रिलोकाला धास्ती वाटूं लागली. कुंभकर्ण ऋषी-मुनींना खाऊन टाकी. विभीषण विद्याभ्यास करी. त्याची वागणूक त्याच्या कुळाला शोभेल अशीच होती. त्याचें पाऊल कधीं दुर्मार्गावर पडलें नाहीं.

तिघे बंधू आश्रमांतच रहात. एकदां कुबेर आपल्या वडिलांना म्हणजे विश्रवसू मुनींना भेटण्यासाठीं पुष्पक विमानांत बसून आला. कुबेराचें वैभव पाहून कैकसीला हेवा वाटूं लागला. ती आपल्या मोठ्या मुलाला म्हणाली—"पाहिलेंस ना तूं आपल्या सावत्र भावाचें हें वैभव? तूं देखील त्याच्याच बापाचा मुलगा आहेस. त्याचें तें वैभव पहा व स्वतःच्या स्थितीकडे पहा. तूं पराक्रमी आहेस. माझा मुलगा कुबेरासारखा श्रीमंत व वैभवशाली होईल त्याच वेळीं माझ्या मनाचें समाधान होईल."

रावणानें अन्नप्राशन केलें नाहीं व दहा हजार वर्षें तपश्चर्या केली. एक सहस्र वर्षें लोटल्यावर तो आपलें एक डोकें कापून त्याचा बळी देत गेला. अशा नऊ आहुती दिल्या. फक्त दहावें डोकें उरलें. दहा हजार वर्षें लोटल्यावर दहाव्या डोक्याची आहुती देणार इतक्यांत ब्रह्मदेव दिक्पालकांसह प्रकट झाला व म्हणाला—"दशग्रीवा! तुझी तपश्चर्या पाहून मी संतुष्ट झालों आहें. काय पाहिजे तो वर मागून घे."

रावणाला आनंद झाला. ब्रह्मदेवाला साष्टांग नमस्कार करून म्हणाला—"या मर्त्यलोकांत जो जन्माला येतो त्याच्या पाठीशीं मरण लागलें आहे. मला कधीं मरण येणार नाहीं असा वर दे."



"दशग्रीवा! असा वर मी कसा देऊं शकेन? तूं दुसरा वर मागून घे." ब्रह्मदेव म्हणाला.

"ब्रह्मदेवा! मला इतर कोणत्याहि प्राण्याचें भय वाटत नाहीं. सुवर्ण, नाग, यक्ष, दैत्य, दानव, राक्षस व देव यांच्या होतीं मला मरण येऊं नये असा वर दे. मनुष्याची पण मला भीति नाहीं." रावण म्हणाला.

रावणाच्या इच्छेप्रमाणें ब्रह्मदेवानें त्याला वर दिला. त्याच बरोबर त्यानें आणखी एक वर दिला कीं, त्याला इच्छारूप धारण












करतां येईल व त्यानें वाहलेलीं नऊ डोकीं त्याला परत मिळतील.

त्यानंतर ब्रह्मदेवानें बिभीषणाला देखील वर मागायला सांगितलें. त्यानें त्याचें मन कधीं धर्मच्युत होऊं नये असा वर मागून घेतला. इच्छिल्याबरोबर ब्रह्मास्त्राचा लाभ व्हावा असादेखील वर त्यानें मागून घेतला. ब्रह्मदेवानें त्याला अमरत्व पण दिलें.

त्यानंतर कुंभकर्णाची वर मागण्याची पाळी होती. सर्व देव ब्रह्मदेवाला म्हणाले—"ब्रह्मदेवा ! या कुंभकर्णाला असा कांहीं वर देऊं नकोस. त्याचीं भयंकर कृत्यें तूं पहातच आहेस. नंदनवनांत विहार करणाऱ्या सात अप्सरा त्यानें गिळून टाकल्या. इंद्राच्या दहा अनुचरांना त्यानें खाऊन टाकलें. कित्येक ऋषी-मुनींना त्यानें खालें. वर प्राप्तीशिवायच इतकीं भयंकर कृत्यें करणारास आणखी वर दिलास तर या पृथ्वीवर जो कहर होईल त्याची कल्पनाच करवत नाहीं."

तें ऐकून ब्रह्मदेवानें सरस्वतीचें स्मरण करून तिचें आवाहन केलें व कुंभकर्णाच्या जिभेवर बसून त्याला निरुपद्रवी असा वर मागण्यास प्रेरित करण्यास आज्ञा केली. त्याप्रमाणें सरस्वतीच्या कृपेनें कुंभकर्णानें सहस्रावधि वर्षें निद्रेचा वर मागून घेतला. ब्रह्मदेव 'तथास्तु' म्हणून निघून गेला व सरस्वती ब्रह्मदेवाच्या तोंडांतून 'तथास्तु' शब्द निघण्यापूर्वींच बाहेर निघून आली.

तेव्हां कुंभकर्णाला शुद्ध आली. "अरेरे रे रे ! आपण हा काय वर मागून घेतला ? सर्व देवांनीं मिळून कारस्थान रचलेलें दिसतें आहे." तो पश्चात्ताप करूं लागला.

रावण, कुंभकर्ण व बिभीषण वरप्राप्ती-नंतर श्लेष्मातक वनांत जाऊन राहूं लागले.





१. एका राजवाड्यांत एक मुलगा नोकरी करीत असे.



२. दुसऱ्या दिवशीं होणाऱ्या मेजवानीसाठीं तो सामानसुमान नीट लावून ठेवीत असतां दरबारी मांत्रिक येत असलेला दिसला.



३. मांत्रिकानें कांहीं तरी मंत्र म्हटल्याबरोबर खोलींत धूर शिरला.



४. मांत्रिकानें इंगित करून त्या धुराला आपल्याकडे बोलाविलें.



५. एक बाटली काढून त्यानें तो धूर त्या बाटलींत



६. मुलाला बाटलींत एका मुलीची आकृति



# भारताचा इतिहास




शाहजहान सन् १६५७ मध्यें आजारी पडला. त्या वेळीं त्याचे चार हि मुलगे पुष्कळ मोठे होते. दाराशिकोह (४३), शुजा (४१) औरंगजेब (३९) व मुराद (३३). त्याला दोन मुलीपण होत्या. मोठीचें नांव जहानारा व धाकटीचें रोशन आरा. जहानारा दाराशिकोहची बाजू घेई. धाकटी औरंगजेबाची बाजू घेई. दारानें आपल्या मागून गादीवर बसावें असें शाहजहाननें मनाशीं ठरवलें होतें. दारा उदार मताचा होता. त्यानें वेदांत व बायबल वाचलें होतें आणि सूफी धर्माचा अभ्यास केला होता. त्यानें ब्राह्मण पंडितांच्या सहाय्यानें अथर्ववेद व उपनिषदांचें फारसी भाषेंत भाषांतर केलें होतें.

दुसरा शुजा तो बंगालचा गव्हर्नर होता. तो पराक्रमी होता, परंतु भोगविलासांत इतका गुरफटून गेला होता कीं त्याला राज्य-कारभाराची काळजी कधींच वाटली नाहीं. चौथा मुराद गुजराथचा गव्हर्नर होता. तो स्वभावानें निष्कपट, उदार व साहसी होता. परंतु नेहमीं दारूच्या निशेंत धुंद होऊन पडून असे.

तिसरा औरंगजेब सर्वांत जास्त कर्तबगार, स्वभावानें मेहनती आणि राजकारण व युद्धकला दोन्हींत निष्णात होता. राज्य कारभारांत पण तो कुशल होता.

शाहजहां आजारी पडला तेव्हां आग्रा येथें एकटा दारा होता. बापाच्या आजाराची बातमी ऐकून मुलांना वाटलें कीं बादशाह मरण पावला असावा व मोठा भाऊ ती बातमी लपवीत असावा. शुजानें बंगालमध्यें स्वतःला बादशाह म्हणून जाहीर केलें. आपला मुलगा सुलेमान याला बरोबर घेऊन तो दिल्लीला निघाला. परंतु बनारसहून त्याला परत मागें फिरावें लागलें.

१६५७ च्या ५ डिसेंबर रोजीं मुरादनें अहमदाबाद येथें स्वतः बादशाह झाल्याचें घोषित केलें. माळव प्रांतांत जाऊन तो औरंगजेबाला भेटला. दोघांनीं कुराण व खुदाच्या नांवानें आणा शपथ करून एक संधी केली. एक तृतीयांश वांटा मुरादला व दोन तृतीयांश औरंगजेबाला मिळेल असें ठरलें. गादी हातीं आल्यावर पंजाब, अफगाणिस्तान, काश्मीर व सिंध मुरादच्या वांट्याचे ठरले.

दोघांनीं आपापलीं सैन्यें घेऊन उत्तरेकडे कूच केलें. शाहजहाननें त्यांना थोपविण्यासाठीं जोधपुरचा राजा जसवंतसिंह व कासिमखान यांना मोठें सैन्य देऊन पाठविलें. दोन्ही सैन्यांचें युद्ध उज्जैन नजीक चवदा मैलावर धर्मात या स्थानीं १५ एप्रिल १६५८ ला झालें. त्या युद्धांत औरंगजेबाला मोठा विजय मिळाला. जसवंतसिंह जोधपूरला पळून गेला तेव्हां त्याच्या राणीनें त्याला किल्ल्यांत येऊं दिलें नाहीं.

औरंगजेब व मुराद दोघे भाऊ विजयी होऊन चंबळ नदी पार करून आग्र्यापासून



आठ मैलांवर समूगा नांवाच्या मैदानांत दाखल झाले. तेथें दारा ५० हजारांचें एक मोठें सैन्य घेऊन त्यांच्याशीं युद्धाला आला. या युद्धांत दारा ज्या हत्तीवर बसून युद्ध करीत होता तो जखमी होऊन पळूं लागला. म्हणून दारा हत्तीवरून उतरून घोड्यावर बसून युद्ध करूं लागला. दाराच्या हत्तीवरची अंबारी रिकामी पाहून त्याच्या सैन्याला वाटलें कीं दारा युद्धांत ठार झाला व ते पळूं लागले. शेवटीं स्वतः दाराला आग्र्याकडे पळ काढावा लागला. त्याचा तोफखाना औरंगजेबाच्या हातीं लागला.

समूगरच्या युद्धांत शाहजहानचा वारस औरंगजेबच आहे हें नक्की झालें.

औरंगजेबानें आग्र्यावर स्वारी केली. ८ जूनला त्यानें आग्र्याच्या किल्ल्यांत प्रवेश केला. किल्ल्याच्या रक्षणासाठीं केलेली तयारी अपुरी ठरली आणि शाहजहान आपल्या मुलाचाच कैदी झाला. औरंगजेबानें किल्ल्यांत जाणारें यमुनेचें पाणी अडवून ठेवलें होतें. शाहजहानला खारें पाणी प्यावें लागलें. तो लिहितो कीं "माझ्या मुलापेक्षां हिंदूच बरे! ते आपल्या मृत मातापितरांचें तर्पण करतात. पण तूं आपल्या जिवंत बापाला पाणी देण्याचें नाकारलेंस."

सामान्य कैद्याला मिळणाऱ्या सुखसोयी व सवलती देखील शाहजहानला मिळत नव्हत्या. जहानारानें आपल्या बापाच्या-वतीनें अनेकदां औरंगजेबला लिहिलें. परंतु औरंगजेबानें तिकडे दुर्लक्ष केलें. शेवटीं शाहजहानाला त्या परिस्थितीचीपण संवय झाली. त्याला आयुष्याचें वैराग्य वाटूं लागलें. तो नेहमीं कुराण वाची. एकटी जहानारा त्याच्याबरोबर असे. जानेवारी महिन्याच्या २२ तारखेला सन् १६६६ या रोजीं वयाच्या ७४ व्या वर्षी तो वारला.

औरंगजेबाचा कावेबाजपणा मुरादला कळला होता. १३ जून १६५८ या रोजीं औरंगजेब दिल्लीला जात असतां त्यानें भावाविरुद्ध बंडाचें निशाण उभारलें. औरंगजेबानें त्याला कैद करविलें व लागोपाठ तीन वर्षें निरनिराळ्या ठिकाणीं त्याला तुरुंगांत ठेवलें. ४ डिसेंबर १६६१ या रोजीं त्याला मृत्युदंडाची शिक्षा दिली. त्यापूर्वींच म्हणजे २१ जुलै १६५८ या रोजीं औरंगजेब दिल्लीच्या गादीवर बसला.



# नेहरू चरित्र



[१६]

मोतीलालजी व जवाहरलालजी यांना लखनौच्या तुरुंगांत ठेवण्यांत आलें. तेथें बरॅकी होत्या. त्यांत राजकीय कैद्यांना ठेवलें होतें. मोतीलालजी, जवाहरलालजी व इतर सोळा प्रमुख जणांना एका मोठ्या आवारांत एक झोपडीवजा जागेंत ठेवण्यांत आलें होतें.

जवाहरलालजींचा बराच वेळ सहकाऱ्यांशीं बोलण्यांत किंवा वादविवादांत जाई. ते नियमितपणें वर्तमानपत्रें वाचीत व चळवळ कशी काय चालू आहे याची माहिती ठेवीत. डिसेंबरच्या शेवटच्या आठवड्यांत अहमदाबाद येथें राष्ट्रीय महासभेचें अधिवेशन होतें. तीन महिन्यापूर्वींच गांधीजींनीं गुडघ्यापर्यंतचें लहान धोतर नेसायला सुरवात केली होती. ते तसेच अधिवेशनाला हजर होते. कांग्रेसचे अध्यक्ष चित्तरंजन दास यांना अटक झाली होती. म्हणून त्यांच्या ऐवजीं हकीम अजमलखान यांच्या अध्यक्षतेखालीं अधिवेशन भरलें. या अधिवेशनांत कायदेभंगाचा ठराव पास झाला. प्रजेनें स्वयंसेवक होऊन तुरुंगांत जावें असं पण ठरलें.

सरकारनें धरपकड सुरू केली व सर्व मुख्य मुख्य पुढारी तुरुंगांत गेले. प्रजेचा उत्साह थंड पडूं लागला. परंतु चळवळ मात्र बंद पडली नाहीं. तोंपर्यंत जवळजवळ सर्व प्रमुख पुढाऱ्यांना शिक्षा झाल्या होत्या. परंतु असहकारतेच्या चळवळीचे सर्वांत प्रमुख पुढारी महात्मा गांधी, त्यांना मात्र अटक करण्याचें साहस सरकार दाखवूं शकलें नाहीं. एका वर्षांत स्वराज्य मिळवून देण्याचें वचन










त्यांच्यावर खटला चालू असतां कोर्टांत हजरपण होते. न्यायाधीश सर रॉबर्ट ब्रूमफील्ड यानें त्यांना फार आदरपूर्वक वागविलें. गांधीजींनीं आपला अपराध स्वीकार केला. "भारत व इंग्लंड अस्वाभाविकपणें निरनिराळ्या परिस्थितींत पडले आहेत. हा सत्याग्रह करून ही गोष्ट मी सिद्ध करून दाखविली आहे. चांगल्या कामाचा पुरस्कार जितका आवश्यक आहे तितकाच चुकीशीं असहकार पण आवश्यक आहे, असें माझें ठाम मत आहे."

गांधीजींना सहा वर्षांची सक्त मजुरीची शिक्षा सांगतांना न्यायाधीश म्हणाला—"मी तुमच्यासारख्या व्यक्तीवरचा खटला या पूर्वी कधीं पाहिला नाहीं. पुढें असा प्रसंग कधीं येणारहि नाहीं. तुम्ही आपल्या देशवासियांचे पुढारी व देशभक्त आहां ही गोष्ट विसरणें कठीण आहे. जे राजकीय कार्यांत तुमच्याबरोबर नाहींत ते देखील तुम्हांला एक थोर महापुरुष व ऋषितुल्य मानीत आहेत. यदा कदाचित तुम्हांला दिलेली शिक्षा कमी झाली तर मला सर्वांत जास्त आनंद होईल."

तुरुंगांतून सुटल्यावर जवाहरलालजींना आनंद वाटत नव्हता. त्यांचे सर्व आप्त बंधुमित्र तुरुंगांत होते. पुढाऱ्यां वांचून कांग्रेस संघटना ढिली पडूं लागली होती. तें पाहून त्यांच्या लक्षांत एक गोष्ट आली. गांधीजींनीं चळवळ थांबविली त्याला कारण फक्त चौरीचौरा नव्हतें. देशाच्या परिस्थितीची परख त्यांना होती. कांग्रेसची स्थितीदेखील नाजूक होती. स्वार्थासाठीं वाटेल तो कांग्रेसमध्यें शिरून तिचा उपयोग करून घेत होता. त्या सर्व गोष्टी लक्षांत घेऊन गांधीजींनीं चळवळ मागें घेतली असावी.





# नवाबकुमारी

[ ३ ]

मथुरासिंहनें दारुकेश्वरला एका सैनिकाला पाठविलें होतें. मंथारणच्या वाटेवर त्याला गजपति दिग्गज भेटला. तो सैनिकाला म्हणाला—"अल्ला महादेव आपल्याला दीर्घायुष्य देवो!" दिग्गजचा तो विलक्षण आशीर्वाद ऐकून सैनिक चकित झाला व घोडा हळूहळू चालवूं लागला. सैनिकानें त्याला त्याची ओळख विचारली तेव्हां दिग्गज म्हणाला—"मी मूळ हिंदू आहें. नंतर मुसलमान झालों. पुन्हां हिंदू झालों. हिंदू होण्यासाठीं प्रायश्चित्त वगैरे जें कांहीं करावयाचें तें सर्व मी केलें. परंतु गुरूच्या आज्ञेशिवाय माझी जात काय हें ठरणें शक्य नाहीं. किल्ल्यांत अस्मानी नांवाची एक दासी आहे. माझी व तिची ओळख, होय ओळखच म्हटलें पाहिजे, आहे."

दोघे मंथारण किल्ल्याजवळ येऊन पोंचले. सैनिकानें दिग्गजला विचारलें—"युवराज जगतसिंहांना कैद करण्यांत आलें आहे. ही बातमी पोंचती करशील का?"

"कैद? कां? कोणी केलें?" दिग्गजनें विचारलें.

"कैद कां केलें हें मला सांगतां येणार नाहीं. पण कैद आम्हीच केलें. मानसिंहाची



तशी आज्ञा होती, एवढेंच मी सांगूं शकेन." सैनिक म्हणाला.

पूर्वी वीरेंद्रसिंहांना कैद केलें होतें तेव्हां किल्ल्यांत राहणाऱ्या सर्वांना कैद केल्याचें दिग्गजला आठवलें. मोठा गोंधळ उडून गेला होता. आतां शत्रूनें जगतसिंहांना पकडलें आहे. ज्या सैनिकाकडून त्याला ती बातमी कळली होती तो पहिला सैनिक असावा व त्याच्या पाठीमागून सैन्यच येत असावें सर्वांना कैद करायला. त्या सैनिकाशीं बोलण्यांत वेळ घालविणें शहाणपणाचें होणार नाहीं असा विचार करून तो म्हणाला—

"मी ही बातमी किल्ल्यांत पोंचती करतो. आतां तुम्ही आपल्या कामावर व मी आपल्या कामावर जाऊं या."

दिग्गज पळत पळत किल्ल्यांत आला. अंतःपुरांत जाऊन अस्मानीला ही बातमी कळविण्यासाठीं तो घाई घाईनें तिकडे गेला. पण दारावर पाहारेकऱ्यांनीं त्याला अडविलें. दिग्गजनें त्यांना आपली ओळख सांगून मला आंत जाऊं द्या. अभिरामस्वामींचा मी शिष्य आहें वगैरे अनेक प्रकारें पाहारेकऱ्यांना सांगितलें. पाहारेकरी म्हणाला—"तूं येथेंच थांब! आंतून कोणी येईल त्याच्याबरोबर तूं आल्याची गोष्ट कळवितों."

विमला अंतःपुराच्या वरच्या मजल्यावर खिडकींतून पाहारेकरी व दिग्गज यांचें संभाषण ऐकत होती. अस्मानीला बोलावून ती म्हणाली—"जाऊन त्याला आंत बोलावून घेऊन ये."

अस्मानीनें खालीं जाऊन लक्ष्मणी नांवाच्या एका दासीला बाहेर पाठवून दिग्गजला बोलावून आणावयास पाठविलें. लक्ष्मणीनें जाऊन दिग्गजला विचारलें—"काय रसिकराज! स्वारी इकडे कोठें? ओळखलें नाहीं वाटतें मला?"



दिग्गजनें पूर्वी कधीं तिला पाहिलें नव्हतें. तरी ओळखल्यासारखें दाखवून म्हणाला—"कां नाहीं? कितीदां भेटलों नाहीं का आपण अंतःपुरांत? पण तुझें नांव आठवत नाहीं मला."

लक्ष्मणीनें थोडा वेळ त्याच्याशीं थट्टा मस्करी केली व मग त्याला बोलावून आंत अस्मानीकडे घेऊन गेली.

"काय रसिकराज? स्वारी कोठून येते आहे? होतां कोठें इतके दिवस?" अस्मानीनें विचारलें.

"तें सर्व मी नंतर सांगेन. प्रथम तूं माझ्याबरोबर निघायला तयार हो पाहूं. येथें राहण्यांत धोका आहे." दिग्गज म्हणाला.

"धोका? तो कसा काय बाई?"

"युवराजांना कैदेंत टाकलें आहे!"

"कोणीं?"

"मानसिंहांच्या आज्ञेनुसार त्यांच्या सेनापतीनें."

"कोठें?"

"ते बाहेर गेले होते तेव्हां त्यांना कैद केलें. ते पाटण्याच्या किल्ल्यांत आहेत. आपल्या किल्ल्यांतल्या सर्वांना कैद करण्याची आज्ञा आहे. मला तुझी काळजी वाटते. नीघ लवकर. कोठेंतरी पळून जाऊं."



ती बातमी विमलाकडे ताबडतोब पोंचविली पाहिजे असा विचार करून अस्मानी दिग्गजला म्हणाली—"तूं म्हणालास तसे काळोख पडल्यावर आपण पळून जाऊं."

"तों पर्यंत येथें राहालीस तर उशीर होईल व धोका वाटेल."

"तूं आश्रमांत जाऊन सांग कीं दोन तासांभरांत मानसिंहांचें सैन्य येत आहे. मी वेळेवर येऊन तुला भेटेन."

पण दिग्गज घाबरून गेला. म्हणाला—"ठीक! हा निघालोंच आणि पळतच निघाला.

दिग्गजनें आणलेली बातमी वणव्या-सारखी किल्ल्यांत सर्वत्र पोंचली. पण कोणाला त्या बातमीचा खरा अर्थ कळला नाहीं. म्हणून अभिरामस्वामीनें आपल्या एका विश्वासपात्र व्यक्तीला सर्व माहिती काढून आणण्यासाठीं पाटण्याला पाठविलें. काळोख पडल्यावर विमला व अस्मानी मिळून अभिरामस्वामींच्या आश्रमांत आल्या.

"आतां पुढें काय?" विमलानें हताश होऊन विचारलें.

"तुला आठवतें का तूं मागें एकदां हाच प्रश्न केला होतास. मी तुला त्याच वेळीं बजावलें होतें कीं मानसिंहांना हा संबंध मुळींच पसंत पडणार नाहीं. तेव्हां तूं म्हणाली होतीस कीं युवराज जगतसिंह स्वतंत्र आहेत. पाहिलास त्या स्वतंत्रपणाचा परिणाम? युवराजांना खरोखरींची स्वतंत्रता कधींच नव्हती. तो मानसिंहांचा नुसता मुलगा नसून पगारी नोकर पण आहे." अभिरामस्वामी म्हणाला.

"ही गोष्ट आपल्याला तेव्हां कळली असती तरी आपण कांहीं करूं शकलों असतों असें नाहीं मला वाटत. कारण दोघांचें परस्परांवर प्रेम होतें. तिलोत्तमेच्या मनाची कल्पना तुम्हांला नाहीं, मला आहे." विमला म्हणाली.

"मला तें समजून घेण्याची गरजपण नाहीं. फक्त एकदां परस्परांना पाहाल्यानें दोघांचीं मनें परस्परांनीं हिरावून घेतली या गोष्टीवर माझा विश्वास बसत नाहीं. हा मोह आहे. परंतु तूं हा रोग उपजतांच उपटून टाकला असतास तर हें सर्व सहन करावें लागलें नसतें, हें मी तुला समजावून सांगायला हवें असें नाहीं."

"तिलोत्तमेच्या सुखासाठीं मी हें सर्व केलें. तिच्यावर मी आपला जीव ओंवाळून टाकण्यास तयार होतें व आहे. तिच्या-वरचीं सर्व संकटें टळलीं व नुकतीच कुठें ती सुखाचा श्वास घेऊं लागली होती कीं तिच्या डोक्यावर पुन्हां आकाश कोसळलें आहे. आतां मी आपलें दुःख कोणासमोर उघडून सांगूं? मी वाटेल तें प्रायश्चित्त करायला तयार आहें."

अभिरामस्वामी म्हणाला—"तूं जें जें केलेंस त्यांत चूक कोणती नव्हती हें प्रथम सांग." विमला काय बोलणार? विरेंद्र-सिंहांची मुलगी व मानसिंहांचा मुलगा, नव्हें युवराज यांचा प्रेमविवाह बरोबर नाहीं







हें विमलाला माहीत होतें. वास्तव तिलोत्तमेच्या मनांत प्रेमांकुर रुजल्याबरोबर तो तिनें उपटून टाकायला हवा होता. तिनें तें केलें नाहीं. तिलोत्तमा कोण हें शैलेश्वराच्या देवळांतून जाते वेळीं जगतसिंहाला कोठें माहीत होतें ? ती गोष्ट तेथल्या तेथें राहून गेली असती तर कांहीं बिघडलें नसतें. पण विमलानें पंधरा दिवसांनीं येऊन भेटायला जगतसिंहाला सांगितलें होतें. तेव्हां ती तिलोत्तमा कोण कोणाची हें सांगणार होती. नंतर अभिरामस्वामीनें नापसंती दाखविली तरी ती जगतसिंहाला भेटली व तिलोत्तमेचा परिचय दिला. तिलोत्तमेशी भेट घडवून देण्याचें वचन दिलें ती दुसरी चूक. वीरेंद्रसिंहाची ती पत्नी होती म्हणून तिला मोगलांच्या एका सेनापतीला, म्हणजे जगतसिंहाला किल्ल्यांत घेऊन येण्याचा अधिकार नव्हता. त्यानंतर पठाण किल्ल्यांत शिरले व जें कांहीं झालें त्या सर्वाला जबाबदार विमलाच होती. एकूण सुरवातीपासून शेवटपर्यंत ती चुका करीत गेली.

विमला निरुत्तर झाली. अभिरामस्वामींचे पाय धरून तिनें क्षमा मागितली व म्हणाली—"पण पुढचा मार्ग तुम्हीच काढला तर निघेल. मी कान धरला."

"मी पाठविलेला मनुष्य येईपर्यंत कांहींच ठरवितां येणार नाहीं. मानसिंहांना राग मुलावर कोणत्या कारणास्तव आहे हें कळल्यावरच कांहीं उपाय करतां येईल." अभिरामस्वामी म्हणाला.

"तो मनुष्य परत यायला किती दिवस लागतील ?"

"उद्यां येऊं शकेल. पाटण्यापर्यंत त्याला जावेंच लागलें तर आठवडादेखील लागेल."



"आठवडा ? तोंपर्यंत तिलोत्तमेच्या जिवाचें काय होईल, तें देवच जाणें !"

"तूं जाऊन तिला धीर दे ! उद्यां सकाळीं मी येऊन तिच्याशीं जें बोलावयाचें तें बोलेन." अभिरामस्वामी म्हणाला.

"मानसिंह आपल्या पोटच्या मुलावर दया करणार नाहींत का ?" विमलानें विचारलें.

"हा कुळाभिमान व स्वाभिमान आहे. मग मुलगा असो कीं आणखी कोणी !"

"शेवटीं काय होईल तें त्या परमेश्वरालाच माहीत !"

"येऊन जाऊन तूं एक बाईच. तुला ही गोष्ट न कळणेंच बरें !"

"मानसिंह कदाचित तुमच्या शब्दाला मान देतील. तुम्ही जाऊन शब्द टाकलांत तर मानसिंह कदाचित कबूल होतील."

"कांहीं फायदा होईल असें नाहीं मला वाटत. उलट मी कांहीं बोललों तर काम बिघडण्याची शक्यता आहे. पुष्कळ उशीर झाला. आतां तूं जा आणि उद्यां सकाळीं ये." असें सांगून अभिरामस्वामींनीं विमला व असमानीला निरोप दिला.



पाटण्याला गेलेला मनुष्य सर्व माहिती काढून घेऊन आला. युवराजांना जन्मठेप कारागृहाची शिक्षा झाली असल्याचें ऐकून सर्व निराश झाले.

अभिरामस्वामी कांहीं विचार करून म्हणाला—"बरें तर मी तीर्थयात्रेला निघतों," आणि निघाला पण. तो कोणत्या कामावर निघाला असावा याची अंधुक कल्पना विमलेला होती.

तिलोत्तमेच्या डोक्यावर जणुं कांहीं आकाशच कोसळल्यासारखें होतें. तिला जेवणखाण सुचलें नाहीं कीं रोजचीं कामें

करण्याचा उत्साह राहिला नाहीं. पती तुरुंगांत मग ती पलंगावर कशी झोंपणार? उघड्या जमिनीवर झोंपूं लागली. तिचा सुखाचा संसार स्वप्नासारखा सुरू झाला व स्वप्नासारखाच अदृश्य झाला. आतां तिला जें दुःख सहन करावें लागत होतें त्यांत तिला आशेचें किरण एक देखील दिसत नव्हतें. पतिदर्शनाचें भाग्य या आयुष्यांत नाहीं अशी तिच्या मनाची खात्री झाली होती.

चारी बाजूंनीं निराश झालेल्या माणसांत एकाएकीं एक निराळ्याच स्वरूपाची अनपेक्षित अशी शक्ति उत्पन्न होते. तद्वतच तिलोत्तमेचें झालें. विमला व पिता वीरेंद्रसिंह यांच्या पंखाखालीं राहाल्यानें तिला कधीं कोणत्याहि संकटाची पर्वा करण्याची गरज नव्हती. नंतर संकटें आलीं त्यांच्यासमोर मान वांकवून तिला चालावें लागलें. परंतु हें संकट अगदीं निराळ्या स्वरूपाचें होतें. दुःख करीत रडत बसल्यानें पतीवरचें संकट टळणें शक्य नव्हतें. तिची झोंपलेली कर्तृत्वशक्ति जागी झाली.

तिनें दासीला बोलावून दऊत, टांक व कागद मागविला व आयशाला पत्र लिहिलें. त्यांत मानसिंहांचा कोप झाल्यानें पति त्यांच्या तुरुंगांत कष्ट सहन करीत असल्याचें लिहून तिनें पुढें विनंतीसूचक लिहिलें होतें कीं 'युवराजांच्या हितैषी व शुभचिंतक व्यक्तींत तुम्ही एक आहां असें समजून तुम्हांला हें पत्र लिहीत आहें. तुम्ही काय करावें व तुम्हांला करतां येण्यासारखें काय आहे, याची कल्पना मला नाहीं.

असें पत्र लिहून तें बंद केलें व तें घेऊन झपाझप पावलें टाकीत ती खोलीत निघून गेली. (पुढील गोष्ट पुढील अंकीं)





# सर्वनाश

विक्रमार्कानें आपला हट्ट सोडला नाहीं व झाडाजवळ जाऊन प्रेत खांद्यावर काढून घेऊन स्मशानाकडे मौनपणें चालूं लागला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला— "राजा! तू इतके कष्ट सहन करीत आहेस हे कोणत्या तरी बाईच्या नादीं लागून तर नव्हेत! कारण तुला माहीतच असेल स्त्रीजातीच्या नादीं लागून कित्येक थोर पुरुषांनादेखील भयंकर संकटांना तोंड द्यावें लागलें आहे. याचें उदाहरण म्हणून कांचनप्रभा नांवाच्या एका स्त्रीमुळें कुंडलदेशाचा कसा सर्वनाश झाला याची गोष्ट मी तुला सांगतों." असें सांगून वेताळ गोष्ट सांगूं लागला.

कुंडलदेशाच्या गादीवर रत्नकुंडल नांवाचा एक राजा राज्य करीत असे. तो सामान्य राजा नसून राजाधिराज होता. राजाचा

**वेताळाच्या गोष्टी**



प्रताप त्याच्या बारा शूरवीर सरदारांमुळें होता. राजा आपल्या मंत्र्यांहून त्यांचा आदर जास्त करीत असे. कारण आपल्या राजाच्या शब्दावर प्राणोत्सर्ग करण्याची त्यांची तयारी होती.

एकदां दरबार भरला असतां दरबारी कवीस कन्यारत्न झाल्याची मंगलवार्ता कळली. लगेच दरबारी लोकांनीं ज्योतिष्याला तिची जन्म कुंडली तयार करून तिचें भविष्य सांगायला आग्रह केला. ज्योतिष्यानें भविष्य सांगितलें. म्हणाला—"ही मुलगी एक त्रिलोकसुंदरी होईल. परंतु आपल्या राज्याच्या सर्वनाशाला ती कारण होईल. ती पाऊल ठेवील तें स्थान घातक ठरेल."

तें भविष्य ऐकून सर्व दरबारी म्हणाले—"देश रक्षणासाठीं मोठ मोठे वीर आपल्या प्राणाची आहुति देण्यास तयार असतां एका टीचभर मुलीची काय कथा? तिचा कांटा मुळांतच उपटून टाकलेला बरा."

पण रत्नकुंडल राजा म्हणाला—"एका अर्भकाचा असा अमानुषपणें वध करणें मला पसंत नाहीं. तिला निर्जन स्थानीं मी ठेवून देतों व ती वयांत आल्यावर मी तिच्याशीं लग्न करून घेईन. तिला जगांत कोणाचें तोंड पहावयास मिळणार नाहीं कीं तिचें तोंड कोणाला दिसणार नाहीं या गोष्टीची जबाबदारी मी स्वतःवर घेतों."

त्याप्रमाणें राजानें एका निर्जन स्थानीं एका दरींत घर बांधून तेथें त्या मुलीला ठेवलें व तिच्या रक्षणासाठीं तीन दासींना नेमलें आणि रात्रंदिवस पाहारा ठेवण्यासाठीं त्यानें शूर शिपाई नेमले. राजाशिवाय इतर कोणालाहि त्या दरींत पाऊल टाकायला सक्त मनाई होती.

त्या मुलीच्या गौरवर्णाला शोभेल असें कांचनप्रभा नांव राजानेंच तिला ठेवलें. कांचनप्रभा त्याच निर्जन दरींत लहानाची मोठी झाली. तिला जगाचें ज्ञान जें कांहीं झालें तें त्या तिघी दासींपैकीं तिच्यावर जास्त प्रेम करणाऱ्या एका दासीच्या तोंडून पुराणांतल्या प्रेमकथा ऐकून झालें. स्वतःच्या सौंदर्याचीपण तिला चांगली जाणीव झाली व त्याचबरोबर कोणत्यातरी गोष्टीची उणीव भासूं लागली. ती एकदां त्या दासीला म्हणाली—"काय ग? जेव्हां पहावें तेव्हां पुरुषाच्या नांवानें मला हा थेरडा राजा दिसतो. जगांत तरुण पुरुष नाहींतच का?" राजा लवकरच कांचनप्रभेशीं लग्न करणार आहे ही गोष्ट त्या दासीला माहीत होती. म्हणून तिला तिची कींव आली व म्हणाली—"तरुण सुंदर पुरुष या जगांत कां नाहींत? महाराज येतात त्या वाटेवरच्या दारावर पाहाऱ्यासाठीं एक तरुण वीर नेहमीं उभा असतो. त्या वीर पुरुषाला पाहल्यावर स्वर्गांतल्या अप्सरादेखील स्वतःला त्याच्यावर ओंवाळून टाकतील."



कांचनप्रभेच्या मनाला एक क्षण भर देखील धीर धरवेना. लगेच जाऊन त्या तरुण वीराला एकदां तरी पाहून यावें असें तिनें मनाशीं ठरविलें. सुदैवानें सायंकाळची वेळ होती व राजा येण्याची वेळ निघून गेली होती. एक जाड शाल अंगावर पांघरून घेऊन कोणाला कळविल्याशिवाय ती घराबाहेर पडली.

तिला दरींत प्रवेश करण्याचें द्वार दिसलें. त्या द्वारावर उभा असलेला पाहारेकरी सामान्य पाहारेकरी नसून एक तरुण सुंदर शूर पुरुष होता. त्याचे दोघे भाऊ राजाच्या खास बारा सरदारांपैकीं दोन प्रमुख सरदार होते. त्याला सैन्यांत तो मान मिळाला नसला तरी आपलें शौर्य व साहस दाखवून उच्चपदावर पोंचण्याची

महत्वाकांक्षा मात्र त्याच्या मनांत होती. त्याचें वय अवघें वीस वर्षांचें होतें. त्याचें नांव केदार असें होतें.

केदारनें दुरून त्या गुप्तगृहांतून त्याच्याकडे येत असलेल्या एका स्त्रीला पाहिलें. त्या तिर्घींपैकीं एक असावी असें त्याला वाटलें. तो आपल्या गुप्तस्थानांतून बाहेर आला आणि तिला सामोरा गेला.

दोघं परस्परांसमोर येतांच कांचनप्रभेनें अंगावरची शाल काढून घेतली. तिचें अप्रतिम सौंदर्य पाहून केदार व त्याचें सौंदर्य पाहून कांचनप्रभा दोघं मंत्रमुग्ध होऊन परस्परांकडे पहात उभी राहालीं. शेवटीं केदार एकाएकीं म्हणाला—"तूं माझ्याबरोबर यायला तयार आहेस का? आपण लग्न करून कोठेंतरी निघून जाऊं."

राजाचें नांव ऐकूनच कांचनप्रभेच्या अंगावर शहारे उभे राहात असत. परंतु त्या तरुण वीराला पाहून तिला वाटलें कीं तो बरोबर असेल तर प्रत्यक्ष यम आला तरी त्याची भीति वाटणार नाहीं. म्हणून ती त्याला म्हणाली—"तुझ्याबरोबर तूं म्हणशील तिकडे मी जायला तयार आहें."



कांचनप्रभेला बरोबर घेऊन केदार मध्यरात्र उलटून गेल्यावर आपल्या दोघां भावांकडे गेला व त्यानें कांचनप्रभेशीं लग्न करण्याचें वचन दिलें असल्याचें व त्यासाठीं वाटेल तिथें जाण्याची तयारी असल्याचें त्यांना सांगितलें.

त्याची चूक भयंकर मोठी होती. पण दोघे भाऊ आपल्या धाकट्या भावाला म्हणाले—"तुम्ही दोघांनीं परस्परांशीं लग्न करून घ्यायचें ठरविलेंच असेल तर आमची ना नाहीं. परंतु या राज्याच्या हद्दींत तुम्हांला राहतां येणार नाहीं. शेजारच्या कोणत्याहि राजाकडे तुम्हांला थारा मिळणार नाहीं. तरी चला यत्न करून पाहूं या पहाटे उठून आपल्या राज्याची हद्द पार करून गेलात तर सुटाल कदाचित. आम्ही पण येतों तुमच्याबरोबर तुमच्या रक्षणासाठीं."

त्यांना कोणत्याहि राजाकडे थारा मिळाला नाहीं. कारण त्यांना आश्रय दिल्याची गोष्ट रत्नकुंडल राजाला कळल्याशिवाय राहणें शक्य नव्हतें व एकदां कळल्यावर तो त्यांचें राज्य नष्ट करील यांतहि त्यांना शंका नव्हती. एकामागून एक अनेक राजांच्या दरबारीं ते गेले. परंतु त्यांना घोटभर पाणी मिळणें-





देखील अशक्य झालें. ते एका देशांत कांहींतरी कामधंदा करण्याचें ठरवून तेथें राहूं लागले. परंतु त्यांच्यावर आणखी एक संकट आलें. त्या देशांतील कांहीं तरुणांची नजर कांचनप्रभेच्या सौंदर्यावर पडली व त्यांनीं तिला पळवून नेण्याचा घाट घातला. त्यांनीं यत्न करून पाहिला व त्यांना केदार व त्याच्या दोघां भावांनीं ठार केलें. एकूण त्यांना तो देशसुद्धां सोडून पळून जावें लागलें.

तिकडे रत्नकुंडल राजानें जाहीर केलें कीं केदार व त्याच्या भावांनीं जो राजद्रोह केला आहे त्याकडे दुर्लक्ष करून त्यांना क्षमा केली जात आहे. त्यांना स्वदेशीं येण्यास व निर्धास्तपणें राहण्यास माझी परवानगी आहे. ती गोष्ट ऐकून इतर सरदारांना फार आनंद झाला. कारण केदारचे दोघे भाऊ निघून गेल्यावर त्याच्या मित्रांना फार वाईट वाटलें. परंतु कोणाची तोंड उघडून बोलण्याची छाती नव्हती. राजाज्ञा झाल्यावर सरदारांपैकीं तिघांनीं केदार व त्याच्या दोघा भावांचा पत्ता काढला व जाऊन भेटले व म्हणाले—"आतां राजाज्ञा झाली आहे. चला परत स्वदेशीं!"

"त्यांच्या बोलण्यावर विश्वास करूं नका. त्यांत कांहींतरी धोका आहे!" कांचनप्रभेनें तिघां भावंडांना सावध केलें.

"आम्ही राजाचे गुप्तचर नाहीं. फसवेगिरीचा धंदा आम्ही आयुष्यांत केला नाहीं. युद्ध करणें हा एकच धंदा केला या तिघांच्या जिवाला कांहीं धोका आहे असें आम्हांला कळल्यास आम्ही प्राणपणानें त्यांचें रक्षण करूं." तिघे सरदार म्हणाले.

"राजाचा खरा हेतू तुमच्या मित्रांना देखील कळलेला नाहीं." कांचनप्रभा पतीला व दोघां दीरांना म्हणाली.

तिचें बोलणें तिच्या दोघां दीरांना आवडलें नाहीं. म्हणाले—"आपल्या मनांतली भीति आमच्या मनांत ओतण्याचा यत्न कशाला करतेस? आपल्या सख्या मित्रांबरोबर युद्ध करीत असतां मरण आलें तर तें आम्हांला जास्त आवडेल."

सर्व स्वदेशीं परतले. कांचनप्रभेचें म्हणणेंच खरें ठरलें. केदार व त्याच्या बंधूंना त्यांच्या सरदार मित्रमंडळींपासून वेगळे करण्यासाठीं राजानें एक युक्ति केली. राजानें आपल्या खास दरबारी मंडळींना मेजवानी दिली. सर्व सरदार हजर होते. कांचनप्रभा व तिघे बंधू घरीं एकटे आहेत हें पाहून ठरल्याप्रमाणें कांहीं लोकांनीं त्यांच्या घराला गराडा घातला. परंतु तिघां शूर बंधूंसमोर त्यांचा किती वेळ टिकाव लागणार. त्यांतले कित्येक मेले व बाकी पळून गेले.

तेवढ्यांत राजाचा एक खास अधिकारी तिघां बंधूंना येऊन भेटला व म्हणाला कीं तुमच्या घरांवर कांहीं भामट्यांनीं हल्ला केल्याचें महाराजांना कळलें व त्यांना त्यांचें फार वाईट वाटलें. या संकटांतून तुमचा बचाव झाला हें ऐकून महाराजांनीं तुमचा



खास सत्कार करण्याचें ठरवून तुम्हांला आदरपूर्वक बोलावून घेऊन यायला सांगितलें आहे.

त्या अधिकाऱ्याच्या बोलण्यावर विश्वास करून तिघे बंधू घराबाहेर पडले. लगेच राजाच्या शिपायांनीं त्यांना कैद करून एकांतांत राजासमोर उभें केलें. "या तिघांना शिरच्छेदाची मी शिक्षा देतों." राजा म्हणाला.

राजाज्ञेप्रमाणें तिघांना शिक्षा देण्यांत आली. कोणाला ती गोष्ट कळलीदेखील नाहीं. तरी इतकी महत्वाची गोष्ट लपते








कशी. कांहीं सरदारांना ती गोष्ट कळली व त्यांनी वध्यस्थानीं जाऊन तिघांचीं प्रेतें स्वतःच्या डोळ्यांनीं पाहिली. त्यांच्याबरोबर कांचनप्रभा पण गेली होती. पतीचें प्रेत पाहून तिच्या हृदयाला धक्काच बसला.

राजानें क्षुद्रबुद्धीनें केलेलें हें काम त्याच्या कांहीं सरदारांना आवडलें नाहीं व त्यांनीं बंड केलें. राजा कांहीं गुन्हा करीत नाहीं असें पंचांचें म्हणणें पडलें. "पंच काय बरळतात ?" असें कांहीं सरदारांचें म्हणणें होतें. दोन तट पडले. सैन्यांत देखील दोन तट पडले. शेवटीं त्यांचें परस्परांशीं युद्ध पण झालें व जें व्हायचें तेंच झालें. त्या युद्धांत स्वतः राजा मेला व राज्य नष्ट झालें.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"राजा! या सर्वनाशाला कारण कोण ? व कोणाचा दोष किती ? उत्तर माहीत असून तूं दिलें नाहींस तर त्याचा परिणाम तुला माहीत आहेच, तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळूं लागतील."

विक्रमार्क म्हणाला—"सर्व चूक राजाची. ज्योतिष्यांनीं भविष्य वर्तवल्यावर सरदारांच्या सांगण्याप्रमाणें त्यानें केलें नाहीं. एक अपूर्व सुंदरी सहजीं आपली पत्नी होईल या आशेनें त्यानें तिच्या रक्षणाचें सोंग केलें. पण त्याचा तो डाव फंसला. पुढें त्यानें आपल्या सरदारांना विश्वासघातानें ठार करविलें. सर्वनाशाचें बी त्यानेंच पेरलें. म्हणून दोषी तोच."

अशातऱ्हेनें राजाचें मौन भंग झाल्यावर वेताळ प्रेताबरोबर नाहींसा झाला व जाऊन झाडाला लोंबकळूं लागला. (कल्पित)





# स्त्रीला आवडणारी वस्तु

एकदां एक राजा आपल्या राणीसह उद्यानांत विहार करायला गेला असतां राणीनें राजाला विचारलें—"महाराज! स्त्रीजातीला आवडणारी वस्तु कोणती, सांगा पाहूं !"

राजा नुकत्याच उमललेल्या फुलांच्या कळ्याकडे पाहून म्हणाला—"फुलें !"

"नाहीं!" राणी म्हणाली.

स्त्रीला सर्वांत जास्त आपला पती, आपलीं मुलें, आपले दागिने, आपलीं लुगडीं अशीं एकामागून एक नांवें राजा सांगत गेला. पण राणी म्हणाली—"नाहीं!"

राणीच्या प्रश्नाचें बरोबर उत्तर काय हें कळलेंच पाहिजे असें राजानें मनाशीं ठरविलें व बरोबर उत्तर देणाऱ्याला एक हजार वराह बक्षिस मिळेल असेंदेखील जाहीर केलें.

दुसऱ्या दिवशीं राजवाड्यासमोर राणीच्या प्रश्नाचें बरोबर उत्तर देण्याच्या हेतूनें आलेल्या लोकांची गर्दी जमा झाली. परंतु, राणीच्या मनाला समाधानकारक उत्तर न देणारास पंचवीस फटक्यांची शिक्षा देण्यांत येईल असा राजानें हुकूम काढला म्हणून कोणीच उत्तर द्यायला तयार झालें नाहीं व सर्व आपापल्या घरीं निघून गेले.

राजाला त्या गोष्टीचा राग आला व त्यानें आणखी एक दवंडी पिटविली. राजा उद्यां सकाळीं एक कबूतर सोडील. तें ज्या घरावर जाऊन बसेल त्या घरांतल्या माणसानें उत्तर दिलें पाहिजे. राणीला तें उत्तर पसंत न पडल्यास उत्तर देणारास फांशीची शिक्षा दिली जाईल.

पहिली दवंडी ऐकून लोकांना जितका आनंद व उत्साह वाटला होता तितकीच

निराशा व भीती दुसरी दवंडी ऐकून वाटली. राजा दररोज सकाळीं कबूतर सोडून एकेका घरच्या माणसाला फाशी देणार अशी राजधानींतल्या प्रत्येकाला धास्ती बसली.

दुसऱ्या दिवशीं राजानें सोडलेलें कबूतर एका खेडेगांवांतल्या एका झोंपडीवर जाऊन बसलें. राजाचे शिपाई त्या झोंपडी जवळ गेले. जाऊन पाहतात तर घरांत एक मुलगा जाळें विणीत बसला होता. शिपायांनीं त्यालाच धरलें आणि राजासमोर हजर केलें.

राजानें त्याला धरून आणण्याचें कारण राणीचा प्रश्न व त्याचें राणीला समाधानकारक असें उत्तर न दिल्यास होणारा परिणाम वगैरे सर्व गोष्टी सांगितल्या.

"पंधरा दिवसांनीं बरोबर उत्तर देतों!" असें तो मुलगा म्हणाला. राजानें त्याला पंधरा दिवसांची सवड दिली. ते पंधरा दिवस त्यानें कित्येक स्त्रियांना त्यांना सर्वांत जास्त आवडीची वस्तु कोणती हें विचारलें. काहींनीं दागिने सांगितले, कांहीं मुलें म्हणाल्या, कांहीं नातवंडें म्हणाल्या. त्यांनीं सांगितलेलीं सर्व उत्तरें सर्वांना माहीत अशींच होतीं.

अगदीं एकच दिवस उरला होता. आतां आपल्याला मरण हें आहेच. देवाच्या भरंवशावर सर्व टाकावें असें ठरवून तो विचार करीत एका सरोवराच्या काठीं बसला असतां तिकडे एक म्हातारी आली व त्याला एकटाच बसलेला पाहून थांबून म्हणाली—"कायरे मुला कोणत्या विचारांत बसला आहेस?" त्यानें म्हातारीला त्याच्यावर ओढवलेला प्रसंग वर्णन करून सांगितला.

ती म्हणाली—"प्रश्नाचें उत्तर अगदीं सोपें आहे!"

"आजीबाई! काय तें सांगाल तरी!" त्यानें चकित होऊन विचारलें.

"आणखी काय असणार? नवऱ्यावर अधिकार! ती राणी पहा नवऱ्याला कशी नाचवीत आहे ती." असें सांगून व आपली काठी टेकीत म्हातारी निघून गेली. दुसऱ्या दिवशीं राजानें त्याला पुन्हां तोच प्रश्न विचारला—"स्त्रीजातीला सर्वांत प्रियवस्तु कोणती?"

"नवऱ्यावर अधिकार!" तो मुलगा म्हणाला.

राजा तें उत्तर ऐकून मनांतल्या मनांत थोडा दचकून म्हणाला—"मला नाहीं वाटत!"

"राणीसरकारांनीं एका लहानशा प्रश्नाचें उत्तर मिळविण्यासाठीं तुमच्याकडून एवढी धांवपळ करविली ही गोष्ट पुरे नाहीं का माझें उत्तर बरोबर आहे कीं नाहीं हें कळायला?" मुलानें विचारलें.

"त्यानें दिलेलें उत्तर बरोबर आहे ना!" राजानें राणीला विचारतां तिनें फक्त मान हलवून होकार दिला.

राणीच्या मनाचें समाधान झाल्याचीं खात्री पटल्यावर राजानें त्या मुलाला एका ऐवजीं दोन हजार वराह देऊन निरोप दिला.







# आठ खुजे

मलय समुद्राच्या किनाऱ्यावर महावीर नांवाचा एक योद्धा रहात असे. त्याच्या पराक्रमाचा गोष्टी जगभर प्रसिद्ध होत्या. एकदां महावीर समुद्रकाठीं फिरत असतां त्याला कोणीतरी समुद्रांतून किनाऱ्याकडे येत असलेला दिसला. त्याचा भव्य देह पाहून तो महाकाय द्वीपाचा राहणारा असावा हें ओळखायला महावीराला वेळ लागला नाहीं. तो महाकाय समुद्रकिनाऱ्यावर येतांच महावीरानें त्याला विचारलें—"कोण तुम्ही? कोठून आलांत? काय पाहिजे तुम्हांला?"

"मी महाकाय द्वीपाचा राहणारा. आमच्या राजानें महावीर नांवाच्या महा पराक्रमी वीराला भेटून येण्यासाठीं मला पाठविलें आहे." तो म्हणाला.

"तो महावीर का? कोठें तरी शिकारीला गेला आहे. काय काम आहे हें सांगितलेंत तर तो आल्यावर त्याला मी कळवीन." महावीर म्हणाला.

"आमच्या राणीसरकारांचा प्रसवकाळ जवळ आला आहे. त्यांना आतांपर्यंत दोन मुलें झालीं. पण दोघां मुलांना जन्मल्याबरोबर कोणी तरी उचलून घेऊन गेला. आतां जें मूल होईल त्याचें रक्षण करण्यासाठीं महावीरानें यावें अशी महाराजांची इच्छा आहे. म्हणून महाराजांनीं मला पाठविलें आहे. या पूर्वी महाराजांनीं मुलांच्या रक्षणासाठीं कित्येक शूरवीर नेमले. परंतु चोर कोण, कोठून व कसा आला आणि मुलांना घेऊन गेला हें कोडें अद्याप उलगडलें नाहीं." महाकाय म्हणाला.

"बरें तर तो महावीर आल्यावर त्याला मी हा निरोप सांगेन." महावीर म्हणाला.

महाकाय आला होता तसाच परत समुद्रांतून निघून गेला. दुसऱ्या दिवशीं महावीर त्याच जागीं हिंडत असतां त्याला आठ खुजे खेळत असलेले दिसले. त्यानें त्यांना विचारलें—"कोण तुम्ही?"

"आम्ही खुजे आहों. आमच्या पैकीं प्रत्येकाला एकेक दिव्य शक्ति प्राप्त आहे. मला दगड म्हणतात. कारण मी एका जागीं बसलों कीं तेथून मला बाजूला सारणें कोणाला शक्य नाहीं." खुजांपैकीं एकजण म्हणाला.

"पाहूं तर दे मला तुझी ती शक्ति!" महावीर म्हणाला. दगड एका जागीं बसला. महावीरानें त्याला एका हातानें ढकलण्याचा यत्न करून पाहिला. दोन्ही हातांनीं ढकलून पाहिलें. दगडाच्या दिव्यशक्तीची खात्री पटल्यावर चकित होऊन त्यानें इतरांना त्यांच्या शक्तीचें वर्णन विचारलें.

एकाचें नांव दिव्यकर्णी होतें. समुद्रापलीकडे कोणी कांहीं बोललें तरी तें त्याला ऐकूं येई. आणखी एकाचें नांव दिव्यस्पर्शी होतें. समुद्रापलीकडे मुंगी चावली तरी



त्याला तें कळें. तिसऱ्याचें नांव महाज्ञानी होतें. जगांत घडणारी प्रत्येक गोष्ट त्याला कळे. चौथ्याचें नांव लघुहस्ती. कोंबडी अंडीं उबवीत बसली असली तरी तीं तिच्या पोटाखालून तिच्या नकळत उचलून नेण्याची शक्ति त्याच्या अंगांत होती. पांचव्याचें नांव आरोहक होतें. कांचेची गुळगुळीत उभी भिंत असली तरी ती चढून ओलांडून तो जात असे. सहावा धनुर्विद्येंत निष्णात होता. शेंकडों पक्षी आकाशांत उडत असले तरी त्यांतल्या पाहिजे असेल त्या पक्ष्याला नेम मारून तो खालीं पाडीत असे. सातव्याचें



नांव दारुब्रह्म होतें. त्याच्या हातांत काठी देऊन त्या काठीची वाटेल ती वस्तु तो तयार करून दाखवी.

महावीरनें दारुब्रह्मला विचारलें—“ समज, तुला एक जहाज तयार करायला सांगितलें तर किती वेळ लागेल ? ”

तो म्हणाला—“ तुम्हीं स्वतः भोंवती एक प्रदक्षिणा करून माझ्याकडे वळण्यापूर्वीं जहाज तयार होईल.”

“ तयार कर पाहूं ! ” असें म्हणून महावीर स्वतः भोंवती फिरला. त्याची पाठ फिरतांच दारुब्रह्मनें एक गवताची काडी पाण्यांत फेंकली. पाहिलें तर खरोखरच एक जहाज पाण्यांत तरंगत होतें.

“ मला महाकाय द्वीपांत जावयाचें आहे. येतां का माझ्या मदतीला ! ” त्यानें त्या खुजांना विचारलें.

“ येतों ! ” असें ते म्हणाले व महावीराबरोबर जहाजांत बसले. सर्व महाकाय बेटावर येऊन पोंचले. महावीर आल्याची वार्ता ऐकून राजा त्याच्या व त्याच्या खुजा मित्रांच्या सत्कारासाठीं आला. तो महावीराला म्हणाला—“ तुम्ही कसे अगदीं वेळेवर आला आहां. आजच राणी सरकारांच्या पोटांत दुखूं लागलें आहे. पूर्वीं मला दोन मुलें झालीं परंतु रात्रीच्या रात्रीं तीं नाहींशीं झालीं. या मुलाला कोणी तसेंच उचलून नेऊं नये म्हणून मुद्दाम मी तुम्हांला तसदी दिली.”

महावीर म्हणाला—“ महाराज ! आपण भिण्याचें मुळींच कारण नाहीं. मी आपल्या मुलाचें रक्षण करूं शकलों नाहीं तर आपण माझें डोकें उडविलें तरी चालेल.”

राजवाड्यांत तिजोरीसारखी एक लोखंडी भिंतींची एक खोली राजानें करवून ठेवली होती. त्या खोलीला वारा यावा म्हणून चिमणीसारखें एक भोंक ठेवलें होतें. त्या खोलींत राणी बाळंत झाल्यावर मुलाला व सुईणीला ठेवण्यांत आलें. खोलीवर कडक पाहारा होता. महाज्ञानी महावीराला म्हणाला—

“ मुलाचें रक्षण करूं शकलो नाहीं तर डोकें कापून घ्यावें अशी प्रतिज्ञा करून तूं मोठी चूक केलीस. त्या मुलाचें रक्षण करणें आपल्याला शक्य नाहीं.”

“ तुला सर्व कळलें आहे तर ? ” महावीरानें विचारलें.

“ राजाची बहीणच चोर आहे ! बहिणीला मंत्रशक्ती प्राप्त आहे. अदृश्यपणें येऊन ती भोकांतून मुलाला उचलून घेऊन जाईल.”

त्याप्रमाणें ती आली व तिनें हात घालून मुलाला उचललें तर काय करावयाचें हें महावीरानें सुचविलें.

अर्धी रात्र लोटल्यावर दिव्यकर्णी म्हणाला—“ महाकाय राजाची बहीण आपल्या किल्ल्यांतून निघाली आहे. पूर्वीं चोरून नेलेल्या मुलांवर चांगला पाहारा ठेवायला आपल्या नोकरांना बजावून सांगत आहे. तिच्या घराला खिडक्या किंवा दारें नाहींत. तिच्या किल्ल्याच्या भिंती कांचेसारख्या तुळतळीत आहेत.” थोडा वेळ



थांबून दिव्यकर्णी म्हणाला—“ ती येऊन पोंचली. पाहारेकऱ्यांना ती किल्ल्यांत शिरल्याचें कळलें देखील नाहीं.”

नंतर एक काळा हात भोकांतून आंत शिरतांना दिसला. तो पाहून दगड नांवाच्या खुजानें तो धरून ठेवला व भोकाच्या तोंडावर बसून राहिला. हात मागें सरकण्याच्या प्रयत्नांत तुटला. सर्व चकित होऊन तो तुटलेला हात पाहूं लागले. ती संधी साधून त्या राक्षसीण बहिणीनें दुसऱ्या हातानें मुलाला पाळण्यांतून उचलून घेतलें आणि निघून गेली.